भारत–इतिहाससंशोधक--मंडळ, पुणें

पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक तीन

श्रीछत्रपती शिवाजी महाराज यांच्या आज्ञेवरून लिहिलें

कवीन्द्र परमानन्दकृत

# श्रीशिवभारत

[ संस्कृत मूळ व मराठी भाषांतर ]

---

संपादकः—सदाशिव महादेव दिवेकर

सभासद भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें.



# श्रीशिवभारत.

उदारशब्दसन्दर्भं भूरिभावार्थमद्भुतम् ।
माधुर्यादिगुणोपेतमलङ्कारैरलंकृतम् ॥१७॥

निचितं धर्मशास्त्रार्थैरर्थशास्त्रसमन्वितम् ।
विश्रुतं सर्वलोकेषु पुराणमिव नूतनम् ॥ १८ ॥

प्रणिपत्य प्रवक्ष्यामि महाराजस्य धीमतः ।
चरितं शिवराजस्य भरतस्येव भारतम् ॥ २२ ॥

अध्याय १

## श्रीशिवाजी महाराज

उष्णीषेणैव शुचिना व्यभादुत्तंसधारिणा ।

कश्मीरजपृषद्वर्षरंजितेनांगिकेन च ॥ १९ ॥

शिववर्मा भृशबलः संवृतः शिववर्मणा ।

तस्य वज्रशरीरस्य किं कार्यं तेन वर्मणा ॥ २० ॥

कृपाणं पाणिनैकेन बिभ्राणोन्येन पट्टिशम् ।

स नंदकगदाहस्तः साक्षाद्धरिरुदैक्ष्यत ॥ २१ ॥

शिवभारत अध्याय २१

शब्दचित्रकार कवीन्द्र परमानन्द.



**शिवाजी महाराज.**

(जन्म शके १५५१ फाल्गुन व. ३ शुक्रवार सायंकाळ)

खास शिवभारताकरतां, मुंबई प्रिन्स ऑफ वेल्स म्युझिअमचे ट्रस्टी यांचे परवानगीनें.

Lakshmi Art, Bombay, 8.

श्री.

# शिवभारत

## उपोद्घात

कोणाहि सद्गृहस्थाचे घरीं, एखादा महान् विभूतीचें आगमन झालें म्हणजे, गांवांतील चार शिष्ट पाचारून, अशा विभूतीचा परिचय करून देऊन स्वागत करण्याची चाल पूर्वापार फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. या शिष्टाचारास अनुसरून, या लेखानें प्रस्तुत शिवभारतरूपी ग्रंथविभूतीचा वाचकवर्गाला परिचय करून देण्याचें योजलें आहे. परंतु हा परिचय करण्याचे पूर्वीं, प्रस्तुत संपादकाची ऐतिहासिक कागद-पत्रांच्या संशोधनाकडे कशी प्रवृत्ति झाली व हा भारतग्रंथ त्यास कसा हस्तगत झाला, या गोष्टींचा अल्प इतिहास येथें दिला असतां तो अप्रस्तुत होणार नाहीं.

मला अल्पस्वल्प जो विद्येचा संस्कार झाला तो पुणें येथेंच झाला. मराठी शिक्षण नार्मल स्कूलमध्यें मिळालें व पुढचें शिक्षण गद्रे यांचे वाड्यांत न्यू इंग्लिश स्कूलमध्यें व फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. मराठी शिकत असतां "शिवाजी हा निरक्षर होता, तो लुटारू होता व त्याचे तानाजी मालुसरे, बाजी पासलकर व येसाजी कंक हे साथीदार होत" इतकाच शिवाजीचा इतिहास शिकविण्यांत येत असे व पुढील अभ्यासक्रमांत यामध्यें मुळींच भर न पडतां, इंग्रजीचे अभ्यासानें स्वभाषा, स्वधर्म व स्वेतिहास या सर्वांचा विसरच पडत असे; कारण हिंदुस्थानच्या इतिहासाचा अभ्यास म्हणजे येथें येणाऱ्या गव्हर्नर व गव्हर्नरजनरलादि अधिकाऱ्यांचीं कारकीर्दस्तोत्रें यांचेंच पठन हें होय. अशा स्थितीमुळें आपल्या महाराष्ट्राचे किंवा हिंदुस्तानचे इतिहासाच्या ज्ञानांत कोणतीहि भर पडत नसे; यामुळें आपल्या देशाच्या इतिहासाचें माझेंहि ज्ञान वृद्धिंगत झालें नाहीं. परंतु माझें शिवचरित्रप्रेम, सात आठ वर्षांचा असतां जें बसलें होतें, तें बिलकूल मंदावलें नाहीं. त्यावेळीं जो थोडा वाचनव्यासंग होता तो ऐतिहासिक व पौराणिक ग्रंथांचाच होता. अशा वाचनानें माझी प्रवृत्ति दिवसेंदिवस स्वदेशाचाच इतिहास वाचण्याकडे होऊं लागली. व मोठमोठ्या ग्रंथकारांनीं,

मराठे, मुसलमान व इंग्रज यांच्या इतिहासांत केलेला पक्षपात स्पष्ट दिसूं लागला. अशा स्थितींत काव्येतिहास संग्रहानें बारा वर्षें केलेलें तप सर्व व्यर्थ होऊन तो बंद पडला व शिल्लक राहिलेल्या अंकांस हलवायाच्या दुकानाचा मार्ग स्वीकारणें भाग पडलें. त्या वेळीं विद्यार्थीस्थितींत शेंपन्नास रुपये खर्चून मासिकाचे सर्व अंक मूळ किंमतीस विकत घेणें अशक्य होतें; पण दहाबारा रुपयांत हलवायाकडे सर्व अंक मिळण्याचा योग जमून आला व ते अंक विकत घेऊन त्यांतील बखरी, ऐतिहासिक पत्रें, यादी वगैरेंचें मननपूर्वक वाचन सुरू केलें. व आमचा इतिहास पक्षपातबुद्धीनें कसा लिहिला गेला आहे हें कोडें थोडथोडें उकलावयास लागलें. ह्या इतिहासकारांनीं शिवाजीस लुटारू कां म्हटलें आहे व मुसलमानी बादशहांनीं परधर्मभ्रष्टतेचीं व अकारण मनुष्यहानीचीं अगणित पातकें केलीं असतांहि त्यांची स्तुति कां केली आहे हेंहि नीट ध्यानीं आलें. शिवाजीचा इतिहास लिहिणें तो त्याचे काळींच लिहिलेलीं ' बखरी, शकावल्या, सनदा, पत्रें, यादी ' वगैरे साधनें जास्त मिळवून कोणातरी महाराष्ट्रीय इतिहासकारानेंच लिहिला पाहिजे अशी पक्की खात्री झाली. दोन शब्दांत सांगावयाचें म्हणजे समकालीन साधनें मिळवून त्यांचें शास्त्रीय दृष्ट्या संशोधन होऊन नंतरच कोणताहि ऐतिहासिक सिद्धांत प्रस्थापित झाला पाहिजे याची मला साक्ष पटली. अशा कारणामुळें संशोधनाच्या कामाकडे मनाची प्रवृत्ति होऊन मी त्या उद्योगास लागलों.

ही इतिहाससाधनसंशोधनप्रेरणा शके १८२० च्या सुमारास माझे मनांत उत्पन्न झाली व रोजचा व्यवहार संभाळून कागदपत्र गोळा करावयास लागलों. कोणत्याहि प्रसंगानें परमुलुखीं अगर परगांवीं गेलों म्हणजे उद्योगाचीं कामें उरकून संशोधनाचेंहि शक्य तितकें काम, कागदपत्रें मिळण्याचीं स्थलें धुंडाळून, करीत गेलों व तसेंच आजमितीपावेतों शक्त्यनुसार पैसा खर्चून ऐतिहासिक सामुग्री संपादण्याची खटपट मी चालविली आहे. इतक्या अवधीमध्यें प्रसिद्ध व अप्रसिद्ध ऐतिहासिक, पौराणिक, वैद्यकीय, गद्यपद्य ग्रंथ बरेच मिळाले. तसेंच बखरी व कागदपत्रेंहि पुष्कळच हस्तगत झालीं. त्यांमध्यें ' नारायण व्यवहार शिक्षा, सवाईमाधवरावाकरितां देशमुखाकडून लिहविलेली बखर, ज्ञानेश्वर महाराजांच्या अमृतानुभवावर संस्कृतांत लिहिलेली बरीच मोठी विस्तृत टीका व इतर ऐतिहासिक

टांचणें वगैरे ग्रंथ व लेख संशोधनाच्या पहिल्या चार पांच वर्षांत मिळाले. ही सर्व सामुग्री कै० इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांचे स्वाधीन केली. व त्यांतील कांहीं लेख त्यांनीं आपल्या मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या ग्रंथमालेंतील चवथ्या खंडांत मुद्रित करून प्रसिद्धहि केले. ही गोष्ट त्यांनीं त्याच खंडाच्या प्रस्तावनेंत स्पष्ट करून ठेविलेलीच आहे. अमृतानुभवावरील टीकाग्रंथ त्यांजकडेस दिला तो तसाच आहे. या खेरीज आजमितीपावेतों केलेल्या संशोधनांत विशेष महत्त्वाचे ग्रंथ व कागदपत्र हस्तगत झाले त्यांतील कांहींची माहिती थोडक्यांत खालीं देतों.

मुकुंदराज यांनीं मराठींत विवेकसिंधु केला आहे त्याची संस्कृतांत अनुष्टुपांत लिहिलेली समश्लोकी, चांगदेव पासष्टीची अशीच संस्कृत समश्लोकी, नरहरी मोरेश्वराचीं भारताचीं कांहीं पर्वें, समर्थबंधु रामीरामदासकृत कांहीं ग्रंथ, ज्ञानेश्वरशिष्य सत्यामलनाथ यांनीं ललितप्रबंध नांवाचा अभंगवृत्तांत केलेला सुमारें साडेबाराहजार अभंगांचा ग्रंथ, महिकावतीची बखर, बाळाजी विश्वनाथ व भाऊसाहेब यांनीं लिहिलेले व यांच्या संबंधीं बर्वे यांजकडे मिळालेले कागदपत्र, पहिले बाजीराव साहेबांची हकीकत देणारी एक बखर, पुणें दरबारांतून समशेर बहाद्दराचा मुलगा अल्लीबहाद्दर यास नाना फडणीसांनीं लिहिलेलीं मथुरेच्या पैवस्तीचीं फार महत्त्वाचीं व पाटिलबोआंच्या उत्तरेकडील व दिल्लीकडील कारस्थानांवर प्रकाश पाडणारीं बरींच पत्रें (सुमारें तीनशें,) जयरामकविकृत पर्णालपर्वतग्रहणाख्यान, भोसल्यांच्या 'संस्कृतांत लिहिलेल्या' दोन तीन विस्तृत वंशावळ्या, भटपेशवे यांची मूळ हकीकत देणारे कांहीं कागद व शिवभारत इ. इत्यादि ग्रंथ उपलब्ध झाले ते निर्दिष्ट केले आहेत. पैकीं कांहींवर येथील भारतेतिहास संशोधकमंडळापुढें टांचणें लिहून वाचलीं आहेत व कांहीं प्रसिद्धहि झाले आहेत. पर्णालपर्वतग्रहणाख्यान मी स्वतः प्रसिद्ध केलें आहे व महिकावतीची बखर तर इतिहासाचार्य राजवाडे यांनीं विस्तृत प्रस्तावनेसह स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रकाशित केली आहे. तसेंच कांहीं भारतेतिहासमंडळाच्या वार्षिक इतिवृत्तांत व त्रैमासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. वर सांगितलेला पुणेंदरबार व अल्लीबहाद्दर यांचा पत्रव्यवहार प्रसिद्ध करावा म्हणून बराच पैसा खर्चून त्याच्या मराठी शुद्ध नकला करून पत्रांच्या मिस्ला वगैरे मुकर करून देऊन

सर्व तयार केला होता. हीं सर्व पत्रें व दोन बखरी, कै०इ. सं. विनायकराव भावे यांनीं नेलीं; तसेंच त्यांनीं संस्कृतविवेकसिंधु वगैरे पोथ्याहि घेतल्या. परंतु त्यांचें प्रसिद्धीकरण त्यांच्या हातून झालें नाहीं. वरील याद पूर्ण नाहीं व पूर्ण देण्याचें हें स्थल नव्हे. या लेखाचा मुख्य उद्देश शिवभारताचें संशोधन कसें झालें हें सांगावयाचें आहे त्याकडे वळूं.

सुमारें नऊ वर्षें होऊन गेलीं. तंजावर एथील नायक राजांनीं स्थापिलेल्या व विद्याव्यासंगीं भोसलवंशजांनीं बरेच ग्रंथ संपादन करून व नवीन तयार करवून भर घालून जगविख्यात केलेल्या हस्तलेखसंग्रहाचें एक वेळ अवलोकन करावें व कांहीं संशोधन झाल्यास पहावें म्हणून तंजावर एथें गेलों. हा ग्रंथसंग्रह ‘ सरस्वतीमहाल पॅलेस लायब्ररी ’ या नांवानें प्रसिद्ध आहे. तेथें गेल्यावर या संग्रहालयांतील अव्यवस्था व बेदादपणा पाहून मन खट्टु झालें. रोज दोन चार हेलपाटे मारावे, परंतु कोणाहि लहान मोठ्या अधिकाऱ्याकडून निश्चित जबाब मिळत नसे. तथापि चिकाटी धरून तसेच वीसपंचवीस दिवस तेथें कंठले व शेवटीं तेथील व्यवस्थापकास प्रसन्न करून घेतला व संशोधनास सुरुवात केली. या प्रचंड संग्रहोदधीचें मंथन करून संशोधन करावयाचें म्हणजे कानडी, तामीळ, तेलगू, संस्कृत, मराठी वगैरे निदान पांचसात भाषांचें ज्ञान असलें पाहिजे तरच व्हावयाचें; व तेंहि बराच काळ घालविल्यावांचून होणें शक्य नाहीं. तेव्हां मुख्य आपल्या आवडीचें संशोधन म्हणजे समर्थ रामदास व शिवाजीमहाराज यांच्या समकालीन कागदपत्रांचें असल्यामुळें त्याकडेसच सर्व लक्ष दिलें. या संग्रहालयांत सुमारें पंचवीस हजार, ताडपत्रावर व कागदावर लिहिलेले निरनिराळ्याभाषेंतील, हस्तलिखित ग्रंथ आहेत. परंतु यांची विषयवार अगर नुसत्या मोजदादीचीहि सूची केलेली नव्हती. यामुळें संशोधकाची आंधळ्यासारखीच थोडी स्थिति होते, व काळहि फार फुकट जातो. चौकशी करितां मराठींत अगर संस्कृतांत समर्थ व शिवाजी यांच्या माहितीसंबंधींचे समकालीन असे ग्रंथ अगर कागदपत्रें नाहींत असें संग्रहाच्या व्यवस्थापकांनीं सांगितलें व तेथें असलेल्या ग्रंथांची त्यांस तपशीलवार कांहीं विशेष माहिती नाहीं असें मला दिसून आलें. शहाजी महाराजांच्या आयुष्याचा उत्तरार्ध सर्व कर्नाटकांत व द्रविडदेशांत स्वाऱ्या करण्यांत व सत्ता स्थापण्यांत गेला. त्याप्रमाणेंच शिवाजी महाराजांनींहि बऱ्याच स्वाऱ्या

कर्नाटकावर केल्या. व श्रीसमर्थ यांचीहि मठस्थापना ठिकठिकाणीं कर्नाटकांत व द्रविडदेशांतहि केली गेली. ही जाणीव असल्यामुळें कानडी, तामीळ, तेलगू या भाषांतील ग्रंथांत कांहीं माहिती मिळाल्यास पहावें म्हणून त्या उद्योगास लागलों. दोन तीन दिवस बरेच ग्रंथ धुंडाळल्यानंतर तामीळ भाषेंत शिवभारत या नांवाचा ग्रंथ अदमासें दोन अडीच बोटें रुंदीच्या व सुमारें दोन विती लांबीच्या ताडपत्रावर दोन्ही बाजूंनीं लिहिलेला उपलब्ध झाला. हा एक मोठा सुयोगच जुळून आला. या भारतग्रंथांतील कांहीं पृष्ठांचा सारांश तेथील व्यवस्थापकांकडून ऐकावयास मिळाला. तेव्हां हा ग्रंथ शिवाजी महाराजांची माहिती देणारा व महत्त्वाचा आहे, याचें बारकाईनें भाषांतर करून संशोधन झालें पाहिजे अशी मनाची पक्की खात्री झाली व ग्रंथ नकलून मिळविण्याचे तजविजीस लागलों. पुढें पांचसहा महिन्यांनीं या ग्रंथाची मंदिराकडून तामीळ लिपींत लिहिलेली नक्कल हातीं आली. नंतर भाषांतर करण्याची अडचण पुढें उभी राहिली. परंतु महिना दोन महिन्याच्या खटपटीनें भाषांतर करून देणारे एक सद्गृहस्थ मिळाले व हे शहाजी महाराजांचे वेळीं दक्षिणेंतील जी कांहीं घराणीं तंजावर एथें गेलीं त्या घराण्यापैकींच होते; त्यांचें नांव हणमंतराव ढोळे असून ते जी. आय. पी. रेल्वेंत एक मोठे नोकर आहेत. त्यांच्या सहाय्यानें मराठींत भाषांतर करण्यास सुरुवात केली. परंतु त्यांचा स्वतःचा व्यवसाय संभाळून भाषांतराकडे देण्यास वेळ फारच थोडा मिळे. यामुळें फार कुचंबणा होऊन भाषांतरहि पुरें शेवटास गेलें नाहीं. पुढें मुंबई येथील रा० त्र्यंबक रामकृष्ण सिधये, मिलिटरी अकाउन्टंट आफिसमधील एक नोकर, यांनीं आपल्या खात्यांतील तामीळ व्यवसायी बंधूंकडून राहिलेल्या भागाचें इंग्रजी भाषांतर पुरें करवून दिलें. याप्रमाणें बराच कालावधि लोटल्यावर हें गंजाजमनी भाषांतर संपूर्णग्रंथाचें हातीं आलें. भाषांतर जरी गंगाजमनी झालें तरी भाषांतरकारांची जन्मभाषा तामीळ असल्यामुळें व त्यांस शिक्षणसंस्कारहि चांगला झाला असल्यामुळें भाषांतर चांगलें तपशीलवार झालें. तामीळ भारतग्रंथ हातीं आल्यानंतर शके १८४१ मध्यें या बद्दलचें लहानसें टांचण भारतेतिहास संशोधक मंडळापुढें वाचलें. या भाषांतराचें मननपूर्वक वाचन करून संशोधन करावयास लागलों तेव्हां हा तामीळ ग्रंथ मूळ स्वतंत्र लिहिलेला नसून एखाद्या संस्कृत अगर मराठी महाराष्ट्रीय ग्रंथकारानें लिहि-

लेल्या एखाद्या काव्यग्रंथाचें भाषांतर असावें अशी मनाची खात्री व्हायास लागली. शिवभारत हें नांव ग्रंथास देण्याची कल्पना महाभारतावरून सुचली असावी असें वाटल्यावरून हा काव्यग्रंथ असला पाहिजे असें निश्चित वाटलें. या भाषांतरांत 'येथें दुसरा अध्याय संपला' असें लिहिलेलें आढळलें. प्रकरण समाप्तीचा हा उल्लेख या ग्रंथांत एकेच ठिकाणीं आढळला व सामान्यतः अध्याय हा शब्द काव्यग्रंथाच्या प्रकरणास लावतात, असा परिपाठ असल्यामुळें हा काव्यग्रंथच आहे, गद्य नाहीं असेंहि निश्चित ठरलें. या ग्रंथांत स्थल व व्यक्ति यांचा नामनिर्देश पुष्कळच ठिकाणीं केलेला आहे. व त्यांतील बरींच नांवें संस्कृतांत भाषांतर करून लिहिलेलीं म्हणजे त्र्याच नांवाचें संस्कृतीकरण केलेलें दिसलें. सोनोपंत या नांवाचा उल्लेख सुवर्णशर्मा असा केलेला दिसला व दुसरेहि असेच संस्कार केलेले शब्द दृष्टोत्पत्तीस आले. मूळ ग्रंथ जर तामीलभाषेंत लिहिला असता तर सोनोपंत याच विशेषनामाचा उल्लेख केलेला आढळला असता. सुवर्णशर्मा हें संस्कृतानें विकृत केलेल्या नांवाचें रूप खास उपयोगांत आणलें गेलें नसतें. ग्रंथकाराचें नांव गोविन्दभट्टाचा मुलगा परमानन्द असें ठिकठिकाणीं दिलेलें आहे. या सर्व गोष्टींवरून हा मूळ ग्रंथ तामील भाषेंत रचलेला नसून तें भाषांतर आहे, त्याचा कर्ता परमानन्द हा महाराष्ट्रीय

---

१. शहाजी महाराजांनीं कर्नाटकावर स्वारी करून तेथील राजांना आपल्या पराक्रमानें ताब्यांत आणलें असें वर्णन भारतांत आहे; त्यांत पिलुगंडाचा राजा वेंकटाप्पा यास शहाजीनें जिंकले असा उल्लेख आहे. कर्नाटकांत पिलुगंड नांवाचा देश किंवा गांव कोठेंहि नाहीं असें सर्वत्र तपास करतां समजलें; कर्नाटकाचा इतिहास देणाऱ्या ग्रन्थांतहि हें नांव मिळालें नाहीं. पुढें वेंकट या नांवाचा राजा शहाजीचे कालीं कोणी कर्नाटकांत होता किंवा काय हें शोधावयास लागलों व सेवेलच्या 'Forgotten Empire' या ग्रन्थांत वेंकट या नांवाचा राजा अनागोंदी एथें राज्य करीत होता असा उल्लेख मिळाला; तथापि अनागोंदी व पिलुगंड या नांवांचा जम कसा जमावा ही अडचण पडली. पुढें 'आने' हा शब्द कानडी भाषेंत हत्तीवाचक आहे असें समजल्यावर हें कोडें उलगडलें. संस्कृतांत हत्तीला 'पीलु' असा शब्द आहे. यावरून 'अनागोंदी' या विशेष नांवाचें 'पीलुगंड' हें संस्कृत रूपांतर होय हें उघड आहे. या अनागोंदीचें संस्कृतीकरण 'पिलुगंड' या शब्दांत केलें असल्यामुळें मूळ ग्रंथ संस्कृतच असला पाहिजे, तामील असता तर ग्रन्थकारानें या शब्दावर काव्य करण्याचा अव्यापारेषु व्यापार केला नसता. सरळ अनागोंदीचा राजा वेंकटाप्पा असें म्हटलें असतें.

आहे, मूळ काव्यग्रंथ आहे, व तो संस्कृतांत लिहिलेला असावा अशी अनुमानें निश्चित झाली व नंतर त्या दिशेनें संस्कृत ग्रंथाच्या संशोधनाचा यत्न चालविला.

याप्रमाणें शिवभारत हा ग्रंथ संस्कृत आहे अशी खात्री पटल्यावर प्रथमतः तंजावर एथील सरस्वतीमहालांतील ग्रंथसंग्रहाचे व्यवस्थापकास पत्रद्वारें त्या संबधीं विचारलें व नकारार्थींच उत्तर मिळालें. माझा धंदा मुंबई एथें मोठ्या जबाबदारीच्या व्यापाराचा असल्यामुळें संशोधनाकडे जितका वेळ द्यावयास पाहिजे तितका मिळत नसे. व यामुळें ठिकठिकाणचे संस्थांतील हस्तलेखसंग्रह तपासण्यास फार दिरंगाई होई. सबब थोडा पत्रव्यवहार करून हें काम चालविलें; परंतु तें यशस्वी झालें नाहीं. पुढें युरोपमध्यें पौर्वात्य ग्रंथसंग्रह ठिकठिकाणीं आहेत तेथें तीन चार पत्रें लिहिलीं, व जर्मनींत 'जर्मन ओरिएन्टल सोसायटी, लिप्झिग्' (The German Oriental Society, Leipzig) या संस्थेनें 'Catalogues Catalogorum by Theodor Aufrecht' या नांवानें सर्व पौर्वात्य देशांत उपलब्ध झालेल्या संस्कृत हस्तलेखांची बृहत्सूचि प्रसिद्ध केली आहे असें समजलें व या सूचीचे कांहीं भाग पुणें एथील आनन्दाश्रमाचे संग्रहालयांत पहावयास मिळाले. त्यांत कवीन्द्रकृत शिवभारताचा उल्लेख सांपडला व बर्नेलनें इ. स. १८७९ मध्यें लंडन एथें प्रसिद्ध केलेल्या तंजावर एथील संस्कृत हस्तलेखांच्या सूचीवरूनच जर्मन सूचीकारानें आपल्या सूचींत ह्या ग्रंथाचें नांव समाविष्ट केलें असल्याचें त्यांत दिल्यावरून समजलें. बर्नेलची[२] सूची पहातां या ग्रंथाचें नांव मिळालें व त्याच्या हस्तलेखाचा

---

२. बर्नेलच्या सूचीमध्यें या ग्रंथाचा तपशील सूचीच्या तिसऱ्या भागांत दिला आहे तो:--

X C III शिवभारतम्—by a Kavindra. The history of Civaraja ( i. e. Civaji ) and his family related to the people of Benares. A pure romance

( 1409 ) D. F. F. 232 Written in large hand.

( 1411 ) D. F. F. 77 This appears to be the original Ms. In disorder.

(A classified Index to the Sanskrit Mss. in The Palace at Tanjore by A. C. Burnell London 1879.)

क्रमांक B. No. 1409 असा दिलेला आढळला. नंतर बर्नेलच्या सूचींत या हस्तलेखाचा दिलेला क्रमांक तंजावर एथील संग्रहाचे अध्यक्ष यांस कळविला व चौकशी करण्याबद्दल लिहिलें व सदर क्रमांकाचा हस्तलेख संग्रहांत असल्याचें त्यांजकडून कळविण्यांत आलें. पुढें हस्तलेखाची शुद्ध नक्कल आणण्याची व्यवस्था केली. ही नक्कल हातीं येण्यास सुमारें आठ नऊ महिने लागले. नक्कल हातीं येतांच ती तामील भाषांतराशीं ताडून पहाण्यास सुरुवात केली. तामील भाषांतरांत दिलेली माहिती महाराजांनीं शृंगारपूर हस्तगत केली येथवरच आहे व संस्कृत लेखांतहि तितकीच असल्याचें दिसलें. भाषांतरांतील प्रारंभापासून शेवटपर्यंतचा क्रम संस्कृत ग्रंथांत दिलेल्या वर्णनाच्या क्रमाशीं ताडून पहातां अगदीं एकच आहे असें आढळलें. तेव्हां तामील भाषांतरकारानें भाषांतराकरितां घेतलेली मूळ संस्कृत प्रत व तंजावर एथून आलेल्या संस्कृत ग्रंथाच्या नकलेची मूळ संस्कृत प्रत ह्या दोन्ही प्रती मूळ एकाच संस्कृत ग्रन्थाच्या असल्या पाहिजेत अथवा तामील भाषांतर हें तंजावर एथील संस्कृत प्रतीवरूनच केलेलें असलें पाहिजे असें मानण्यास कांहीं प्रत्यवाय आहे असें दिसत नाहीं. असा या शिवभारत ग्रंथाच्या संशोधनाचा इतिहास आनन्दपर्यवसायी झाला तो येथें सादर केला आहे. आतां आपण या संस्कृत ग्रन्थाच्या विवेचनाकडे वळूं.

ग्रन्थस्वरूप:—या संस्कृत ग्रन्थाचे एकंदर बत्तीस अध्याय आहेत. पैकीं ३१ पूर्ण असून बत्तिसावा अध्याय त्रुटित आहे. बत्तिसाव्या अध्यायाचे शेवटीं ग्रंथसमाप्तीचें गमक नाहीं. या अध्यायांची श्लोकसंख्या अध्यायवार आहे ती अशी:—

---

३ या नकलेचे शेवटीं " इत्थं श्रीमत्तंजानगरस्थ श्रीमद्राजकीय श्रीसरस्वतीमहाल ग्रन्थानुसारेण लिखितं परिशोधितं च सत् विजयतेतराम्." असें समाप्तिवाक्य आहे.

| अध्याय | श्लोकसंख्या | अध्याय | श्लोकसंख्या | अध्याय | श्लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | ९२ | १२ | ११९ | २३ | ७२ |
| २ | ६८ | १३ | १३० | २४ | ७८ |
| ३ | ५७ | १४ | १०७ | २५ | ६७ |
| ४ | ६८ | १५ | ५३ | २६ | ७८ |
| ५ | ६० | १६ | ६५ | २७ | ५२ |
| ६ | ९६ | १७ | ७६ | २८ | ९२ |
| ७ | ३७ | १८ | ६५ | २९ | ८९ |
| ८ | ७३ | १९ | ४४ | ३० | ५१ |
| ९ | ७४ | २० | ६५ | ३१ | ७३ |
| १० | ४५ | २१ | ८६ | ३२ | ९ |
| ११ | ४९ | २२ | ७२ | | २२६२ * |

येणेंप्रमाणें अध्यायवार श्लोकसंख्या उपलब्ध प्रतींतील आहे. अध्याय सहा मध्यें शिवजन्मकालाचे श्लोक तंजावर एथील मूळ ग्रन्थाच्या हस्तलिखित पोथीच्या ज्या दोन पृष्ठांवर दिले आहेत त्या पृष्ठांचीं छायाचित्रें तयार करवून त्याचे ठसे मुद्रित करवून सहाव्या अध्यायांत घातले आहेत. या प्रतिमाचित्रांवरून मूळ प्रतीच्या प्रत्येक पानांत सुमारें साडे पांच श्लोक दिलेले आहेत असें दिसतें. तसेंच या प्रतिमांवरून मूळ पोथीचा आकार काय असावा व आंतील अक्षरवटिकेवरून पोथी कोणते काळीं व कोणत्या प्रान्तांत लिहिली गेली असावी हेंहि ध्यानांत येण्यासारखें आहे. अध्यायांचा शेवट 'इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां .... .... अध्यायः' याप्रमाणें आहे व तो पुराणें व उपपुराणें यांच्या परंपरागत अध्यायसमाप्तिदर्शक वाक्याप्रमाणेंच केलेला आहे. असें आहे तरी सर्व अध्यायांचा शेवट अगदींच वर दिलेल्या वाक्याप्रमाणें शब्दशः नाहीं. कांहीं अध्यायांत 'सूर्यवंशे शतसाहस्र्यां संहितायां' हे शब्द गाळलेले आहेत, तर कांहीं अध्यायांत 'निधिवासकर परमानन्द' किंवा 'निवासकर परमानन्द' असा उल्लेख अधिक आहे. कांहीं अध्यायांस नांवहि दिलेलें नाहीं. बत्तिसावा अध्याय त्रुटित आहे हें वर सांगित-

* अ. ७ श्लो. २५, अ. १४ श्लो. २३, अ. २९ श्लो. २५ ह्या श्लोकांचा एकच अर्थ आहे.

लेंच आहे; म्हणजे नऊच श्लोक उपलब्ध असून समाप्तीचें गमकहि नाहीं. येथें लिहिणें ऐन भरांत आल्यावेळीं अकस्मात् थांबविल्याचा भास प्रस्तुत प्रतीवरून होतो. यावरून कवीनें हा ग्रंथ असाच अर्धवट सोडून दिला असावा किंवा लेखन अर्धवट होऊन कवीवर एकाएकीं कांहीं अकस्मात् घाला आला असावा अथवा पुढील भाग लिहिलेला असून तो तंजावर एथें उपलब्ध झालेल्या प्रतींत कोणत्याहि कारणाकरितां लिहिला गेला नसावा; या तिही प्रकारांपैकीं कोणताहि एक प्रकार होणें संभवनीय आहे. प्रस्तुत हातीं आलेल्या ग्रन्थामध्यें शिवाजी महाराजांचा निर्देश 'राजा राजगिरीश्वरः' या पदानें केलेला ठिकठिकाणीं आढळतो. त्यावरून रायगडावर महाराज अभिषिक्त होण्यापूर्वींचा व राजगडावरूनच सर्व कारभार चालत असे या काळचाच हा उल्लेख असला पाहिजे हें अगदीं उघड आहे. उपलब्ध झालेल्या या बत्तीस अध्यायांत मालोजी पासून तों शके १५८३ मध्यें सूर्यराजाचें शृंगारपूर हस्तगत करून तेथें त्र्यंबक भास्करास अधिकारी नेमिलें येथपर्यंतचेंच वर्णन आहे. परंतु याहि काळानंतर घडून आलेल्या एकाच गोष्टीचा उल्लेख अ. २८ श्लो. २१।२२ मध्यें केलेला आहे. शिद्दी जोहारास विजापूरकर अदिलशहानें शके १५८३च्या अखेर मारलें तो जोहाराच्या मृत्यूचा काळ शृंगारपूरच्या स्वारीच्यानंतरचा आहे.

या ग्रंथांत ग्रन्थकारानें आपलें नांव 'कवीन्द्र परमानन्द भट्ट गोविन्द-नंदन' या शब्दांनीं ठिकठिकाणीं निदर्शित केलें आहे. यावरून ग्रन्थ-काराचें नांव परमानन्द व त्याच्या बापाचें नांव गोविन्दभट्ट असें होतें. हा आपल्यास 'निधिवासकर' किंवा 'निवासकर' असें म्हणवितो (अ० २।३।४।६।१०।१७।२३।२४ व २८ चे समाप्तिवाक्यांत 'निधिवासकर परमानन्द' व अ. ९ व १६ यांत 'निवासकर परमानन्द' असें आहे). यावरून हा नेवाशाचा राहणारा होता असें दिसतें. कदाचित त्याचें आड-नांवच नेवासकर असणें संभवनीय आहे. त्याची कुलदेवता 'एकवीरा' होती हें

एकवीराप्रसादेन लब्धवाक् सिद्धिवैभवम् ॥ १/६ ॥

एकवीरां भगवतीं। प्रणिपत्य । ॥१/२२; कृपालुःकुलदेवता। चतुर्भुजा भगवती ॥ १/४२

यावरून सिद्ध आहे. हा मोठा शास्त्रज्ञ, अध्यात्मवेत्ता व पौराणिकप्रवर म्हणजे मार्मिक पौराणिक पंडित होता ( अ. १ श्लो. ५ ते ७ ). त्याच्या विद्वत्तेमुळें व अलौकिक काव्यशक्तीमुळें त्यास कवीन्द्र ही पदवीहि मिळाली होती. शिवाय तो चांगला इतिहास—चरित्रकार होता हेंहि या भारत ग्रन्थावरून उघड होत आहे.

निधिवास म्हणजे नेवासें हें सिद्ध करणारा एक लेखी आधार उपलब्ध झाला आहे. नेवासें येथें महालया देवीचें प्रसिद्ध स्थान आहे. या महालयेचें माहात्म्य गोपाळ कवीनें ओंवीवृत्तांत वर्णिलें आहे; त्याची एक हस्तलिखित प्रत श्री. सरदार मुजुमदार पुणें, यांचे खाजगी संग्रहालयांतील मला पहावयास मिळाली. त्यांत सर्वत्र नेवासें गांवाचें नांव 'निधिवास' या नांवानेंच उल्लेखिलेलें आहे. हें स्पष्ट होण्याकरितां त्यांतील अध्याय १८ पृष्ठ ७ वरील ओंव्या खालीं दिल्या आहेतः—

प्रवरेचीया दक्षीणगिरी ॥ उभी लावण्यसींन्धु लहरी ॥
जे प्रेमे भक्तकाजकैवारी ॥ जगदेश्वरी मुळमाया ॥ ६२ ॥
यापरी सत्क्षेत्र निधिवास ॥ पीतरालागी प्रीय विशेष ॥
पींडदानकृते संतोष ॥ अत्यातत्यो होतसे ॥ ६३ ॥
नीश्चये नीधीवासा पासोनी ॥ पवित्र गंगा सुरवाहिणी ॥
अमृतावाहाप्रवरानाम्नी ॥ गोदावरीची ज...... ॥ ६७ ॥
माधव म्हणे महालय ॥ नीधीवास क्षेत्र पुण्यवर्य ॥
त्रिभवनामाजी सुखमय ॥ दुजे नाहीं सत्यत्वे ॥ ८१ ॥

अध्याय १९ चा शेवटः—

इतिश्री पद्मपुराण अपार ॥ महालयाचरित्र हें सुंदर ॥
गुणग्राहीका जोडून कर ॥ गोपाळ कावि प्रार्थीतु ॥ ११५ ॥

ग्रंथनकल शके १७८८ त केलेली आहे.

यावरून प्रवरातटीचें हल्लींचें नेवासें म्हणजे 'निधिवास' हें होय.

आतां अध्यायांचे समाप्तिवाक्यांत 'अनुपुराणे,' 'सूर्यवंशे,' व 'शतसाहस्र्यां संहितायां' या शब्दांची योजना केली आहे. यावरून काय अर्थनिष्पत्ति होते हें पाहूं.

कवीनें या ग्रन्थास 'अनुपुराण' असें नांव दिलें आहे. तें अनु-

चित आहे असें दिसत नाहीं. आपण महाभारतप्रतिम, शिवाजी महाराजांसारख्या तेजस्वी व अवतारी विभूतीचा चरित्रग्रंथ रचला आहे, ज्यांत महाभारताप्रमाणें विविधविषयांचें व प्रसंगांचें वर्णन केलें आहे, व राजनीतीसारख्या गहन विषयांचाहि ज्यांत अन्तर्भाव केला आहे अशा आपल्या शिवभारतग्रंथाचा समावेश रामायण, भारतादि महापुराणांच्या पंक्तींत व्हावा हें कवीस उत्कटत्वानें वाटणें साहजिक आहे. तथापि पुराणें व उपपुराणें यांची संख्या मर्यादित असल्यामुळें त्यांत हें एकोणिसावें पुराण म्हणून घालतां येणार नाहीं, एतदर्थ कवीन्द्रानें आपल्या कृतीस 'अनुपुराण' हें अन्वर्थक नांव दिलें असें दिसतें. शिवाय कवीनें या ग्रन्थास 'पुराणमिव नूतनं' (अ. १ श्लो. १८) असें काशीस्थ मनीषींच्या तोंडून वदविलें आहे.

अध्याय १–४, ६, १०, १७ ते २०, २२ ते ३१ यांत 'सूर्यवंशे' अशा विशेषणाचा उल्लेख आहे. क्षत्रियांचा पूर्ण लोप होऊन क्षत्रिय मुळींच अस्तित्वांत नाहींत असा जो कित्येकांचा समज झालेला दिसतो तो परमानन्दाला मुळींच मान्य नाहीं; व मराठ्यांचें क्षत्रियत्व व भोसल्यांचें सूर्यवंशीयत्व त्यास पूर्णपणें मान्य होतें. हीच गोष्ट परमानन्दानें

तं सूर्यवंशमनघं कथ्यमानं मयादितः ।
.... .... .... .... ॥ ४१ ॥
दक्षिणस्यां दिशि श्रीमान् मालवर्मानरेश्वरः ।
बभूव वंशे सूर्यस्य.... .... .... ॥ ४२ ॥ अ. १

ह्या कथानकारंभींच्याच श्लोकांत स्पष्ट व्यक्त करून ठेविली आहे. याप्रमाणेंच शिवावताराची कथा अ. ५ मध्यें दिली आहे. पृथ्वी म्लेंच्छछलानें पीडित झाली असतां ब्रह्मदेवाकडे जाऊन या क्लेशांपासून मुक्त व्हावें म्हणून प्रार्थना करीत असतां तिचे तोंडीं

उत्थाप्य स्थापिताः केचित् केचित् युद्धे निपातिताः ।
बालिभिस्तैस्ततः प्रायः क्षत्रियाः क्षीणतां गताः ॥ ५/३१
.... .... व्रजन्ति क्षत्रियाः क्षयम् ।
.... .... .... .... ॥ ५/४३

असें भाषण घातलें आहे. यावरून राष्ट्रांतील 'क्षत्रिय नाहींसे होत

आहेत ' व ही हानि भरून येण्यासारखी नाहीं असें कवीन्द्र दर्शवीत आहे. सारांश क्षत्रिय निःशेष नष्ट झालेले नसून, नष्ट होण्याच्या मार्गाला लागलेले होते; परंतु ते अस्तित्वांत होते ही गोष्ट मान्य होती. तेव्हां राज्यारोहणसमयीं क्षत्रियोचित उपनयन–विवाहादि संस्कार महाराजांस त्या वयांत करावे लागले ते संस्कारलोप झाल्यामुळें करावे लागले; भोसल्यांस राज्यारोहणसमयी क्षत्रिय करून घेतलें म्हणून अथवा त्यांचें क्षत्रियत्व त्या कालापर्यंत कोणींहि कबूल केलें नाहीं म्हणून हे संस्कार केले गेले हें म्हणणें वाजवी होणार नाहीं. परंतु प्रस्तुत स्थळ या विषयाचा उहापोह करण्याचें नसून आपणास फक्त ग्रन्थांतर्गत उल्लेखांवरून तत्कालिन गोष्टींबद्दल अनुमानें काय निघतात याचाच विचार करावयाचा आहे.

अध्याय १, २, ४, १७ ते ३१ च्या समाप्तींत ' शतसाहस्र्यां संहितायां ' असा शब्दसमास आहे. कवीनें ग्रंथास शिवभारत हें नांव दिलेलें आहे व ग्रन्थाची उभारणीहि महाभारताप्रमाणेंच केलेली आहे. महाभारत जसें सूत शौनकांस नैमिष्यारण्याचे ठायीं सांगतो; तद्वतच हें शिवभारत कवीन्द्रानें शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून तयार केलें, पण तें काशी एथील पण्डितांपुढें सांगितलें; यामुळें कवीन्द्र हा वक्ता व काशी एथील मनीषी म्हणजे पण्डित हे श्रोते अशी मांडणी केलेली असून पण्डितांनीं शंका व प्रश्न विचारावे आणि परमानन्दानें त्यांचीं उत्तरें ऐतिहासिक माहिती देऊन सांगावी अशी हरएक प्रसंगांची पद्धती आहे. शिवाय कवीन्द्रानें अ. १ श्लो. २२ मध्यें

चरितं शिवराजस्य भरतस्येव भारतम् ॥

असें म्हटलें आहे. या सर्व गोष्टींवरून शिवभारत हा ग्रंथ महाभारताप्रमाणेंच विस्तृत व सर्वांगसुंदर सजवावयाचा होता; हीच ग्रन्थारंभापासून कवीची भावना असली पाहिजे हें स्पष्ट होतें. त्या प्रमाणेंच अ. १ श्लो. ३६ ते ४१ मध्यें या ग्रन्थांत कोणकोणत्या गोष्टी व प्रसंग समाविष्ट करावयाचे आहेत हेंहि कवीनें साकल्यानें दिलें आहे. अफजलखानाचा वध शके १५८१ मध्यें मार्गशीर्ष शुद्ध सप्तमी गुरुवार रोजीं झाला व पुढें शके १५८३ वैशाख शुद्ध ११ सोमवार रोजीं महाराजांनीं शृंगारपूर हस्तगत केलें या सुमारें सतरा महिन्यांतील प्रसंगाचें वर्णन एकंदर अध्याय २१ ते ३२ पर्यंत म्हणजे १२ अध्यायांत केलें आहे व या

बारा अध्यायांची श्लोकसंख्या ८१९ आहे. शृंगारपूर हस्तगत केल्यानंतरच्या कालांतच मोठमोठे प्रसंग व प्रचंड घडामोडी शिवाजी महाराजांनीं केल्या. त्यांकडे पाहिलें असतां सहजच महाभारता एवढा प्रचंड ग्रन्थ होईल असें आपणांसहि आज वाटत आहे. मग कवीन्द्रासारख्या बहुश्रुत विद्वानास, व समक्ष घडणाऱ्या गोष्टी पहाणारास, शिवाजीचें चरित्र लिहिलें असतां तें सहजच महाभारतासारखें ' शतसाहस्री ' होईल हें वाटणें अगदीं साहाजिक होतें. तेव्हां कर्त्यानें ' शतसाहस्र्यां संहितायां' हा शब्दसमुच्चय उपयोगांत आणला यांत अतिशयोक्ति मुळींच नसून आश्चर्य मानण्याचेंहि कारण नाहीं.

**कविकाल:**—सर्व ऐतिहासिक लेखांचें प्रामाण्य व त्यांची विश्वसनीयता ( मग ते लेख ग्रन्थ, ताम्रपट, शिलालेख इत्यादि कोणत्याहि स्वरूपाचे असोत ) त्यांच्या लेखनकालावर सर्वस्वी अवलंबून असतात. कोणताहि प्रसंग घडत असतां एखादा चितारी समक्ष हजर असून तो त्या प्रसंगाचें जें चित्र तयार करतो तें चित्र सर्वांशीं विश्वासार्ह होतें. परंतु जर प्रसंग होऊन गेल्यानंतर कांहीं कालानें एखाद्या चिताऱ्यानें नुसत्या ऐकीव माहितीवरून चित्र तयार केलें तर त्या चित्राचे उभारणींत काल्पनिक गोष्टींचा समावेश होतो. यामुळें मूळच्या समकालीन चित्राशीं ताडून पहातां, असें मागाहून काढलेलें चित्र विसंगत दिसतें व त्या प्रमाणांतच तें विश्वासासहि अपात्र ठरतें. हाच सिद्धान्त ऐतिहासिक लेखकांच्या कृतींना सर्वांशीं लागू पडतो. प्रसंग व त्या प्रसंगाचें लेखन करणारा लेखक यांच्यामध्यें कालाचें जितकें जितकें अंतर पडतें तितकी तितकी त्याची कृति काल्पनिक व ऐकीव साधनांनीं सजविली जाते. व म्हणूनच ती कृति विश्वसनीयत्वाच्या प्रामाण्यास उतरत नाहीं. व या कारणांमुळेंच इतिहाससंशोधनशास्त्रांत विषमकालीन लिहिलेले बखरी वगैरे लेख प्रामाण्याच्या दृष्टीनें अगदीं खालच्या पायरीचे ठरतात. यास्तव इतिहाससंशोधनदृष्ट्या विश्वासार्ह ठरण्यास कोणताहि ग्रन्थ समकालींच लिहिला गेला असला पाहिजे. आतां या समकालीनत्वाचे कसोटीस हा भारतग्रन्थ किती उतरतो हें ग्रन्थबाह्य व ग्रन्थांतर्गत गोष्टींच्या पुराव्यावरून पाहूं.

प्रथमत: ग्रन्थबाह्य पुराव्यावरून कालनिर्णय करूं. शके १५८६च्या माधव म्हणजे वैशाख मासांत राजापूर एथें धर्मनिर्णयार्थ एक मोठी सभा

भरली होती. या सभेनें दिलेल्या निर्णयपत्रांत, ‡सभेंतील पण्डितांची यादी दिली आहे. यांत कवीन्द्राचा उल्लेख आहे तो असा:—

तत्र सभायां स्थिताः पंडिताः ।
गागाभट्टस्त्वनूचानो निगमागमवित्तमः ।
सभायां शुशुभे राज्ञः सुधर्मायां यथागुरुः ॥ १ ॥
दीक्षितः शितिकण्ठश्च रघुनाथो बुधाधिपः ।
कवीन्द्रः परमानन्दो महादेवश्च पण्डितः ॥ २ ॥
प्रभाकर उपाध्यायस्तथा श्रीरंगशास्त्रिणः ।
नृसिंहशास्त्रिणश्चाथ भट्टविश्वंभरोऽपि च ॥ ३ ॥
अयाचितमहादेव पण्डिताग्र्यो विनायकः ।
सोमनाथो जगन्नाथो भट्टविष्णुस्तथैवच ॥ ४ ॥
भूगोपालाभिधोऽनन्तोपाध्यायः पण्डिताग्रणीः ।
शेषोपाख्य महादेवः काशीस्थाः पण्डिता अमी ॥ ५ ॥

यांत कवि परमानन्दाची गणना गागाभट्टादि शिवसमकालीन काशीस्थ पण्डितांत केली आहे. काशी हें विद्येचें पूर्वापार पीठ असल्याचें सर्वविश्रुतच आहे. तेव्हां परमानन्दासारखा विद्याव्यासंगी पंडित काशी एथें अध्ययनाध्यापनाकारितां जावा हें साहजिक आहे. शिवभारतग्रन्थारंभीं, तीर्थयात्रेच्या निमित्तानें काशी एथें कवीन्द्र गेला असतां, त्यानें तेथील पण्डितांना भागीरथी नदीचे कांठीं बसून हें पुराण सांगितलें, अशी भूमिका घेतली आहे. या भूमिकेचा शब्दशः अर्थ घेतला तर त्यानें हा ग्रन्थ खरोखरच काशी एथें पण्डितांस सांगितला व नंतर कांहीं दिवस तो तेथें राहिला; म्हणून त्याची गणना काशीस्थ पण्डितांत झाली असावी. व पुढें शके १५८६च्या सुमारास या सभेसाठीं राजापूर एथें काशीस्थ पण्डित म्हणून तो आला असावा. तो पुढें इकडेच होता किंवा परत काशीस गेला आणि त्याची हयात

‡हें निर्णयपत्र पुणें येथील भारत इतिहास संशोधकमण्डळापुढें माझे मित्र कै०पां. न. पटवर्धन यांनीं वाचलें होतें. तें शके १८३५ च्या इतिवृत्तांत 'शिवकालीन शास्त्री पंडित' या मथळ्याखालीं मंडळानें प्रसिद्ध केलें आहे; तें वाचकांनीं मुद्दाम पहावें व या निर्णयपत्राचें मूळ मिळविण्याचा प्रयत्न करावा. या निर्णयपत्रांत दिलेल्या पण्डितांच्या घराण्यांचे व त्यांनीं केलेल्या ग्रंथांचें संशोधन झाल्यास शिवकालीन समाजेतिहासावर बराच प्रकाश पडेल असें प्रस्तुत लेखकास वाटतें.

कोठवर होती या प्रश्नाचा निर्णय झाल्यास शिवभारत कोठवर रचिलें गेलें हें ठरविण्यास एक अप्रत्यक्ष साधन होईल. असो.

वरील यादींत गागाभट्ट यांचा प्रारंभींच उल्लेख केलेला आहे व त्यांनीं शके १५९६ मध्यें राज्याभिषेकसंस्कारसमयीं पुढाकार घेऊन तो समारंभ सुशोभित केला हें इतिहासप्रसिद्धच आहे. तसेंच शके १६०८ मध्यें म्हणजे शिवाजी महाराजांचे निधनानंतर सहा वर्षांनीं, गंगाधर रंगनाथ या हरसूल येथील ब्राह्मणास मोंगलांनीं बलात्कार करून बाटविला होता, त्यास यथाविधि प्रायश्चित्त देऊन पूर्ववत् ब्राह्मण जातींत पावन करून घेतला. या समयीं धर्मशास्त्रनिर्णयार्थ जमलेल्या मंडळींत वरील यादीपैकीं 'सोमनाथभट्ट' व 'अन्तोपाध्ये' होते (राजवाडे खंड ८ पान ३८). यावरून कवीन्द्र, गागाभट्टादि विद्वानांप्रमाणेंच, शिवसमकालीन होता याबद्दल संदेह रहात नाहीं.

आतां शिवभारतान्तर्गत उल्लेखांवरून हें कसें सिद्ध होतें हेंहि पाहूं. शिवचरित्रश्रवणोत्सुक पंडित यांनीं " 'यः शास्ति वसुधामेतां राजा राजगिरीश्वरः' म्हणजे 'जो राजगडाचा अधिपति ह्या पृथ्वीवर राज्य करीत आहे' त्याचें आपण अनेकाध्यायगर्भित चरित्र रचलें आहे तें आम्हांस सांगा" अशी विनंती कवीन्द्रास केलेली आहे; हा सर्वच श्लोकार्ध कवीन्द्र व महाराज यांचें कालैक्य दर्शक आहे. हे समकालीन नसते तर 'राजगडचा अधिपति राज्य करीत आहे' असें न म्हणतां कवीन्द्रानें 'रायगडचा अधिपति राज्य करीत होता' असें म्हटलें असतें.

चरित्रलेखनाचें काम शिवाजी महाराजांनीं परमानन्दाकडे सोंपविलें होतें हें सांगतांना कवि म्हणतो.

.... .... .... .... ।
स एकदात्मनिष्ठं मां प्रसाद्येदमभाषत ॥ २५ ॥

यानि यानि चरित्राणि विहितानि मया भुवि ।
विधीयन्ते च सुमते तानि सर्वाणि वर्णय ॥ २६ ॥

मालभूपमुपक्रम्य प्रथितं मत्पितामहम् ।
कथामेतां महाभाग महनीयां निरूपय ॥ २७ ॥ अ० १

यांतील ' यानि चरित्राणि विहितानि विधीयन्ते च ' या पदावरून हें चरित्र लेखनाचें काम सारखें चालू होतें असें दिसतें; म्हणजे ग्रन्थकर्ता, शिवाजीराजे हयात असतां, ते जें जें इतिहासचरित्र करीत असत तें तें लिहीत होता. व हें चरित्र लिहिण्यास खुद्द महाराजांनींच परमानन्दास आज्ञा केली. या गोष्टी चरित्रकार व चरित्रनायक यांचें समकालीनत्व पूर्णत्वानें प्रस्थापित करतात.

या ग्रन्थांत साक्षात् कालदर्शक मित्या फक्त दोनच दिल्या आहेत, [ १ ] शिवजन्माची व [ २ ] अफजलखानाच्या वधाची; व त्या अगदीं बिनचूक आहेत. या ग्रन्थांतील कथानकांच्या प्रसंगांच्या अनुक्रमाकडे कितीहि सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तरी त्यांत स्थलकालव्यक्तिविपर्यास कोठेंहि आढळून येत नाहीं; या गोष्टी समकालीनत्वाचे पुराव्याच्याच पोषक आहेत.

शिवकालीं लिहिल्या गेलेल्या ग्रन्थांतून ' महाराज विष्णूचा अवतार होते ' असे उल्लेख सांपडतात. शिवभारताप्रमाणेंच जयरामकृत पर्णालपर्वत ग्रहणाख्यान, रघुनाथपंडितकृत राजव्यवहारकोश व संभाजी ( महाराजांचा मुलगा ) यांनीं केलेला बुधभूषणग्रंथ वगैरे शिवसमकालीन संस्कृत ग्रन्थांत त्यांना ' विष्णूचा अवतार ' असें म्हटलें आहे. परंतु शिवाजी महाराजांच्या वर्णनासंबंधींचे जे उत्तरकालीन लेख उपलब्ध आहेत त्यांत विष्णूच्या अवताराची कल्पना कोठेंहि उल्लेखिलेली सांपडत नाहीं. उलट महाराज हे ' शंकराचे अवतार होते ' असें आढळतें. या गोष्टीची ' सप्तप्रकरणात्मक चरित्र,' ' शिवदिग्विजय ' वगैरे बहुसंख्याक ग्रन्थ साक्ष देत आहेत. तसेंच कवीन्द्रानें भोसले या आडनांवाचें ' भृशबल ' असें संस्कृतरूपांतर सर्वत्र प्रस्तुत ग्रन्थांत योजिलें आहे. त्याप्रमाणेंच ' भृशबल ' हें भोसले शब्दाचें दर्शक संस्कृतरूप शिवसमकालीन ग्रन्थांतच आढळतें. संभाजी महाराजांनीं दिलेलें एक फार महत्त्वाचें व विस्तृत संस्कृतदानपत्र प्रो. दत्तो वामन पोतदार यांनीं मंडळापुढें वाचलें; त्यांतहि याच रूपाचा उपयोग केला आहे. व 'बुधभूषण' ग्रन्थांतहि हें रूप आहे. उत्तरकालीन संस्कृत लेखांतून हें रूप कोठेंहि आढळांत येत नाहीं. तंजावर एथील दोनतीन भोसल्यांच्या वंशावळी संस्कृतांत लिहिलेल्या, उपलब्ध झाल्या आहेत. त्यांत ' भोसल ' हें रूप वापरलें आहे. हे सर्व कवीन्द्राचें समकालीनत्व दाखविणारे मजबूत पुरावे आहेत.

शिवभारतांतील एकंदर प्रसंगवर्णनांत ग्रन्थकाराची बारकाई, मार्मिकता व सहजता हीं सर्वत्र दृग्गोचर होतात. याचें कारण तो व्यापक व कुशाग्र बुद्धीचा असून प्रसंगाच्या कालाशीं त्याचें निकट सान्निध्य होतें हेंच होय. कालसान्निध्य किंवा समकालीनत्व नसतें तर वर्णनाच्या तपशीलांत जी मार्मिक बारकाई दिलेली दिसते ती देतां आली नसती.

पन्हाळ्याचे वेढ्याचे पूर्वीं शके १५८१ च्या पौष वद्यांत कोल्हापूर नजीक रुस्तुमजमा व फाजलखान यांजबरोबर महाराजांचें युद्ध झालें. या युद्धाचें वर्णन चोवीसाव्या अध्यायांत आहे; त्यांत दोन्ही पक्षांतील सैन्याची कशी मांडणी केली होती याचा पट, सरदारांच्या नांवांसह, दिला आहे. तसेंच रुस्तुमाच्या सैन्याचा भंग झाल्यावर तो महाराजांच्या जवळून कसा पळून गेला व महाराजांनीं त्यास किंचितही प्रतिबंध न करतां कां जाऊं दिला याचें इंगित फारच खुबीनें दिलें आहे. याप्रमाणेंच महाराजांचें कार्तलबखानाशीं उंबरखिंडींत युद्ध झालें, त्याचे वर्णनांतहि कवीची बारकाई दृष्टोत्पत्तीस येते. या आमच्या म्हणण्याची सत्यता पटवून घेण्याकरितां या ग्रन्थाची प्रस्तावना वाचकांनीं बारीक नजरेनें अवलोकन करावी असें आग्रहाचें सांगणें आहे.

कार्तलबखानाचा दूत महाराजांस भेटावयास गेला तेव्हां अश्वारूढ लष्करी पोषाखांत असलेले शिवाजी महाराज त्यास कसे दिसले याचें चित्र कवीन्द्रानें फारच हुबेहुब रंगविलें आहे. तसेंच अफजलखानाचे भेटीचे समयीं महाराजांच्या स्वरूपाचें वर्णन दिलें आहे. ह्या दोन्ही वर्णनांत कवीची सहजता किती आहे याची साक्ष वाचकांनीं हीं वर्णनें वाचून आपल्या मनाशींच पटवून घेतली पाहिजे. या शब्दचित्रांकडे पाहिलें असतां प्रेक्षकाच्या दृष्टीसमोर महाराज साक्षात् उभे आहेत असा भास होतो. हीं शब्दचित्रें देऊन कवीनें शिल्पकाराचें व चित्रकाराचें काम सुकर करून ठेविलें आहे खास.

अफजलवधानंतर अदिलशहा फार चिरडीस आला; व त्यानें दिल्लीकर मोंगलांपाशीं, शिवाजीस कायमचा चिरडून टाकावा म्हणून मदत मागितली; ही मागणी मोंगलांनीं मान्य केली. औरंगजेबानें आपला मामा शास्ताखान यास सेनाधिपत्य दिलें व बरोबर सत्त्याहात्तर हजार घोडेस्वार, हत्ती, पायदळ वगैरे प्रचंड सैन्य देऊन, दौलताबादेहून महाराजांचे

मुलखावर रवानगी केली. खानानें इकडे येऊन महाराजांचा सर्व मुलूख हस्तगत केला. पुणें, सुपें, सासवड, चाकण, इंदापूर वगैरे सर्व प्रान्त गेला; पन्हाळाहि सोडावा लागला. अशी स्थिति प्राप्त झाल्यामुळें महाराजांस मोठा पेंच पडला। ते राजगडावर आले. तेथें त्यांनीं सर्व परिस्थितीचा विचार करून पुढील धोरण ठरविण्याकरितां राजसभा भरविली. या सभेस राजनीतिनिपुण व अर्थशास्त्रविद्, सर्व मंत्रिमंडळ त्यांनीं निमंत्रिलें; सभा भरल्यावर सुरवातीचें भाषण महाराजांनींच केलें व सभेचा उद्देश महाराजांनींच सांगितला. 'आज आपलें सर्वस्व हरण झालें आहे व मी दूर असतां संग्रामदुर्गासह चाकण शत्रूनें घेतलें आहे; तें परत घेणें फार दुष्कर आहे, तथापि तेंच प्रथमतः परत घेतलें पाहिजे. शत्रुनाश करावयाचा म्हणजे मनुष्यबळ पाहिजे व कायमचें मनुष्यबळ बाळगावयाचें तर द्रव्यबळहि फार लागणार. द्रव्यबळावांचून यशःप्राप्ति शक्यच नाहीं. तेव्हां सर्व प्रान्तांतून खंडणी वसूल केली पाहिजे व नंतर शत्रुनाशाचे कामास लागलें पाहिजे.' असें राजनीतियुक्त आपलें म्हणणें महाराजांनीं सभेपुढें मांडलें व मंत्रिमंडळानेंहि 'मुलूखगिरीकरून अशा प्रसंगीं द्रव्यार्जन करणें राजनीतिसंमत आहे व त्यास आपली सर्वांनुमतें मान्यता आहे' असें सांगितलें. व सचिवांनीं, 'चाकण जिंकून शास्ताखान पुणें येथें तळ देऊन राहिला आहे, महाराज राजगडावर आहेत हें त्यास समजतांच तो आपल्या सैन्याची रवानगी सह्याद्रीवरून खालीं करील' असें महाराजांस सुचविलें व महाराजांसहि ही गोष्ट बरोबर पटली. अशी ही राजगडावरील राजसभेची त्रोटक हकीकत आहे. ती कवीन्द्रानें प्रस्तुत ग्रन्थाच्या २८ व्या अध्यायांत दिली आहे.

ही सभा अनेक कारणांनीं फार महत्त्वाची असून या सभेची हकीकत प्रथमतः कवीन्द्रच देत आहे. इतर कोणत्याहि ग्रन्थांत या सभेचा उल्लेख केलेला आढळत नाहीं. कवीन्द्र देतो याचें कारण ही गोष्ट त्याचे वेळचीच असली पाहिजे. ही सभा शके १५८२ च्या पौषमासांत, महाराजांचा मुक्काम राजगडावर असतां भरली गेली; व मुलुखगिरी करून द्रव्यार्जन करावयाचें व मुलूख जिंकावयाचा हें सभेंत निश्चित झाल्याप्रमाणें त्यांनीं आपलें पुढील धोरण आचरणांत आणलें.

राजकारण व कारस्थान यापैकीं कोणतेंहि करणें झालें तरी महा-

राज आपल्या विद्वान् मंत्र्यांचा सल्ला घेऊन व त्याप्रमाणें आपलें धोरण बदलणें किंवा कायम करणें तें ते करीत असत. त्याप्रमाणेंच कोणतेंहि राजकारण करावयाचें म्हणजे तें राजनीतीस धरून आहे कीं नाहीं याचा उहापोह होऊन नंतरच तें केलें जात असे. या गोष्टी या सभेच्या हकीकतीवरून उघड होत आहेत. शिवशाहींत एकतंत्री व एककल्ली कारभार नव्हता. बरींच डोकीं एकत्र होऊन नंतरच कोणतेंही धोरण निश्चित होत असे.

आतां एकच कालदर्शक गोष्ट देतों. शके १५८२ च्या फाल्गुन वर्षांत महाराजांनीं राजापूरावर स्वारी करून तें लुटलें. या स्वारींत त्यांनीं सर्व विदेशी व्यापाऱ्यांकडून खंडणी घेतली. त्यांत इंग्रजांस तर विशेष त्रास झाला व त्यांचें भूमिगत द्रव्य खणून काढविलें. याचें वर्णन कवीन्द्रानें

निक्षेपस्वर्णसंपूर्णकटाहजठरां धराम् ।

खलांतकः स खनकैरनेकैः समखानयत् ॥ ८०/६

असें केलें आहे. हीच हकीकत ह्या प्रसंगीं हजर असलेल्या एका डच व्यापाऱ्यानें लिहून ठेविली आहे. त्यांतील एकाच वाक्याचें इंग्रजींत भाषांतर येथें देतों. 'Their (of the English) office was entirely plundered but the floor was delved on all sides to find out all the treasures' (Dagh-Register gehouden int Casteel Batavia, Anno 1661 pages 215-216). वरील हकीकतींत कवीन्द्राचें व डच व्यापाऱ्याचें इतकें साम्य आहे कीं, हे दोन्ही उतारे एकमेकांचीं भाषांतरें दिसतात. यापेक्षां शिवाजी महाराज व कवीन्द्र यांचें समकालीनत्व दाखविण्यास जास्त बळकट्टर पुरावा तो काय पाहिजे!

ग्रन्थरचनाकालः—शिद्दीजोहाराचा मृत्यु शके १५८३ त झाला; या गोष्टीचा उल्लेख ग्रन्थांत आला आहे व तो प्रभावळी घेतल्यानंतर झालेला आहे. यावरून या ग्रन्थाची रचना शके १५८३ नंतर व महाराजांच्या राज्यारोहणापूर्वीं केव्हां तरी झाली असली पाहिजे हें उघड आहे.

शिवकालीन स्वातंत्र्यभावना—अ० ५ मध्यें विश्वंभरेच्या तोंडीं

विहसन्ति तथा सर्वे मां म्लेच्छवशवर्तिनीम् ।

स्थितां यथागतमुखे श्रुतिं श्रुतिविदो यथा ॥ ५/४४

असा श्लोक घातला आहे. हा श्लोक विश्वंभरेच्या तोंडीं घातला आहे, तेव्हां हे सर्व उद्गार महाराष्ट्रजनतेच्याच तोंडचे आहेत, असें मानण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. सर्व महाराष्ट्र पारतंत्र्यापासून होणाऱ्या असह्य क्लेशांनीं जर्जर झाला होता, यामुळें या पारतंत्र्यांतून कसेंहि करून मुक्त झालेंच पाहिजे; अशी भावना त्यावेळीं महाराष्ट्रांत प्रादुर्भूत झाली होती, असें मानणें उघड आहे. तसेंच पारतंत्र्यांत असतांना सर्वत्र मानखंडना कशी होते व ती किती असह्य असते हेंहि वरील श्लोकांत दिलें आहे. यावरून परसत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य प्रस्थापित झालें तरच धर्म, नीति व जनता यांचें रक्षण होईल अशीहि भावना स्पष्टपणें उत्पन्न झाली होती असें अनुमान काढणें चुकीचें होणार नाहीं. परंतु या खेरीज आणखी बलवत्तर समकालीन आधार मिळाल्यावांचून जास्त लिहिणें धाडसाचें आहे. तेव्हां जास्त संशोधन होऊन जास्त पुरावा मिळाल्यावरच या गोष्टीबद्दल उहापोह करणें बरें.

ऐतिहासिक लेखन परंपरा—आतां आपण या विषयाकडे वळूं. आमच्या देशांत ऐतिहासिक लेखनाची परंपरा मुळींच नव्हती; व मुसलमानी तवारिखा व युरोपियन इतिहास वाचूनच इतिहासाची हिंदु लोकांना स्फूर्ती झाली असें मत कित्येक विद्वानांनीं प्रतिपादन केलें आहे. परंतु तें चुकीचें असून इतिहासाची अभिरुची हिंदु समाजांत शेंकडों वर्षांपासून आहे असें अनेक पुराव्यांनीं दाखवितां येण्याजोगें आहे. इतर सर्व शास्त्रीय कल्पनांप्रमाणें इतिहासाची आजची व प्राचीन कल्पना यांत पुष्कळ अंतर पडलें असेल. पण हें अंतर उत्क्रांतितत्त्वाप्रमाणें कालानुक्रमानें पडत गेलें आहे. उदाहरणार्थ गणितविषयांत आज पुष्कळ प्रगति झाली असेल; पण आर्यभट व भास्कराचार्य यांच्या गणितज्ञानाची महती आज आपणांस अमान्य करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें इतिहासाचें अध्ययन आपल्या समाजांत उपनिषद्कालापासून चालत आलें आहे हें निर्विवाद आहे. छांदोग्योपनिषदांत अ. ७ खं. २ मध्यें अध्ययनविषयांत इतिहासाची गणना केली आहे. त्याचप्रमाणें दोन हजार वर्षांपूर्वी कौटिल्याचें 'अर्थशास्त्र' या ग्रंथांतहि इतिहासाचा उल्लेख प्रामुख्यानें केला आहे. याखेरीज भारत, रामायण हे आर्ष ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. त्यानंतर शालिवाहनाच्या सहाव्या शतकांत लिहिलेलें बाणभट्टकृत हर्षचरित्र, कल्हण-

कविकृत राजतरंगिणी (श. १०६५), नयचंद्रसूरीकृत दहाव्या शतकांतलें हंमीरवंशकाव्य, बिल्हणानें कल्याणनगरांत बाराव्या शतकांत लिहिलेलें विक्रमांकदेव चरित, त्याच सुमारास गुजराथेंतील जयसिंहसूरीकृत कुमारपाल चरित्र, वाक्पतिराजकृत ' गउडवहो ' ( कनोज ), पद्मगुप्तविरचित ' नवसाहसांकचरित, ' जयानककृत ' पृथ्वीराजविजय ' ( अजमीर ), सोमेश्वरकृत ' कीर्तिकौमुदी ', संध्याकरनन्दीविरचित ' रामचरित ' ( बंगाल ), आनंदभट्टकृत ' बल्लाळचरित ' ( बंगाल ), मेरुतुंगाचा ' प्रबंधचिंतामणी ' ( गुजराथ ), राजशेखरकृत ' चतुर्विंशतिप्रबन्ध ', गंगाधरकृत ' मंडलीककाव्य ' ( गिरनारयादव ), व दक्षिणेंतील रामभद्रांबाकृत ' रघुनाथाभ्युदयं ' राजनाथडिंडिमविरचित ' सालुवाभ्युदयम् ', गंगोदेवीकृत ' कंपरायचरितम् ' या सारख्या अनेक ग्रंथांच्या द्वारें ऐतिहासिक लेखनाची परंपरा या देशांत एकसारखी चालली होती. मुसलमानांच्या आगमनापासून फारशी भाषेंतून इतिहास लिहिण्याची एक नवीन परंपरा सुरू झाली. तिचें स्वरूपहि बादशहानामा, महमदनामा, बुऱ्हाण-इ-म-आसिर वगैरे रूपानें शिवकालीन लोकांपुढें होतें. तेव्हां मूळची भारतीय इतिहासाची परंपरा व फारशी लेखनपद्धति यांतील गुणांचें सुंदर संमीलन करून परमानन्दानें शिवभारताची रचना केलेली दिसते. या ग्रंथांत नद्या व कला यांच्या नांवाच्या याद्या पौराणिक धर्तीच्या आहेत; परंतु निजामशाही बुडण्याची कारणपरंपरा सांगतांना व शिद्दी जोहाराच्या मृत्यूची चर्चा करतांना परमानन्दाचें लिहिणें आधुनिक इतिहासकाराला उत्तम रीतीनें शोभेल अशा चिकित्सक स्वरूपाचें आहे. त्याचप्रमाणें स्वर्गांतील दरबाराचें वर्णन देतांना परमानन्द जरी कल्पनेच्या वातावरणांत शिरत असला तरी दाक्षिणात्यांची मोंगलाशीं झालेलीं युद्धें, अफजलप्रसंग, पन्हाळ्याचा वेढा, तानाजी मालुसऱ्याचा पराक्रम वगैरेंची माहिती देतांना परमानन्दानें खरी ऐतिहासिक दृष्टी दाखविली आहे हें निर्विवाद आहे. सारांश शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत महाराष्ट्रांत पूर्वीपेक्षां शास्त्रशुद्ध व ओजस्वी अशी ऐतिहासिक लेखनाची पद्धति रूढ होऊं लागली होती व परमानंद व जयराम यांचे ग्रंथ याचे द्योतक आहेत. जयरामाचे दोनच ग्रंथ आज आपणांस सांपडले आहेत. पण आणखी बरेच ग्रंथ आपण लिहिले आहेत असें त्याच्या उपलब्ध ग्रंथांत स्पष्टपणें विधान केलेलें आढळतें. यावरून बऱ्याच उच्च दर्जाचें

ऐतिहासिक लेखन शिवशाहींत सुरू झालें होतें व महाराजांच्या मरणानंतर महाराष्ट्रांत जाळपोळ व धामधूम यांचा काळ आल्यामुळें ही उज्वल परंपरा चालू शकली नाहीं व शिवकालीन ग्रंथहि पहाण्यास सांपडणें कठिण झालें आहे हें खरें; परंतु त्याचें अस्तित्व व त्यांची योग्यता याविषयीं संशयास जागा नाहीं.

शिवभारताचें काव्यदृष्ट्या समालोचन—या शिवभारत ग्रंथाचें मराठी भाषांतर रा. राजाराम दामोदर देसाई यांजकडून करवून घेतलें आहे. हें समालोचनहि त्यांनीं तयार केलेल्या टिपणांतील थोड्या बहुत फरकानें महत्त्वाचे भाग घेऊन साभार येथें सांगतों. शेवटचे ४—५ अध्याय सोडून बाकीचे सर्व अध्याय सबंधचे संबंध सरळ धावत्या अनुष्टुप् वृत्तांत रचलेले असून प्रत्येकाचा शेवटचा श्लोक तेवढा कोणत्या तरी दीर्घ वृत्तांत गुंफलेला आहे. २४ व्या अध्यायांतील ५८ ते ७२ श्लोक प्रहर्षिणी वृत्तांत असून पुढील श्लोक मालिनी, शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, वसन्ततिलका वृत्तांत आहेत. २८ व्यांतील शेवटचे ८, ३० व्यांतील शेवटचे १५, ३१ व्यांतील शेवटचे ५ श्लोक पुष्पिताग्रा, हरिणी, स्रग्धरा, उपजाति, उपेन्द्रवज्रा, रथोद्धता, वसन्ततिलका, मालिनी, प्रहर्षिणी अशा विविध वृत्तांत असून, ३२ व्या अध्यायांतील आरंभापासून सर्व श्लोक वियोगिनी ( रघुवंशाच्या ८ व्या सर्गाचें वृत्त ) वृत्तांत आहेत. ही वृत्तांची इतकी बारीक छाननी करण्यांत हेतु हा आहे कीं, कवीन्द्र परमानन्द हा शिवचरित्रवर्णनांत अधिकाधिक तल्लीन होऊन शिवभारताच्या मोहकत्वांत कर्णमाधुर्याचीहि भर घालीत आहे हें दाखवावयाचें.

हें कर्णमाधुर्य अनुप्रास व यमक या शब्दालंकारांचा मार्मिकतेनें भरपूर उपयोग करून शिवभारताच्या आरंभापासून शेवटपर्यंत कसें साधलें आहे हें वाचकांच्या सहज दृष्टीस पडेल. तथापि कांहीं ठळक उदाहरणें दिल्यास वावगें होणार नाहीं.

प्रतापतापिताऽरातिधराधिपतिमण्डलः । १।४७
स कोषमिभरामस्य पुपोष बहुतोषकृत् । ५।१९
विकरालं महाकालं करवालं करे महन् । २२।१९
क्रूरः करिकराकारकरः प्रतिभयस्वरः । २२।१४

न यत्र पवनस्तत्र यवनः स महावने ।
निवसन्नवने हेतुमात्मनो न व्यचिंतयत् ॥ २८।७०
तदद्य सद्य एव त्वं तं प्रपद्य महीभृतम् । २९।१२
अग्नेरिव तवावज्ञा विज्ञायापि विनिर्मिता । २९।३५
चण्डेन भुजदण्डेन दण्डितारातिमण्डलः । २९।६०
तेषां निजनयज्ञानां न यज्ञानां प्रवृत्तयः । ५।३०
स्वयं नियन्ता विश्वस्य विश्वस्य बत वैरिषु ।
सुखं सुप्तो निजगृहे ततो निजगृहेऽरिभिः ॥ १६।७
स मया हन्त हन्तव्यः समया समुपागतः । १८।२२
भवताऽपकृता पूर्वं भवतापकृता स्वयम् । १९।३८
अहंकारपरः कारतलवः स्वबलान्वितः ।
हन्तारं नैव हन्तारं, कांतारं तु व्यलोकत ॥ २८।६८

हीं यमकें किती अनायासानें व क्लिष्टता न आणतां साधलीं आहेत !
आतां आणखी एक शब्दालंकार जो श्लेष त्याचीं दोन तीन खुबीदार उदाहरणें देऊं.

स्वहस्तपुष्करोद्भूत धूळिधूसरमस्तकम् ।
उद्भिद्यमानदन्ताग्र कुंदकुड्मल भूषितम् ॥ ७।१५
× × × विलोक्य स्तिमिताऽभवत् ॥ ७।१६

हस्त म्हणजे (१) हात आणि (२) सोंड; पुष्कर म्हणजे (१) कमळ, (२) सोंडेचें अग्र.

चक्रप्रियकरं सद्यः समुल्लासितमण्डलम् ।
नावेदयदमुं लोकबन्धुं लोको व्यलोकत ॥

लोकबन्धुं=(१)लोकांच्या मित्रास, (२) सूर्यास; चक्रप्रियकरं=(१)राष्ट्राचें प्रिय करणाऱ्यास, (२) चक्रवाक पक्ष्यास आनंद देणाऱ्यास; समुल्लासित-मण्डलं = (१) देशास उल्हसित करणाऱ्यास, (२) पृथ्वीस प्रकाशित करणाऱ्यास.

अभ्रमन्नपि युद्धेऽस्मिन् स भ्रमन्नभ्रमन्तरा ।
अभ्रामयदहोरात्रं मिषतां द्विषतां दशः ॥ २१।६३

अभ्रमन् = (१) न भ्रमण करणारा, (२) न गोंधळणारा.
येथें श्लेषालंकार हा विरोधालंकारास पोषक आहे.

निशम्य येदिलस्तेन नरेन्द्रेण करे कृतम् ।
अन्वशोचत् तमचलं फणी फणमिवोन्नतम् ॥ २४।२२

नरेन्द्रेण=(१) राजानें,(२) गारुड्यानें;करे कृतं=(१) हस्तगत केलेल्या, (२) हातांत धरलेल्या.

माधुर्य, ओज आणि प्रसाद हे तीनहि गुण समग्र काव्यभर ओतप्रोत भरलेले असून, वीरादि रसांस पोषक झाले आहेत. ओज व प्रसाद हे गुण विशेषतः वीर व रौद्र रसांस खुलविणारे आहेत. उदाहरणार्थ

त्वङ्गत्तुरङ्गमखुरक्षुण्णभीमरथीतटः ।
समुद्यद्दुन्दुभिध्वानविभ्रमक्षोभितार्णवः ॥ अ. १।४६ ते ४८; इत्यादि

या खेरीज २२ व्या अध्यायांतील २७ ते ३२ आणि ५७ ते ७० श्लोक पहावे.

या ग्रंथांत उपमा, रूपक, उत्प्रेक्षा इत्यादि अर्थालङ्कार मुबलक पहावयास सांपडतात ते असेः—

उपमाः—१३।८५; २१।४१; २२।१; २२।८-११; २४।१२; २६।४५; २७।२०. उत्प्रेक्षाः—२।३८; ४।३७; ४।४७; १४।२७, २८; २१।६२; २३।७०. रूपक व व्याजस्तुतीः—२४।६८; २४।६२; २२।३९; २१।५२. अतिशयोक्तिः—१३।८७; १७।७-१०; २१।७४. सहोक्तिः—९।६६; १३।२९. विनोक्तिः—११।३१. अपह्नुतिः—१९।११; विरोधः—१७।१४; २२।३७; ६।९१. कारणमालाः—१६।३५-४१. दृष्टांतः—१६।८. अर्थांतरन्यासः—२४।७४. अनन्वयः—२९।३७.

परमानन्द ८ व्या अध्यायांत ५८ व्या श्लोकापासून कालाचें माहात्म्य वर्णीत असतांना, ६४ ते ७० श्लोकामध्यें आणि १३ व्यांत यशोमाहात्म्य स्तवीत असतांना ६९ ते ७३ श्लोकांमध्यें भाषेचा अप्रतिहत प्रवाह पहावयास सांपडतो.

परमानन्दाची वर्णनशैली प्रसादयुक्त व मनोवेधक आहे, याचें प्रत्यंतर शिवाजीची शिशुलीला ( अ. ९ ), रायबागिणीचें भाषण (अ २९), शिवस्वरूपवर्णन ( अ. ३० ), व्यवहारनिरीक्षण ( अ. ११ ); समरभूमी-

वर्णन ( अ. २१–२३ ) वगैरे अनेक प्रसंगीं दिसून येणार आहे; आणि अशीं बहारीचीं वर्णनें ग्रंथभर ठिकठिकाणीं असल्यामुळें

वयं भागीरथीतीरे भवतो भारतीमिमाम्
पायंपायं न तृप्यामः सुधां सुमनसो यथा ॥ २८/११

हे काशीस्थ पंडितांच्या तोंडचे उद्गार आजच्या वाचकांसहि पटण्याजोगे आहेत यांत संशय नाहीं.

वरील समालोचनावरून शिवभारताची काव्यदृष्ट्या योग्यता किती मोठी आहे हें कोणाच्याहि सहज लक्षांत भरेल. आणि कवीचें भाषाप्रभुत्व, अपार शब्दसंपत्ति, ओजस्वी व प्रसादयुक्त वर्णनशैली, इत्यादि अलौकिक गुणांवरून परमानन्द हा कवीन्द्र पदवीस पूर्णपणें पात्र आहे हें कोण अमान्य करील ?

**चित्रें, हस्तलेखांचीं छायाचित्रें व नकाशे.** ÷ या ग्रंथांत आठ नकाशे दिले असून ते पाठपोठ छापले असल्यामुळें व ते चिकटविण्यापेक्षां शिवणींत आल्यानें जास्त सुरक्षित रहातात असें वाटल्यामुळें त्यांची योजना दोन ठिकाणीं केली आहे. टोपोग्राफि व सर्व्हे वगैरे निरनिराळया दृष्टीनें सरकारी रीतीनें प्रसिद्ध झालेले अनेक नकाशे पाहून व शिवभारतांतील वर्णनाचा बारीक विचार करून, हे नकाशे नवीनच तयार करविले आहेत. शिवकालीन इतिहासाच्या अध्ययनास ते इतिहासजिज्ञासूंना चांगले उपयोगी पडतील असा भरंवसा आहे.

जन्मतिथिविषयक तीन हस्तलेखांचीं छायाचित्रें येथें दिलीं आहेत. पैकीं कुंडली ज्यांत दिली आहे, तें पृष्ठ रायबहादुर पंडित गौरीशंकर ओझा यांजकडून मूळ हस्तलिखित बाडाचें छायाचित्र आलें त्यावरून जसेंचें तसें दिलें आहे. राजपुतान्यांतील बिआवर संस्थानांत पंडित मीठालाल व्यास यांच्या संग्रहीं हें जुनें बाड सापडलें व त्यांतील अनेक कुंडल्या विश्वसनीय असल्यामुळें राजपुतान्याच्या इतिहासाच्या द्वितीय खंडांत रायबहादुर ओझा यांनीं त्याचा उपयोग केला आहे.

शिवभारतांतील जन्मतिथिविषयक श्लोक देणाऱ्या हस्तलिखित पोथीच्या दोन पृष्ठांचीं छायाचित्रें दोन वर्षांपूर्वी तंजावर येथील सरस्वती महालाचे व्यवस्थापक रा. सांबमूर्तीराव यांच्या मार्फत आणविल्या व त्यावरून येथें

दिलेल्या प्रतिमा तयार केल्या आहेत. त्यावरून मूळपोथींचें हस्ताक्षर कोणत्या वळणाचें व काळाचें आहे तें वाचकांना समजण्याजोगें आहे.

जेधे शकावलींतील जन्मतिथिविषयक पृष्ठाचें छायाचित्र चित्रशाळेच्या व्यवस्थापकांनीं केलें होतें, तें या ग्रंथाच्या उपयोगास त्यानीं दिलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

मुखपृष्ठानंतर दिलेलें श्रीशिवाजी महाराजांचें रंगीत चित्र मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियममधील अमोलिक संग्रहांतलें आहे. या संबंधीं केलेल्या चौकशीवरून हें मूळ साताऱ्याच्या संग्रहांतील असून तें मुंबईतील प्रसिद्ध व्यापारी श्रीमंत शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी यानीं मुंबईस आणलें व त्यांजकडून तें म्यूझियमकडे गेलें असें कळतें. सदर म्यूझियमच्या पंचांकडे पुणें येथील भा. इ. सं. मंडळाचे चिटणीस श्रीयुत सरदार गंगाधरराव नारायणराव मुजुमदार एम्. एल्. सी. यानीं मंडळाच्या पुरस्कृत ग्रंथमालेंतील शिवभारत ग्रन्थांत घालण्याकरितां सदर चित्राची मागणी केली, व त्यावरून तें मला मिळालें. मूळ चित्रांतील रंग व आकारमान जसेचें तसें कायम ठेवले आहेत; या चित्राच्या छपाईसाठीं तयार करावे लागणारे ठसे श्रीयुत मावजी शेट यांच्या लक्ष्मी आर्ट प्रेस नांवाच्या छापखान्यांत तयार करण्यांत आले. हें चित्र या ग्रंथांत घालण्यासाठीं दिल्याबद्दल म्यूझियमच्या चालकांचा व श्रीयुत सरदार मुजुमदार यांचा मी फार आभारी आहें.

इतर ऐतिहासिक चित्रांपैकीं बंगळूरच्या किल्ल्याचें छायाचित्र मुंबईचे श्रीमंत व इतिहासप्रेमी शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी यांच्या संग्रहालयांत शके १७१६मध्यें छापलेल्या एका दुर्मिळ ग्रंथांतील चित्राचें आहे; मावजी शेट यांची शिवचरित्रविषयक कळकळ व मार्मिकपणा महाराष्ट्रीय वाचकांच्या परिचयाचीं आहेत. सदर बंगळूरचें चित्र मला दिल्याबद्दल मी श्रीयुत मावजी शेट यांचा फार ऋणी आहें.

शिवनेरी येथील शिवाईचें चित्र प्रस्तुत ग्रंथांत प्रथमच प्रसिद्ध होत आहे; व त्याचें श्रेय औंध संस्थानचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी यांना आहे. हा चित्राचा ठसा श्रीमंतांनीं मला दिला याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

या ग्रन्थावर प्रस्तावना, भाषांतर, नकाशे, हस्ताक्षराचीं छायाचित्रें, शिवाजी महाराजांची कुंडली, महाराजांचें रंगीत चित्र व इतर चित्रें वगैरे

अनेक अलंकार माझ्या शक्त्यनुसार चढविले आहेत. त्यांतील रत्नजडित व महत्वाचा म्हणजे प्रस्तावनाच होय. परंतु त्याची कारागिरी व आंतील रत्नें यांचें मोल, वाचकवर्ग हेच परीक्षक असल्यामुळे त्यानींच ठरवावयाचें आहे. ही प्रस्तावना माझे मित्र श्री. दत्तात्रय विष्णु आपटे यांनीं लिहिली आहे; या कामीं त्यांनीं मला आपल्या सहकारितेचा लाभ दिला याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

तसेंच या ग्रन्थाचें परिशीलन चालू असतां, श्रीमंत सरदार खंडेराव चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब मेहेंदळे यांनीं आपला मौल्यवान् ग्रन्थसंग्रह मोकळा ठेविला याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

भारत इतिहास संशोधक मंडळ पुणें यांनीं या शिवभारतग्रन्थविभूतीचा सत्कार करून आपल्या पुरस्कृत ग्रन्थमालेंत त्यास आसन दिलें याबद्दल मंडळाचा मी फार आभारी आहें.

शिवभारतांतील स्थळांचे व व्यक्तींच्या नांवाचें संशोधन शक्यतोंवर केलें आहे. तथापि कांहीं नांवाचा तलास लावण्याचें काम झालें नाहीं. उदाहरणार्थ शास्ताखानाबरोबर आलेल्या व्यक्तींचा शोध लावावयाचा अजीबात राहिला आहे. त्याचप्रमाणें 'क्षुद्रवंद्यपुर' 'प्रचंडपूर' इत्यादि पांचचार गांवांचा पत्ता लावतां आला नाहीं. तथापि मार्मिक वाचक हा अपुरेपणा नाहींसा करण्यास आस्थेनें मदत करतील अशी आम्हांस आशा आहे.

प्रस्तुत ग्रंथाचें मुद्रण शुद्ध व्हावें म्हणून पहिले पासून दक्षता ठेवीत गेलों व बराच पैसाहि खर्ची घातला; परंतु त्या कामीं यश लाभलें नाहीं. तथापि मुद्रणदोषाची सर्व जबाबदारी मजवर आहे, हें निराळें सांगणें नकोच.

आज, बरेच वर्षे 'शिवभारत' 'शिवभारत' म्हणून गाजत असलेला ग्रन्थ आम्हीं यथाशक्ति परामर्ष घेऊन इतिहासप्रेमी वाचकांस सादर करीत आहों.

मिति श्रावण वद्य ८<br>भृगुवार, शके १८४९<br>पुणें

सदाशिव महादेव दिवेकर.

# आधारभूत ग्रंथांची यादी.

१ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें—राजवाडे—खंड ४, ८, १५, १६, १७, १८, २०, २१. २ राधामाधवविलासचंपू—राजवाडे ३ विविधविषय—इतिहास आणि ऐतिहासिक—राजवाडे. ४ रामदास आणि रामदासी—धुळें. ५ संकीर्णलेखसंग्रह—सरस्वतीमंदिर. ६ तंजावरचा शिलालेख—राजवाडे. ७ तंजावरचा शिलालेख—टी. सांबमूर्तीराव. ८ शिवछत्रपतीची बखर—प्रभात, धुळें. ९ सभासदी बखर—साने. १० चित्रगुप्ताची बखर—साने. ११ चिटणीशी बखर—साने. १२ शिवदिग्विजय—बडोदें. १३ एक्याणव कलमी बखर—धुळें. १४ शिवचरित्रप्रदीप. १५ शिवचरित्रसाहित्य खं. १. १६ पर्णालपर्वतग्रहणाख्यान—जयरामकृत. १७ बुधभूषण—शंभुराजकृत. १८ सनदापत्रें—मावजी व पारसनीस. १९ अमात्याची राजनीति—नवी आवृत्ति. २० राजव्यवहारकोश—रघुनाथपंडितकृत. २१ पुरुषोत्तमकविकृत शिवकाव्यम्. २२ शिवराजभूषण—भूषण. २३ चतुर्थ संमेलनवृत्त—भा. इ. सं. मंडळ. २४ बुसातिने सलातीन—हिंदी भाषांतर, बडोदें. २५. विजापूरच्या आदिलशाही घराण्याचा इतिहास—मोडककृत. २६ बुसातिने सलातीन—मराठी भाषांतर अप्रकाशित. २७ इतिवृत्त श. १८३५—भा. इ. सं. मंडळ. २८ भा. इ. सं. मं त्रैमासिक श. १८४२—४८. २९ अफजलखानाचा पोवाडा —य. न. केळकर संपादित. ३० खरे जंत्री. ३१ बुऱ्हाण—इ.—मआसीर (निजामशाहीचा इतिहास). ३२ संभाजीचें संस्कृत दानपत्र—पोतदारसंग्रह. ३३ पत्रें यादि वगैरे—काव्येतिहाससंग्रह. ३४ महालया माहात्म्य —खाजगी संग्रह—श्री. सरदार मुजुमदार पुणें.

1 History of the Mahrathas by Grant Duff, 3rd edition. 2 Sources of Vijayanagar History-Krishnaswami Ayyangar. 3 Nayaks of madura–R. Sathyanath Aiyar. 4 Shivaji and his times by J. Sarkar ( 2nd edition ). 5 Aurangjeb-( Vol. I and II 2nd edition )–by J. Sarkar. 6 Mysore–Rice ( old and new editions ) 7 Jahangir–Veni Prasad. 8 History of India ( Vols. VI & VII )-Elliot. 9 History of the Mahrattas–Scott Waring. 10 Selections from state papers–Forest.

11 Factory Records (English). 12 Dagh Register (Dutch). 13 Shivaji ( Portuguese )-P. Pisurlenkars. 14 Travels-P. Della Vella-Hakluyt society. 15 Epigraphia Moslemica. 16 Epigraphia karnatica. I7 Indian Antiquary. 18 Sewell's Forgotten Empire. I9 Modern Review ( 1917 Sept. ). 20 Catatogus Catalologorum-Theodor Aufretcht Leipzig ( 1891 ). 21 A Classified index to the Sanskrit Mss. in the palace at Tanjore by A. C. Burnell Ph. D. ( London 1879 ). 22 The Indian calendar-Sewell & Dixit ( 1896 ).

## मुद्रणशुद्धि.

उपोद्घात--पृष्ठ व ओळ ५/२३ गंजाजमनी=गंगाजमनी; ९/११ वेंकटाप्या=वेंकटाप्पा; ८/१९ त्रटित=त्रुटित.

प्रस्तावना--५६/९ असलें=असेल; ११/२४ काय=कार्य; ११/२९ शहाजीला=शहाजीला; १३०/२५ खडेबारे=खेडेबारे; १३२/१ अगदि=अगदीं; १६१/२२ मत्हव=महत्व, १७४/२५ भारकारानें=भारतकारानें.

कुंडलीच्या प्रतिमाचित्राखालीं शिवमकालीन याबद्दल शिवसमकालीन असें पाहिजे.

शिवभारताचें शुद्धिपत्र निराळें दिलें आहे. ग्रंथ शुद्ध करून नंतर वाचावा.

# अनुक्रमणिका.

## चित्रें, हस्ताक्षरांची प्रतिमाचित्रें व नकाशे

# पुरस्कार.

शके १८४१ या वर्षी म्हणजे सुमारें आठ वर्षांखालीं आपल्या मंडळाचे उत्साही सभासद रा. रा. सदाशिव महादेव ऊर्फ बाबा दिवेकर मु० कल्याण यांनी तामील गद्य शिवभारताचा उडता परिचय सप्तम संमेलनप्रसंगीं करून दिला. जी थोडी माहिती त्या तामील मजकुराच्या इंग्रजींत करविलेल्या भाषांतरावरून पुढें आली त्यावरून सर्व ऐकणारांची जिज्ञासा जागृत झाली. पुढें मूळ ग्रंथ संस्कृत असला पाहिजे हें रा. दिवेकर यांचे ध्यानीं आल्यावर त्याचा शोध करून त्यांनी तो ग्रंथ नकलून आणविला. शके १८३८ सालीं कै. टिळकांचे द्वारा पुढें आलेल्या जेधे शकावलींतील शिवकालीन मित्यांमुळें मंडळांतील अभ्यासी संशोधकांत मोठी खळबळ उडून गेली होती; आणि श्रीशिवजन्माची जेधे यांनीं दिलेली मितीच बहुतेक तंतोतंत जेव्हां शिवभारतांत आढळली तेव्हां प्रथम संशय आणि मागाहून कुतूहल अतोनात वाढलें. मावळाचे एका कोपऱ्यांतील जेध्यांची कारी एका टोंकाला आणि दूरच्या तामीलनाड मधील एका भागांतील भोसल्यांचें तंजावर दुसऱ्या टोंकाला ! या दोन टोंकांतून जेव्हां श्रीशिवजन्मतिथीचा नवाच आणि संवादि सूर निघूं लागला तेव्हां मति घटकाभर गुंगच झाली. आरंभीं हें कसेंसेंच वाटे. पुढें जेधे मित्तीची चिकित्सा **अस्सल कागदांच्या मुकाबल्यानें** करण्यास प्रारंभ झाला. रा. जोशी, रा. पुरंदरे प्रभृतींनीं नवे कागद पुढें मांडले. रा. द. वि. आपटे यांनी आपली तीक्ष्ण संशोधक व गाणितिक नजर लावून त्यांची तपासणी केली आणि पहिला संशयाचा झटका हलकेहलके उतरला. आपण बखरीच्या युगांतून पुढील **अस्सल पत्रांच्या युगांत** प्रविष्ट होत आहोंत हें ध्यानांत आलें आणि आजवर प्रमाण वाटणारीं कित्येक ऐतिह्यें धिटाईनें भिरकावून देण्यास प्रारंभ झाला. वसंतोदयापूर्वी जशी वृक्षाचीं पानें गळून पडणें आणि नवी पालवी फुटणें हा सृष्टिक्रमच आहे तसेंच मानवी ज्ञानवृक्षाचेंहि आहे. नवे शोध झाले म्हणजे जुने समज आपोआप गळून पडतात.

जशी शिवजन्ममिति या शिवभारतांत अगदीं नवीच सांपडली तशीच इतरहि माहिती पुष्कळच नवी आहे असें परीक्षणांतीं दिसून आलें आणि असेंहि दिसून आलें कीं ही माहिती **अस्सल कागदपत्रांतील व तत्कालीन इतिहासांतील इतर माहितीशीं पुष्कळ जमिळती** आहे. 'काव्यांत इतिहास कोठून येईल?' अशीहि शंका मनांत होती. परंतु परमानन्दाचें हें शिवभारत तसल्या काव्यकोटींतलें दिसेना. परमानन्द हा कसबी कवी खरा, परंतु हा इतिहासवेत्ता कवी आहे अशी खात्री पटली. या खात्रीचेंच पर्यवसान म्हणजे या समग्र (उपलब्ध असलेल्या) ग्रंथाची प्रसिद्धि करण्याची हिंमत धरून रा. दिवेकर यांनी तडीला नेली हें होय. आपला संकल्प याप्रमाणें सिद्धीला नेऊन रा. दिवेकर यांनी मोठेंच कार्य शेवटास नेलें आहे;

आणि जोंवर श्रीशिवछत्रपतींच्या चरित्राविषयीं आपलें प्रेम राहील तोंवर रा. दिवेकर यांचा विसरहि परमानन्दाबरोबर आपणांस होऊं शकणार नाहीं.

हें शिवभारत प्रसिद्ध करावें असा विचार *कै. लक्ष्मणराव-आंध्र ज्ञानकोशकर्ते-यांनी आम्हांला कळविला होता! त्यांच्या लक्ष्यांत त्याची योग्यता भरलेली होती. शिवभारतासारखेच आणखी ग्रंथ किंबहुना याच भारताचा पुढला भाग पुढेंमागें तिकडे मूळरूपानें किंवा भाषांतररूपानें उपलब्ध होईल अशी आशा आहे. तसेंच **द्राविड भाषेंत** शिवकालीन व शिवपूर्वकालीन इतिहासाचीं साधनें पुष्कळच असलीं पाहिजेत. तिकडील शोधकांनीं प्रयत्न केला पाहिजे. कै. लक्ष्मणराव गेले तथापि कुंभकोण, तंजावर वगैरे भागांत मूळचे महाराष्ट्रीय पुष्कळ आहेत त्यांनीं तरी हें काम अंगावर घेऊन पुनः पूर्वींचे संबंध उज्वलित करावे अशी त्यांना विनंती आहे.

या शिवभारतांतील ऐतिहासिक माहितीची परीक्षा करणारी सविस्तर प्रस्तावना रा. दत्तोपंत आपटे यांनी लिहिलेली ग्रंथास जोडली आहे. ही रा. आपटे यांनीं केलेली परीक्षा वाचून रा. आपटे यांची विद्वत्ता, चिकित्साबुद्धि व परिश्रम इत्यादींची स्पष्ट कल्पना कोणाहि वाचकास येईल. केवळ ऐतिहासिक सत्यचिकित्सा करण्याचें शुद्ध व शास्त्रीय धोरण त्यांनी आपणांपुढें कसें ठेवलें आहे हें त्या विवेचनावरून सहज प्रतीत होईल.

येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे. महाराष्ट्रेतिहासचिकित्सेला अवश्य असणारा बराच ग्रंथसंग्रह आपले मंडळांत अद्यापि हवा आहे. मंडळाचे ग्रंथालयांत पुष्कळ दुर्मिळ ग्रंथांचा संग्रह केलेला आहे; तथापि द्रव्याभावीं पाहिजेत तेवढे ग्रंथ तेथें संग्रहून ठेवतां आलेले नाहींत यामुळें रा. आपटे यांचेसारखे विद्वान् विचिकित्सक व कष्टाळू लेखक व शोधक निरपेक्षपणें श्रम करण्यास सिद्ध असतांहि त्यांची अडचणींतून सुटका होत नाहीं. ही उणीव सत्वर नाहींशी केली पाहिजे.

श्रीछत्रपती शिवाजी महाराजांचें सर्वांगसुंदर चरित्र प्रसिद्ध होण्याला आधीं **शिवचरित्रसाहित्य** भरपूर प्रसिद्ध व्हावयास हवें. या साहित्याचे भाषावार विभाग पाडले तर ( १ ) मराठी ( २ ) फारशी ( ३ ) इंग्रजी (४) फ्रेंच (५) डच ( ६ ) पोर्तुगीज (७) द्राविड (८) संस्कृत व(९)इतर असे नऊ भाग पडतील. पैकीं मराठी साधनांचे पहिले पहिले थर हल्लीं हाताला थोडथोडे लागत चालले आहेत. हे थर उकरून झाले म्हणजे याहि खालीं महत्त्वाचे राजकीय वगैरे स्वरूपाचेहि कागद सांपडतील अशी आशा वाटत आहे. सांपडणार नाहींत किंबहुना अद्यापि सांपडत नाहींत किंवा सांपडले नाहींत सबब तसले कागदच नसले पाहिजेत आणि अतएव मराठे किंवा

---

* कै. राजारामशास्त्री भागवत मुंबई यांनी शिवभारताविषयीं इंदुप्रकाशांत कांहीं लिहिल्याचें रा. ना. कृ. गद्रे यांनीं रा. पोतदारांजवळ सांगितलें होतें. परंतु त्या ग्रंथाची योग्यता ध्यानांत येण्याची वेळ पुढेंच यावयाची होती!

महाराष्ट्रीय लोक (मुसलमानांपेक्षां?) सांस्कृतिक दृष्ट्या हीन होते असा एक*अपसिद्धांत घाईघाईनें मांडण्यांत आलेला आहे त्याचें वैय्यर्थ्यहि लख्ख दिसून येईल. जधे-घोरपडे वगैरे घराण्यांतून असे कागद मिळूं लागले आहेत.

जसे ऐतिहासिक कागद पाहिले पाहिजेत तसेंच तत्कालीन सारस्वतहि पाहिलें पाहिजे. राष्ट्राची मनोरचना समजून घेण्यास त्याच्या सारस्वताचें सूक्ष्म व मार्मिक अध्ययन अवश्य आहे. रा. आपटे यांनी आपल्या प्रस्तावनेंत पृ. ५९-६०-६१ येथें महाराष्ट्र-मराठा-शब्दाच्या अर्थाची निश्चिति करण्याचा जो प्रयत्न केला आहे तो वरील दृष्टीनें आम्हांस अपुरा वाटतो. "तान्हा मऱ्हाठा देश" (ज्ञानेश्वर-अभंग) किंवा "तो मी एक सर्व मुक्त। बोलोनियां मऱ्हाठिया भाखा। करी डोळेवरी लोकां। घेवों ये ऐसें जे" (ज्ञानदेवी) किंवा "ऐसा हा राव असतां। महाराष्ट्र धर्मी वर्तता" (नृसिंह-सरस्वती) अथवा "जैसा सुखासनाचा मार्गु। तैसा महाराष्ट्रप्रसंगु"-" ये मऱ्हाठींचेनि पल्लवें। जीव उगमातें पावे" "धन्य धन्य हे मऱ्हाठी। हे ब्रह्मविद्येची कसवटी" [बाळबोध-त्र्यंबकराज] इत्यादि जे अनेक शिवपूर्वकालीन उल्लेख 'मऱ्हाठा' शब्दाची सकलमहाराष्ट्रव्याप्ति दर्शवितात त्यांचाहि विचार व्हावयास पाहिजे.

मराठींतील साधनें प्रसिद्ध करण्याचा उद्योग चालू आहे आणि जयरामाचें पर्णाल-पर्वतग्रहणाख्यान, बुधभूषण किंवा हें शिवभारत अशीं संस्कृत साधनेंहि मिळून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम वाढत चालला आहे हें अभिनंदनीयच आहे. इंग्रजींतलीं साधनें कांहीं प्रसिद्ध झालीं आहेत परंतु अद्यापि अप्रसिद्ध अशींहि पुष्कळ आहेत. डॉ. बाळ-कृष्ण कोल्हापूर यांनीं त्यांतलीं कांहीं प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे. डच् भाषेंतील डाग् रजिस्टर्मध्यें पुष्कळच नवीन माहिती असल्याचें दिसून आलें आहे आणि या माहितीचे खंडहि पुरस्कृतग्रंथमालेंत प्रसिद्ध करण्याची उमेद रा. दिवेकर यांनीं धरिली आहे. पोर्तुगीज साधनेंहि महत्त्वाचीं असून प्रो. पिसुर्लेकर यांनीं ती माहिती प्रसिद्ध करण्याची खटपट चालविली आहे. अद्यापि द्राविड भाषांतील साधनें विशेष पुढें आलीं नाहींत. फारसी अस्सल साधनेंहि प्रसिद्ध व्हावयाजोगीं पुष्कळच आहेत. आणि नुकतीच आपले तरुण व उत्साही मित्र रा. शंकर गणेश दाते यांचे संग्रहांतील जी **अदिलशाही फर्मानाची खाण** भा. इ. सं. मंडळाच्या संमे-लनप्रसंगीं दाखविली ती पाहिली म्हणजे असली महत्त्वाची ऐतिहासिक सामग्री पुष्कळच हातीं लागेल अशी पक्की आशा वाटूं लागली आहे. कागदांबरोबरच नाणीं-चित्रें-देवळें-देव-भाषा-वाङ्मय-चालीरीती-यांचें संशोधन झालें पाहिजे. स्थळ-कुळ संशोधन अद्यापि पुष्कळच होणें आहे. त्याशिवाय श्रीशिवचरित्र लिहिण्याची उमेद सफळ होण्यासारखी नाहीं.

अजमीरचे रायबहादुर गौरीशंकर ओझा या इतिहासपंडितांनी सुचविलेप्रमाणें

---

* प्रो. जदुबाबूकृत-शिवाजी ॲंड हिज् टाइम्स् आवृत्ति २ पहिलें.

( सुधा–मधील लेख ) शके १८५१ त श्रीशिवप्रभूंचा त्रिशतसांवत्सरिक जन्मतिथि-मंगलोत्सवप्रसंग सर्वांनीं उत्साहानें साजरा करावा आणि त्यापूर्वी शिवचरित्रसाहित्याचे निदान पांच खण्ड तरी प्रसिद्ध व्हावे. मंडळाच्या **स्वीय ग्रंथमालेनें** या साहित्याचा फार महत्त्वाचा असा **नवा खंड** छापावयास घेतला आहे. आणखी एक दोन खंड तरी काढण्याइतकी सामग्री मिळण्याजोगी आहे. हें साहित्यप्रसिद्धीचें जबाबदारीचें कार्य व्यवस्थितपणें पार पाडण्यासाठी एक योजन मंडळामार्फत प्रसिद्ध करण्याचा आणि अंगावर घेण्याचा रा. दिवेकरप्रभृतींचा विचार आहे. असा प्रयत्न झाला पाहिजे यांत संशय नाहीं. तो रा. दिवेकर यांनीं लवकर हातीं घ्यावा किंबहुना आतां त्यांनीं याच कामास स्वतःस वाहून घेतलें तर लागलाच आरंभ होईल. यासाठीं एकादा निराळा निधि किंवा ट्रस्ट मंडळांत करावा आणि हे पुरस्कृत ग्रंथ वगैरे सर्व त्यांचे खातीं लावून देऊन काम आरंभावें.

असो ! आजची ही शिवभारताची प्रथमावृत्ति आहे. ती प्रसिद्ध होण्याला विलंब बराच झाला तरी रा. दिवेकर यांनीं ती अव्यंग करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला आहे असें म्हटलें पाहिजे. रा. दिवेकर व आपटे या उभयतांनीं आज सतत दोन वर्षे खपून ही सार्थ, सचित्र,ससूचिक अशी सालंकृत आवृत्ति प्रसिद्ध केली यासाठीं त्या उभयतांस शतशः धन्यवाद देऊन या ग्रंथाचीं गुजराथी, हिंदी, बंगाली, तामील वगैरे भारतीय भाषांतरें झाल्यानें श्रीशिवप्रभूंचें अद्भुतरम्य चरित्र सर्वत्र कळण्यास मोठें साधन होईल असें सुचवून मोठ्या आनंदानें आणि आदरानें या ग्रंथाचा पुरस्कार मंडळातर्फे आजच्या गोकुळअष्टमीच्या सुमुहूर्तीं करतों.

श्रावण व. ८ शुक्रवार
शके १८४९ पुणें.

दत्तो वामन पोतदार.
गंगाधरराव नारायणराव मुजुमदार.
चिटणीस–भा. इ. सं. मंडळ.

# शुद्धिपत्र.

| पृ.—ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ७-२९ | सा·म् | सागरसन्निभम् |
| ९-१४ | साम·र्नां | सामदानार्नं |
| ११-१२ | प्र·च्चै | प्रथितामुच्चै |
| १४-६ | वि·त्य | विद्धयनित्य |
| १५-३ | शि·रा | शिशिरो |
| ,, -२६ | शाहू: | शाहः |
| १६-२४ | नि·पि | निशम्यैतन्नि-जामोपि |
| ,, -२८ | श·हौ | शरफिाह्वौ |
| ,, -२९ | स·य्य | समानाय्य |
| १९-९ | सु·न्ते | सुवृत्ते |
| ,, -१५ | शि·णि | शिञ्जन्मणि |
| २१-९ | होत गेला | झाला |
| २३-११ | दास्या·णा० | दास्यानीतो० |
| ,, -१४ | दीरा | दूरा |
| २४-६ | मृन्दन्त | मृद्रन्त |
| २५-२२ | संबंधाकडे | सोयरिकीकडे |
| २९-११ | त्याचा | त्याचा जाधव-रावानें |
| ३०-१८ | तदेव | तदैव |
| ,, -२२ | संधि | संधिं |
| ३२-२३ | रा·ल | राघवश्चांचल |
| ३६-१८ | घ·र | घराकार |
| ,, -२७ | रु·जे० | रुरुधुर्गज० |
| ,, -३१ | पातमासु० | पातयामासु |
| ४०-९ | द्य·म् | द्युमण्डलम् । |
| ४१-२५ | मम·जं | महाराजं |
| ४१-११ | प्र·ख | प्रसादान्मुखे |
| ४४-२ | वृ·नि | वृजिनानि |
| ४६-६ | स्या·मि | स्थापयिष्यामि |
| ४८-१७ | व·खा | वज्ररेखा |
| ४९-२६ | स·ती | सत्त्ववती |
| ५२-९ | मेघा: | मेधा |
| ,, -१७ | मानिता | मानिना |
| ५४-१९ | सि·र | सिन्धुरघर्घर |
| ,, -३३ | आदिति | अदिति |
| ५५-१५ | इ·घा | इत्यभिधा |
| ,, -२३ | व·ली | बलीनाना- |
| ,, -२५ | गो·ति | गोप्स्याति |
| ५६-८ | वैराटा | वराटा |
| ५७-२७ | स्निन्ध | स्निग्ध |
| ५८-२७ | भोजस्य | भोजस |
| ५९-७ | घराणि | घरणि |
| ६०-२३ | बलेन | बलेना |
| ६१-३ | मंजीर र्हाजितम् | मंजीरशिंजि-तम् |
| ,, -१५ | गेह दे·म् | गेहदेहलीम् । |
| ६२-२५ | दहोडिंभः | दहो डिंभः |
| ६३-२ | शा·म् । | शार्दूलशाब्दितम् |
| ,, -७ | म·त | महेषत |
| ,, -१० | च·न्ति बृं·नि | चरद्दन्तिबृंहि-तानि |
| ६३-२४ | पतत | पतंतं |
| ,, -३० | प·द्व तल | पदद्वंद्वतल |
| ६५-१४ | होता. | होता; तेथें शहाजीचें आग-मन कसें झालें तें सर्व, हे कवी-न्द्रा, तूं आम्हा-ला सांग. |
| ६९-१२ | म·शः | महायशाः |
| ७३-१२ | म·त् | मजीघनत् |

| पृ.—ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ,, -२७ | दैवगिरं | देवगिरिं |
| ,, -२९ | का·त | कालाज्जातं |
| ७५-३० | जिगीवितोः | जिगीषतोः |
| ७६-७ | युद्धत | युध्यत |
| ,, -२१ | ततो | ततम् |
| ,, २२ | तद्दशौ | तद्दृशौ |
| ७८-२९ | र·म् | रणदूलहम् |
| ७९-३ | ह·र | हुशेन्यंबर |
| ७९-१५ | म·म् | महीभुजम् |
| ८०-११ | प्रतिसद्योलसत् | प्रतिसद्मोलसत् |
| ,, | ५५ वा श्लोक पृ. ८१ वर ५६ चे आधीं घालणें. | |
| ८२-२३ | वातो | वाता |
| ८५-६ | द्युर्शः | द्युतिमुदर्कशः |
| ,, -२१ | वृ·म् | वृषध्वजम् |
| ८६-२६ | शहाराज | शाहराज |
| ८७-४ | ध·स्य | धरित्रीभारस्य |
| ,, -६ | शि·म | शिवाह्वयम् |
| ८८-२५ | पुण्याहं | पुण्याव्हं |
| ,, -२८ | चक्रप्रियकरः | चक्रप्रियकरं |
| ८९-११ | गुणैस्मह | गुणैस्सह |
| ८९-२१ | विघंलने | विलंघने |
| ९०-११ | वा·व | वसन्ततौ |
| ९४-२३ | कुंजरास्तु | कुंजरांस्तु |
| ९५-१४ | ह·न | हंतोद्धावनेन |
| ९६-३० | संहसाः | संहताः |
| ,, | सै·त | सैनिकैः गृहीत |
| ९७-६ | य·न् | यस्याममन्त्रयन् |
| ९९-१० | या·भिः | याकुतसाराथिः |
| १०३-७ | चितस्य | चित्तत्र |
| ,, -१६ | हस्तीच्या-र्णे | मस्तकावरील |

| पृ.—ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| | | कुंभा प्र० १ |
| ,, -२२ | उत्पत्योत्पत्य | उत्पत्योत्पत्य |
| ,, ,, | पातायन् | पातयन् |
| १०४-३२ | काळी | तेजस्वी |
| १०५-१९ | हतसंबद्ध | दृढसंबद्ध |
| १०६-२ | दिग्जकारकः | दिग्जयकारकः |
| ,, ,२४ | मेहिर्नी | मेदिर्नी |
| ,, ,२८ | प्रतिद्ध्यान | प्रतिद्ध्वान |
| ११०-३ | असतांहि० | असून मोठमोठ्या वेदना होत असतांहि तो |
| ,, -१४ | स्सपौरुषम् | स्स्वपौरुषम् |
| १११-३ | सहस्त्रधा | सहस्रधा |
| १११-१३ | पत् | पतापतात् |
| १११-२० | १०६ श्लोकाचा उत्तरार्ध | १०७ श्लोकाला जोडून वाचावा |
| १११-२० | | नंतर शत्रूंनीं केलेल्या असंख्य शस्त्रपातांच्या मुळे वारंवार पडणाऱ्या घोड्यावरून झटकन् उडीमारून |
| ,, -३३ | स्मयं | स्वयं |
| ११३-५ | नेंघने | नेंघनं |
| ११५-८ | क्रूरोशरफशाह | करोऽशरफशाह |
| ,, -१७ | शरफशहा | अशरफशहा |
| ,, -२६ | शिवसैन्येर० | शिवसैन्यैर० |
| ,, -२८ | है०चा पुत्र | है०चा सिंहाकृति पुत्र |
| ११७-१२ | सांगोपांगासह | सांगोपांग |

| पृ.–ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- |
| ११७-२१ | दुष्टांशीं मैत्री | दुष्टांची यावनाधुरी |
| ११८-२ | केळीचा खांब | जगांत प्रसिद्ध असलेलें के० |
| ,, - ,, | पाडणें | फाडणें |
| ,, -१३ | आहितो | अहितो |
| ,, २८ | पालयन्नाति | पालयन्नति |
| १२०-२ | प्रथनाय | प्रधनाय |
| ,, -२९ | प्रथनामोदो | प्रधनामोदो |
| १२३-५ | सिद्धिन्नो | सिद्धिं नो |
| ,, -२४ | शंकर | यशासाठींच शंकर |
| ,, -३१ | दुर्गाचा | लगेच त्या दु० |
| १२६-९ | र्दिर्घाभिः | र्दीर्घाभिः |
| ,, -२७ | तेंव्हां | तेंव्हां तेथें |
| ,, ३२ | बडवान प्रमाणें अत्यंत | ( हें गाळणें ) |
| ,, -३२ | असतां | असतां बलवान् बल्लाळ |
| १२७-१० | मीमश्च | भीमश्च |
| १२८-६ | छद | उरश्छद |
| ,, १० | सारेच्छेदान् | सोरश्छदान् |
| ,, ३० | च्छिभमेकं | च्छिन्नमेकं |
| ,, ,, | ११२श्लोक | अर्थ— तेथें शत्रूनें आपला एक हात कापला आहे हें ज्याच्या लक्षांत आलें नाहीं अशा एका योद्ध्यानें हस्तीप्रमाणें एकाच हातानें ( सोंडेनें ) शत्रूवर हल्ला केला. |
| १२९-२३ | छुगारून | उगारून |
| १३०- ३ | से०ना | सेनाधिपातिना |
| ,, - ६ | मत्त | लढणाऱ्या मत्त |
| १३१- ४ | याश्व | पाश्व |
| १३२-२० | डिंडरि | डिंडीर |
| १३४-२१ | भ्रष्टानूपनूरु | भ्रष्टानुपलानुरु |
| १३५- २ | दूरं | इरं |
| ,, -२३ | मध्वनोर्ध्येव | मध्वनोऽधेऽव |
| १३७- ५ | तरा | तटी |
| ,, - ७ | मत्राजि | मत्ताजि |
| ,, -१२ | मचाची | मताजी |
| १३८- ३ | युध्यत | युध्यत |
| ,, -१० | समयोभृतम् | स्मयोद्धुरम् |
| ,, -१८ | वरोदु | वरोद्ध |
| १३९-११ | रंग | ० |
| ,, -३० | रुधिराद्रौ | रुधिरार्द्रौ |
| १४०-३२ | विस्प्रस्त | विस्रस्त |
| १४१-२७ | प्रथम | प्रमथ |
| ,, -३३ | बुबुधे | बुभुजे |
| १४२-११ | सर्वमाधि० | सर्वमभिधा० |
| ,, -१८ | का०प्र० | सर्पा प्र० |
| १४३-१८ | गोदेस्य | गोदस्य |
| ,, -२७ | केलेल्या | केलेला |
| १४४-१२ | वर्णनिन्यास | वर्णविन्यास |
| ,, -१५ | वांकविलें | वाकविलेलें |
| ,, -२७ | सिं०खा | सिंहासारख्या |
| ,, -३२ | तेंव्हांच | युद्धावेशानें |
| १४७- ९ | परत | ( हें गाळणें ) |
| १४८-३० | शहाजी | शिवाजी |
| १४९-१८ | बिंबरूरे | बिंगरूरे |
| १५०-२५ | जगत्यत्र | जगत्यत्र |
| ,, -२६ | म्हणतो | म्हणाला |

| पृ.—ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १५९-२९ | नव | नैव |
| १६०-२० | काणि | आणि |
| १७४- ९ | म·ति | ममितः स्थिति |
| ,, -३५ | साहस्यां | साहस्त्र्यां |
| १७८-२२ | उ० | उद्धृत्य |
| १८३-१५ | सं·म | संदेशादेशनं नाम |
| १८६-१० | समुन्नध्दै | समुन्नद्धैः |
| ,, -२६ | प्रपतेद्यपि | प्रपतेद्यदि |
| १८८-२२ | डोंगरी वाटेनें | डोंगरी पायवाटेनें |
| १९०. ५ | ! | × |
| ,, . ७ | व्या·न् | व्याहृत्योतिहि तान् |
| १९३.२६ | ज्ञातासि | ज्ञातास्मि |
| १९५. ४ | र·तु | रहस्तानित्यु० |
| २००- ३ | अप्य·नियोः | निर्भय अंतःकरणाचे·वृत्तीचे |
| २०६. ८ | नीतीनें | आपल्या नीतीनें |
| ,, .१९ | स्वरुणां | स्वरुणा |
| २१०. ८ | बर्बरेण | वर्बरेण च |
| ,, -,, | युद्धन्तो० | युध्यन्तो० |
| २१३.२२ | कोपनाः | कोपनः |
| २१६.१४ | मानयत्। | मानयन् |
| ,, .२३ | शत्रूंच्या | कोणी शत्रूंच्या |
| २३२ .६ | पोत्क्षिप्य | प्रोत्क्षिप्य |
| २३७.२१ | पुरद्धोति | स्फुरद्धोति |
| २३९.२३ | मुर्घानि | मूर्घानि |
| २४३ .३ | द्रु·न् | द्रुतमुद पा० |
| २५३ .३ | कारतलवो | कारतलबो |
| २५४.१६ | घनागमं | घनागमं |
| २५८.१४ | धर्मनिष्ठ | करारी |
| २६१.१० | ध्वनींमध्ये | ध्वनेमध्ये |
| ,, .१८ | म·ल | महाबाहुर्हि० |
| ,, .२२ | वेरिबक्षो० | वैरिबक्षो |

| पृ.—ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| २६६ .६ | भित्वैन | भित्वैनं |
| ,, .७ | पतितोऽद्धा | परितोऽद्धा |
| २६७.२७ | म·ल | मणिर्विशाल |
| २६९ .४ | पत्तिशत्तैः | पत्तिशतैः |
| २७५.२२ | स्दर्शनो० | संदर्शनो |
| २७६.१३ | तस्त्रथं | तत्रस्थं तेगा० |
| २७९ .६ | दै·ते | दैवाद्धस्तमुप |
| ,, .१८ | काना डोळा | काणा डोळा |
| २८ .१० | चक्रामती | चक्रावती |
| ,, -१९ | प्यतपरम् | प्यतःपरम् |
| २८२,२१ | स्म | स्व |
| २८३, ६ | तन्नोति | तन्नेति |
| ,, , ८ | म्हणतां तें | म्हणतां तें अर्थपूर्ण आहे. |
| २८४,१६ | मिथः | मिथं |
| २८५, ४ | सह्यजयः | सह्यजय्यः |
| २८६, २ | सैन्यांचा | सैनिकांचा |
| २८७, ८ | वरोहं तं | वरोहन्तं |
| २८८,१४ | असें समजलें | असें शत्रुयोद्धयांस |
| २८९,२९ | सरोपषमेयु | सरोषमुपेयुषाम् |
| २९५-२४ | स्वमात्मन | स्वमात्मान |
| ३०३-९ | स्वपुर | राजपुर |
| ३०६·२२ | हिरडा | बाळहिरडा |
| ,, -२६ | फळांचीं | कापसांची |
| ३१३-१८ | आवरला | दिसूं दिला नाहीं |
| ३१८, ५ | मनांत कसें आणलें नाहीं. | मनांत आणिलें नाहीं. |
| ,, ,१७ | सारवर | सारवरपूरः |
| ३२०,२१ | द्विजोत्तमाः | द्विजोत्तमः |
| ३२३,१६ | सूर्यवंशे | सूर्यवंशे निधिवासकर· |
| ,, ,१७ | स्वपुर | शृंगारपुर |

# प्रस्तावना



## १. ग्रंथपरिचय

१. गेल्या दोन अडीच हजार वर्षांपासून या भारतवर्षांत लहानापासून थोरापर्यंत सर्वांच्या परिचयाचा असा जर कोणता ग्रंथ असेल तर तो महाभारत हा होय. या ग्रंथानें आपणा सर्व हिंदु लोकांना विशिष्ट प्रकारचें वळण लावलें, त्यांचें ध्येय निश्चितपणें सांगून दिलें, नीती अनीती, पाप पुण्य वगैरे अवश्यक कल्पनांचें स्वरूप विशद करून सांगितलें, सर्व परिस्थितींतील लोकांचीं सामान्य व प्रासंगिक कर्तव्यें नमूद केलीं आणि हे सर्व तात्विक व गूढ विषय समजाऊन देत असतां कथानकें व उपकथानकें यांची अशी उत्तम रीतीची सांगड घालून दिली कीं, तो ग्रंथ निरक्षरापासून तों जाडया विद्वानापर्यंत सर्व दर्जाच्या लोकांना पुनः पुनः वाचावा ऐकावा व मनन करावा असें वाटत असतें. शिवाजी महाराजांच्या चरित्राची थोरवीहि अशाच जातीची उज्वल आहे. त्यांच्या जन्मास आतां तीनशें वर्षे होत आलीं; या अवधींत किती तरी पुरुष झाले गेले, अनेक राज्यक्रान्त्या घडल्या, आमच्या समाजाचे स्वरूप किती तरी पालटलें, लोकांच्या आकांक्षांत व ध्येयांत जमीन अस्मानाचें अंतर पडलें; पण या सर्व उलथापालथींत आणि या सर्व स्थित्यंतरांत सर्व हिंदुस्थानांतील—आणि विशेषतः सर्व महाराष्ट्रांतील—विचारी लोकांच्या अंतःकरणांत दिवसेंदिवस अधिकाधिक आदरणीय होत चाललेल्या अशा एका व्यक्तीचें नांव पाहूं गेल्यास तें शिवाजी महाराजांचेंच आहे असें आढळून येईल. त्यांच्या हयातींत त्यांना देव मानणारे लोक होते त्याचप्रमाणें त्यांना तिरस्कारानें उल्लेखणारेहि लोक पुष्कळ होते. पण काळाच्या भट्टींत त्यांच्या निंदकांचीं होळी होऊन महाराजांचें चरित्र राष्ट्रीयभावना जागृत करणारें व राष्ट्रास वळण देण्याजोग्या उदात्त स्वरूपाचें आहे ही गोष्ट सर्वमान्य होत चालली आहे; आणि त्यांच्या खऱ्या चरित्राची माहिती उजेडांत येऊन, त्याची छाननी होईल तसतसें त्यांचे चरित्र सर्वांच्या आदरास अधिकाधिक पात्र होईल अशी खात्री वाटू

लागली आहे. सारांश महाभारतानें आपल्या राष्ट्रास वाट दाखविण्याचें जें काम आजवर केलें तेंच काम शिवाजी महाराजांचें चरित्र या पुढील काळांत करील. हें स्पष्ट दिसत असल्यामुळें तें समजून घेण्याची जिज्ञासा आजच्या चिकित्सक युगांतहि पुष्कळ ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत आहे.

२. महाराजांचें विस्तृत नवें चरित्र लिहिलें जाण्यास अद्याप अवकाश आहे. शिवकालीन इतिहासाची विश्वसनीय माहिती कोणत्या प्रकारची असली पाहिजे, तिची जुळणी कशी करावी, तिची तपासणी कशी करावी, तिच्यांतील ग्राह्याग्राह्य भागांची निवड कशी करावी वगैरे विचार आमच्या विद्वानांना सुचून उणीपुरीं २५।३० वर्षें लोटलीं असतील. आणि त्या विचारास अनुसरून मराठींत काम किती लोकांनीं केलें याचें टिपण करूं गेल्यास एका राजवाड्यांचें नांव सांगितल्यानंतर 'अनामिका सार्थवती बभूव' असेच उद्गार काढण्याची पाळी आहे. तथापि दिवसें-दिवस ही अनास्था नाहींशी होऊन शिवचरित्र हें महाभारताप्रमाणें विस्तृत स्वरूपानें लिहिलें जाण्याचा काळ जवळ येत चालला अशी आशा करण्यास जागा आहे. कारण महाभारतास आधारभूत असा ज्याप्रमाणें मूळ भारत ग्रंथ होता आणि या बीजापासून ज्याप्रमाणें व्यास-मुनींना महाभारताचा विस्तीर्ण वृक्ष निर्माण करता आला तद्वत् विस्तृत शिवचरित्रास उपयोगी पडणारें उत्तम जातीचें शिवभारतरूपी बीज आज आपणास उपलब्ध झालें आहे. या बीजाची पेरणी होऊन, त्याचा प्रचंड वृक्ष होण्यास जी ऐतिहासिक पत्रांची सामुग्री लागते ती पुरविण्याचीहि आतुरता शिवकालीन घराण्यांतच आजच्या वंशजांतून थोडीबहुत दिसूं लागली आहे; त्याअर्थी शिवभारतास महाभारतासारखें विस्तृत स्वरूप आल्यावांचून राहणार नाहीं अशी खात्री बाळगण्यास हरकत दिसत नाहीं.

३. प्रस्तुत प्रकाशित होणाऱ्या शिवभारतास मूळ भारताची व विस्तृत शिवचरित्रास महाभारताची जी उपमा दिली आहे ती केवळ गौरवार्थ असेल असें वाचकांना वाटण्याचा संभव आहे. याकरितां हें येथें नमूद करणें अवश्यक आहे कीं उपमा देण्यांत विशिष्ट प्रकारचें सादृश्य ठळक रीतीनें सांगण्याचा जो सर्वत्र हेतु असतो तोच आणि तेवढाच हेतु आमच्या या उपमेंत आहे. महाभारतांत अनेक उपाख्यानें, विस्तार, वाद, स्पष्टी-करण, वर्णनें वगैरे अशा प्रकारचीं आहेत कीं तीं मूळ भारतांत नव्हतीं

व महाभारतकाराला भारताच्या पूर्ततेस तीं घालणें अवश्यकहि वाटलें असेल. किंबहुना कांहीं ठिकाणीं मूळ भारतकाराच्या कृतीवर महाभारतकारानें कळस चढविला असेल; पण या सर्व गोष्टी मान्य करूनहि महाभारतकारास ठोकळपणानें मूळ भारतग्रंथाचाच आधार घ्यावा लागला असला पाहिजे व त्याच पायावर ही टोलेजंग इमारत रचली गेली. तद्वत् शिवाजी महाराजांचें विस्तृत व विश्वसनीय असें जें चरित्र भविष्यकाळीं लिहिलें जाईल त्याचा गाभा प्रस्तुतचा शिवभारत हा ग्रंथ होणार आहे याबद्दल आम्हांस यत्किंचित शंका वाटत नाहीं.

४. शिवभारताची योग्यता, महती व त्याचें चिरस्थाई स्वरूप याविषयीं जो अभिप्राय सांगितला तो कित्येकांना वादग्रस्त वाटण्यासारखा असल्यामुळें त्याचें थोडेसें स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे. सध्याचा काळ चिकित्सेचा आहे, शास्त्रीय युगाचा आहे, त्यांत अंधश्रद्धा अगर भाविकपणा यांचें उच्चाटण होत असून शुद्ध सत्य पारखून घेण्याची उत्तम साधनें निर्माण होत आहेत. रसायनशास्त्र, विज्ञानशास्त्र, ज्योतिषशास्त्र यांची, दुर्बिणी व सूक्ष्मदर्शक यंत्रें यांनीं, जशी स्पष्ट प्रगति केली व पूर्वीच्या किती तरी भ्रामक कल्पना पार घालवून दिल्या त्याचप्रमाणें इतिहासशास्त्रांतहि चिकित्सक पद्धतीनें मोठी क्रांति घडवून आणिली आहे. ग्रँडफनें अमूक लिहिलें आहे अगर चिटणीशी बखरींत अशी हकीकत दिली आहे असें सांगण्यानें विशिष्ट विधान खरें असलें पाहिजे असें मानण्याचा एक काळ महाराष्ट्रांत होता. परंतु तो मनु आतां पालटला. ग्रँडफ अगर चिटणीस हीं नांवें उच्चारण्यानें शिवचरित्रविषयक विधानांची सत्यता पटण्याचा काळ आतां राहिला नाहीं. शिवचरित्रांतील प्रसंगांची सत्यासत्यता तपासण्यास वरील ग्रंथकारांखेरीज विश्वसनीय, समकालीन व प्रत्यंतर पुराव्यानें बिनचुक ठरणारे अस्सल लेख उपलब्ध झाले आहेत. त्यांची छाननी करून त्या आधारानें शिवचरित्रांतील प्रसंगांची हकीकत देणें व यापेक्षां सविस्तर माहिती मिळविण्यासाठीं आणखी संशोधन करणें हेंच खऱ्या महाराष्ट्रेतिहासज्ञांचें आजचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य करूं पाहणाऱ्यांच्या मनांत बखरकाराविषयीं पूज्यभाव वसत नाहीं असा मात्र अर्थ घ्यावयाचा नाहीं. कारण बखरकारांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें व आपल्या मगदुराप्रमाणें खरेंखुरें शिवचरित्र सांगण्याचा प्रयत्न केला. पण हेतु शुद्ध व सोज्वळ असला

म्हणून कार्यसिद्धी होतेच असें नाहीं. त्याला साधनांची, परिस्थितीची व सशास्त्र विचारसरणीची जोड मिळावी लागते. यांच्या अभावीं केवळ काल-दृष्ट्या बखरकार आमच्यापेक्षां एका शतकानें शिवकालाला जवळचा होता म्हणून बखरकाराचें लिहिणें प्रमाण मानावें असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. 'महाराष्ट्रांत राष्ट्रकूट, यादव, चालुक्य वगैरे राजे होऊन गेले, त्यांच्या कारकीर्दी अमूक वर्षांच्या होत्या, त्यांचे उदयास्त अमूक कारणामुळें झाले' ही तपशीलवार हकीकत आधुनिक इतिहासज्ञ निश्चयपूर्वक सांगूं शकतो, आणि बखरकार विक्रम व शालिवाहन यांची नांवें सांगतांच एकदम पिठोराचें नांव घेतात व राष्ट्रकूट चालुक्य इत्यादिकांचें नांवहि उच्चारीत नाहींत. याचें कारण आज ताम्रपट व शिलालेख यांच्या वाचनाचें जें शास्त्र विद्वानांना माहीत झालें आहे त्याची वार्ताहि बखरकरांना नव्हती. या बाबतींत बखरकरांना दोष लावण्यांत अर्थ नाहीं. कारण तो दोष त्यांचा नसून त्या काळीं सर्वत्र होता. तेव्हां बखरकारांनाच त्याबद्दल जबाब-दार काय म्हणून धरावें ?

५. पण बखरकारापेक्षां विश्वसनीय असा पुरावा पुढें नव्हता तों-पर्यंत त्यांचें म्हणणें ऐकून घेणेंच प्राप्त होतें. तपशीलवार नसली तरी ठोकळमानानें तरी शिवचरित्राची माहिती बखरींवरून घेतां आली. तीस वर्षांपूर्वी कै. राजवाडे वगैरे इतिहासकारांनीं बखरींचें समालोचन केलें व नंतर अस्सल कागदपत्र शोधून काढण्याचा उद्योग आज तागायत चाल-विला. यामुळें आतां समालोचनाची पुनरावृत्ती करण्याची वेळ आली आहे. मागलें समालोचन बखरींचें होतें व आतांचें शिवकालीन लेखांचें आहे. मागल्या समालोचनप्रसंगीं अस्सल पत्रांचा प्रत्यंतर पुरावा पाह-ण्याची सोय नव्हती ती आतां अनेक ठिकाणीं झाली आहे. यामुळें बखरींत अमूक एक विधान आहे म्हणून तें खरेंहि मानतां येत नाहीं व खोटेंहि मानतां येत नाहीं असा नकारात्मक निष्कर्ष काढण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला होता, ती परिस्थिती पालटून कांहीं बाबतींत तरी निश्चयानें ' अमूकच प्रकार घडला ' असें ठाम मत देता येतें. अद्याप अपुऱ्या माहितींचीं स्थळें बरींच आहेत ही गोष्ट खरी; पण त्यामुळें 'कांहीं प्रसंग आतां निश्चित स्वरूपानें ठरल्यासारखे आहेत' या म्हणण्यास बाधा येऊं शकत नाहीं.

६. लेखक शास्त्रज्ञ असणें अगर अनभिज्ञ असणें आणि पुराव्याचा

कागद समकालीन असणें अगर विषमकालीन असणें यांतील अंतर काय याचें दिग्दर्शन येथवर केलें. त्यावरून आधुनिक लेखकाला इतिहासशास्त्राची व शिवसमकालीन कागदांची अनुकूलता असल्यामुळें बखरकारापेक्षां पुढें पाऊल टाकणें शक्य आहे हें सहज ध्यानांत येईल. आतां या शास्त्राच्या व समकालीन कागदपत्रांच्या देखील मर्यादा काय आहेत त्या पाहिल्या पाहिजेत. इतिहासशास्त्रज्ञाला हजारो वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या ईजिप्तमधील राजघराण्यांची माहिती आज नव्यानेंच उजेडांत आणण्याची अद्भुत कामगिरी करता आली याचें कारण समकालीन इष्टिका लेख वगैरे साधनें उपलब्ध झालीं हें आहे. त्याचप्रमाणें भूमींत गडप झालेलीं हीं ईजिप्तच्या इतिहासाचीं साधनें व हिंदुस्थानांत लोकांच्या दृष्टीपुढें शेकडो वर्षांपासून असणारीं शिलालेखादि साधनें शंभर वर्षांपूर्वीं शास्त्रज्ञाच्या अभावीं असून नसल्यासारखीं होतीं. तेव्हां शास्त्रज्ञ व समकालीन पुरावा यांची गाठ पडल्यावाचून इतिहासनिष्पत्ति होत नाहीं हें तर आहेच; पण ही गांठ ज्या अंशानें पडेल त्या अंशानेंच ही निष्पत्ति होईल हें लक्षांत ठेवणें महत्त्वाचें आहे. इतिहासशास्त्राची अनेक अंगें आहेत. तीं सर्व जाणणारा पुरुष मिळणें शक्य नाहीं. कागदपत्राप्रमाणें नाणीं, इमारती, शिलालेख, कोरीवकामें वगैरे हीं सर्व इतिहासाचीं समकालीन साधनेंच आहेत. पण त्या सर्वांचा उपयोग इतिहासज्ञ या नांवाखालीं मोडणाऱ्या प्रत्येक विद्वानाला करता येईल असें नाहीं. शिवकालीन कागदपत्र सफाईनें वाचणारा व समजणारा विद्वान् त्याचवेळचीं नाणीं पुढें आणलीं असतां नेणता ठरतो. मराठी वाचणाराला फारशी कागद आले म्हणजे आपलें अज्ञान कबूल करून स्वस्थ बसण्याचा प्रसंग येतो. मराठी कागदांत देखील पेशवाईतला व शिवकालीन यांत इतकें अंतर पडतें कीं बखरी उत्तम रीतीनें जाणणाऱ्यास शिवकालीन कागदांतील सारांश देखील समजण्यास मारामार पडते. वाचनाची व अर्थाची चांगली माहिती असून देखील पत्रांचा कालनिर्णय करण्याचें शास्त्र इतकें निराळें आहे कीं त्याच्या अज्ञानामुळें कित्येक महत्त्वाच्या पत्रांतून निघणारी माहिती, तीं पत्रें कित्येक वर्षें लोकांपुढें असून देखील, आजवर उघडकीस आली नाहीं. कोणताहि कागद अमूक काळचा हें निश्चित झालें म्हणजे त्यावेळची उपलब्ध माहिती आपणापुढें असेल तिच्याशी तें पत्र ताडून पाहून आपल्या माहितींत भर घालता येतें; इतकेंच

नव्हे, तर तो कागद वाचण्यासहि प्रत्यक्ष मदत होते. तात्पर्य काय कीं, इतिहासज्ञ या मोघम नांवानें आपली फसगत होण्याचा संभव असतो. संशोधक अथवा समकालीन अस्सल पत्रें वाचण्यांत काळ घालविणारा व संकलनकार म्हणजे प्रसिद्ध झालेल्या छापील मजकुरावरून संकलित हकीकत लिहिणारा हे एकसारखे नव्हेत व दोघांचीं कार्यक्षेत्रेंहि निरनिराळीं आहेत. यामुळें कोणत्या इतिहासज्ञाचा अभिप्राय कोणत्या मुद्यावर प्रमाणभूत मानावा हें ठरवितांना फार बारकाईनें तपासणी होणें अवश्य असते. नाहींतर इतिहासाच्या एका क्षेत्रांत नांवाजलेला इतिहासज्ञ भलत्याच क्षेत्रांतल्या प्रश्नाचा न्याय देण्यास लायख समजला जाण्याचा फार संभव असतो. याकरिता इतिहासशास्त्रांतील अनेक शाखांपैकीं ज्या शाखेंतील माहिती विशिष्ट कागदांत असेल त्या शाखेतील अभ्यस्त अशा शास्त्रज्ञाच्या पाहण्यांत तो कागद आला पाहिजे तरच खरी इतिहासनिष्पत्ति होते.

७. शास्त्रज्ञाचा एकांगीपणा सांगितला त्याचप्रमाणें समकालीन कागद देखील एकांगीच असतात. शिवकालीन कागद म्हटला कीं त्यांत शिवाजी महाराजांच्या वेळची महत्त्वाची माहिती दिलेली असलीच पाहिजे असें नाहीं. उलट महत्त्वाची माहिती न देणारेच बहुतेक कागद असतात. पण त्यावरून त्यांचा संग्रह व त्यांचें प्रकाशन करणें अनाठाई आहे हा समज मात्र चुकीचा आहे. पंचवीस वर्षांपूर्वी शिवकालीन कागद सफाईनें वाचणारा विद्वान् महाराष्ट्रांत एखादा दुसरा तरी होता किंवा नाहीं याची शंका आहे व त्या पत्रांतील सर्व शब्दांचे अर्थ समजणारा तर नव्हताच असें निश्चयानें म्हणतां येतें. परंतु पंचवीस वर्षें शिवकालीन पत्रें मिळविण्याचा, वाचण्याचा, उकलण्याचा, विशद करण्याचा उद्योग संथपणें चालू राहिल्यामुळें त्यावेळीं न कळतां अक्षरास अक्षर उतरावयाचें या संकल्पानें छापलेले कागद आज महत्त्वाची माहिती देत आहेत. त्यावेळीं न समजणाऱ्या शब्दांचे अर्थ आतां पुष्कळांच्या परिचयाचे झाले आहेत. त्यावेळीं झालेल्या वाचनाच्या चुका आतां लक्षांत येऊं लागल्या आहेत आणि अशाच प्रकारची आणखी नवीन पत्रें हातीं आल्यास आमच्या ज्ञानांत खात्रीनें भर पडेल असेंहि म्हणतां येतें. ‘ क्षणशः कणशश्चैव विद्यामर्थं च चिन्तयेत् ’ या सुप्रसिद्ध उक्तीप्रमाणें शिवकालीन इतिहासाची महाराष्ट्रास जर खरोखरच तळमळ लागली असेल तर त्यानें ही इतिहासाचीं साधनें

न कंटाळतां, न थकता, व न थांबता जमविण्यास व तिचा अभ्यास करण्यास तयार असलें पाहिजे. शिवाजी महाराजांच्या सरकारी दप्तरांतील महत्त्वाचे खलीते व विस्तृत वृत्तांत अद्याप महाराष्ट्रांतील संशोधकांच्या हातीं लागले नाहींत याबद्दल नुसती दिलगिरी व्यक्त करणारे कांहीं नामांकित इतिहासज्ञ आहेत हें खरें; पण या नुसत्या हळहळीनें कांहींएक निष्पत्ति होणार नाहीं. त्यापेक्षां खाजगी मजकुराची पत्रें जुळविणारे संशोधक शिवकालीन माहितींत अधिक भर टाकीत आहेत. तेव्हां समकालीन कागद मिळतील तेवढे मिळवून त्यांची निवड करतांना अगदीं खात्रीनें टाकाऊ वाटतील ते सोडले जातीलच; पण जेथें 'महत्त्वाचा आहे किंवा नाहीं' असा संशय पडत असेल तेथें संशयाचा फायदा अशा कागदास देऊन ते कागद प्रकाशित केलें पाहिजेत, अशी परिस्थिति शिवकालीन पत्रांची आहे. मग तीं कित्येकांना 'तेलातुपाचीं' वाटलीं तरी त्यास उपाय नाहीं. एकंदरींत पुष्कळ माहिती गोळा झाल्यानंतर त्यांत पुनरावृत्तीचा दोष टाळण्यासाठीं खबरदारी घेणें हा गुण ठरतो; पण जेथें माहिती अगदींच त्रोटक आहे तेथें संग्राहकपणासच प्राधान्य देणें जरूर आहे.

८. शिवकालीन कोणत्याहि कागदाचा संग्रह मोठ्या आस्थेनें केला पाहिजे हें ठरल्यानंतर प्रत्यक्ष शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून तयार झालेलें हें शिवभारत हातीं आलें असतां त्याचें अध्ययन किती कसोशीनें केलें पाहिजे हें निराळें सांगावयासच नको. त्याची शहानिशा सर्व बाजूनें झाली पाहिजे; त्याचे गुणावगुण, ग्राह्याग्राह्य भाग, वगैरेचें विवेचन उपलब्ध माहितीच्या आधारें सांगोपांग केले पाहिजे. पण हें काम एका व्यक्तीच्या हातून होण्याजोगें नाहीं; अनेक संशोधक आपापल्या परीनें या शिवभारताची परीक्षा करतील तेव्हां त्याचे खरे गुणदोष ठरतील, आणि ते तसे ठरावे व आपल्या हातीं आलेला भाग लोकांपुढें मांडून मोकळें व्हावें याच हेतूनें हा ग्रंथ आहे या स्थितींत, प्रकाशित करण्यांत येत आहे. वस्तुतः हा ग्रंथ इतकाच लिहिला गेला कीं आणखीं कांहीं अध्याय पुढें होते याचा पुरा तपास करून हें प्रकाशन व्हावयास पाहिजे होतें. परमानन्द हा निधिवासकर म्हणजे अहमदनगर जिल्ह्यांतील श्रीज्ञानदेवींचे नेवासे येथील राहणारा व तो शिवाजी महाराजांच्या पदरचा हें लक्षांत ठेविलें असतां परमानन्दाच्या हातची मूळ प्रत इकडेच सांपडण्याचा संभव

पुष्कळ आहे; व तिच्यांत कदाचित् तंजावर यथील प्रतीपेक्षां अधिक माहिती सांपडण्याचाहि संभव आहे. पण नुसत्या तर्कांच्या प्रदेशांत शिरण्यापासून तादृश फायदा नसतो, यामुळें 'या बाबतींत आणखीं शोध झाला पाहिजे' अशी इच्छा व्यक्त करून हा मुद्दा येथें सोडतों.

९. शिवभारताचें विस्तृत परीक्षण करण्याचें काम अनेक विद्वान आपापल्या परीनें व आपापल्या सवडीनें करतीलच. आणि त्यानंतर याच्या आधारें शिवचरित्रांतील कोणत्या प्रसंगाविषयीं आपल्या माहितींत किती भर पडली याचें समालोचन करण्यासहि सोईचें होणार आहे. अर्थात् हा प्रसंग कालांतरानें येणार. त्या पूर्वीं येथें या ग्रंथाच्या प्रस्तावनेदाखल व वाचकांना विषयप्रवेश करण्यास उपयोगी पडावें म्हणून पुढील विवेचन दिलें आहे. हा ग्रंथ एक दोन वेळां वाचून उपलब्ध माहितीशीं तो ताडून पाहून जे विचार प्रस्तुत लेखकास आज सुचले आहेत ते येथें नमूद केले आहेत इतकेंच. पण अधिक माहिती उपलब्ध होईल तिच्या अनुषंगानें या विवेचनांतील चुका विद्वानांनीं दाखवून दिल्या आणि त्यांतील कांहीं विधानें दुरुस्त करावीं लागलीं अगर सोडून द्यावीं लागलीं तर प्रस्तुत लेखक तसें करण्यास आनंदानें तयार होईल.

१०. इतर माहिती व विवेचन देण्यापूर्वीं हा ' शिवभारत ' ग्रंथ कोठला, केव्हां, कसा मिळाला; ' आजपर्यंत याचें नांवहि ऐकूं आलें नाहीं आणि आजच हा पुढें आला ' हें काय गौडबंगाल आहे याचा उलगडा केला पाहिजे. हा ग्रंथ तंजावर येथील सुप्रसिद्ध सरस्वतीमहालांतील हस्तलिखित प्रतीवरून रा. दिवेकर यानीं नकल करवून आणविला. ही भारताची पोथी तेथें आहे ही गोष्ट सार्वजनिक रीत्या पुढें येऊन जवळ जवळ अर्ध शतक होत आलें. बर्नेलनें इ. स. १८८० मध्यें तंजावर येथील संस्कृत हस्तलिखित ग्रंथाची विषयवार सूची लंडन येथें छापली आणि औफ्रेटनें इ.स.१८९१ मध्यें लाइप्झिक येथें संस्कृत ग्रंथांची बृहत्सूची छापली; या दोहींतहि शिवभारताचा उल्लेख आहे. मात्र त्यांत या ग्रंथाची माहिती " The history of Civaraja or Civaji (lived in 1627-1680) by a Kavindra" या शब्दांत दिली आहे. यावरून सूची करतांना ग्रंथाच्या अंतरंगांत पाहण्यास सूचीकारास झालें नाहीं व पोथीच्या अध्यायाच्या शेवटचे पांच-चार शब्द पाहून हें ग्रंथवर्णन दिलें गेलें हें स्पष्टपणें दिसून येतें; आणि

हजारों हस्तलिखित ग्रंथांची सूची करतांना यापेक्षां जास्त लक्ष प्रत्येक पोथीच्या वाच्यास देणें शक्यहि नसतें. हें सामान्य कारण झालें. पण आमच्या मतें जर एखाद्यानें ही पोथी लक्षपूर्वक वाचली असती तर त्यावेळीं ती त्याला समजली नसती किंवा महत्त्वाची तरी वाटली नसती. एक तर हा ग्रंथ छंदोबद्ध असल्यामुळें ऐतिहासिक दृष्ट्या बारकाईनें त्याकडे पहावें असें वाटणें कठिण होतें. आणि ग्रंडफवरून व बखरींवरून शिवाजी महाराजांच्या चरित्राची जी रूपरेषा सामान्य वाचकाच्या डोक्यांत असे तिचा यांत नामनिर्देश आढळत नसल्यामुळें 'शिवभारत' हा ऐतिहासिक दृष्ट्या जमेस धरण्याचें कारण नाहीं असाच निर्णय मिळाला असता! शहाजीची माहिती देतांना हत्तीची तुळा केल्याची हकीकत, त्यानंतर शिवजन्माच्या वेळचा जाधवरावानें केलेला पाठलाग आणि नंतर तोरणा किल्ला घेऊन स्वराज्याचें तोरण लावल्याचें रसभरित वर्णन आणि शहाजीस कैदेंत टाकल्या वेळीं तुरुंगाच्या कोठडीस ठेवलेल्या किलकिल्या फटींचें सरभरित चित्र व शिवाजी महाराजांनीं घातलेल्या दरोड्यांचे देखावे ज्या ग्रंथांत आढळत नाहींत तो ग्रंथ 'स्वराज्याचा संस्थापक शिवाजी याचें वर्णन देत नसून, काल्पनिक शिवाजीच वर्णन करतो' असा शेरा औफ्रेट्नें किंवा बर्नेलनें मारला असता तरी त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नव्हतें. ग्रँडफनें लिहिलेल्या इतिहासांत कांहीं चुका असतील ही शंकाच जेथें अद्याप उद्भवली नव्हती तेथें शिवभारतांतील वर्णन ऐतिहासिक शिवाजी महाराजांचेंच आहे असें म्हणणाऱ्याची गणना कदाचित् 'विक्षिप्त' पुरुषांत झाली असती व लोकांनीं तर त्याचें म्हणणें मुळींच ऐकलें नसतें. रूढ समजुतींची मगरमिठी मनावर किती जबरदस्त असते व त्यांस धक्का देणारे खरे प्रकार लोकांना पटणें किती कठिण काम असतें याची प्रचीति अनेक प्रसंगीं येते; आणि ऐतिहासिक संशोधकाला तर वारंवार येते. या प्रवृत्तीबद्दल तक्रार करण्यांत अर्थ नाहीं. कारण खुद्द संशोधकांच्या मनाला देखील नव्या शोधाचें महत्त्व व त्याची सत्यता पटण्यास अनेक प्रकारची अनुकूलता असावी लागते. उदाहरणार्थः—ज्या जेधे शकावलीचें महत्त्व आज सर्वसंमत आहे ती शकावली इ. स. १९०६–७ च्या सुमारास कै. लोकमान्यांच्या हातीं आली. तेथून सरासरी १० वर्षांनीं ती प्रसिद्ध झाली;

आणि ती छापून लोकापुढें आल्यावर देखील तिच्यांत दिलेले शक व मित्या, तिची भाषा, तिच्यांतील नांवें वगैरे सर्वच बाबी शिवचरित्रविषयक रूढ कल्पनाहून इतक्या निराळ्या होत्या कीं पांच चार वर्षेपर्यंत या शकावलीकडे एकदोन संशोधकाखेरीज कोणाचें लक्ष गेलें नाहीं यांत नवल कसचें ? खुद्द जेधे यांचें नांव देखील लोकांना शिवचरित्राच्या दृष्टीनें अगदि अपरिचित असें होतें, सन व तारखा डोक्यांत वागविणाऱ्या पुढें शक व मित्या यांतले उल्लेख म्हणजे जंत्रीच्या अभावी मोठेंच गूढ; अशा वेळीं शकावलीतलें भातवडीच्या लढाईचें नांव वाचून याचा ‘ शिवचरित्राशीं काय संबंध आहे परमेश्वर जाणें ’ असें उद्गार काढून बहुतेक वाचकांनीं शकावलीचीं सर्व पानें बाजूस सारलीं हें सरळच झालें. पण कै. पां. न. पटवर्धन यांनीं शकावलीतला एकेक उल्लेख अस्सल व विश्वसनीय प्रत्यंतरांशीं ताडून पाहण्याचें काम मोठ्या चिकाटीनें चालविलें व कै. गणपतराव खरे यानीं आपलीं अखेरचीं पांच वर्षें शिवकालीन जंत्री तयार करण्याच्या कामीं निरलसपणें अर्पण केलीं आणि यामुळें १९२१—२२ च्या सुमारास शकावलीचें परीक्षण करण्याचा काल येऊन ठेपला. तेव्हांपासून कै. वासुदेव शास्त्री खरे, व रा. चांदोरकर आणि दिवेकर यानीं शिवजन्मतिथि विषयक ऊहापोह लोकांपुढें मांडला हें इतिहास वाचकांना माहीतच आहे.

अशा रीतीनें शिवचरित्रविषयक जुन्या कल्पना सोडून कांहीं वेगळ्या कल्पना मान्य केल्या पाहिजेत असें पटल्यावेळीं रा. सदाशिवराव दिवेकर यांच्या हातीं शिवभारताची प्रत आली. जेधे शकावलींत शिवजन्म शके १५५१ मध्यें दिलेला आहे ही गोष्ट संशोधकांना ५।४ वर्षांपासून परिचित झालेली असल्यामुळें शिवभारतांतील जन्मकालाकडे त्यांचें बारकाईनें लक्ष गेलें; आणि अफजल प्रसंगांतील मितीचेंहि साम्य असेंच ध्यानांत आल्यामुळें शिवभारत बारकाईनें वाचण्यास सुरुवात झाली. जेधे शकावलींत नुसत्या नोंदी आहेत; व त्या इतक्या त्रोटक शब्दांत सांगितल्या आहेत कीं केवळ तेवढ्या वांचून हकीकत समजणें शक्य नाहीं. उलट शिवभारतांत कांहीं प्रसंगांचीं वर्णनें इतक्या बारकाईनें दिलीं आहेत कीं त्यांची कल्पना शकावलीवरून केव्हांहि आली नसती. आणि ठळक प्रसंगांखेरीज इतर हकीकतींचा निर्देश भारतकारानें इतका ओझरता केला

आहे कीं त्यांचें रहस्य व अनुसंधान अवांतर साधनांच्या मदतीवांचून लक्षांत येणें फार कठिण होतें. सारांश अस्सल पत्रें, समकालीन तवारिखा, जेधे शकावली व शिवभारत यांचा एकमेकाशीं संबंध इतका निगडित आहे कीं दुव्यानें दुवा उकलत जावा त्याप्रमाणें वरील सर्व साधनें एकमेकाशीं ताडून पहावीं तेव्हांच त्यांचें खरें मर्म समजतें. याकरितां शिवभारतांतील मजकूर इतर शिवकालीन साधनांशीं ताडून त्यावरून काय माहिती निष्पन्न होते तें पहावयाचें आहे.

११. ग्रँडफ व चिटणीस यांच्या लेखावर विश्वसण्याचा काळ गेला व समकालीन हकीकतींच्या आधारें शिवचरित्राची मांडणी केली पाहिजे असें जें येथवर सांगितलें त्याचें आणखी थोडें स्पष्टीकरण करावयास पाहिजे. शिवाजीमहाराज शिवनेरीस उपजले, त्यांनीं अफजलखानास मारिले, शास्ताखानाचीं बोटें तोडलीं, राज्याभिषेक करून घेतला व दक्षिणेंत स्वारी केली वगैरे ठोकळ हकीकती ग्रँडफ व चिटणीस यांनीं दिल्या आहेत त्या 'खऱ्या मानावयाच्या किंवा नाहीं' असा कोणी प्रश्न केल्यास त्या खऱ्या मानावयाच्या असेंच कोणीहि उत्तर देईल. पण याच गोष्टींचा तपशील वरील दोनीं ग्रंथकारांनीं दिला आहे तो अगर त्यांचा त्यांनीं दिलेला काळ, खरा कीं खोटा, असा प्रश्न निघाल्यास तो वादग्रस्त ठरेल. बखरकारांना शिवकालीन कागदपत्र फारच थोडें पाहण्यास मिळाले व त्यांनीं बहुतेक हकीगती परंपरागत दंतकथांच्या आधारावर अवलंबून लिहिल्या. उदाहरणार्थ मुरार जगदेवानें दिलेलें दानपत्र अगर त्याच्या नकला आजतागायत तुळापुरास सहज पाहण्यास मिळतात; व त्या बखरकारांनींहि पाहिल्या होत्या. यामुळें ही तुळा झाल्याचा शक १५५५ हा बहुतेक बखरकार बरोबर सांगतात; राजाभिषेक शके ज्येष्ठ शु. १३ रोजीं बदलण्याची पेशवाईंतहि परंपरा चालू होती यामुळें राजाभिषेकाचा शकहि सर्वांनीं बिनचुक दिला आहे; पण या व अशाच ठोकळ पांच चार गोष्टी सोडल्या म्हणजे इतर बाबतींत केवढी चूक करावी व पौर्वापर्याचा, आणि कार्यकारणभावाचा किती विपर्यास असावा याला बखरकारांच्या लिहिण्यांत प्रमाणच राहिलेलें नाहीं. कांहीं ठिकाणीं १० वर्षांची देखील चूक आहे व दक्षिण दिग्विजयानंतर राज्याभिषेक असें सांगण्यास चिटणीसानीं देखील कमी केलें नाहीं. पण शिवाजी महा-

राजांच्या थोरवीविषयीं व योग्यतेविषयीं बखरकारांच्या अंतःकरणांत यथार्थ पूज्यभाव वसत होता; आणि त्यांच्या ग्रंथाच्या वाचनानें महाराजांच्या विषयीं परकीय इतिहासकारांनीं काढलेले तिरस्काराचे उद्गार व गैरसमज घालविण्यास मोठी मदत झाली आहे व याहिपुढें होईल हें निःसंशय आहे. सुबोध, चटकदार, आवेशयुक्त व रसभरित भाषाशैली योजून शिवाजी महाराजांच्या कार्याविषयीं कौतुक व आदरभाव जागृत करण्याचें काम चिटणिसांच्या बखरीप्रमाणें करण्यास आजच्या सरावलेल्या लेखकाची लेखणी देखील समर्थ होणार नाहीं. मुसलमानी ग्रंथकार व ग्रँडफ यांच्या अंतःकरणांतील शिवचरित्रविषयक अनादरभाव महाराष्ट्रांत फैलावत चालला होता तो बऱ्याच अंशीं धुऊन काढण्याचें काम बखरींच्या प्रकाशनानें गेल्या चाळीस वर्षांत महाराष्ट्रांत घडलें आहे हें निःसंशय खरें आहे. पण बखरकारांची ही कामगिरी झाल्यानंतर त्यांना ज्या गोष्टी करतां आल्या नाहींत, किंबहुना करतां येण्याजोग्या नव्हत्या त्या आम्ही केल्या पाहिजेत व बखरींतील दोष दाखवून शिवचरित्राचें उज्वल व समग्र स्वरूप उघडकीस आणण्यासाठीं झटलें पाहिजे हेंहि तितकेंच खरें आहे. त्याचप्रमाणें ग्रँडफनें केलेल्या चुका दाखविल्यानंतर त्याच्या ग्रंथांत जो ग्राह्यांश आहे तोहि घेण्याचा काळ आला आहे हें येथें नमूद केलें पाहिजे. ग्रँडफनें शिवाजी महाराजांच्या आरंभींच्या हालचालींचें वर्णन दरोडे, लूटमाऱ्या वगैरे शब्दांत केल्यामुळें महाराष्ट्राच्या स्वाभिमानास जबरदस्त धक्का बसत होता व असें पुस्तक विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमांत ठेवणें चुकीचें आहे हें लोकांना दाखवून देण्यासाठीं कित्येक विद्वानांनीं जी चिकाटी धरली ती स्तुत्य व सत्यप्रकाशनाच्या दृष्टीनेंहि अवश्यक होती असेंच कोणीहि म्हणेल. पण वाळलेल्या बरोबर ओलेंहि जळतें या न्यायानें ग्रँडफच्या ग्रंथांत जो ग्राह्यभाग आहे त्याची आम्ही हेळसांड होऊं न देण्याची खबरदारी घेतली पाहिजे.

उदाहरणार्थ शिवाजीमहाराजांच्या चरित्राचा पूर्वार्ध बखरकारांना फारच थोडा माहीत आहे; अफजलप्रसंगापासून पुढचें चरित्र ते कांहींसे जाणतात आणि शहाजीच्या पूर्वचरित्राची तर त्यांची कल्पना फारच चुकीची व अव्यवस्थित स्वरूपाची आहे; हें ओळखून ग्रँडफनें शहाजींचें पूर्वचरित्र लिहिण्यास मुसलमानी ग्रंथांचा आश्रय केला. यामुळें या भागांत बखरकारा-

पेक्षां त्याचें लिहिणें कांहीं मुद्यांवर अधिक विश्वसनीय झालें आहे. अलीकडे अस्सल पत्रें प्रकाशित होऊं लागल्यामुळें ही गोष्ट विशेष रीतीनें स्पष्ट झाली. सारांश बखरकारापेक्षां ग्रँडफ कांहीं बाबतींत श्रेष्ठ आहे हें अमान्य करतां येणार नाहीं. त्यानें जेथें समकालीन ग्रंथांचा व कागदपत्रांचा आधार दिला आहे त्या मुद्यापुरतें त्याचें लिहिणें जमेस धरलेंच पाहिजे. त्याचप्रमाणें आधुनिक ग्रँडफ म्हणजे प्रो. जदुनाथ सरकार यांच्या शिवचरित्रविषयक ग्रंथांत जो ग्राह्यांश असेल तो जमेस धरून त्याची तुलना शिवभारतांतील मजकुरांशीं केली पाहिजे. पण ही तुलना करण्यापूर्वीं शिवभारतांतील मजकूर सारांश रूपानें प्रथम वाचकापुढें मांडणें अवश्यक आहे. हा सारांश देतांना संक्षेपाकडे मुख्य दृष्टि ठेविली असून कवीनें गौरवार्थ केलेलें वर्णन बहुतेक गाळून मुख्यत: ऐतिहासिक कथानकाचा भाग निवडला आहे. त्याचप्रमाणें कवीनें प्रश्नोत्तररूपानें विषयाची मांडणी केलेली आहे व कित्येक वेळां एका विषयाचें कथानक पुरें करण्यासाठीं कवीला कालानुक्रमाकडे दुर्लक्ष करावें लागलें आहे; हें लक्षांत घेऊन सारांश देतांना मजकुराच्या मूळच्या अनुक्रमांत थोडाबहुत फरक केला आहे.

## २ शिवभारतसार.

१ **भूमिका**. एकदां परमानन्द नांवाचा एक श्रेष्ठ ब्राह्मण तीर्थयात्रेच्या निमित्तानें काशीस गेला होता; तेथें तीर्थविधि करून तो भागीरथीच्या तीरीं बसला असतां तेथील कांहीं पंडितांनीं शिवाजीमहाराजांचें चरित्र ऐकण्याची इच्छा प्रकट केली. ते म्हणाले "तुळजा भवानीच्या प्रसादानें ज्याला राज्य मिळालें, आणि देव, ब्राह्मण व गाई यांचें जो संरक्षण करतो अशा राजगडाच्या शिवाजी राजाचें जें चरित्र तुम्ही देवीच्या प्रसादानें रचलें आहे तें कृपा करून आम्हांस सांगा." तेव्हां कवीन्द्र परमानन्द म्हणाला "नारायणांशरूपी हा राजा शिवाजी एकदां मला म्हणाला 'मालोजीपासून प्रारंभ करून मी आतांपर्यंत जीं जीं कृत्यें केलीं तीं सर्व वर्णन करा.' त्याचें हें सांगणें ऐकून मी घरीं आलों व "भारताप्रमाणें मोठें चरित्र मी रचावें ही शिवाजीची इच्छा माझ्या हातून कशी पार पडेल" असा विचार करीत असतां एकवीरा देवीनें "मी तुला प्रसन्न झाल्यें आहे; तूं काळजी करूं नको" असा धीर

दिला. तेव्हां मला उत्साह वाटून हा इतिहास मी लिहिला. यांत शंभुमहादेव, तुळजा भवानी, चार पुरुषार्थ, तीर्थें, शिवाजीची यवनाशीं झालेलीं युद्धें, देव ब्राह्मण गाई यांचा महिमा, अनेक राजांचीं चरित्रें, हत्ती घोडे दुर्ग यांचीं वर्णनें आणि शाश्वत राजनीति इत्यादि विषय आले आहेत. तेव्हां हें चरित्र तुम्ही एकाग्रतेनें ऐका. ”

२ **मालोजी.** दक्षिण देशांत मालोजी नांवाचा एक सूर्यवंशी राजा होता. तो महाराष्ट्र राजा पुणें प्रांतांत राहून भीमेच्या कांठीं राज्यविस्तार करीत असे. तो राजा विष्णूच्या अंशापासून झालेला व मोठा पराक्रमी असून त्याच्या स्त्रीचें नांव ‘ उमा ’ असें होतें. त्या शिवभक्त मालोजीनें शंभुपर्वतावर एक गोड पाण्याचा तलाव बांधिवला, आणि अनेक राजवाडे, बागा, विहिरी, पाणपोया व धर्मशाळा करविल्या. त्या वेळीं देवगिरी येथें निजामशहा राज्य करीत असून यादवराव वगैरे दाक्षिणात्य राजे त्याच्या पदरीं होते. त्याच वेळीं विजापुरास अदिलशाही राज्य असून तेथें यवन सरदार नांदत असत. एकदां अदिल व निजाम यांच्यांत युद्धप्रसंग उद्भवल्या वेळीं निजामानें मालोजीस मदतीस बोलाविलें. तेव्हां मालोजी व त्याचा भाऊ विठोजी हे निजामास मिळाले, व त्यांनीं निजामाच्या शत्रूचा पराभव केला. हें पाहून निजामानें मालोजीचा गौरव केला, व मालोजी निजामानें दिलेल्या जहागिरीवर राज्य करूं लागला. नंतर शंकराची आराधना केल्यावरून मालोजीला मुलगा झाला; त्याचें नांव शहाजी आणि पुढें दोन वर्षांनीं दुसरा मुलगा झाला त्याचें नांव ‘ शरीफ ’ असें ठेवलें. ‘ शाह ’ व ‘ शरीफ ’ हीं नांवें एका सिद्ध पुरुषाच्या नांवावरून ठेविलीं होतीं. शहाजीला पांचवें वर्ष लागलें असतां मालोजी निजामशहाच्या आज्ञेनें आपलें सैन्य घेऊन इंदापूरच्या स्वारीवर गेला व तेथें शत्रुसैन्याशीं लढत असतां मरण पावला.

३. **शहाजीचा उदय.** मालोजी मरण पावल्यावेळीं शहाजी व शरीफजी हे मुलगे लहान असल्यामुळें विठोजीनें सर्व जहागिरीची व्यवस्था केली. पुढें शहाजी वयांत आला तेव्हां जाधवरावानें आपली मुलगी जिजाबाई इचे लग्न शहाजीशीं केलें. त्याचप्रमाणें विश्वासराजाची मुलगी दुर्गा इचें लग्न शरीफजीशीं झालें; आणि हे दोघे भाऊ निजामशहाच्या पदरीं सरदारीचें काम करूं लागले. या नंतर विठोजी स्वर्गवासी झाल्यावर शहा-

जीनें कारभार आपल्या हातीं घेतला. तेव्हां शहाजी व शरीफजी आणि विठोजींचे आठ मुलगे ( १ संभाजी, २ खेळोजी, ३ मालोजी, ४ मंबाजी, ५ नागोजी, ६ परसोजी, ७ त्र्यंबकजी व ८ कक्काजी) हे सर्व मलिकंबराच्या तंत्रानें वागत असत.

**४. जाधव व भोसले यांचें वितुष्ट.** एकदां निजामशहास मुजरा करून जाधवराव आदिकरून सरदार आपापल्या घरीं परत जाण्यासाठीं घाईनें बाहेर पडत असतां दाराबाहेर एकच गर्दी झाली. ती मोडण्यासाठीं भालदारांनीं खटपट केली. परंतु हत्ती, घोडे, पालख्या इ० वहानांवरून जाणाऱ्या व पायीं जाणाऱ्या लोकांची खेचाखेच झाली. त्या गर्दींत खंडागळे नांवाच्या सरदाराचा हत्ती बेफाम होऊन अनेक लोकांना मारूं लागला. हें पाहून जाधवरावाचा मुलगा दत्ताजी यानें त्या हत्तीस शस्त्रांनीं जर्जर करून वठणीस आणलें. तेव्हां विठोजींचे वडील मुलगे संभाजी व खेळोजी हे खंडागळयाच्या मदतीस धाऊन आले; त्यामुळें भोंसले व यादव यांच्यांत मारामारी जुंपून संभाजीच्या हातून दत्ताजी मारला गेला. यावेळीं जाधवराव बराच दूर गेलेला होता. परंतु आपला मुलगा दत्ताजी हा मारला गेला ही बातमी ऐकतांच तो परतला; आणि त्यानें आपल्या मुलास मारणाऱ्या भोसल्यांच्या सैन्यावर हल्ला केला. त्या मारामारींत जाधवरावाच्या हातून शहाजी जखमी झाला व संभाजी ठार झाला. शेवटीं ही मारामारी निजामशहानें मध्यें पडून थांबविली. याप्रसंगीं जाधवरावाचें वागणें अन्यायाचें होतें असें वाटून निजामशहानें जाधवरावाविषयीं कांहीं कपट योजलें होतें. पण तें ओळखून जाधवराव निजामशाही सोडून दिल्लीकरांच्या आश्रयास गेला.

**५ भातवडीचें युद्ध.** जाधवरावासारखा बलाढ्य सरदार निजामशाही सोडून गेला हें ऐकून अदिलशहास मोठा आनंद झाला; कारण निजामानें अदिलाचा अनेक वेळा पराभव केला होता, त्याचा सूड घेण्यास अनुकूल अशी परिस्थिति जाधवराव गेल्यामुळें निर्माण झाली. अदिलानें मोंगलाशीं तहाचें बोलणें लाविलें. मोंगलांच्याहि मनांत निजामाविषयीं आढी होतीच. तेव्हां त्यांनीं अदिलाची बाजू पत्करली. अशा रीतीनें जहांगिरानें इब्राहिम आदिलशहाच्या मदतीस सैन्य पाठविल्यामुळें अदिलास निजाम करपटाप्रमाणें वाटूं लागला. मोंगलांचा सेनापति लष्करखान व अदिलशाही

सैन्याचा मुल्लामहंमद हे निजामशाही मुलुखावर चालून आले. तेव्हां मलिकंबराच्या हाताखालीं असणाऱ्या निजामशाही सैन्यानें मोठा पराक्रम करून शत्रूची दाणादाण उडवून दिली. या युद्धांत भोसल्यांची एका मोंगल सरदाराशीं गांठ पडली व त्यांत शरीफजी ठार झाला. परंतु शहाजी वगैरेंनीं मोंगली सरदारांचा पराभव केला व कित्येकांना कैद केलें. शेवटीं अदिलशाही व मोंगली सैन्यावर पुरा विजय मिळवून मलिकंबर व भोसले मंडळी असे सर्व निजामशहाकडे मुजरा करण्यास गेले.

६. **शहाजीची उचलबांगडी**—खेळोजी वगैरे भाऊ व शहाजी यांच्यांत भाऊबंदकीची भावना होती ती भातवडीच्या युद्धापासून स्पष्ट-पणें बाहेर पडली. खेळोजी प्रभृति बंधूंनीं शहाजीशीं स्पर्धा मांडून मलिकंबराचा आश्रय केला. तेव्हां आपले चुलतभाऊ व मलिकंबर यांच्याशीं वांकडें आलें असतां या दरबारांत राहणें सुरक्षितपणाचें नाहीं असें ओळखून शहाजी आपल्या जहागिरीकडे गेला. त्यानें अशा रीतीनें जाऊं नये म्हणून निजामशाही मुत्सद्यांनीं सांगितलें. परन्तु शहाजीला तें पटलें नाहीं. ही हकीकत अदिलशहास समजतांच त्यानें शहाजीस बोलाऊन आपल्या पदरीं ठेवलें. शहाजीनेंही मलिकंबराचा व निजामशाही सैन्याचा पराभव केला यामुळें अदिलशहानें संतुष्ट होऊन शहाजीस मोठी जहागीर दिली. नंतर मुधोजी फलटणकर यानें बंड केलें होते त्याचा शहाजीनें बंदोबस्त करून दाखविला; आणि कर्नाटक व केरळ प्रांत जिंकून इब्राहिम अदि-लशहाच्या खजिन्यांत मोठी भर टाकली.

७. **शिवाजीचा जन्म.** शहाजी अदिलशाही दरबारांत असतां निजा-मशाही वजीर मलिकंबर व विजापूरचा बादशहा इब्राहिम हे दोघेही मरण पावले. त्यानंतर विजापूरच्या गादीवर आलेला महमुदशहा गर्विष्ठ आहे व मलिकाच्या मागून निजामशाही दरबारांत कर्ता मुत्सद्दी नाहीं हें पाहून शहाजहानाचें सैन्य दक्षिण काबीज करण्याच्या ईर्षेनें चालून आलें. अशा वेळीं निजामशाहीविषयीं शहाजीच्या अंतःकरणांत कळवळा असल्यामुळें तो विजापुर सोडून निघाला. त्याच वेळीं जाधवरावही मोंगलांची बाजू सोडून निजामाचें दरबारीं देवगिरी येथें येऊन पोंचला. या सुमारास विश्वास-राजाच्या वंशांतील सिद्धपालाचा मुलगा विजयराज यानें आपली मुलगी जयंती ही शहाजीचा मुलगा संभाजी यास देऊ केली. शहाजीला देखील ही सोयरिक

करणें योग्य वाटल्यामुळें भोसले व विश्वासराव यांच्या घराण्यांतील हा बेटीव्यवहार शिवनेरी किल्ल्यावर मोठ्या समारंभानें घडून आला. नंतर हा समारंभ आटोपल्यावर व्याह्यांच्या सम्मतीनें आपल्या गरोदर पत्नीस ( जिजाबाईस ) तेथें ठेवून शहाजी दर्याखानावर स्वारी करण्यासाठीं गेला. नंतर शके १५५१ फाल्गून वद्य ३ रोजीं रात्रीं शुभलग्नावर शिवाजी महाराजांचा जन्म झाला. शिवनेरी किल्ल्यावर जन्म झाल्यामुळें मुलाचें नांव शिवाजी असें ठेविलें. त्याचें जातकर्म पुरोहितानें केलें. पुढें त्या राजकुमाराचें उपवेशन व अन्नप्राशन हे संस्कार योग्य वेळीं करण्यांत आले. त्यानंतर दर्याखानाचा पराभव करून शहाजी शिवनेरीस आला व तेथें पुत्रमुखावलोकन करून त्यानें आनंदानें मोठा दानधर्म केला.

८ **निजामशाहीचा अंत**. जाधवराव निजामशाही वांचविण्याच्या हेतूनें देवगिरीस आला असून त्याच्याविषयीं भलतीच शंका घेण्यांत आली. दारूनें बेहोष बनलेल्या निजामास दुष्ट मंत्र्यांनीं खोटया नाटया गोष्टी सांगून भर दरबारांत जाधवरावाचा अपमान करविला. तेव्हां तो रागानें बेफाम झाला. अशा वेळीं हमीदखान वगैरे सेनापतींनीं त्याला घेरून ठार केलें. सासऱ्याची ही अवस्था ऐकून शहाजीनेंहि निजामशाही पक्ष सोडला. इतर निजामशाही सरदारांना देखील हमीदखानाचें वागणें न पटल्यानें त्यांपैकीं कित्येक अदिलशहाकडे गेले, कित्येक मोंगलांकडे गेले, कित्येकांनीं झेंडे उभारलीं आणि कित्येक तटस्थ राहिले. या सुमारास मोठा दुष्काळ पडून लोकांना शेरभर रत्नें देऊन शेरभर कुळीथहि मिळण्याची मारामार पडूं लागली! अशा वेळीं मोंगलांच्या सैन्यानें दौलताबादेस वेढा दिला हें पाहून अदिलशहानेंहि दौलताबाद घेण्यासाठीं आपलें सैन्य पाठविलें. यामुळें शहाजहानाच्या व महमुदशहाच्या सैन्यांत दौलताबाद घेण्यासाठीं दररोज लढाई होऊं लागली. त्यांत मोंगलांनीं अदिलशाही सैन्याचा पराभव केल्यानें शेवटीं निजाम व त्याचा मंत्री फत्तेखान हे मोंगलांच्या हस्तगत झाले व निजामशाही राज्य बुडालें. अशाप्रकारें मोंगलांचें ठाणें दौलताबादेस बसलेलें पाहून अदिलशहास तेथून पाय काढावा लागला.

९ **नवीन राज्याची उभारणी.** देवगिरी हस्तगत झाल्यामुळें मोंगलांचें सैन्य आनंदानें व विजापूरचें सैन्य दुःखानें निजामशाही मुलुखांतून निघून गेल्यावर शहाजीनें शिवनेरी प्रभृति निजामशाही किल्ले आपल्या ताब्यांत घेतले, त्याचप्रमाणें गोदावरी, प्रवरा, भीमा, यांच्या कांठचा व सह्यादि पर्वतानजीकचा प्रदेश त्यानें हस्तगत केला. अशा रीतीनें दिल्लीपतीविरुद्ध शहाजीनें हा नवा डाव मांडलेला पाहून घाटगे, काटे, घोरपडे वगैरे अनेक मराठे सरदार त्याला मिळाले. तेव्हां हें नवें प्रस्थ वाढूं लागलेलें पाहून शहाजहानानें अदिलशहाशीं तह करून भीमानदी ही दोघांच्या राज्यांची सरहद्द ठरविली. आणि शहाजी या यावनी सैन्याविरुद्ध तीन वर्षें लढला. शेवटीं शहाजीनें आपला जहागिरीचा प्रदेश वगळून राहिलेल्या निजामशाही मुलुखांतला कांहीं भाग दिल्लीपतीस व बाकीचा अदिलशहास देऊन टाकिला. शहाजी हट्टी स्वभावाचा असून देखील त्यानें आपला हट्ट सोडून या वेळीं तह केला याचें कारण त्याला शंकरानें स्वप्नांत येऊन तसें करण्यास सांगितलें होतें; व यवनांचा संहार करण्याचें काम तुझ्या मुलाच्या हातून होणार आहे असें शंकरानें सांगितलें होतें. निजामशाही बुडवून मोंगलांचें सैन्य परत फिरलें तेव्हां "हें सामर्थ्यवान् मोंगली सैन्य पुढेंमागें मलाहि बुडवील" असें अदिलशहास भय पडून त्यानें शहाजीस आपल्या पदरीं ठेवण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें शहाजी विजापूरकराकडे गेला.

१०. **शहाजीची दक्षिणेंतील कामगिरी.** फरादखानाचा मुलगा रणदुल्लाखान याच्या बरोबर शहाजी कर्नाटकच्या स्वारीस निघाला. तेथें बिंदुपुर, वृषपत्तन, कावेरीपट्टण, श्रीरंगपट्टण, तंजावर, जिंजी, मदुरा, पीलगोंडा, विद्यानगर, हंसकूट येथील अनेक राजांना शहाजीनें जिंकलें. तेव्हां किंपगौडापासून घेतलेलें बंगळूर शहर रणदुलानें शहाजीस बक्षीस दिलें, व शहाजी बंगळुरास राहूं लागला. शहाजीस अनेक स्त्रिया असून देखील त्याचें जिजाबाईवर अत्यंत प्रेम होतें;व शिवाजी हा मुलगा त्याला अतिशय आवडत होता. शिवजन्मापासून शहाजीचें ऐश्वर्य एकसारखें वाढत होतें; व ठिकठिकाणीं त्याला युद्धांत जय मिळाला होता. शिवाजी सात वर्षांचा झाला तेव्हां शहाजीनें त्याला लिहिणें वाचणें शिकविण्यासाठीं गुरूच्या

स्वाधीन केलें. तेव्हां शिवाजीचें विद्याग्राहकत्व पाहून " हा विलक्षण बुद्धिमान आहे " अशी खूणगांठ गुरूनें आपल्या मनाशीं बांधली.

११. **शिवाजीची पुण्यास रवानगी.** एकदा शहाजीला स्वप्नांत शंकरानें दर्शन देऊन "शिवाजीची पुणें प्रांताच्या अधिकारावर योजना कर" असें सांगितलें. त्याप्रमाणें शिवाजीस बारावें वर्ष लागलें तेव्हां त्याबरोबर अमात्य, हत्ती, घोडे व विपुल द्रव्य देऊन त्याची रवानगी शहाजीनें पुणें प्रांताकडे केली. तो पराक्रमी शिवाजी अनुकूल मंत्र्यांच्या सहाय्यानें प्रजेला आनंद देत वाढू लागला. तेव्हां महाराष्ट्र देशाची जनता समृद्ध झाली व त्याचे गुरू कृतार्थ झाले. सर्व विद्या शास्त्रें व कला यांत प्रवीण होऊन शिवाजीनें गुरूंना मोठें यश दिलें. नंतर नवयौवन प्राप्त झालेल्या त्या शिवाजीचें पवार कुलांतील मुलीशीं लग्न झालें.

१२. **शहाजीची कैद.** मुलास पुणें प्रांतीं पाठवून शहाजीनें सर्व कर्नाटक प्रांत आपल्या ताब्यांत आणला. कावेरीपट्टण, मदुरा, म्हैसूर येथील राजे शहाजीच्या अंकित झाले. रणदुलाखानानें पळवून लावलेल्या वीरभद्रास शहाजीनें पुनः अधिकारावर प्रस्थापित केलें. पुष्कळ राजांनीं शहाजीच्या प्रभावानें यवनांची भीति टाकली.रणदुल्लाखान तर शहाजीच्या सल्ल्यानें वागत होताच; पण रणदुल्ला मेल्यावर तिकडे विजापुराहून पाठविलेले सर्व सेनापति देखील शहाजीच्याच तंत्रानें वागू लागले. तेव्हां महमूदशहानें शहाजीस कैद करण्यासाठीं मुस्तफाखानाची रवानगी गेली. मुस्तफा येत आहे असें ऐकून शहाजी त्यास सामोरा गेला आणि दोघांच्या भेटीचा समारंभ मोठ्या थाटाचा झाला. दोघांच्या सैन्याचा तळ जवळजवळ पडला असून मुस्तफाखान वरून गोडीगुलाबी ठेऊन शहाजीवर आपला विश्वास आहे असें दाखवीत असे. पुढें एके दिवशीं मध्यरात्रीं मुस्तफानें आपल्या सेनानायकांना एकांतांत बोलावून " शहाजीस कैद करा असा महमूदशहानें आज मला निरोप पाठवून कळविलें आहे; त्याअर्थी आज पहाटे तो उठण्यापूर्वी त्याला कैद केलें पाहिजे " असें सांगितलें. त्याप्रमाणें पहाटे मुस्तफाखानाच्या सैन्यानें शहाजीच्या शिबिराभोंवतीं वेढा दिला. शहाजीच्या सैन्यांत युद्धाची मुळींच तयारी नव्हती; सर्व लोक निजले होते. अशा स्थितींत घोरपडे, मालोजी पवार वगैरे विजापूरकरांचे सरदार शहाजीच्या शिबिरांत शिरले. तेव्हां शहाजीचें सैन्य घाईघाईनें लढण्यास निघालें. त्यांत खंडोजी पाटलानें बराच

वेळ पराक्रम गाजविला व शेवटीं बाजी घोरपड्याच्या हातून तो मारला गेला. नंतर शहाजी बराच वेळ लढून थकल्यानंतर मूर्च्छित झाला, व त्यास बाजी घोरपड्यानें कैद केलें. मुस्तफाखानानें शहाजीस विश्वास पटावा म्हणून आपला मुलगा आतषखान याची शपथ घेतली होती, व कुराणहि उचललें होते; आणि शेवटीं हा विश्वासघात केला.

१३ **शिवाजीचा पराक्रम.** शहाजीस कैद केल्यानंतर बंगळूर घेण्यासाठीं संभाजीवर तानाजी डुरे, विठ्ठल गोपाळ व फरादखान यांची मुस्तफानें रवानगी केली. आणि शिवाजीवर महंमुदशहानें फत्तेखान, अश्रफशहा, बाजी निंबाळकर वगैरे सरदार पाठविले होते त्यांनीं बेलसर गांव हस्तगत करून तेथें तळ दिला. त्याचप्रमाणें हैबतरावाचा मुलगा बल्लाळ यानें शिरवळ गांठलें. विजापूरकरांच्या या हालचाली पाहून शिवाजीनें पुरंदरगडावर लढण्याची तयारी केली. ही करतांना शिवाजीमहाराजांना आत्मप्रत्यय वाटण्याजोगी कांहीं पराक्रमाचीं कृत्यें त्यांच्या हातून यापूर्वींच झालीं होतीं. कारण लोकांत प्रसिद्ध असलेली जावळी घेऊन तेथें त्यांनीं चंद्रावाची स्थापना करून दाखविली व फलटणच्या राजास पळवून लावून त्याला जिवंत पकडून त्यांनीं सोडून दिलें होतें. यामुळें फत्तेखान व बल्लाळ हे विजापूरकरातर्फें सैन्य घेऊन आले तेव्हां त्यांनीं प्रथम शिरवळ येथें आणि नंतर पुरंदर येथें शत्रूशीं तोंड देण्याचें ठरविलें. जगताप, वाघ, काटे, इंगळे, वगैरे सरदारांना कावजीच्या हाताखालीं देऊन त्यांनीं शिरवळास पाठविलें. कावजीनें शिरवळावर हल्ला करून बल्लाळाच्या सैन्याचा धुव्वा उडविला, बल्लाळास रणांगणांत ठार केलें आणि शत्रुसैन्यास लुटून तो परत पुरंदरास आला. बल्लाळ ठार झाल्याचें ऐकून फत्तेखान व मुसेखान थेट पुरंदरावर चालून गेले. परंतु हें सैन्य गड चढून जाऊं लागलें तेव्हां जी मारामारी झाली तिच्यांत मुसेखान ठार झाला व फत्तेखानावरही पराभूत होऊन रणांगणांतून पळून जाऊन जीव वांचविण्याची पाळी आली. त्याचप्रमाणें संभाजीकडून फरादखानाचा बंगळुराकडे पराभव झाला. हें पाहून महमुदशहानें सिंहगड व बंगळूर हे दोन किल्ले शहाजीनें द्यावेत या अटीवर शहाजीस कैदेंतून मुक्त केलें. सिंहगडासारखा महत्त्वाचा किल्ला द्यावा लागला म्हणून शिवाजीमहाराजांनीं चिडून जाऊन विजापूरकरांवर चालून जाण्याचा विचार केला होता. परंतु

सोनोपंत नांवाचा मंत्री त्यांना म्हणाला "राजकारणांत बलवानाशी मारामारी करण्याचा प्रसंग आणणें शहाणपणाचें गणलें जात नाहीं. शहाजीनें बलवानाशीं वैर केलें व तो गैरसावध राहिला यामुळें त्याच्यावर कैदेचा प्रसंग आला. सध्यां अदिलशहा व दिल्लीपती हे दोघेहि तुमच्यावर रागावले आहेत. व त्या दोघांनींही एकजूट होऊन चाल केली तरी तुमचा निभाव लागेल असें दुर्गम स्थान हस्तगत करण्याचा प्रथम प्रयत्न करा; तोंपर्यंत आधीं शत्रूच्या पक्षांत फाटाफूट कशी पडता येईल तें पहा. भेदनीति हीच राजकारणांत फार उपयोगी असते. पित्याची सुटका होण्यासाठीं एकादा गड द्यावा लागला तरी हा सौदा महाग पडला असें वाटण्याचें कारण नाहीं. किल्ल्याचा स्वामी अजिंक्य असणें ही गोष्ट जास्त महत्त्वाची आहे." सोनोपंतांची ही विचारसरणी शिवाजीमहाराजांनाहि पसंत पडली व त्यांनीं कांहीं दिवस पड घेण्याचें ठरविलें.

१४. **अफजलप्रसंग**—यानंतर दंडाराजपूरच्या हबशाशीं शिवाजीमहाराजांना मारामारी करावी लागली त्यावेळीं महमुदशहानें हबशाचा पाठपुरावा केला. पुढें चंद्रराव मोऱ्यास जिंकून जावळी पूर्णपणें ताब्यांत घेतली तेव्हां प्रतापराव मोरे हा विजापूरकरांच्या आश्रयास जाऊन राहिला. महमुदाच्या मृत्यूनंतर औरंगजेबानें विजापूरकरांचा जो मुलूख हस्तगत केला होता त्यांत शिवाजीमहाराजांनीं ढवळाढवळ केली व विजापूरकरांच्या राज्यांत धुमाकूळ माजविला; मोंगलांच्या राज्यांतीलही कित्येक गांव घेऊन त्यांनीं अहमदनगरचें शासन केलें. सारांश निजामशाही राज्य मोंगलांनीं बुडविलें होतें तें शिवाजीमहाराज आपल्या ताब्यांत घेणार असा रंग दिसूं लागला. तेव्हां अली अदिलशहानें अफजुलखानास महाराजांच्या राज्यावर स्वारी करण्याचा व त्यांना जिवंत पकडून आणण्याचा हुकूम सोडला. अफजलखानानेंहि " शिवाजीला पक्केपणीं बांधून तुमच्या पुढें आणतों " अशी प्रतिज्ञा केली. तेव्हां अलीशहानें खूष होऊन अफजलखानाचा मोठा सन्मान केला व खान स्वारीवर निघाला. त्याच्या बरोबर अंबर, याकूत, मुसेखान, हसन, रणदुल्ला, अकुंशखान, हिलाल वगैरे मुसलमान सरदार आणि घोरपडे, पांढरे, खराटे, यादव, मंबाजी भोसले, घाटगे, काटे वगैरे मराठे सरदार होते. खान निघाला तेव्हां शिवाजीमहाराज पुणें प्रांतीं असून तिकडेच खानानें जाणें अवश्यक होतें. परंतु महाराजांनीं जावळी घेतल्यावेळीं

चंद्रराजाच्या सर्व नातेवाइकांना कापून काढलें; तेव्हां चंद्ररावाचा भाऊ प्रतापराव हा अदिलशहाकडे पळून गेला होता; त्याच्या आग्रहावरून जावळी प्रथम घेण्याचा विचार कायम करून खान वाईकडे आला. महाराजांनींहि असा विचार केला कीं " ज्या दुष्टानें तुळजापूरच्या भवानीचा मोठा अपमान केला, जो ब्राह्मणांना ठार मारूं इच्छितो, आणि जो वर्णाश्रमधर्माचा सर्वस्वीं नाश करण्यास उद्युक्त झाला आहे त्या अफजुलखानास मला मारलेंच पाहिजे. जावळींचें घोर वन ही माझी सिंहाची गुहाच होय. तींत शिरणारा हा शत्रु, अफझलखानरूपी हत्ती, खात्रीनें नाश पावणार. " असा विचार करून आणि आपले सेनापती व अधिकारी यांना कामें नेमून देऊन महाराज स्वतः पायदळांसह जावळीस आले. हें ऐकून अफजलखानानें महाराजाकडे निरोप पाठविला तो असा:—"अदिलशहानें निजामशाही राज्यांतला जो मुलुख मोंगलांना दिला होता तो तूं ताब्यांत घेतलास; दंडाराजपुरीच्या राजाचा मुलुख घेऊन त्याच्याशीं वैर संपादन केलेंस; चंद्रराजाची जावळी जबरदस्तीनें घेतलीस; कल्याण भिवंडी घेऊन मशिदी पाडल्यास; क़ाजी मुल्लांना कैद करतोस; चक्रवर्ती चिन्हें धारण करून सोन्याच्या सिंहासनावर बसतोस व स्वतंत्रपणें वागतोस; यासाठीं तुझ्यावर अदिलशहानें मला पाठविलें आहे. मुसेखान व प्रतापराव वगैरे सरदार मला युद्ध करण्याविषयीं प्रोत्साहन देत आहेत; तेव्हां हे राजा तूं तह करून सिंहगड, लोहगड, पुरंदर, चाकण, व नीराभीमा यांमधील प्रदेश दिल्लीश्वरास देऊन टाक, आणि जावळी अदिलशहाला दे. " या निरोपास उत्तर म्हणून दूतामार्फत महाराजांनीं असा निरोप पाठविला कीं "आपण कर्नाटकांतील अनेक राजांचा नायनाट केला, असें असून मजविषयीं एवढी दया दाखवितां हें चांगलें आहे. आपलें बाहुबल अतुल असून आपल्या ठिकाणीं मुळींच कपट नाहीं. आपली इच्छा असल्यास आपण जावळीस यावें. आपणांवाचून मोंगली व अदिलशाही सैन्य मला कस्पटासमान वाटतें. आपण वाटेनें सावधपणें यावें. आपण मागत अहां ते किल्ले व जावळीदेखील मी देतों. आपण येथें आल्यास मी निःशंक होऊन माझी तलवार आपल्यापुढें करीन. " हा सूत्रमय निरोप ऐकून " शिवाजी तह करण्याच्या इच्छेनें मला बोलवीत आहे तेव्हां मला तेथें गेलेंच पाहिजे. तो माझें योग्य बोलणें कबूल करणार नाहीं तर मी

देवता भ्रष्ट करीन व प्रतिज्ञा पार पाडीन " असें खानानें ठरविलें. तेव्हां त्याच्या कित्येक सल्लागारांनीं असें म्हटलें कीं " शिवाजीनें तुम्हांवर शुद्ध अंतःकरणानें विश्वास ठेविला हें खरें असेल तर त्यानें जावळीच्या वनांतून बाहेर यावें आणि आपलें सर्वस्व तुम्हांस अर्पण करावें. पण असें न करितां तो ज्या अर्थीं निर्भयपणें आपणांस तिकडेच बोलावीत आहे, त्याअर्थीं त्याच्या हृदयांत कांहींतरी साहस आहे असें आम्हांस वाटतें. ही डोंगरी वाट घोडे व हत्ती यांना त्रासदायक आहे, करितां तुम्ही या रानांत जाऊं नये." परंतु या सांगण्याकडे दुर्लक्ष करून खान जाण्यास निघाला.

इकडे शिवाजीमहाराजांना तुळजाभवानीनें प्रसन्न होऊन असें सांगितलें कीं, " अफजलखान कपटी असून तुझ्याशीं युद्ध करीत आहे. सध्यां तुळजापूर सोडून तुझ्या सहायार्थच मी आल्यें आहे.या प्राण्यानें माझा अपमान केला म्हणून तुझ्या हातानें त्याचा मृत्यु व्हावा अशी ब्रह्मदेवानें योजना केली आहे. या साठीं हे राजा, मी तुझी तलवार होऊन राहिलें आहे. " याप्रमाणें बोलून भवानी त्या तलवारींत शिरली. आणि जागृतावस्थेंत असूनहि त्यांना हें स्वप्न आहे असें वाटलें. नंतर महाराजांनीं आपल्या सेनापतींना असें सांगितलें कीं "मी बोलावल्यावरून तो यवन संधी करण्याच्या इच्छेनें इकडे येत आहे. तेव्हां शत्रुसेना या अरण्यांत येत असतां तुम्ही तिला अडथळा करूं नका. तुम्ही शस्त्रास्त्रानें सज्ज होऊन मजबरोबर अहां असें ऐकून एकांतांत भेट घेण्यासाठीं येणाऱ्या अफजलखानास कदाचित् भीति वाटेल, म्हणून तुम्ही सर्वांनीं जवळच सज्ज असूनहि गहन अरण्याच्या आंत शत्रूंना न कळत दडून रहावें. स्वतः करार करून सुद्धां जर तो संधि करणार नाहीं तर आमच्या दुंदुभीचा ध्वनी होतांच त्याची सेना कापून काढावी." इकडे अफजलखान मोठ्या कष्टानें हत्तीघोड्यानिशीं चढून वर आला, व जावळीनजीक कुमुद्वतीच्या तीरावर त्याच्या सैन्यानें तळ दिला, तेव्हां तें अगदीं दमून गेलें होतें. नंतर एकमेकांचे वकील एकमेकांकडे कुशल प्रश्न विचारण्यासाठीं गेले तेव्हां लोकांना हा तह होणार असें वाटूं लागलें. पण शिवाजीचें अंतःकरण अफजलखानानें ओळखलें व खानाचें शिवाजीनें ओळखलें. पण खरा प्रकार

ब्रह्मदेवास मात्र कळला होता. खानाच्या सैन्यांत अकुंशखान, याकुदखान, वगैरे सरदार व मंबाजी भोंसले वगैरे आप्त मंडळी असल्यानें त्यांना देणग्या देण्याकरितां रत्नें खरेदी करावयाचीं म्हणून महाराजांनीं खानाच्या सैन्यांतून जवाहिरे व्यापारी बोलावून आणून ठेवून घेतले. तेव्हां त्या लोभी व्यापाऱ्यांना आपण पर्वत शिखरावर वेढलें गेलों हें समजलें नाहीं. अफजलखानासही असें वाटलें कीं "या शिवाजीनें मजवर विश्वास ठेविला आहेच; तेव्हां मी त्याच्याजवळ जाऊन सख्य करण्याचें कपट करून व आपली गुप्त कट्यार त्याच्या पोटांत खुपसून आज देवाच्या मंदिरांतसुद्धां अतिशय भय उत्पन्न करीन." नंतर भेटीसंबंधीं दोघांत करार ठरला तो असा: "आपलें सैन्य तळावर आहे तेथें ठेवून एकटया अफजलखानानें स्वत: सशस्त्र निघावें, आणि पालखींत बसून पुढें यावें. त्याच्या सेवेसाठीं २।३ च सेवक असावेत. त्यानें प्रतापगडच्या पायथ्याजवळ स्वत: येऊन सभामंडपांत वाट पहात रहावें. आणि शिवाजीनें सशस्त्र येऊन त्या पाहुण्याचा आदरसत्कार यथाविधि करावा. दोघांच्याही रक्षणार्थ १०।१० सैनिकांनीं बाणाच्या टप्यावर येऊन मागें उभें रहावें, आणि दोघांनींहि भेटल्यावर गुप्त बोलणें करावें." याप्रमाणें करार करून व आंतून कपट योजून त्यांनीं एकमेकांची भेट घेण्याचें टरविलें. खान प्रतापगडच्या पायथ्याकडून मैदानाकडे येत आहे असें ऐकून महाराज भेटीस निघाले व पाहुण्यास सामोरे जावें त्याप्रमाणें ते स्नेहभावानें गेले, त्यावेळीं त्यांच्या डोक्यावर तुरा खोविलेली शुभ्र पगडी, अंगांत केशरी शिडकावाचा अंगरखा आणि एका हातांत तलवार, व दुसऱ्या हातांत पट्टा होता. दोघांनीं एकमेकांस पाहिलें. खानानें महाराजांचा विश्वास आपणांवर बसवून घेण्यासाठीं आपल्या हातांतील तलवार आपल्या जवळ असलेल्या सेवकाच्या हातांत दिली आणि स्नेहाचा आव आणून खान म्हणाला "मी आज तुज उद्धटला वठणीवर आणण्याकरितां आलों आहे. हे गड दे, लोभीपणा सोड, आणि मला शरण ये. मी तुला विजापुरास नेऊन बादशहापुढें तुझें डोकें नमवितों आणि तुला मोठें वैभव मिळवून देतों. तूं भीति टाकून मला आलिंगन दे." असें म्हणून त्यानें महाराजांची मान डाव्या हातानें धरून उजव्या हातानें कुशींत कटयार खुपसली. तेव्हां महाराजांनीं आपली मान त्याच्या हातून सोडवून घेऊन, गडबडून न जातां, अंग अकुंचित करून पोटांत खुपसलेल्या कट्यारीचा वार चुकविला.

आणि आपल्या तलवारीचें टोंक त्याच्या पोटांत खुपसलें. ती तलवार शत्रूच्या पोटांत पाठीपर्यंत घुसून व खानाची आंतडीं ओढून बाहेर पडली. खानानें आंतडीं हातानें दाबून धरून ओरडा केला. तेव्हां अफजलखानानें दिलेली तलवार उगारून त्याचा सेवक महाराजांवर धांवला. "ब्राह्मणास शिवाजी ठार मारणार नाहीं" असें जाणून अफजलखानानें त्या ब्राह्मण योद्ध्यास युद्धांत सामील केलें होतें. त्यानें महाराजांवर तलवार हाणली. पण त्यांनीं आपल्या तलवारीनें तिचा वार अडवून दुसऱ्या हातांतील पट्ट्यानें खानाच्या डोक्याचीं दोन शकलें केलीं. खान ठार झालेला पाहून सय्यद, रहीमखान, मोहिते वगैरे रक्षक चालून आले. तेव्हां संभाजी कावजी, इंगळे, कंक, जिवा महाला वगैरे महाराजांच्या लोकांनीं खानाच्या लोकांना अडविलें. बडा सय्यद यानें महाराजांचे अंगावर केलेला वार जिवा महाला यानें आपल्या अंगावर घेऊन सय्यदाचे दोन तुकडे केले. नंतर इतरांचीहि मारामारी सुरूं झाली. शके १५८१ मार्गशीर्ष शुद्ध ७ या तिथीस गुरुवारीं मध्यान्हीं अफजलखान मारला गेला. त्याबरोबर गडावर विजयसूचक गंभीर दुंदुभिध्वनि झाला. तो ऐकून शिवरायाच्या सैनिकांनीं शत्रुसैन्यास चोहोंकडून घेरलें. तेव्हां खानाचें सैन्य सैरावैरा पळूं लागलें. मुसेखानानें त्या सैन्यास थोपवून धरून कांहीं वेळ युद्ध चालविलें; पण शेवटीं त्यालाही पळ काढावा लागला. खानाचा वडील मुलगा आपल्या घाबरलेल्या दोन भावांना सोडून वेषांतर करून पळून गेला. मंबाजी भोंसले लढतां लढतां ठार झाला; रणदुल्ला पाडाव झाला, अंबरखान शरण आला व राजाजी घाटगे कैद झाला. सारांश त्या सैन्याची अगदीं दाणादाण उडाली; शत्रूकडील अनेक लोक कैद झाले, व मराठ्यांना मोठी लूट मिळाली.

अफजल प्रतापगडाकडे येणार असें ऐकून शिवाजीमहाराज पुण्याहून जावळीकडे निघाले तेव्हां मराठ्यांच्या सेनापतींनीं शत्रूंचे प्रांत हस्तगत केले व नगरें उध्वस्त केलीं. खानानेंहि आपले सरदार पाठवून मराठ्यांच्या राज्यांत दंगा उडविला. जाधवानें सुपे प्रांत, पांढरे यानें शिरवळ, खराड्यांनीं सासवड, हिलालानें पुणें प्रांत आणि सैफखानानें तळकोंकण हे प्रांत घेतले. तेव्हां त्यांना घालवून देण्यासाठीं नेताजी परत स्वराज्यांत

आला. परंतु महाराजांनीं त्याला "खान सैन्यासह तह करण्याच्या इच्छेनें जावळीस येत आहे, त्या तहाचा निर्णय होईपर्यंत तूं युद्ध करूं नकोस; पण सज्ज होऊन रहा. आमची व खानाची भेट होईल त्याच दिवशीं तूं वाईस जा." अशी आज्ञा दिली होती. त्यामुळें तो थांबला होता. खान मारला गेल्यावर नेताजीनें मुसलमानी सैन्यावर हल्ला करण्याची खटपट केली. परंतु प्रतापराव मोरे त्या रानांतील वाटांचा माहितगार असल्यानें त्याचे सहाय्यानें मुसेखान वगैरे सरदार जिवानिशीं वाईस येऊन पोंचले. तेव्हां नेताजी पालकरानें वाईवर हल्ला केला. नंतर चंदन, वंदन वगैरे किल्ले घेतले, व खटाव, औदुंबर, पाली, कऱ्हाड, कोल्हापूर, वगैरे गांवांवर हल्ले करून पुष्कळ खंडणी वसूल केली. पन्हाळयास अचानक वेढा देऊन तोहि हस्तगत केला.

**१५. रुस्तुमजमान व फाजलखान**—अफजलखान मारला गेल्याची बातमी मुसेखान वगैरे सरदारांनीं सांगितलेली ऐकून अल्ली अदिलशहानें फराद्खानाचा नातु रुस्तुमजमान यास सेनाधिपत्य देऊन विजापुराहून पाठविलें. शिवाजी महाराज पन्हाळयाच्या संरक्षणार्थ थोडें निवडक सैन्य ठेऊन रुस्तुमजमानाशीं लढण्यास निघाले. नेताजी, जाधवराव, खराडे, पांढरे, हिलाल, इंगळे, वाघ (ब्राह्मण), गोदाजी जगताप वगैरे सरदार मराठयांच्या सैन्यांत होते. त्यांच्याशीं तोंड देण्यास फाजल, मलिक, इतबार, अजीजखान, फत्तेखान, मुलाहय, संताजी घोरपडे, घाटगे यांना रुस्तुमानें नेमले. दोन्हीं सैन्यें निकरानें लढलीं. शेवटीं फाजलानें पळ काढण्यास सुरुवात केली व रुस्तुमानेंहि आपलें शस्त्र टाकलें. तेव्हां विजापुरी सैन्य गोंधळून गेलें. रुस्तुम पांच सहा घोडेस्वारांसह महाराजांच्या समोरून वेगानें पळून गेला. तेव्हां त्याला पकडतां येण्याजोगें होतें; पण त्या भित्र्या लोकांना महाराजांनीं पकडलें नाहीं. या युद्धांत मराठयांना कित्येक हत्ती सांपडले.

**१६. शिद्दीजोहाराचा वेढा**—रुस्तुमजमान प्रभृतींचा पराभव करून महाराज परत पन्हाळयास गेले. नेताजीनें महाराजांच्या आज्ञेवरून कवठे, मिरज, कागल, रायबाग, अथणी, तिकोटे वगैरे मुलूख उध्वस्त केला. या अडचणीच्या वेळीं विजापूरकरांनीं दिल्लीकरांचीं मदत मागितली. परंतु मोंगलांचें सैन्य लौकर येऊन पोंचलें नाहीं. यामुळें अल्ली अदिलशहानें कर्नूळचा अधि-

पति शिद्दी जोहार यास बोलाऊन महाराजांना पकडण्यासाठीं पन्हाळ्याकडे पाठविलें. रुस्तुम व फाजिल यांनाहि जोहाराच्या सैन्यांत सामील होण्याचा हुकूम सुटला होता. बाजी घोरपडे, पीड नाईक, भाई नाईक, शिद्दी मसूद वगैरे सरदार या सैन्यांत मिळाल्यावर सर्वांनीं मिळून पन्हाळ्यास चोंहीकडून वेढा दिला. स्वतः जोहार वगैरे किल्ल्याच्या पूर्वेस, घोरपडे वगैरे पश्चिमेस व इतरांनीं दक्षिणोत्तर आपापलीं सैन्यें ठेविलीं. कित्येक महिनेपर्यंत जोहार लढला. पण त्याला यश आलें नाहीं.

**१७ शास्ताखान.** अलि अदिलशहानें दिल्लीकरांकडे सहायार्थ सैन्य मागविलें होतें. त्याप्रमाणें औरंगजेबानें आपला मामा शास्ताखान यास दौलताबाद येथील आपल्या सैन्यासह मराठ्यांवर चालून जाण्याची आज्ञा केली. शास्ताखानाबरोबर ७७,००० घोडेस्वार, मोठमोठे हत्ती, व उत्तम पायदळ होतें; व त्यानें अडथळा न होतां भीमा नदी गांठली. या सैन्यांत अनेक पठाण सरदार, कारतलबखान, रजपूत राजे, गौड राजे, शिसोदे, भोंसले, काकडे, खंडागळे, पवार, उदारामाची बायको रायबागीण, घाटगे, गाढवे, कोकाटे, वगैरे सरदार होते. या सैन्यानें मुलुख उध्वस्त करीत चाकणच्या किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां आसपासचे लोक घाबरून गेले; व्यापारी पळाले, सासवड लुटलें गेलें, सुप्यास वेढा पडला, शत्रूनें पुणें घेऊन इंदापूरही काबीज केलें. एकंदरींत चाकणचौऱ्यांशीचा प्रदेश शत्रु-सैन्यानें ग्रासला. यामुळें मराठी राज्यावर मोठा कठिण प्रसंग गुदरला.

**१८ जिजाबाईचा आवेश.** शिवाजीमहाराज पन्हाळ्यास वेढ्यांत सांपडले व इकडे पुणें वगैरे प्रांत मोंगलांनीं हस्तगत केला, हें पाहून जिजाबाईचे ठिकाणीं विरश्रीचा संचार झाला व ती स्वतः युद्धास जाण्याची भाषा बोलूं लागली. त्यावेळीं तिचा मुक्काम राजगडास होता. नेताजी पालकर व हिलाल यांनीं विजापूरजवळचें शहापूर जाळलें, आणि शत्रूंस पराभूत करून ते शिवापट्टणास आले. त्यांना पाहतांच जिजाबाई म्हणाली—“ तुम्ही आपल्या धन्याला पन्हाळ्याच्या वेढ्यांत सोडून व सगळी लाज गुंडाळून ठेवून शत्रूच्या भीतीनें येथें आलांत असें दिसतें. तेव्हां शिवबास सोडविण्याची मी स्वतः खटपट करीन. तुम्ही इकडे शत्रूंशीं झुंजा.” नेताजीनें उत्तर केलें कीं “ आम्ही महाराजांच्याच आज्ञेनें विजापूरकरांकडे गेलों होतों, व आतां मोंगलांशीं युद्ध करण्यासाठीं परत आलों आहोंत.

पण आतां येथील सैनिक मोंगलांशीं लढतील; आम्ही जोहाराशीं लढण्यास जातों."

१९. **हिलालाचा पराभव**—नेताजी व हिलाल अशा रीतीनें राजगडाहून निघून पन्हाळ्याकडे वेढा उठविण्यासाठीं आले आणि जोहारानें त्यांच्यावर कांहीं सैन्य पाठविलें, तेव्हां या सैन्याच्या अनेक चकमकी झडल्या. एका चकमकींत हिलालाचा मुलगा वाहवाह हा शत्रूच्या व्यूहांत शिरला व त्यानें मोठें निकराचें युद्ध केलें; परंतु शत्रूंनीं त्याला घेरून घोड्यावरून खालीं पाडलें, व तो बेशुद्ध असतां त्याला शत्रूनें उचलून नेलें. अशा रीतीनें आपल्या मुलास शत्रू उचलून नेत असतां त्यांना अडविण्याचें काम हिलालासही करतां आलें नाहीं. नेताजीस ही बातमी ऐकून फार वाईट वाटलें; परंतु जोहाराच्या सैन्यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं.

२०. **पन्हाळ्यांतून महाराजांची सुटका.** हिलालाचा मुलगा कैद झाल्याचें ऐकून महाराजांना जोहाराविषयीं फार संताप आला. अशा वेळीं त्यांना एकदां झोंप लागली असतां तुळजाभवानीनें दर्शन दिलें; व ती महाराजांना म्हणाली: "मोंगलांनीं तिकडे चाकणचा किल्ला जिंकला; करितां तूं येथें राहूं नकोस, येथून निघून जा. तूं राजगडास जाऊन आईस भेट. थोड्याशा सैन्यासह तूं येथून निघून जा; मी आपल्या मायेनें जोहारास मोह पाडीन. जोहार आतां फार दिवस वांचणार नाहीं." याप्रमाणें पन्हाळ्याहून निघण्याचें ठरवून महाराजांनीं त्र्यंबक भास्कर यांस सेनापती नेमलें, व ते त्याला म्हणाले " आम्ही रात्रंदिवस लढतां लढतां चैत्रापासून चार महिने लोटले; आतां पांचवा महिना लागला. नेताजी वगैरेंचा मोड झाल्याची वार्ता आहे. सध्यां आपणांस शिद्दीस जिंकतां येणार नाहीं. पुणें प्रांत मोंगलांनीं घेतला आहे तेव्हां मी येथें रहाणें योग्य नव्हे. मी मोंगलांशीं लढण्यास जातो. हा गड तुझे हाताखालीं असूं दे." याप्रमाणें सांगून महाराज रात्रीचे पहिले प्रहरीं पन्हाळ्याहून पालखींत बसून निघाले, व त्यांचे मागून ६०० लोक गेले. महाराज प्रवास करीत असतां हेरांनीं पाहून ठेविलेल्या वाटेवरील उंचसखल भाग विजांनीं मध्यें मध्यें प्रकाशित होई. भवानीनें मोहित केल्यामुळें महाराज जवळून गेले तरी शत्रूस समजलें नाहीं व ते त्या अरण्यांतून सुरक्षितपणें पार होऊन विशाळ-

गडास पोंचलें. महाराजांनीं पन्हाळ्याहून निघण्याचें ठरविलें तेव्हां जोहाराकडे असा निरोप पाठविला कीं " मोंगल आमच्या राज्यावर चालून आले आहेत, त्यांच्याशीं लढण्यास मी जात आहे. तेव्हां तूं माझ्या येथें असलेल्या योद्धयांशीं लढ किंवा माझ्याशीं द्वंद्व युद्ध करण्याची इच्छा असेल तर पन्हाळगडाच्या पायथ्याशीं ये. तेथें आपण दोघेच लढूं." हा निरोप ऐकून जोहार भयचकित झाला व त्यानें तिकडे कानाडोळा केला; आणि सगळीकडे कडेकोट बंदोबस्त ठेवण्याविषयीं भाईखानास त्यानें बजाविलें, त्याप्रमाणें त्यानें अतिशय दक्षता ठेविली; तरी देखील महाराज मोठ्या हिंमतीनें वेढा उल्लंघून गेले. नंतर सात प्रहरांत पांच योजनें मार्ग आक्रमून महाराजांनीं विशाळगड गांठला. इकडे महाराज गेल्याची बातमी शिद्दीस समजली तेव्हां त्याला फार वाईट वाटलें; आणि मसूदखानास त्यांच्या पाठलागास जाण्यास त्यानें हुकूम दिला. त्याप्रमाणें मसूद पाठलाग करण्यास निघाला. त्याचे कित्येक लोक चिखलांत रुतले व शेवाळांत पडले. तथापि शेवटीं मसूद, पालीचा राजा जसवंतराव, आणि शृंगारपूरचा सूर्याजीराव यांनीं महाराजांना अडविण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण त्याचा उपयोग झाला नाहीं. उलट मराठ्यांच्या सैन्याचा मारा सहन न झाल्यामुळें त्याच्या सैन्याची पांगापांग झाली व स्वतः मसूदास मराठ्यांनींच सोडलें म्हणून जीव घेऊन परत जाऊं शकला.

**२१. शिद्दी जोहाराचा शेवट**—मसूद परत गेल्यानंतर महाराज विशाळगडाहून निघून राजगडास गेले; व जिजाबाईस भेटले. एकीकडून शास्ताखान व दुसरीकडून शिद्दी जोहार असा दुहेरी पेंच संभाळणें कठिण आहे असें पाहून पन्हाळगड लढविण्याचें रहित केलें व " किल्ला अदिलशहाच्या स्वाधीन कर आणि तूं निघून ये. " असा त्यांनीं त्रिंबक भास्कर यास निरोप पाठविला.त्याप्रमाणें त्यानें पन्हाळा अली अदिलशहास देऊन टाकला. नंतर जोहारास भेटून त्रिंबक भास्करानें चौकशी केली तेव्हां जोहाराच्या मनांत महाराजांचा स्नेह जोडण्याची इच्छा आहे असें दिसलें. अशा रीतीनें त्र्यंबक भास्कर आपलें सर्व सैन्य घेऊन सुरक्षितपणें राजगडास परत आला. इकडे अदिलशहाला अशी शंका आली कीं 'जोहारानें महाराजांकडून पैसा घेऊन त्यांना पन्हाळ्यांतून जाऊं दिलें असलें पाहिजे; जोहाराची सम्मती असल्यावांचून शिवाजीमहाराजांना वेढ्यांतून जातांच

आलें नसतें.' या संशयानं अल्ली अदिलशहा पछाडला गेल्यामुळें तो जोहा-रावर रागावला आणि " शिवाजी राजे यांनीं तुला दिलेलें धन दे, नाहीं-तर माझ्या हातून तुझा नाश होईल. " अशा अर्थाचा निरोप त्याच्याकडे पाठविला. तथापि जोहार भ्याला नाहीं. त्यानें अदिलशहाशीं युद्ध आरं-भिलें. त्यांत त्याला पिछेहाट करावी लागली, तेव्हां तो कर्नूळास गेला. तेथें अदिलशहानें त्याला युक्तीनें विषप्रयोग करविला. यामुळें जोहार मरण पावला. केवळ संशयावरून अल्लीनें जोहाराचें प्रकरण या थरावर नेलें व शेवटीं त्याचा घात करविला हा अदिलशहाचा मूर्खपणा होता. शिवाजी महाराज निघून गेले तें जोहारास कळलें नाहीं याचें कारण महाराजा-वर देवीची कृपादृष्टी होती. तेव्हां या बाबतींत जोहाराकडे कांहींच दोष नव्हता.

२२. **कारतलबाशीं उंबरखिंडीचें युद्ध**—शिवाजीमहाराज पन्हा-ळ्याच्या वेढ्यांत अडकले होते त्या संधीचा फायदा घेऊन शास्ताखानानें संग्रामदुर्गासह चाकणशहर ताब्यांत घेतलें व पुण्यापर्यंतचा मुलूख हस्त-गत केला. मोगलांच्या अफाट सैन्याशीं युद्ध करावें तर प्राणहानी पुष्कळ होणार व त्या मानानें फायदा तर कांहींच नाहीं;हें ओळखून महाराजांनीं प्रथम मंत्र्यांच्या सल्ल्यावरून ' पैसा मिळविणें व मोगलांचा सह्याद्री उतरण्याचा मार्ग बंद करणें ' या दोन गोष्टी करण्याचें ठरविलें. इकडे ७३ हजार घोड-स्वारांसह शास्ताखानानें पुण्यास ठाणें दिल्यानंतर त्यानें कारतलबखान नांवाच्या सरदारास सह्याद्री उतरून चौल, कल्याण, भिवंडी, पनवेल, नागोठणें वगैरे स्थळें हस्तगत करण्याचा हुकूम केला. त्या काळीं चव्हाण, गाढे, रायबागीण, कोकाटे, जाधव वगैरे सरदारांनीं कारतलबाच्या स्वारींत सामील व्हावें असें शास्ताखानानें ठरविलें. त्याप्रमाणें हें सैन्य लोहगडच्या दक्षिणोत्तर मार्गानें सह्याद्री उतरूं लागलें. तेथें केवळ पाऊलवाट मात्र अस-ल्यामुळें त्या सैन्यास चालून जाण्यास बराच वेळ लागला. अशा रीतीनें हें मोंगली सैन्य पाऊलवाटेनें चाललें असतां मराठयांचें सैन्य डोंगराच्या पायथ्याशींच होतें. परंतु दाट झाडी असल्यामुळें मराठ्यांचें सैन्य मोंगलांना दिसलें नाहीं. यामुळें मोगली सैन्य सह्याद्रीच्या कड्यावरून बरेंच दूरपर्यंत चालून आलें; व आयतेंच मराठ्यांच्या कोंडींत सांपडलें. मोंगलांचें सैन्य झाडींत शिरण्यापूर्वींच मराठ्यांचे सेनापति दोन्ही बाजूस आधींच जाऊन बसले

होतें. कारतलबाचें सैन्य 'उंबरखिंड' नांवाच्या पाऊलवाटेवर येतांच मराठ्यांनीं आपल्या रणभेरी वाजविल्या, तेव्हां मराठ्यांच्या सैन्याचे नगारे ऐकून मित्रसेन, अमरसिंह वगैरे सरदारांनीं युद्धाची तयारी केली. मराठ्यांनीं पुढें होऊन मोंगली सैन्यांतले बरेच लोक मारले, हें पाहून 'आपण वेढले गेलों' हें मोंगलांच्या लक्षांत आलें; व तें सैन्य जागच्या जागीं थबकलें; त्याचा धीर खचला. दोन प्रहरची वेळ होऊन उन्हाचा ताप त्याला असह्य वाटूं लागला. तेव्हां रायबागीण कारतलबास दोष देऊन म्हणाली: "मोंगली सैन्य नेमकें या जंगलांत अडचणीच्या जागीं घेऊन येण्यांत तुझी तर चूक झालीच; पण तुला हा हुकूम देणारा शास्ताखानहि याबद्दल दोषी आहे. आतां आपलें हें सैन्य सारीकडून वेढलें गेलें आहे. अशा वेळीं लढण्यापासून कांहीं फायदा होणार नाहीं. या वेळीं शिवाजीस शरण जाणें हा एकच मार्ग जीव वांचविण्यास मोकळा दिसतो." रायबागिणीचें हें सांगणें कारतलबासहि सयुक्तिक दिसलें. त्यानें दूत पाठवून महाराजांना असें कळविलें कीं "शास्ताखानाच्या हुकुमावरून आम्हीं तुमच्या प्रांतांत शिरलों ही आमची चूक आहे. दोन तीन दिवसांत आम्हांला धड पुरेसें पाणी पिण्यास देखील मिळालें नाहीं. तेव्हां या वेळीं आम्हांला अभय देऊन जीवदान द्यावें. आमची गाळण उडाली आहे. कसेंहि करून आम्हांस राखावें. आपले वडील शहाजी राजे यांचा मजवर अतिशय लोभ होता. पण तो विसरून मी भलत्याची नोकरी पत्करली हें वाईट केलें. आतां आम्हांला या रानांतून कसेंहि करून जिवंतपणीं जाऊं द्यावें. आम्हीं तुम्हांस शरण आलों आहों." कारतलबाच्या या विनंतीस मान देऊन महाराजांनीं त्याच्या सैन्यास निघून जाण्याची परवानगी दिली. आणि कारतलबानेंहि महाराजांकडे खंडणी पाठविली. मित्रसेन वगैरे सरदारांनीं देखील खंडणी पाठवून अभय मिळविलें. अभयदानाचा हा तह ठरेपर्यंत कित्येक ठिकाणीं चकमकी झडून मोंगली शिपाई मेटाकुटीस आले होते. इतक्यांत भालदारांनीं महाराजांची आज्ञा मोठ्यानें ओरडून सर्व ठिकाणच्या सैनिकांना कळविली. यामुळें युद्ध बंद पडलें. मोंगल मोठ्या कष्टानें व घाईघाईनें निघून गेले. तेव्हां पुष्कळ द्रव्य, हत्ती, घोडे, सोन्यारुप्याचीं भांडीं वगैरे बहुमोल लूट मराठ्यांना मिळाली.

**२३. कोंकणची स्वारी**—मोंगलांचें सैन्य पराभूत होऊन गेलें तरी तें परत येण्याचा संभव असल्यामुळें त्यांना अडविण्यासाठीं त्या ठिकाणीं कांहीं सैन्य ठेऊन महाराज कोंकण प्रांतावर चालून गेले. त्यांचें सैन्य पाहतांच पुष्कळ गांवच्या अधिकाऱ्यांनीं आपणहून मराठ्यांचें स्वामित्व मान्य केलें. त्या सैन्यानें यानंतर दाभोळ बंदर ताब्यांत घेतल्याचें ऐकून पालीचा राजा जसवंत यास 'आपण सिद्दी जोहारास मदत केली होती तेव्हां आतां आपली धडगत नाहीं' असें वाटून त्यानें शृंगारपूरच्या राजाचा आश्रय केला. तथापि शृंगारपूरचा सूर्यराव व पालीचा जसवंत यांच्याविषयीं महाराजांना फारसें वाईट वाटलें नाहीं. कारण ते दोघेहि आदिलशहाचे मांडलिक होते. दाभोळचा बंदोबस्त झाल्यानंतर महाराजांनीं चिपळुणास जाऊन परशुरामाचें दर्शन घेतलें व देवाची पूजा केली. नंतर संगमेश्वर व देवरुख हीं गांवें मुसलमानांनीं सोडून दिलीं होतीं तीं ताब्यांत घेण्याचें काम नीळकंठ राजाचा मुलगा ( पिलाजी निळकंठ ) व तानाजी मालुसरे यांजकडे सोंपविण्यांत आलें; व 'संगमेश्वरास गेलेल्या या मराठ्यांच्या सैन्याशीं भांडण उकरून काढूं नये' असा निरोप प्रभानवलीच्या राजाकडे शिवाजीमहाराजांनीं पाठविला. राजापूर येथें अनेक फिरंगी व्यापारी होते. त्यांच्यापासून व इतर व्यापाऱ्यांपासून अनेक प्रकारची संपत्ति महाराजांना खंडणी म्हणून मिळाली. आदिलशहानें ही बातमी ऐकून मराठ्यांचा बंदोबस्त करण्याचें काम शृंगारपूरच्या सूर्यरावाकडेंच सोंपविलें. रुस्तुमखान वगैरे सरदार मराठ्यांशीं लढूं शकत नाहींत असा अनुभव आला होता व कोंकणचा प्रदेश डोंगराळ असून तो सूर्यरावाच्या पूर्णपरिचयातला होता यामुळें आदिलशहानें यावेळीं सूर्यरावाची योजना या कामावर केली. सूर्यरावानेंहि ही कामगिरी पत्करून संगमेश्वर येथें असलेल्या मराठ्यांच्या सैन्यास अचानक रीतीनें वेढा दिला. तेव्हां मराठ्यांचा सेनापती पिलाजी निळकंठ हा घाबरून पळून जाण्याच्या विचारांत होता! हें पाहून तानाजी मालुसऱ्यानें त्याचा धिःकार केला; व त्याला दोरखंडांनीं दगडाला बांधून ठेवून सूर्यरावाच्या सैन्यावर मोठ्या आवेशानें हल्ला चढविला; आणि सकाळ होण्यापूर्वीं शत्रूसैन्याची दाणादाण उडवून दिली. ही बातमी समजतांच सूर्यराजाच्या उद्धटपणाचा महाराजांना मोठा राग आला. पण त्यांनीं तो आवरला. सूर्यराजाकडे

याहि वेळीं त्यांनीं बोलणें करण्यासाठीं दूत पाठविला. त्यानें सूर्यरावास असें कळविलें कीं "संगमेश्वर येथील मराठ्यांच्या सैन्यावर रात्रीं अचानकपणें हल्ला करून तुम्हीं अक्षम्य अपराध केला आहे. तथापि महाराज आतां पालीचें राज्य घेण्यास निघणार आहेत. त्या वेळीं तुम्हीं भेटीस या म्हणजे तुम्हांस अभयदान मिळेल; आणि आला नाहीं तर पालीच्या राजाची जी अवस्था तीच तुमचीहि होईल हें लक्षांत ठेवा." हें ऐकून सूर्यरावानें भेटीस जाण्याचें कबूल केलें. पुढें महाराजांनीं पालीचें राज्य जिंकून तेथील लोकांना अभयदान दिलें व चिरदुर्गाभोंवतीं तट बांधून मंडनगड हें नांव गडास दिलें. तरीहि शृंगारपूरचा राजा भेटीस आला नाहीं. यामुळें त्याच्या राज्यावर चालून जाण्यावांचून महाराजांना गत्यंतर राहिलें नाहीं. सूर्यरावावर चालून जाण्याच्या कामीं इतकी चालढकल करण्याचें कारण असें होतें कीं जावळीचें राज्य महाराजांनीं घेतलें तेव्हां प्रभानवल्लीच्या सूर्यराजानें त्यांच्याकडे गुप्तपणें 'मी तुमचा क्रीतपुत्र आहे' असा निरोप पाठवून अभयवचन घेतलें होतें. व तेव्हांपासून त्यानें कित्येक वेळां महाराजांना मदतहि केली होती. परंतु पुढें त्याची बुद्धी फिरली व तो महाराजांच्या भेटीस आला नाहीं. तेव्हां महाराज १५ हजार पायदळ घेऊन एकाएकी प्रभानवल्लीवर चाल करण्यास निघाले. ते सारवरापर्यंत येऊन पोंचले हें ऐकून सूर्यराव पळून गेला. यावेळीं सूर्यरावास पळून जाणें भाग पडलें, याचें दुसरें असेंही कारण होतें कीं, त्याच्याजवळ सैन्य मुळींच नव्हतें. पूर्वी संगमेश्वराहून महाराज पालीकडे निघून गेले तेव्हां आपणास आतां कोणी शत्रू राहिला नाहीं व युद्धाचा प्रसंग नाहीं असें समजून सूर्यरावानें आपल्या सेनापतीला सैन्यासह घरीं जाण्यास परवानगी दिली होती; आणि महाराज पालीहून इतक्या अचानक रीतीनें परतले कीं ते प्रभानवल्लीस आले तरी सूर्यराजाला आपलें सैन्य जमविणें शक्य झालें नाहीं. यामुळें सूर्यराव भिऊन पळून गेला; व महाराज सैन्यासह शृंगारपुरांत शिरले. नंतर सर्वच प्रभानवल्ली प्रांत हस्तगत करून त्यावर त्र्यंबक भास्कर याची नेमणूक महाराजांनीं केली. आणि शृंगारपुराजवळ असलेल्या गडास 'प्रतीतगड' असें नांव दिलें. त्या वेळीं ग्रीष्म ऋतु होता.

---

# ३. प्रचलित शिवचरित्राची भूमिका

१. तंजावरचा शिलालेख. वर दिलेल्या सारांशावरून एक गोष्ट स्पष्टपणें लक्षांत येण्याजोगी आहे ती ही कीं तंजावरच्या शिलालेखकारानें शिवभारताचा उपयोग केला आहे. शिलालेखांत वर सांगितलेले २३ हि प्रसंग आहेत. आणि शिवभारत ज्या प्रभानवल्लीच्या विजयापर्यंत आहे तेथपर्यंत त्याच्या आधारें शिलालेखांतहि मजकूर संगतवार दिलेला असून पुढें शिलालेखकारानें एकदम उडी मारली आहे. भातवडीच्या लढाईंत, शहाजीच्या कैदेच्या वेळीं, अफजलाच्या स्वारींत आणि शास्ताखानाच्या मोहिमेंत अदिल, निजाम, मोगल व मराठे यांकडील सरदारांच्या ज्या याद्या शिवभारतांत आहेत त्या बहुतेक त्याचक्रमानें शिलालेखकारानें उतरल्या आहेत. शिवभारत व शिलालेख यांतील मजकूर ताडून पाहिला असतां दोहींतील मजकुरांचें साम्य शेंकडो बाबतींत आहे व शिलालेखकारानें भारताची नक्कल करण्याचा प्रयत्न केला आहे हें सहज समजण्याजोगें आहे. सर्व साम्यांचीं स्थळें येथें देण्यानें विस्तार होईल व त्याची तादृश आवश्यकता नाहीं. याकरितां येथें दहापांच स्थळें केवळ उदाहरणादाखल देतों.

( १ ) एतस्मिन्नेव समये दुर्गं देवगिरिं श्रयन् ।
निजामशाहो धर्मात्मा पालयामास मेदिनीम् ॥ १/५८

त्या समईं निजाम पादशहा म्हणणार देवगिरि दुर्गांत राज्य करीत होता. ( तं. शि. पृ. ५ ).

( २ ) सुतां विश्वासराजस्य दुर्गां नाम्नाथ सद्गुणाम् ।
शरीफोऽपि महाबाहुर्भव्यां भार्यामविन्दत ॥ २/६५

शरफोजी राजे यानी विश्वासरायाचे कन्या दुर्गाबाई यांसी लग्न करून घेतले. ( पृ. ७. )

( ३ ) ततस्तेनेभरामेण तस्मै विध्वस्तविद्विषे ।
मन्ये संतुष्य शाहाय निजमर्धपदं ददे ॥ ४/१

शाहजी राजे जय पाऊन अल्ली यदलशाहाकडे आले तेव्हां शाहा मजकुरांनीं फार संतोष पाऊन शहाजी राजास आपले अर्ध राज्य जाहगीर दिल्हे. ( पृ. १२ ). [ येथें ‘ मन्ये ’ हा मुळांतला शब्द अजीबात

सोडला, व ' इभराम ' बद्दल ' अल्लीयदलशाह ' असें शिलालेखकारानें लिहिलें. ]

( ४ ) ततो निजामविषयं शाहः स्वविषयं विना ।
दिल्लीन्द्राय ददौ कंचित् येदिलाय च कंचन ॥ $\frac{९}{१०}$

शाहाजी राजानी नूतन निजामशहाचा मुल्क आपण बांधिला तो समग्र दिल्लेश्वर अवरंगजब व विजापूरचे अल्लियदलशाहा उभयतांस वांटून देऊन सोडून आपण आपल्या स्वराज्य सातारगड नगरातच राहिले. (पृ. १७. ) [ येथें दिल्लीन्द्र म्हणजे औरंगजेब; यदिल म्हणजे अल्ली आणि स्वविषय म्हणजे स्वराज्य सातारगड नगर असें शिलालेखकार समजतो हें त्याच्या ऐतिहासिक व भूगोलिक अज्ञानाचें फल आहे. ]

( ५ ) आहूय स्वर्णशर्माणमग्रजन्मानमंतिके ।
शिवोद्धा मंत्रवित्तत्तन्मंत्रवेदिनमब्रवीत् ॥ $\frac{१९}{२}$

त्यांनीं ( शिवाजी राजांनीं ) आपला मंत्री सुवर्ण नामक ब्राह्मण त्यास सोनोजीपंत म्हणून येक,त्यास बलाऊन येकांती सांगितले जे.(पृ.२४-२५)

( ६ ) असौ जाग्रदवस्थोपि तत्स्वप्नमवमन्यत ॥ $\frac{१०}{२३}$

स्वप्न पाहिलें म्हणावें तर जागाच आहे. ( पृ. २९. ).

( ७ ) यातुं प्रणालमचलं स्वयमेव समुद्यताम् ॥ $\frac{२१}{८}$

जिजाई आईसाहेब पनाळास जाणेस सिद्ध जाहले ( पृ. ३८ ).

( ८ ) तत्र तं स्वामिनं हित्वा त्रपां चातिमहीयसीम् ।
अहा युवां पराभिया परावृत्तावुभावापि ॥ $\frac{२६}{१३}$

(तुमचा यजमान पनळगडी शत्रूशी युद्ध करितो,) तुम्ही उभयतां लाज नाहींसे भीऊन आपला प्राणच थोरसा समजून पळून आला. ( पृ.३८).

( ९ ) यामिन्याः प्रथमे यामे प्रस्थितः पृथिवीपतिः ।
तदा बतानुयान्ति स्म पद्गानां शतानि षट् ।
प्रस्थानदुंदुभिस्तस्य दध्वानं मधुरं तथा
ध्वनदंभोधर भ्रांत्या परैर्न बुबुधे यथा ॥ ६८ ॥

राजे रात्रीं प्रहरानंतर सहाशें पायदळसहीत भेरी वाजवीत शत्रूसमीप मार्गानें चालिले तेव्हां ते शब्द मेघगर्जना म्हणून शत्रु समग्र समजले ( पृ. ३९ ).

( १० ) ततस्तदंतिके तत्तद् वृत्तमावेदयन्नयम् ।
अनयत्तद्दिनं सर्वं विजयी शाहनंदनः ॥ $\frac{२७}{५०}$

शत्रूस जिंतून तेथून निघून राजगडास आपले मातोश्रीला.... चाले वर्तमान येकंदर सांगून एक दिवस तेथेंचि राहिले ( पृ. ३९ ).

( ११ ) तस्मादेहि धनं देहि यद्दत्तं तेन भूभृता ।
मद्धस्तेनैव भवतो भवेन्निधनमन्यथा ॥ $\frac{२८}{१८}$

राजाकडून लाच घेतलास ते द्रव्य देणे नाहितरी तुझें पारिपत्य केलें जाईल ( पृ. ४० ).

( १२ ) अ. २९ श्लो. ८१ व ८२ मध्यें शिवभारतकारानें 'तानाजी मालुसुरा व पिलाजी नीलकंठ संगमेश्वरास गेले' हें सांगतांना '**नीलकंठराजात्मजो द्विजः**' असे शब्द पिलाजी नीलकंठ याऐवजीं वापरले आहेत. त्याचें भाषांतर करतांना शिलालेखकारानें 'नीलकंठ-राजाचे पुत्र ब्राह्मण' ( पृ. ४१ ) असेच शब्द योजले!

( १३ ) न यद्यपि नरेंद्रस्य तत्र सिद्धांजनांचिते
तदप्यद्धा निधनानि पश्यतः स्म विलोचने ॥ $\frac{३०}{९}$

शिवाजी राजास अंजन न घालतां बहुत द्रव्य मोहराच्या कढया दृष्टीस पडल्या ( पृ. ४१ ).

( १४ ) तव क्रीतसुतोऽस्मीति वाचिकेन व्यजिज्ञपत् ॥ $\frac{३१}{४२}$

आपण महाराजाचा क्रयपुत्र म्हणून शरण आला होता ( पृ. ४३ ).

शिलालेखकारानें मजकूर तयार करतांना शिवभारताची तंजावर येथील प्रत पाहिली होती हें वरील विवेचनावरून ठरतें. त्याप्रमाणें शिवभारतांतील मजकूर मराठीत उतरतांना शिलालेखकारानें कांहीं ठिकाणीं ( १ ) चुका केल्या व कांहीं ठिकाणीं ( २ ) जास्त अवांतर मजकूर घातला यामुळें शिलालेखांतील मजकुरांत विसंगति उत्पन्न झाली आहे. विजापूरच्या आदिलशाही गादीवर अनुक्रमानें इब्राहीम, महमूद आणि अली हे बाद-शहा (शहाजी व शिवाजी यांच्या हयातींत ) होते व शिवभारतांत हीं नांवें जेथल्या तेथें बिनचूक दिलेलीं असून शिलालेखकारानें महमूदशहाचें नांव अजीबाद गाळलें व अली आदिलशहा हें नांव जेथें तेथें घातलें आहे. त्याच्या मतें इब्राहिमाचा मुलगा यदिल व 'यदिल', यालाच प्रतिनाम अली. या त्याच्या समजामुळें अथवा गैर समजामुळें, यदिल उर्फ अदिल

हा शब्द दिसतांच त्यानें अलीचें नांव घुसडलें ! वस्तुतः ' यदिल ' हा विजापूरच्या सर्वच बादशहांना लागू पडणारा आडनांवासारखा सामान्य शब्द आहे. पण शिलालेखकारानें अज्ञानामुळें यदिलचें भाषांतर किंवा स्पष्टीकरण अली या शब्दानें केलें. तोच प्रकार दिल्लीच्या बादशहासंबंधीं झालेला आहे. जहांगीर, शहाजहान व औरंगजेब असा, ताम्र (ह्मणजे मोगल) बादशहाचा क्रम असून शहाजहानाच्या कारकीर्दींत त्याचा मुलगा औरंगजेब दक्षिण प्रांतीं सुभेदार म्हणून अधून मधून होता आणि नंतर बापास कैद करून औरंगजेब बादशहा बनला ही तपशीलवार माहिती शिलालेखकरास नसल्यामुळें ताम्राधिपति याचा अर्थ त्यानें क्वचित् जहांगीर व बहुधा औरंगजेब उर्फ अलमगीर किंवा ' अल-गिरी ' या शब्दानें देऊन व शहाजहान हें नांव अजिबात गाळून घोटाळा माजविला आहे. शिलालेखकाराच्या भूगोलविषयक अज्ञानानेंहि बरीच दंगल उडवून दिली आहे. शहाजीची मूळ जहागीर पुणें प्रांत; त्यापैकीं ' पुणें ' या शब्दाचें रूप कांहीं ठिकाणीं ' पुणें सातारगड ' आणि कांहीं ठिकाणीं नुसतें ' सातारगड ' असें दिलें आहे ! मालोजी इंदिरापूरच्या म्हणजे इंदापूरच्या युद्धांत मेला असें भारतांत असून ' इंदापूर'च्या जागीं कोल्हापूर असें शिलालेखकारानें म्हटलें आहे. शहाजीची नेमणूक रणदुल्लाबरोबर दक्षिण प्रांताच्या स्वारीवर झाली हें सांगतांना औरंगजेबास तोफा (=खंडणी) देणारा दक्षिण प्रांत जिंकण्यासाठीं आदिलशहानें ही स्वारी पाठविली असें स्पष्टीकरण शिलालेखकार करतो. वस्तुतः यावेळीं दिल्लीच्या गादीवर शहाजहान होता व त्याचा अंमल तुंग-भद्रेच्या दक्षिणेस यत्किंचितहि नव्हता. ' मुधाभिध फलस्थानपतिः ' ह्मणजे मुधोजी फटलणकर याचें भाषांतर करतांना मुधाभिध या जागीं 'मुसेखान' हा शब्द शिलालेखांत योजला आहे. शिवजन्माच्या वेळीं शहाजी दर्याखानावर स्वारी करण्यास गेला होता एवढें भारतांत आहे. पण दर्याखा-नाची हयात शिलालेखांत बरीच लांबविली आहे. नसतें स्पष्टीकरण घाल-ण्याच्या हौसेनें तर शिलालेखकारांस बऱ्याच ठिकाणीं तोंडघशीं पाडलें आहे. याचीं एकदोन उदाहरणें देतों—

तस्य तस्यामजायन्त पुत्राः षट् शुभलक्षणाः ।
तेषां मध्ये शंभुशिवौ द्वावेवान्वयवर्धनौ । ५-२३.

या भारतांतील श्लोकांत ' शहाजीला जिजाबाईपासून सहा मुलगे झाले; त्यांपैकीं दोघेच मोठे झाले ' एवढें सांगितलें आहे. पण शिलालेखकारानें " शके १५४७ प्रथम पुत्र संभाजीराजे जन्मले; त्यामागूनहि क्रमेकरून चौघे पुत्र जाहले; परंतु वर्धमान दशेस पावले नाहींत. " ( पृ. १३ ) अशी मल्लिनाथी केली आहे. त्याप्रमाणें शिवभारतांत शिवजन्म व अफजलप्रसंग या दोहींच्याच मित्या दिल्या असून शिलालेखकारानें पुष्कळच जागीं शकाचे व सनाचेहि आंकडे दिले आहेत.

योध्दुमद्धा पठानेन दर्याखानेन मानिना ।
शाहराजे महाराजे प्रयाते विषयांतरम् ॥
अनुग्रहाय देवानां दैत्यानां निग्रहाय च ।
प्रभुः स जगतां प्रादुरभूद् भृशबलान्वये ॥ ६।३७

म्हणजे 'शहाजी महाराज दर्याखान पठाणाशीं लढण्यासाठीं परप्रांतास गेले असतां भोसले वंशांत देव (=शिवाजी महाराज) अवतरले' असें शिवभारतकार ह्मणतो. पण शिलालेखकारानें यांत कल्पनेची पुष्कळच भर घालून विसंगति उत्पन्न केली आहे. तो लिहितो 'निजामशहानें शहाजीला मोगलाची फौज घेऊन येणाऱ्या दर्याखानावर जा ह्मणून निरोपून यादव राजास आपल्या भेटीस या ह्मणून बलाऊन पाठविले, तेव्हां जिजाबाई पूर्ण गर्भ होती; तेव्हां तिच्या संरक्षणास शहाजीनें कांहीं सैन्य शिवनेरीस ठेवलें; व वरकड सैन्यानिशीं शहाजी दर्याखानाशीं युद्ध करण्यास गेला. आणि दर्याखानास पळवून लावून शहाजी परत शिवनेरीस येतो इतक्यांत जिजाबाईस पुत्रोत्सव जाहला'.भारतकारानें शहाजी कोणाच्या हुकुमानें दर्याखानावर गेला व दर्याखान कोणाकडचा हे मुद्दे मुद्दाम संदिग्ध ठेवले आहेत हें शिलालेखकारास समजलें नाहीं.

ऐतिहासिक व भूगोलिक अज्ञानानें व स्पष्टीकरणाच्या हौसेनें शिलालेखकाराच्या हातून भारतांतील मजकूर सांगतांना कशा प्रकारचे दोष घडले आहेत त्याचें दिग्दर्शन केलें. आतां शिलालेखांत भारतापेक्षां जास्त मजकूर घातला गेला आहे त्याचें स्वरूप पाहूं. ' सूर्यवंशांत मालोजी नांवाचा राजा होऊन गेला ' असें म्हणून भारतकारानें ग्रंथांतील कथानकास प्रारंभ केला आहे. पण शिलालेखकारास ब्रह्मदेवापासून मालोजीपर्यंतच्या पिढ्या सांगण्याची अवश्यकता भासली; व त्यानें नांवनिशीचे

बरेंच मोठें लटांबर जोडून दिलें; त्याचप्रमाणें 'पेमगिरी' येथें बादशाही उभारल्या वेळीं शहाजीच्या बाजूस घाटगे, काटे, गायकवाड, चव्हाण, वगैरे 'महाराष्ट्र नृपाः' म्हणजे मराठे राजे मिळाले हे सांगतांना भारतकारानें दाहाबाराच नांवें दिलीं आहेत. पण शिलालेखकारानें शहाण्णव कुळींचे मराठे जमले असें सांगून त्यांची यादी दिली व सूर्यवंशी कोण व चंद्रवंशी कोण याचा खुलासाहि जोडला. 'शहाजी व शरीफजी' ही मालोजीचीं मुलें 'सिद्धनामांकित' म्हणजे फकीराच्या नांवावरून ठेविलीं गेलीं एवढें भारतांत आहे. पण शिलालेखांत त्या फकीराचें नांव काय व त्यानें मालोजीस आशीर्वाद काय दिला व बीरुदें कोणतीं दिलीं याची भारुडकथा सांगितली आहे. पण याहीपेक्षां महत्वाची गोष्ट म्हटलीं म्हणजे चित्रकलच्या भरमापावर शहाजीनें काढलेल्या स्वारीचें वर्णन व जिजाबाईस शहाजीची दुसरी बायको म्हणणें या दोन गोष्टी शिलालेखांत अगदीं नव्या आहेत; त्यांचा मागमूसहि भारतांत नाहीं. यावरून शिलालेखकारांला शिवभारतांतील मजकुरापेक्षां जास्ती माहिती नमूद करण्याची इच्छा होती हें उघड आहे. शिवभारतांत तुकाबाई अगर व्यंकोजी यांच्या संबंधीं अवाक्षरहि नाहीं. परंतु तंजावरच्या शिलालेखांत ही माहिती अवश्य आली पाहिजे असें तेथील लेखकांस स्वाभाविकपणें वाटून त्यानें आपल्या मताप्रमाणें ही माहिती घुसडून दिली. या घुसडलेल्या माहितींत जीं चुकीचीं विधानें आहेत तीं शिलालेखकारानें जाणूनबुजून बनावट तयार केलीं कीं, दंतकथावरून ऐकलीं तशीं लिहिलीं हें समजण्यास आज मार्ग नाहीं. शिलालेख व शिवभारत या दोहींतील मजकूर आज आपणापुढें आला आहे व तो बारकाईनें तपासून पाहतां येतो; यामुळें शिलालेखकारानें आधारभूत ग्रंथांचीं यादी सांगितली नसली तरी शिवभारताचा आधार त्यानें घेतला हें आपण निश्चयानें म्हणूं शकतो. पण भारतांत नसलेला मजकुर शिलालेखांत आहे, त्याअर्थीं आणखी कांहीं तरी आधार शिलालेखकारास उपलब्ध होता यांत शंका नाहीं. ब्रह्मदेवापासून मालोजी पर्यंतची यादी देतांना त्यानें प्रारंभीं पुराणांचा उपयोग केला असला पाहिजे; आणि एक ठिकाणीं 'भारत, भागवत, हरिवंश, रामायण या ग्रंथांत विस्तार सांगितले' असें म्हटलेंहि आहे. पण शहाण्णव कुळीची व भोंसले कुळीची यादी देतांना पुराणानें काम भागणार नाहीं; त्यासाठीं

अवांतर याद्या, तोंडी माहिती व कल्पनाशक्ति, यांचा आश्रय शिलालेख-कारानें केला असला पाहिजे. त्याचप्रमाणें शिवाजी हा वयानें व्यंकोजी-पेक्षां मोठा असला तरी मानानें लहान याचें कारण तुकाबाईचें लग्न शहाजीशीं प्रथम झालें व नंतर जिजाबाईशीं झालें असें इ. स. १८०३ मध्यें कोरलेल्या या शिलालेखांत दोनचार ठिकाणीं आहे. पण ही माहिती त्यानें कोणत्या आधारावर सांगितली हें आपणांस माहीत नसल्यामुळें या चुकीची जबाबदारी आधारभूत कागदावर आहे कीं शिलालेखकाराच्या अडाणीपणावर आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. एवढें मात्र खरें कीं हा मजकूर शिवभारतांतला नसून तो शिलालेखांत जास्तीचा म्हणून घातला गेला आहे.

शिवभारत व तंजावरचा शिलालेख यांतील मजकूर बारकाईनें ताडून पाहिला असतां काय दिसून येतें याचा खुलासा येथवर केला. त्यावरून पुढील प्रमेयें दिसून येतात—

( १ ) शिलालेखकार आपल्या आधारभूत ग्रंथांचा नामनिर्देश करीत नाहीं. पण त्यानें शिवभारताचा उपयोग केला आहे.

( २ ) शिवभारतांतला मजकूर सारांशरूपानें घेतांना त्याच्या हातून ( अ ) भूगोलिक, ( आ ) ऐतिहासिक व ( इ ) व्युत्पत्तिविषयक अज्ञाना-मुळें शिलालेखांत कांहीं चुकीचीं विधानें पडलीं आहेत.

( ३ ) शिवभारताखेरीज अन्य आधारावर किंवा दंतकथांवर विश्वसून शिलालेखांत समाविष्ट केला गेलेला मजकूर विश्वसनीय आहे कीं अविश्व-सनीय आहे हें प्रत्यंतर पुराव्यावाचून निश्चितपणें सांगतां येत नाहीं.

शिवकालीन 'शिवभारता'ची विकृती इ. इ. १८०३ मधल्या शिलाले-खकाराच्या हातून कशा रीतीनें झाली याचें विवेचन येथवर केलें. त्यावरून समकालीन आधार पुढें असला तरी त्याची शास्त्रज्ञ लेखकाशी गांठ पडल्यावा-चून इतिहास निष्पत्ति होणें किती मुष्किलीचें आहे हें ध्यानांत येईल. सध्या आपणापुढें शिवचरित्रविषयक बखरी आणि ग्रँडफ, प्रो. रॉलिन्सन, मि. किंकेड, रा. केळुसकर व प्रो. सरकार यांचे ग्रंथ आहेत. पण अद्याप शिवचरित्रांतील रहस्य आपल्या हातीं लागलें नाहीं ही गोष्ट सर्वमान्य आहे. याचें कारण देखील वर सांगितलेल्या कपिलाषष्ठीच्या योगांत आढळून येणार आहे. हा योग जुळून येणें किती कठीण आहे याचें स्पष्टीकरण

कांहीं उदाहरणानेंच सांगणें बोधपर असल्यामुळें त्याच पद्धतीचें अवलं-बन करूं.

(२) सभासदाच्या बखरीची भूमिका—सभासदी बखरीची भूमिका अशी आहे:—

श्रीमंत महाराज राजश्री राजारामसाहेब छत्रपती साहेबांचे सेवेशी.

विनंति सेवक कृष्णाजी अनंत सभासद कृतानेक विज्ञापना ऐसीजे. साहेबी मेहेरबानी करून सेवकास पुसिलें कीं "आपले पिते थोरले राजे [=शिवाजीमहाराज ] याणी इतका पराक्रम केला व चार पातशाहीशी दावा लाविला. ऐसा पराक्रम केला. ऐसें असतां औरंगजेब येऊन किल्लो-किल्लीं अनर्थ मांडिला. याचा अर्थ काय ? तुम्ही पुरातन राज्यांतील माहीत-[ गार ] लोक आहां तरि इस्तकबिलपासून चरित्र लेहून देणें" म्हणोन आज्ञा केली. त्याजवरून वर्तमान ऐसीजे इत्यादि. बखर समाप्त करतांना "चैत्र शुद्ध प्रतिपदा ते दिवशीं वर्णन समाप्त जाहालें. ईश्वर संवत्सर मुक्काम चंदी शालिवाहन शके १६१६त जाहाली कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें ! हे विनंति" असे शब्द योजले आहेत. त्यांवरून ग्रंथाच्या रचनाकालाची कल्पना करतां येईल. पण मजकूर लिहितांना आधार कशाचा घेतला व ऐकीव माहिती किती जमेस धरली हें समजण्यास मार्ग नाहीं. पण समकालीन उपलब्ध कागदावरून "सभासदी बखरींत दिलेले प्रसंग कालानुक्रमानुसार नाहींत; व त्यांची मांडणी स्मरणावर हवाला ठेवून आठवेल तशा क्रमानें केलेली आहे" असें म्हणतां येतें. आणि या पद्धतीमुळें सभासदी बखरींत चुकीचीं स्थळें बरींच आहेत. उदाहरणार्थ पन्हाळा शिवाजीमहाराजांनीं दोन वेळां घेतला; प्रथम शके १५८१ मध्यें व नंतर शके १५९४ मध्यें. पैकीं पहिल्या प्रसंगानंतर म्हणजे १५८२ मध्यें शिद्दी जोहाराचा वेढा पडला. परंतु सभासदानें ही हकीकत शके १५९४ मध्यें म्हणजे महाराज आग्र्याहून सुटून आल्यानंतर मोंगलांशीं युद्ध सुरू झालें त्या सुमारास दिली आहे. त्याचप्रमाणें शहाजीचा खरा मृत्युशक सभासदास माहीत नसल्यामुळें त्यानें शिवाजीमहाराजांच्या तोंडीं "मिरजा राजियाची भेट घेऊन दिल्लीस गेलों. पादशहाची भेट घेऊन मागती

आपल्या राज्यास आलों. मागती कित्येक गड घेतले व शहरें पाहिलीं आणि पागा शिलेदार चाळीस हजार केले. असें पराक्रमाचें वर्तमान ऐकून महाराज [ =शहाजी ] संतुष्ट जाले. समाधानपत्रें आपणांस वरचे-वर येत होतीं. तैशींच अलंकारवस्त्रें पाठवीत होते. त्या उपरि त्यांमागें आपणास कोणी आतां वडील नाहीं " अशीं वाक्यें घातलीं. याचें कारण सुरतेची लूट (शके १५८९ मध्यें व शके १५९२ मध्यें अशी) दोन वेळां झाली. पैकीं पहिल्या लुटीच्या सुमारास शहाजीचा मृत्यु घडला. तो सभासदानें दुसऱ्या लुटीच्या सुमारास धरला आहे. केवळ स्मरणावर हवाला देऊन हकीकत तयार करतांना एकाच जातीचे दोन प्रसंग निरनिराळ्या वेळीं घडले असले म्हणजे पहिल्या प्रसंगाशीं संबद्ध असलेल्या गोष्टी दुसऱ्या प्रसंगाच्या वेळीं घडल्या असाव्या असें वाटणें स्वाभाविक असतें. आणि हा दोष टाळण्यासाठींच प्रत्यंतर पुरावा पाहून नंतर दोन प्रसंगांचें पौर्वा-पर्य ठरविणें इष्ट असतें. तथापि सभासदी बखर महाराजांच्या मृत्युनंतर १५।२० वर्षांच्या आंत लिहिली गेल्यामुळें तिच्यांत पौर्वापर्याचा विपर्यास झाला असला तरी तो विशिष्ट प्रसंगापुरताच आहे व दंतकथांचा सुळसुळाट तर पुष्कळच कमी आहे. चित्रगुप्तानें सभासदाच्या बखरीचा आपण उपयोग केला असें स्पष्टच सांगितलें आहे. व सभासदापेक्षां जास्तीचा मजकूर केवळ स्पष्टीकरणार्थ असल्यामुळें शब्दावडंबरापेक्षां शिवचरित्रविषयक जास्त माहिती यांत मिळत नाहीं. मात्र ' आधारभूत ग्रंथांचा नामनिर्देश बखरकार मुळींच करीत नाहींत' या विधानास चित्रगुप्ताचा अपवाद सांगतां येण्याजोगा आहे.

३. **चिटणिशी बखर**—चित्रगुप्तानंतर एक्याणव कलमी, रायरी, तरीख-इ- शिवाजी वगैरे बखरी लिहिल्या गेल्या. पण त्या फार अव्यवस्थित आहेत. त्यांपेक्षां चिटणीसांची बखर बरीच व्यवस्थित अशी आहे. ही राज्याभिषेक शके १३७ म्हणजे शके १७३२च्या सुमारास लिहिली गेली व ती लिहितांना "शास्त्राधार विष्णुपुराणादि पुराणांतील दंडनीति, राजधर्म, राजमयूख व रमलशास्त्र व कारकीर्दी वडिलार्जित होत्या, दिनचर्या, परा-क्रमकथा [ही होत्या,] त्यांचे आश्रयेकरून लेहून निवेदन केलें " (पृ.२) असा आधारग्रंथनिर्देश चिटणीसांनीं केला आहे. पैकीं पुराणांच्या आधारें चिटणीसांनीं जो मजकूर लिहिला असेल त्याची चिकित्सा करण्याचें हें स्थळ

नव्हे. 'वडिलार्जित कारकीर्द, दिनचर्या व पराक्रमकथा,' ज्या त्यांच्याजवळ होत्या त्यांच्या आश्रयानें त्यांनीं दिलेला मजकूर कितपत विश्वसनीय उतरला आहे याचें आपणांस परीक्षण करावयाचें आहे. परीक्षणासाठीं छापील प्रतींतील २६ ते ३७ अ पर्यंतच्या कलमांतील (पृ. २१-३२) भाग घेऊं. या भागांत शहाजीच्या लग्नानंतर शके १५४१ मध्यें त्याला वजीरी मिळाल्यापासून शके १५५५ पर्यंतच्या १४।१५ वर्षांची हकीकत आहे. तिचा सारांश असाः—

१. निजामशाही गादीचा मालक वारला तेव्हां त्याचीं मुलें लहान होतीं. अशा वेळीं बेगमेनें शहाजीस वजिरी दिली.

२. यामुळें मलिकंबर व जाधवराव यांना शहाजीचा मत्सर वाटूं लागला.

३. जाधवरावांनीं मोंगलांची मदत आणविली.

४. मोंगलांच्या फौजेनें चाल केली तेव्हां शहाजीनें माहुलीच्या किल्ल्यांत राहून सहा महिने युद्ध केलें.

५. नंतर विजापूरकराकडे जाण्याचें ठरवून व जिजाबाईस शिवनेरीस ठेऊन शहाजी विजापुराकडे शके १५४८ मध्यें गेला; व कर्नाटकाच्या स्वारींत सामील झाला.

६. शिवजन्म शके १५४९ मध्यें शिवनेरीस झाला.

७. दिल्लीकरातर्फे निजामशाहावर दुसरी स्वारी आली तिचा पराभव मलिकंबरानें केला.

८. मलिकंबर बलिष्ठ झालेला पाहून विजापूरकरांनीं त्याच्यावर स्वारी केली. पण मलिकानें भातवडीच्या तलावावर विजापूरकरांचा पराभव केला.

९. शहाजीवाचून मलिकंबराचा पराभव होत नाहीं असें पाहून त्याला दक्षिणेंतून बोलाऊन मलिकाशीं लढण्यास पाठविलें.

१०. तेव्हां मलीकानें पुणें जाळलें; पण म्हसवडच्या लढाईत त्याचा मोड होऊन तो भीमा उतरून गेला. विजापूरचें सैन्य नदी उतरूं शकलें नाहीं.

११. शके १५५५ च्या भाद्रपदांत मुरारपंतानें तुळा केली; आणि नंतर तो व शहाजी विजापुरास परत आले.

ही चिटणीसांची हकीकत गोष्ट या दृष्टीनें संगतवार आहे. पण ऐतिहासिक प्रसंग या दृष्टीनें ती अशक्य कोटींतली आहे. याचें कारण चिटणीसांच्या वर दिलेल्या विधानांत कालाच्या पौर्वापर्याचा विपर्यास अतोनात आहे व त्यांची माहिती अपुरी आहे. उपलब्ध विश्वसनीय माहितीच्या आधारें वर दिलेल्या ११ विधानाबद्दल असें म्हणतां येतें.

१. निजामशाही गादीवर लहानमुलें येऊन शहाजी वजीर बनण्याचा काळ शके १५५४ नंतरचा आहे. त्यावेळीं मलिकंबर व जाधवराव हे दोघेहि हयात नव्हते.

२. मलिकंबर व शहाजी यांचें वितुष्ट शके १५४७ मध्यें आलें व शहाजी विजापुराकडे गेला. जाधवराव व शहाजी यांचें वितुष्ट शके १५४३ च्या सुमारास येऊन जाधवराव मोंगलांच्या आश्रयास गेला; तो ७।८ वर्षांनीं निजामशाहींत परत आला.

३. जाधवराव मोगलांसह येऊन शहाजीशीं लढला तो शके १५४६ मध्यें, चिटणीस समजतात त्याप्रमाणें माहुलीच्या वेढ्यांत नव्हे.

४. माहुलीच्या वेढ्याचा प्रसंग शके १५५७।५८ मधला आहे. चिटणीसांनीं तो १५४८ मध्यें मानला आहे.

५. शहाजी शके १५४७ मध्यें विजापूरकरांच्या नोकरींत गेला; तेव्हां शिवनेरी वगैरे भाग त्याच्या ताब्यांत नव्हता. अर्थात् त्याला जिजाबाईस तेथें ठेवणें शक्य नव्हतें. जाधवराव तर मोंगलांकडे होता यामुळें त्याचाहि संबंध या वेळीं शिवनेरीस नव्हता. शहाजी विजापूरकराकडे ३ वर्षें राहून शके १५५० च्या सुमारास निजामशाहींत परत आला व नंतर संभाजीच्या लग्नासाठीं जिजाबाईसुद्धां शिवनेरीस गेला.

६. शहाजी १५४८ शकांत विजापूरकरांच्या नोकरींत गेला. तेव्हांपासून तो अखेरपर्यंत त्याच दरबाराकडे राहिला अशी चिटणीसांची समजूत असल्यामुळें याच सुमारास शहाजी व जिजाबाई यांची ताटातूट करून शिवजन्म शके १५४८ अगर १५४९ मानणें बखरकारांना व चिटणीसांना अवश्य वाटलें. पण शहाजी पुनः निजामशाहीच्या नोकरींत गेला व त्यावेळीं त्याला शके १५५१ मध्यें शिवनेरीस जातां आलें हें चिटणीसांना माहीत नव्हतें.

७. दिल्लीकरांचा मलिकंबरानें पराभव केला तो प्रथम श.१५४६ मध्यें आणि नंतर श. १५३७ मध्यें बुऱ्हाणपूर येथें दुसऱ्यांदा केला. त्यानंतर शके १५४८ मध्यें मलिकंबर मेला. चिटणीसांनीं दिल्लीकरांचा पराभव श. १५४९ नंतर मानला आहे ही त्यांची चूक आहे.

८. भातवडीच्या युद्धांत मलिकानें विजापूरकरांचा पराभव केला हें चिटणीसांना माहीत आहे. पण ही लढाई श. १५४६ च्या सुमारास झाली हें त्यांना माहीत नाहीं. त्याचप्रमाणें या युद्धाच्या वेळीं शहाजी दक्षिणेंत होता असें चिटणीस मानतात ती त्यांची चूक आहे.

९. शहाजी व मलिक यांचें वैमनस्य १५४७–४८ पर्यंत होतें. चिटणीसांनीं त्याचा अवधि श. १५५३ च्या जवळ आणला आहे. पण त्या वेळीं मलिक हयात नव्हता.

१०. पुणें मलिकानें जाळलें नाहीं; तें मुरारजगदेवानें जाळलें. चिटणीसांचा समज या बाबतींत अगदीं चुकीचा आहे.

११. तुळा श. १५५१ मध्यें झाली हें खरें. पण पुढें तीन वर्षांनंतर शहाजी विजापूरकरांच्या नोकरींत गेला.

अर्धवट माहितीच्या जोरावर सर्व हकीकत संगतवार रीतीनें सजवून सांगण्याच्या इच्छेनें चिटणीसांच्या हकीकतींत काय दोष राहिले याचें विवेचन केलें. आतां प्रसंगांचा कालानुक्रम लक्षांत ठेऊन शहाजीचें या वेळचें चरित्र सांगतां येतें तें असें:—

शहाजी व जाधवराव यांचें वितुष्ट वाढून जाधवराव मोगलांकडे शके १५४३ मध्यें गेला. त्यानंतर दिल्लीकर व विजापुरकर यांनीं मलिकंबराविरुद्ध एक होऊन निजामशाहीवर चाल केली. या संयुक्त सैन्याचा पराभव मलिकंबर व शहाजी यांनीं भातवडीच्या युद्धांत शके १५४६ मध्यें केला. त्यानंतर मलिक व शहाजी यांचें वैमनस्य वाढून शके १५४७ मध्यें शहाजी विजापूरकरांच्या आश्रयास गेला. मलिकानें विजापूरकरावर चाल केली त्यावेळीं शहाजी मलिकंबराविरुद्ध लढला. पुढें विजापूरचा इब्राहिम आदिलशहा, व निजामशाहीचा मलिकंबर हे दोघेहि मरण पावले. त्यानंतर शहाजहानानें निजामशाहीवर सैन्य पाठविलें. तेव्हां शहाजी विजापुराहून व जाधवराव मोगलाईंतून निघून निजामशाहीकडे आले. पैकीं जाधवराव निजामशहाकडून मारला गेला आणि शहाजी संभाजीच्या

लग्नासाठीं शके १५५१ अखेर शिवनेरीस गेला. तेथून दर्याखानाच्या स्वारीवर जावयाचें असल्यामुळें शहाजीनें जिजाबाईस शिवनेरीस बाळंतपणास ठेवलें. तेथें शिवजन्म शके १५५१ फाल्गुन व. ३ रोजीं झाला. या सुमारास शहाजीनें कांहीं दिवस मोगलांची नोकरी केली. ती पुढें सोडून तो विजापूरकरांच्या सैन्याशीं सहकार्य करून मोगलांशीं लढत होता. शेवटीं मोगलांनीं निजामशाही बुडविली; व त्यांचें सैन्य परत गेलें. तेव्हां विजापूरकरांचा सलोखा संपादन करून शहाजीनें पेमगिरी येथें पुनः निजामशाही उभारली. त्या सुमारास विजापूरकरांतर्फे १५५५ शकांत मुरारजगदेव भीमातीरीं होता. हा प्रकार पाहून मोंगलांनीं पुनः दक्षिणेंत सैन्य आणून विजापूरकरांची व शहाजीची जूट फोडली. तरीहि शहाजीनें माहुली किल्ल्याच्या आश्रयानें मोंगली व आदिलशाही सैन्याशीं कांहीं काळ तोंड दिलें. आणि शेवटीं श. १५५७–५८ मध्यें मोंगलांशीं तह करून शहाजी विजापूरकरांच्या नोकरींत गेला.

सारांश ( १ ) शिवजन्म शिवनेरीस झाला; आणि ( २ ) शिवनेरीस जिजाबाईस पोंचविण्यांत आलें तेव्हां ती आसन्नप्रसवा होती; या दोन गोष्टी बखरकारांना निश्चितपणें माहीत होत्या. परंतु मलिकंबराची हयात कोठपर्यंत भातवडीची लढाई कोणकोणांत केव्हां झाली, जाधवरावाचें शहाजीशीं वितुष्ट केव्हां आलें, शहाजीच्या ताब्यांत शिवनेर वगैरे प्रांत कधीं आले व माहुलीच्या वेढ्याचा वृत्तांत काय याची चिटणीसांची माहिती कालदृष्ट्या व तपशीलदृष्ट्या फारच चुकीची होती. याचें कारण कागदोपत्रीं मिळालेल्या थोड्याशा माहितीवर त्यांना तर्काच्या आश्रयानें सर्व हकीकत तयार करावी लागली हें आहे. सारांश 'आपण कोणत्या आधारांवर विश्वसून लिहितों' याचा नामनिर्देश बखरकार करीत नाहींत. व शिवकालीन परिस्थितीची थोडीशी विश्वसनीय माहिती त्यांना मिळाली म्हणजे तिची विस्तृत व सांगोपांग हकीकत बनविण्यासाठीं ते पुष्कळसा तर्काचा आश्रय करतात व त्या वेळीं कालविपर्यासाचा दोष त्यांच्या हातून हटकून घडतो. यामुळें कै. राजवाडे यांनीं म्हटल्याप्रमाणें—" अमूक एका बखरींतील मजकूर खरा आहे असेंहि निश्चयानें सांगतां येत नाहीं व खोटा आहे असेंहि बिनधोक ह्मणतां येत नाहीं. सारांश या बखरींच्या आधारांवर

निश्चयात्मक असें विधान कांहींच करतां येत नाहीं. प्रत्येक गोष्टीविषयीं संदेहवृत्तीचाच परिपाक विशेष होतो व आजपर्यंत जे शिवाजीचे वृत्तांत आपण वाचलेले आहेत ते फक्त कल्पित कथांच्यापेक्षां जास्त विश्वसनीय आहेत हें पाहून इतर अस्सल पुराव्याची व रचनेची अपेक्षा उत्पन्न होते."

(४) ग्रँडफची भूमिका— बखरीनंतर स्कॉटवेअरिंगनें (इ. स. १८१०) व ग्रँडफनें (इ. स. १८२६) मराठ्यांचा इतिहास लिहिला. वेअरिंगनें ऑर्मच्या टिपणांचा उपयोग केला व रायरीच्या बखरीवर मुख्य भिस्त ठेवली. पण डफनें ( १ ) सभासदी ( २ ) चिटणीशी व ( ३ ) मोऱ्यांची या बखरी; ( ४ ) टामस् कोट्सकृत भाषांतरित बखर; ( ५ ) बॅरी क्लोज यानें भाषांतर केलेली बखर; ( ६ ) कोल्हार येथील कुलकर्ण्यांजवळची बखर आणि ( ७ ) खटावच्या देशपांड्यांनीं लिहिलेला मराठ्यांचा इतिहास हे सात मराठी ग्रंथ पाहिले होते. पैकीं Mulhar Ram Rao's Life of Sivajee is very voluminous; but I do not think he has made a good use of the valuable letters and records in his possession असा अभिप्राय त्यानें चिटणीशी बखरीबद्दल दिलेला आहे. चिटणीसाच्याजवळ थोडे बहुत अस्सल कागदपत्र होते व कांहीं पत्रें तर बाळाजी आवजीच्या हातचीं होतीं; पण त्यांना या पत्रांचा शिव-चरित्रांत चांगला उपयोग करतां आला नाहीं अशी डफनें तक्रार केली आहे. इतर बखरींच्या योग्यतेबद्दल त्यानें कांहींच अभिप्राय दिलेला नाहीं-आणि आधारांचा नामनिर्देश करतांना मोघम ( Mahratta Mss ) 'मराठी हस्तलिखितें ' असा केला आहे. यामुळें कोणता प्रसंग कोणत्या बखरीच्या आधारें लिहिला हें ग्रँडफच्या ग्रंथांत एकदम स्पष्टपणें समजत नाहीं. पण डफच्या ग्रंथाचा कांहीं भाग चिटणीशी व सभासदी बखरींशीं ताडून पाहिला असतां असें दिसतें कीं त्यानें बखरींत सरसनीरस हा भेदभाव न करतां आणि त्यांतील प्रसंगांपैकीं विश्वसनीय कोणते व काल्पनिक कोणते हें न पाहतां सर्व बखरींतील माहिती एकत्र मिळवून त्यानें त्यांची एक साखळी बनविली आहे. पण या साखळींतला दुवा पौर्वापर्याच्या दृष्टीनें चुकेल किंवा काय ही शंका त्याच्या मनास शिवलेली दिसत नाहीं. मात्र जेथें मुसलमानी हकीकत देण्याचा प्रसंग असेल तेथें त्यानें मुख्य भर फेरिस्ता

व त्यानंतर खाफीखान यांच्या ग्रंथावर व विजापुरास मिळालेल्या फारशी हस्तलिखितांवर दिला आहे. शहाजी व मलिकंबर यांची हकीकत सांगतांना बखरकारांचें लिहिणें अजीबाद बाजूस ठेवून विजापूरचे मुसलमानी इतिहास व खाफीखान यांची हकीकतच तेवढी त्यानें स्वीकारली. यामुळें शके १५५८ पर्यंतची शहाजीची डफची हकीकत बखरकारापेक्षां कांहींशी विश्वसनीय अशी झालेली आहे. तथापि शहाजीच्या बालपणाची हकीकत सांगतांना त्यानें रंगपंचमीच्या खेळाची वगैरे माहिती निवळ बखरींच्या आधारें दिली आहे. याचें कारण उघडच आहे. मुसलमानी इतिहासांतून मराठ्यांच्या संबंधीं इतकी तपशीलवार माहिती आढळणें शक्यच नाहीं, आणि शहाजीची बालपणाची माहिती तर सांगितली पाहिजे; अशा पेचांत सापडल्यामुळें बखरींचा आश्रय करून त्यानें वेळ मारून नेली. खरें पाहतां ही पद्धति शास्त्रशुद्ध आहे असें म्हणतां येणार नाहीं. मुसलमानी हकीकती ताडून पाहण्यास प्रत्यंतर पुरावा सांपडला तेथें बखरीतील लिहिणें अविश्वसनीय म्हणून बाजूस टाकणें जर डफला भाग पडलें तर त्याच्याहि पूर्वींची हकीकत देतांना बखरींची हकीकत सर्वस्वी ग्राह्य धरणें योग्य नव्हतें. त्यासंबंधीं जास्त चौकशी करून प्रत्यंतर पुराव्यानें ज्या गोष्टी शाबीद ठरतील तेवढ्याच नमूद करणें अवश्यक होतें. तसें न करतां डफनें सरस आधार मिळाल्यास तिचा आश्रय करावा, नाहींतर मिळेल ती हकीकत देऊन प्रसंग साजरा करावा असें धोरण पत्करलें आहे. यामुळें त्यानें लिहिलेल्या शिवचरित्रविषयक मजकुरांत पक्क्या आधारावर लिहिलेला भाग कोणता व संशयित आधारावर कोणता याचा उलगडा वाचकांना करतां येत नाहीं. आधारांची विश्वसनीयता अगर अविश्वसनीयता यासंबंधीचा विवेक डफच्या मनांत चांगलासा होता किंवा नाहीं याची शंका वाटते. एरव्हीं मनांतली शंका कोठें तरी व्यक्त केल्यावांचून तो राहिला नसता. मात्र समकालीन इंग्रजी पत्रें मिळालीं तीं त्यानें जमेस धरलीं आहेत त्या अर्थी त्यांचें महत्व त्याला मान्य होतें यांत शंका नाहीं. पण समकालीन विश्वसनीय सामुग्री, मुसलमानी माहिती व बखरी यांतील मजकुराची सापेक्ष ग्राह्याग्राह्यता काय याचा यथार्थ निर्णय त्यानें केला नव्हता; व प्रत्येक विधानास आधार असला म्हणजे झालें, मग तो आधार कसा कां असेना, अशी पद्धति त्यानें स्वीकारली. यामुळें त्याचा इतिहास बहुतेक ठिकाणीं साधार

असूनहि तो विश्वसनीय आहे असें म्हणतां येत नाहीं. कांहीं ठिकाणीं तो विश्वसनीय आहे व कांहीं ठिकाणीं नाहीं. जेथें त्यानें समकालीन आधारांवर विश्वसून विधानें केलीं आहेत तेथें त्याचें लिहिणें शोधाअंतीं विश्वसनीय ठरत आहे. व जेथें बखरींच्या आधारांवर विधानें केलीं आहेत तेथें त्याचीं विधानें चुकीचीं ठरत आहेत. सारांश विश्वसनीय आधारांचाच तेवढा उपयोग करण्याची खबरदारी न घेतल्यामुळें डफच्या इतिहासांतील पुष्कळ स्थळांस बखरींचीच योग्यता आलेली आहे.

**(५) राजवाडे यांची भूमिका**— कै. राजवाडे यांनीं डफचा ग्रंथ व बखरी यांचें विस्तृत परीक्षण करून विश्वसनीय शिवचरित्र लिहावयाचें असल्यास समकालीन कागदपत्र जमविण्याचें कंटाळवाणें काम प्रथम केलें पाहिजे असा सिद्धांत मांडला व त्यास अनुसरून २५।३० वर्षे संशोधनाचें काम करण्यांत आयुष्य घालविलें हें सर्वश्रुतच आहे. या त्यांच्या कामगिरीनें शिवचरित्रविषयक कांहीं प्रसंगांना ऐतिहासिक प्रामाण्य आलें आहे. हें प्रामाण्य कसें पारखावें या संबंधीं त्यांनीं तीस वर्षांपूर्वी आपलीं मतें स्पष्ट-पणें नमूद केलीं आहेत. त्यांवरून त्यांची भूमिका सहज कळण्याजोगी असल्यामुळें त्यांचेच शब्द येथें उतरून घेणें योग्य आहे. "ऐतिहासिक प्रमाण व अप्रमाण यासंबंधीं माझीं मतें काय आहेत तें स्पष्ट सांगितल्यास पुष्कळ उलगडा होईल असें वाटतें. (१) समकालीन व्यक्तींनीं सम-कालीन प्रसंग साक्षात घडत असतांना परमार्थानें लिहिलेलें अगर लिह-विलेलें अस्सल पत्र किंवा त्याची नक्कल सर्वांशीं जातीनें प्रमाण होय. (२) समकालीन व्यक्तींनीं आपल्या हयातींतील गतकालीन प्रसंगांसंबंधीं लिहिलेले लेख किंवा उल्लेख पहिल्या वर्गांतील प्रमाणांच्या प्रातिकूल्याच्या अभावीं जातीनें प्रमाण होत. (३) विषमकालीन व्यक्तींनीं गतकालासंबंधीं लिहिलेले लेख (अ) पंचायतीपुढें प्रामाणिक साक्षीच्या रूपानें दिले जात असल्यास आणि (ब) बखरी म्हणून योग्य आधारानें लिहिले असल्यास, केवळ स्मृतीवर भरंवसा ठेवून लिहिलेले नसल्यास व आपल्या कामाचें योग्य शिक्षण मिळून लिहिलेले असल्यास जातीनें प्रमाण सम-जावे. ह्या तीन प्रकारच्या लेखांखेरीज करून बाकी सर्व लेख कमजास्त प्रमाणानें अविश्वसनीय होत. प्रस्तुत ज्यांची परीक्षा चालली आहे त्या

बखरी ह्या तिन्ही वर्गांतील कोणत्याही एका वर्गांत अंतर्भूत होत नाहींत. सभासदी बखर केवळ स्मृतीवर हवाला ठेऊन लिहिलेली आहे. मल्हार-रामरावानें जुन्या टिपणांचा व अस्सल पत्रांचा उपयोग केला आहे; परंतु त्याला योग्य शिक्षण मिळालें नसल्यामुळें त्याची बखर प्रमाणभूत समजणें योग्य नाहीं. शिवदिग्विजयांत जुन्या टिपणांचा व पत्रांचा उपयोग केलेला दिसतो व मल्हार रामरावाच्या बखरीपेक्षां ऐकीव लेखी अशी जुनी माहिती तींत बरीच सांपडते; परंतु कर्त्याला योग्य शिक्षण न मिळाल्यामुळें तिचें प्रामाण्य मल्हार रामरावाच्या बखरीहून जास्त धरतां येत नाहीं. येणें प्रमाणें ह्या तिन्ही बखरींचें प्रामाण्य अव्वल प्रतीचें नाहीं, म्हणजे ह्या बखरी जातीनें प्रमाण नाहींत हें उघड आहे" ( खंड ४ प्रस्ता. पृ. ४९।५० )

अशा स्थितींत कै. राजवाडे यानीं बखरी तपासण्यास तोड सुचविली आहे ती अशी. " बखरींतील मजकुराचा खरेखोटेपणा ठरवावयाचा तरी कसा असा प्रश्न साहजिकच उभा राहतो; ह्या प्रश्नाला उत्तर असें आहे कीं मराठी, पारशी, कानडी, इंग्रजी व पोर्तुगीज अस्सल पत्रें, त्या कालीं लिहिलेलीं अशीं, जर सांपडलीं तरच बखरींतील मजकुराचा खरेखोटेपणा ठरवितां येईल. अन्यथा हें काम मनाजोगतें व निश्चयात्मक होणार नाहीं." ( खंड ४ प्रस्ता. पृ. ५१. )

(६) **प्रो. सरकार यांची भूमिका.**—प्रो. सरकार यांनीं शिवचरित्र लिहिण्यास घेतलें तेव्हां बखरी व डफचा इतिहास हीं सदोष आहेत ही गोष्ट सर्वमान्य होती; व बरीच शिवसमकालीन सामग्री प्रकाशित झालेली होती. ती जमेस धरून शिवचरित्र लिहिणें प्रो. सरकार यांना भाग होतें. त्यांनीं ग्रंथाच्या आरंभीं असें सांगून ठेवलें आहे कीं—

१. उत्तरकालीन ग्रंथांपेक्षां समकालीन लेखांना सर्वत्र मान्यता दिली आहे.

२. फारशी, इंग्रजी, मराठी व हिंदी या भाषांतील व डच भाषेंतील छापील व हस्तलिखित अशा उपलब्ध सामग्रीचा संपूर्ण व सूक्ष्म रीतीनें उपयोग केला आहे. ( Exhaustive and minute use of the available sources )

३. डफनें फक्त खाफीखानाच्याच ग्रंथाचा उपयोग केला. पण मी (प्रो. सरकार यांनीं) शहाजहान, औरंगजेब, महमद व अली आदिलशाहा आणि जैसिंग यांचीं अस्सल पत्रें उपयोगांत आणिलीं. तीं डफला माहीत नव्हतीं.

४. डफचा मुख्य आधार म्हणजे चिटणिशी बखर; पण ती 'अचिकित्सक आणि पुष्कळ ठिकाणीं मुद्दाम खोटी अशी आहे (uncritical and often deliberately false) याकरितां मी सभासदाची बखर अधिक ग्राह्य मानली आहे.

५. गेल्या ४० वर्षांत पुणें व सातारा येथील आस्थेवाईक हिंदी संशोधकांनीं मराठींत प्रकाशित केलेल्या सामुग्रींत जो महत्त्वाचा व संशयातीत भाग होता तो सर्व जमेस धरला आहे.

६. इंग्रजी व डच फॅक्टरी रेकॉर्डस् मधील पत्रांतील उपयुक्त माहिती बारकाईनें तपासून घेतली आहे.

७. शिवचरित्रासंबंधीं दंतकथांचा सुळसुळाट आहे व बनावट कागदहि तयार होत आहेत. तेव्हां ऐतिहासिक सत्यसाधनार्थ शिवचरित्रविषयक प्रत्येक बारीक सारीक गोष्टदेखील निश्चित असेल तेथें मी ती जमेस धरली आहे व इतरांच्या संभाव्यासंभाव्यतेची चर्चा केली आहे.

या गोष्टी प्रस्तावनेंत सांगून प्रो. सरकार ग्रंथाच्या शेवटीं असें बजाऊन सांगतात कीं "शिवाजी व संभाजी यांच्यावेळचे समकालीन कागद इंग्रजी व फारशी भाषेंत आहेत. मराठींत मुळींच नाहींत" (None at all in Marathi p. 446). अशा परिस्थितींत मराठी सामग्रीवर विश्वसणें देशाभिमानाचें द्योतक असेल. पण ती सामुग्री म्हणजे खरा इतिहास नव्हे.

८. राजवाडे खंड ८ व १५-२२ यांत कांहीं राजकारणी पत्रें व पुष्कळशी खासगी पत्रें आहेत. त्यांत कांहीं बनावट कागद आहेत. या खंडांतील पत्रांच्या खरेपणाबद्दल खात्री झाल्यास शिवाजीच्या राज्याची वाढ कसकशी होत गेली हें बारकाईनें ठरवितां येईल; व तारखाहि निश्चित करतां येतील.

यावरून प्रो. सरकार यांच्या म्हणण्याचें तात्पर्य असें निघतें कीं राजवाडे यांच्या खंडांतला मजकूर अनेक कारणांमुळें जमेस धरतां आला

नाहीं व बखरी तर जाणून बुजून उत्तरकालीन व अविश्वसनीय; यामुळें समकालीन सामुग्री काय ती फारशींत व इंग्रजींत राहिली आहे; तेव्हां ती जमेस धरून हें चरित्र लिहिलें आहे. अर्थात फारशी व इंग्रजी साधनांवर विश्वसून शिवचरित्र लिहिल्यामुळें प्रो. सरकार यांना खाफीखान व ग्रँडफ यांचा आधुनिक अवतार ह्मणणें न्यायाचें आहे. प्रस्तुत आपणांस शिवभारतांतर्गत प्रसंगांचा म्हणजे शके १५८३ पर्यंतचाच विचार करावयाचा आहे. तेव्हां त्या दृष्टीनें प्रो. सरकार यांच्या शिवचरित्राची योग्यता बखरीहून फारशी अधिक नाहीं हें अनेक उदाहरणें देऊन सिद्ध करतां येण्याजोगें आहे. खरें पाहतां ( १ ) या कालावधीचें शिवचरित्र लिहिण्यास समकालीन अशी माहिती मिळत नाहीं व ( २ ) मराठी बखरी विश्वसनीय व समकालीन नाहींत; या दोन गोष्टी त्यांना पटल्या होत्या; तर ज्या Honest history चे ते भोक्ते आहेत तिच्या प्रीत्यर्थ त्यांनीं या काळचा इतिहास लिहिण्याची वेळ अद्याप आली नाहीं, आणखी संशोधन व्हावयास पाहिजे अशी कबूली द्यावयास पाहिजे होती. पण तसें न करतां ज्या चिटणीशी बखरीस त्यानींच Deliberately false म्हटलें आहे तिचाच मुख्य आधार घेऊन त्यानीं कित्येक प्रसंग सजविले आहेत. आणि त्या भरांत मराठींतील समकालीन सामग्री तर राहोच पण ग्रँडफनें ज्या गोष्टी निश्चित केल्या होत्या त्याकडेहि दुर्लक्ष करून बखरकारांची तरफदारी प्रो. सरकार यानीं केली आहे. उदाहरणार्थ शहाजीची कैदेतून सुटका होण्यास रणदुल्लाखानाचें वजन व भीड उपयोगी पडली असें चिटणीस ह्मणतात. पण रणदुल्लाचा मुलगा रणदुल्ला नांवाचाच होता व बडा रणदुल्लाखान या वेळीं हयात नव्हता वगैरे माहिती डफनें टीपेंत सांगितली आहे; व रणदुल्लाच्या थडग्यावरील शिलालेख भा. इ. सं. मंडळानें प्रसिद्ध केला आहे. त्यावरून बडा रणदुल्ला शके १५७१ मध्यें जीवंत नव्हता यांत शंका रहात नाहीं. पण प्रो. सरकार यानीं या प्रसंगापुरतें चिटणीसांना Deliberately false या सदरांतून काढून "The hereditary secretary and record keeper of Shivaji's descendants is right when he ascribes the release of Shahaji to the friendly mediation of Sharzakhan and bail of Randula Khan, two leading nobles of Bijapur" असें विधान केलें आहे. अर्थात हें ग्राह्य धरतां येण्याजोगें नाहीं हें सांगावयास नकोच.

चिटणीसापेक्षां सभासदाची बखर जास्त ग्राह्य धरण्याचें अभिवचन प्रो० सरकार यांनीं प्रस्तावनेंत दिले आहे. पण तें त्यांनीं पाळलेलें दिसत नाहीं. उदाहरणार्थ शहाजीनें बालशिवाजीची रवानगी विजापुराहून श. १५५९ मध्यें म्हणचे १० व्या वर्षीं पुण्याकडे केली असें चिटणीस लिहितात. पण सभासदानें शिवाजी महाराजांना बारावें वर्ष लागलें तेव्हां बेंगळुराहून रवाना केले असें स्पष्ट म्हटलें आहे; व " बारा वर्षेपर्यंत तुम्ही आपले जवळ ठेवावें पुढें न ठेवणें" असा दृष्टांत दिला आहे; त्याव-रून जन्मापासून बारा वर्षें शिवाजी बापाबरोबर होता असें ठरतें. परंतु प्रो. सरकार यांनीं सभासदी बखर बाजूस ठेऊन चिटणीस व दिग्विजय वगैरे ग्रंथ जास्त प्रमाणभूत मानले असें कंसांतील टीपेंत दाखविलें आहे(पृ. २१ ओळ ५ पहा ) आणि It is beyond dispute that Jijabai now lost her husband's love, probably with the loss of her youth असें त्यांनीं शुद्ध आपल्या कल्पनेच्या जोरावर विधान केलें आहे. वस्तुतः जिजाबाईचें तारुण्य संपलें म्हणून शहाजीनें तिला दूर केलें असें समजण्यास एकाहि बखरीचा आधार नाहीं. ही प्रो. सरकार यांची तर-कीब आहे त्याअर्थीं त्यांनीं या वाक्यापुढें बखरीच्या आधारांचें मिथ्या अवडंबर माजविलें आहे तो देखावा तरी त्यांनीं करावयास नको होता.

अस्सल व विश्वसनीय माहिती देणारे सर्व महत्त्वाचे व बारीक सारीक मुद्दे देखील जमेस धरले असें प्रो. सरकार म्हणतात; तेंहि विश्वसनीय नाहीं. उ. चतुर्थ संमेलन वृत्तांत महाराजांच्या पहिल्या कर्नाटकच्या स्वारीचा (श. १५८०) उल्लेख अस्सल पत्रांत दिलेला आहे. पण त्याची माहिती प्रो. सरकार यांनीं मुळींच दिलेली नाहीं.

सभासदी बखरींत कालाच्या पौर्वापर्याचा विपर्यास आहे व त्यांतील प्रसं-गांची मांडणी अस्सल पत्रांच्या आधारें केली पाहिजे हें उघड आहे. उदाहरणार्थ शृंगारपूरच्या सुर्व्यावर शके १५८३ मध्यें स्वारी झाली असल्याबद्दल शिवाजी महाराजांच्या नांवचें अस्सल पत्र प्रकाशित आहे. यासंबंधींचें समकालीन इंग्रजी पत्र देखील इ. स. १६६१ मधलें आहे. पण प्रो. सरकार यांनीं सभासदाची नक्कल करून शृंगारपुरावरची स्वारी इ. स. १६५६. ( श. १५७८ ) च्या पूर्वीं झाली असें सांगितलें व त्यांस अनुसरून मराठ्यांच्या ताब्यांतील स्वराज्याचें शब्दचित्र काढलें आहे ! अर्थात तें साफ चुकलें आहे.

अस्सल पत्रांतील माहितीपुढें बखरकारांच्या विधानाची मातब्बरी मुळींच नाहीं ही स्वतःसिद्ध गोष्ट आहे. पण बखरीपलीकडे प्रो. सरकार यांचे मराठी वाचन नसल्यामुळें अस्सल पत्रांतील मजकूर त्यांना जमेस धरतां आला नाहीं. उदाहरणार्थ सिंहगड घेतांता ( श. १५९२ मध्यें ) तानाजी पडलेला ऐकून महाराजांनीं कोंढाण्याचें नांव सिंहगड ठेवलें ही आख्यायिका प्रो. सरकार यांनीं इतिहास ह्मणून दिला आहे (He named it Singarh after the lion-heart that had won it. p. 189); पण खंड ८ ले. १२. हें पत्र खुद्द शिवाजीमहाराजांच्या नावें शके १५८५ मध्यें लिहिलेलें असून त्यांत सिंहगड हा शब्द चार वेळा आलेला आहे. त्याअर्थी कोंढाण्यास सिंहगड हें नांव श. १५९२ च्या पूर्वीं होतें हें उघड आहे.

प्रस्तुत आपणास प्रो. सरकार यांच्या ग्रंथाचें परीक्षण करावयाचें नसून त्यांची भूमिका काय व त्यांत त्यांनीं नमूद केलेल्या प्रतिज्ञा कितपत पार पडल्या आहेत याचें दिग्दर्शन करायाचें आहे. त्यावरून असें निष्पन्न होतें कीं अपुऱ्या माहितीवरून व मराठी भाषेचें सूक्ष्मज्ञान नसतां प्रो. सरकार यांनीं संपूर्ण शिवचरित्र लिहिण्याचा प्रयत्न केला; यामुळें अफजलप्रसंगापर्यंत मुख्यतः बखरीवर त्यांना भिस्त ठेवावी लागली व अस्सल मराठी पत्रें त्यांना जमेस धरतां आलीं नाहींत. समकालीन फारशी सामुग्री त्यांनीं जमेस धरली हें खरें; पण ती शास्ताखान प्रसंगापासून पुढें धरली आहे. त्यापूर्वीं ( एक दोन अपवाद सोडून ) महाराजांचा जर मोगलाशी हर्षामर्षाचा प्रसंगच आला नाहीं तर मोगली इतिहासांत मराठ्यांची माहिती सापडणार तरी कशी? आणि ती तेथें सापडल्यावांचून प्रो. सरकार जमेस तरी काय धरणार? मोगली अगर विजापुरी इतिहासांत शहाजी व शिवाजी यांचे उल्लेख पाहून प्रो. सरकार यांनीं शहाजी व शिवाजी यांचीं चरित्रें लिहितां येतील असें गृहीत धरलें आहे. पण हा समज मुळांतच चुकीचा आहे. शहाजी व शिवाजी हे जबरदस्त बनल्यानंतर ते मुसलमानी इतिहासकारांच्या डोळ्यांत भरले; त्यापूर्वीं या पराक्रमी पुरुषांची गणना, त्यांच्या मतें, किरकोळ सरदारांत किंवा पुंड लोकांत होती. यामुळें मोठमोठ्या प्रसंगांत हजर असून शहाजीचा उल्लेख फारशी इतिहासकार करीत नाहींत; पण मराठी लेखकांना त्याचा गौरवानें उल्लेख करणें इष्ट दिसलें. उदाहरणार्थ भातवडीच्या लढाईचा प्रसंग

घेऊं. त्याचें वर्णन मोगली व विजापुरी इतिहासांत बऱ्याच बारकाईनें दिलेलें आहे. पण त्यांत मलिकंबर, लष्करखान, मुल्ला महमद इत्यादि सेनापतींचीं व प्रमुख सरदारांचीं नांवें आहेत; शहाजीचें नांव नाहीं. आणि तंजावरच्या शिलालेखांत मुसलमानांचीं नांवें देऊन मराठ्यांचींहि नांवें दिलीं आहेत व त्यांत शहाजीचा पराक्रम विस्तारानें सांगितला आहे. शहाजीच्या चरित्रास निराळें वळण लावणारा हा महत्वाचा प्रसंग असल्यामुळें शिलालेखकारानें तो तपशीलवार सांगितला; शहाजी व शिवाजी यांची माहिती सांगण्यासाठींच हा प्रवृत्त झाल्यामुळें त्याला शहाजीचा हा पहिला पराक्रम मुद्दाम नमूद करणें प्राप्त होतें. मलिकंबरादिकांच्या मानानें शहाजीचें महत्व फारच लहान असें फारशी लेखकांना वाटणें व त्यांनीं त्याचा उल्लेख टाळणें ज्याप्रमाणें स्वाभाविक आहे त्याप्रमाणें भातवडीच्या प्रसंगांत शहाजीचा लहानसा पराक्रमहि प्रामुख्यानें वर्णन करणें शिलालेखकाराला अपरिहार्य होतें. आणि ज्याला शहाजीच्या पूर्वचरित्राची मांडणी करावयाची असेल त्यानें या शिलालेखाचें मनन करणें जरूर आहे. कै. राजवाडे यांना शहाजीच्या पूर्वचरित्राची जी नव्या रीतीनें मांडणी करतां आली तिचें कारण त्यांनीं तंजावरचा शिलालेख बारकाईनें वाचला हें आहे. राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेंत शहाजीसंबंधाच्या माहितीस तंजावरच्या शिलालेखाचा त्यांनीं आधार घेतल्यामुळें बखरकारापेक्षां त्यांना पुढें पाऊल टाकतां आलें; आणि प्रो. सरकार यांनीं केवळ पारशी ग्रंथांपलीकडे या बाबतींत पहावयाचें नाहीं असें ठरविल्यामुळें शहाजीचा उदय कसा झाला याची माहिती त्यांना मुळींच मिळाली नाहीं.

The stories told in the marathi BAKHARS about the history of his ( Shivaji's ) parents during the year preceeding his birth and the events of his own life up to the age of twenty are in many points, contrary to authentic history or in others improbable or at all events unsupported by any evidence.

असे उद्गार त्यांनीं शिवचरित्राच्या प्रारंभीं ( पृ. २० ) काढले आहेत. पण या बाबतींत शिलालेखाची योग्यता काय आहे हें पहाण्याचा देखील त्यानीं प्रयत्न केलेला दिसत नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांनीं आधारभूत ग्रंथाचीं यादी देतांना १२७ ग्रंथांचीं नांवें सांगितलीं त्यांत या शिलालेखाचा नामनिर्देशहि केलेला नाहीं ! तात्पर्य महत्वाची मराठी सामग्री

जमेस न धरतां केवळ बखरी मात्र प्रो. सरकार यांनीं हिशेबांत घेतल्या, यामुळें त्यांचे अफजलप्रसंगापर्यंतचें शिवचरित्र बखरवजाच आहे.*

जेधे शकावलीवर प्रो. सरकार यांची अशीच गैरमर्जी दिसते. पण त्याचें कारण समजणें कठीण आहे. चरित्राच्या ४५२ व्या पृष्ठावर 'ही शकावली बनावट नाहीं व त्यांत चुका असल्या तरी त्या नक्कलकाराच्या आहेत आणि कांहीं मित्या इतक्या बिनचूक आहेत कीं त्या कोणाही बनावट लेखकास माहीत असणें शक्य नाहीं' अशा अर्थाचा शेरा त्यांनीं मारला आहे. अर्थात या शकावलीचें त्यांनीं बारकाईनें अध्ययन केलें असलें असें कोणासही वाटण्याचा संभव आहे. पण तसा प्रकार मुळींच दिसत नाहीं. अफजलप्रसंगापर्यंत एकदोन अपवाद सोडून त्यांनीं या शकावलीचा उल्लेखच केला नाहीं. वस्तुतः त्यांनीं समकालीन इंग्रजी पत्रांच्या आधारें व फारशी उल्लेखांवरून ज्या मित्या आपल्या ग्रंथांत ठोकळमानानें दिल्या आहेत त्यास जेधे शकावलीनें दुजोरा मिळण्याजोगा आहे एवढेंच नव्हे तर त्यांनीं अंदाजानें महिने घातले आहेत तेथें तिथी-पर्यंत सूक्ष्म रीतीनें काळ ठरविण्यास जेधे शकावलींत त्यांना साधन उपलब्ध होतें. परंतु या मित्या तिथिरूपानें असल्यामुळें त्याचें इंग्रजी तारखांत रूपांतर करण्याचें त्यांना अवघड वाटलें असें दिसतें (The dates are given in the Hindu lunisolar era of the Deccan and defy conversion to the Julian calender, except approximately p, 452), मिळून जेधे शकावलीनें तिथी व शक रूपानें नोंदी सांगितल्या आणि प्रो. सरकार यांना इंग्रजी तारखांत हे उल्लेख पाहिजे होते; तेव्हां त्यांनीं अशी तोड काढलेली दिसते कीं या शकावळीचा नामोच्चारच फारसा करूं नये म्हणजे झालें ! मिळून समकालीन पत्रें, तंजावरचा शिलालेख व जेधे शकावली हीं मराठींतली महत्त्वाचीं साधनें उपलब्ध असून त्यांचा उपयोग करून घेण्याचें काम प्रो. सरकार यांच्या हातून झालें नाहीं. यामुळें त्यांचें शिवचरित्र वाचून मनाचें समाधान होत नाहीं.

अशा रीतीनें सभासदी बखरीपासून प्रो. जदुनाथ सरकार यांच्या ग्रंथापर्यंत जीं शिवचरित्रें लिहिण्यांत आलीं त्यांचें सामान्य रीतीनें गुण-

---

* दादाजी कोंडदेवाच्या मृत्यूचा शक ठरवितांना त्यांनीं अस्सल पत्र जमेस धरलें आहे हा एक अपवाद सांगतां येईल.

दोष विवेचन केलें. त्यावरून पुढील गोष्टी वाचकांच्या लक्षांत येतील. सभासदी बखर बरीच विश्वसनीय आहे व त्यांत दंतकथा फार थोडया आहेत; पण तिच्यांत कालविपर्यास कांहीं ठिकाणीं असून बखर फार त्रोटक आहे. एक्याणव कलमी, रायरी वगैरे बखरींत गोष्टीबळ चांगलें आहे. चिटणीसांची लेखनशैली तर चांगलीच रसभरित आहे; आणि क्वचित त्यांना अस्सल पत्रेंहि पाहण्यास मिळालीं असण्याचा संभव आहे; पण त्यांना साधनांची निवड करून तारतम्यानें त्यांची ग्राह्याग्राह्यता ठरविण्याचें शास्त्र माहीत नसल्यामुळें व अपुऱ्या माहितीस दंतकथांचा व कल्पनेचा आधार घेऊन संपूर्ण शिवचरित्र लिहून टाकण्याची अनावर हौस त्यांनीं धरल्यामुळें या बखरींत विश्वसनीय व अविश्वसनीय भागांची खिचडी झाली आहे व कालविपर्यासाचा दोष त्यांत अतोनात घुसला आहे. स्कॉट वेअरिंग व डफ यांनीं या बखरीच मुख्यतः आधारास घेतल्या. यामुळें बखरीपेक्षां यांना शिवचरित्र रचनेच्या कामीं फारसें यश लाभलें नाहीं. तथापि फारशी व इंग्रजी भाषेंत समकालीन साधनें मिळण्याजोगीं आहेत व त्यांचें सहाय घेतलें पाहिजे याची जाणीव या ग्रंथकारांनीं व त्यांच्याहि पूर्वी ऑर्मनें करून दिली आणि प्रो. सरकार यांना समकालीन पुराव्याचें हें महत्व अवगत आहे आणि इंग्रजी व फारशी साधनें यांचा उपयोग त्यांनीं केला तेथें त्यांना चरित्रविषयक माहितींत भर टाकतां आली; पण मराठी भाषेंत उपलब्ध असलेलीं समकालीन साधनें त्यांना नीटशी समजली नाहींत व बखरीवरच त्यांनीं मुख्य भिस्त ठेऊन अफजलप्रसंगापर्यंत त्यांनीं चरित्र लिहिलें, यामुळें बखरींतले दोष ठिकठिकाणीं त्यांच्या ग्रंथांत दिसून येतात. अशा परिस्थितीमुळें बखरींनीं अगर प्रो. सरकार यांच्या ग्रंथानें महाराष्ट्रियांची शिवचरित्रविषयक जिज्ञासा अद्याप तृप्त झालेली नाहीं. आणि ही असमाधानवृत्ति सकारण असल्यामुळें तिच्या पूर्ततेचा योग्य मार्ग शोधून काढणें भाग आहे.

हा योग्य मार्ग म्हणजे समकालीन अशी अनुपलब्ध सामग्री शोधून काढून ती प्रकाशित करण्याचा मोठा कार्यभाग उचलणें व समकालीन प्रकाशित सामग्रीचें बारकाईनें अध्ययन करणें अशा दुहेरी स्वरूपाचा आहे. शिवभारताच्या प्रकाशनानें वरील दोन कामांपैकीं एकाच्या सिद्धीस

मदत होईल; तेव्हां या नवीन ग्रंथानें शिवचरित्रांत काय भर पडते व कोणतीं नवीं शंकास्थानें निर्माण होतात याचें दिग्दर्शन करणें अवश्य आहे.

या दृष्टीनें या शिवकालीन ग्रंथाचें परीक्षण करतांना समकालीन साधनें व सभासदी बखर एवढींच जमेस धरतां येतील. चिटणीशी बखरींत, शिवदिग्विजयांत अगर इतर बखरींतून विशिष्ट प्रसंगासंबंधीं काय लिहिलें आहे याची फारशी तुलना करावयास नको. कारण या बखरींच्या कसोटीनें शिवभारताचें प्रामाण्य सिद्ध करावयाचें नाहीं. अस्सल समकालीन पुराव्यानें शिवभारताचें महत्त्व समजून घेऊन त्यांतील विधानांना कोठें व कसा दुजोरा मिळतो तें पहावयाचें आहे. आणि अशा रीतीनें निश्चित झालेल्या तपशीलांपैकीं बखरींत शुद्ध स्वरूपांत कोणता भाग सापडतो, विकृत स्वरूपांत कोणता सांपडतो, आणि ही विकृति कोणत्या पद्धतीनें होते याचाहि अभ्यास मनोरंजक होण्याजोगा आहे; पण हा बखरींच्या अध्ययनाचा स्वतंत्र विषय असल्यामुळे तो येथें मांडण्याचें कारण नाहीं. येथें आपणास शिवकालीन साधनांच्या योगानें शिवभारतांतील प्रसंगांचा विचार केला असता पुरें होणार आहे.

या परीक्षणाचे मुख्यतः दोन विभाग करतां येतील. एक शिवपूर्वकालीन प्रसंगांचा व दुसरा शिवकालीन प्रसंगांचा. त्याचप्रमाणें प्रत्येक विभागांत भारतांतील उल्लेखाखेरीज अवांतर माहितीवरून चरित्रविषयक कोणते प्रसंग आपणास माहीत आहेत व त्यांचा उल्लेख शिवभारतांत न येण्यास कांहीं कारण दाखवितां येतें किंवा काय याचेंहि विवेचन करावें लागेल. हें विवेचन करतांना शिवभारत हें विशिष्ट हेतूनें व विशिष्ट परिस्थितींत लिहिलें गेलें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शिवाजीमहाराज हे अवतारी पुरुष आहेत; ‘धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे’ या गीतावचनानुसार त्यांचें अवतारकार्य ठरलेलें आहे; त्यांत त्यांना यश येणारच; आणि या त्यांच्या कार्यास मदत करणारे व विरोध करणारे हे अनुक्रमें देवकोटींतले व दानव कोटींतले आहेत या गोष्टी जनतेच्या मनांत बिंबविण्यासाठीं परमानन्दानें या ग्रंथाची रचना केली आहे. या ग्रंथाचें श्रवण पुण्यप्रद आहे वगैरे प्रस्तावना करून तो पुराणश्रवणलोलुप जनतेचें अंतःकरण ओढून घेतो; व या अंतःकरणांत कार्याभिमुख

वृत्ती उत्पन्न करण्याचा, व शिवचरित्राविषयीं आदरभाव वाढविण्याचा कवीचा हेतु स्पष्टपणें दिसून येतो. तो कांहीं विसाव्या शतकांतला निर्विकार इतिहासकार नव्हता. त्यानें कवीची व पुराणकाराची भूमिका स्वीकारली होती. या मुळें सर्वच प्रसंग सांगण्याची जबाबदारी त्याच्यावर नव्हती. त्याला वाटतील ते प्रसंग निवडण्यास तो मोकळा होता. आणि ही निवड करतांना त्याला तात्कालीन परिस्थिती लक्षांत घेणें भाग होतें. शास्ताखानाच्या आगमनापासून दिल्लीकराशीं मराठ्यांचें जें वितुष्ट उघड रीतीनें पडलें तें महाराजांच्या निधनापर्यंत चालूच होतें; यामुळें या अवधींत शिवचरित्रांतील प्रसंगांचें वर्णन करणाऱ्या परमानन्दास दिल्लीकराविषयीं शत्रुभाव बिंबवावयाचा होता; तेव्हां दिल्लीकरांचें अंकितत्त्व शहाजी अगर शिवाजी यांनीं कांहीं काळ मान्य केलें होतें याविषयीचे उल्लेख परमानंदानें अजीबात गाळणें स्वाभाविक होतें. त्याचप्रमाणें ज्या प्रसंगांच्या वर्णनानें शिवाजीमहाराजांच्या थोरवीस बाधा येण्याचा संभव होता ते प्रसंग मुळींच न देणें किंवा त्यांचा ओझरता उल्लेख करण्याचा मार्ग पत्करणें परमानन्दास इष्ट वाटण्याजोगें होतें. आणि ज्यांत महाराजांचें गुणवर्णन विशेष खुलवून सांगता येतील असें कवीस वाटलें असेल त्यांचीच निवड कवीनें केली असेल. अशा रीतीनें शिवभारतांतील उल्लेखित व अनुल्लेखित प्रसंगांसंबंधीं स्थूलमानानें तर्क करतां येईल. पण यापेक्षां अनुल्लेखावरून जास्त अनुमान काढणें योग्य होणार नाहीं.

## ४ स्वराज्या पूर्वीचा महाराष्ट्र.

१ **मालोजी.** शिवभारताचे बत्तीस अध्याय ( श्लोकसंख्या २२६१ ) आपणास मिळाले आहेत. त्यापैकीं पहिल्या दहा अध्यायांतील विषय शिवपूर्वकालीन आहे. त्यांत अनुक्रमें शहाजी जन्म, शहाजी जिजाबाई विवाह, जाधवराव व भोसले यांचें वैमनस्य, भातवडीचें युद्ध, शहाजीचें विजापुरास जाणें, परत निजामशाहींत येणें, पेमगिरीस निजामशाही उभारणें, शिवजन्म आणि महाराजांची पुण्यास रवानगी इतके विषय आले आहेत. मालोजीची माहिती सांगतांना तो सूर्यवंशी असून दाक्षिणात्य होता, तो पुणें प्रांतीं रहात असे, भीमेच्या काठच्या प्रदेशावर त्याचा अंमल चालत होता आणि त्यानें शंभुमहादेवाच्या डोंगरावर सुंदर तलाव बांधविला वगैरे

मजकूर प्रारंभीं आहे. त्यांत पुणें प्रांतावरील मालोजीचें राज्य निजामशाहींत नोकरी धरण्यापूर्वीपासूनचें होतें असें सांगण्याचा कवीचा बराच आग्रहाचा प्रयत्न दिसतो. पुढें देखील शहाजीनें नवीन मिळविलेला मुलूख देऊन टाकला तरी त्याचा पुणें प्रांतावरचा हक्क कायम होता व तोच पुढें शिवाजी महाराजांना मिळाला असें कवीनें सांगितलें आहे. याचा अर्थ मुसलमानी पातशाह्या दक्षिणेंत नांदत असल्या तरी ठिकठिकाणीं लहान सहान अंमल गाजविणारे गांवोगावचे पाटील वगैरे वतनदार हे स्वतंत्र व खरे मालक होते आणि ते आपखुषीनें अधिक वैभव मिळण्यासाठी यवनांची नोकरी पत्करीत; पण या नोकरीच्या पेशानें त्यांच्या गांवच्या स्वामित्वास बाध येत नव्हता असें कवीस सुचवावयाचें आहे. पुणें प्रांतांतील कांहीं गांवांपुरता भोसल्यांचा हा अधिकार मोंगलानी देखील मान्य केला होता. उदाहरणार्थ पुरंदरच्या तहानंतर इतर भाग मोंगलाकडे गेला तरी कर्यात मावळचे ३६ गांव भोसल्यांच्या नांवानें मोगलांनीं वजा दिले आहेत. यावरून गांवच्या पाटीलकीचे हक्क मुसलमानी अमदानींत अबाधित होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या पाटीलकीच्या हक्कासच कवीनें गौरवानें "सौराज्य" शब्द लावलेला दिसतो. या पाटीलकीचे गांव महाराष्ट्र जनपदान्तर्गत होते म्हणजे महाराष्ट्र देशांत मोडत होते, त्या अर्थी लहान प्रमाणांत कां होईना कवीला मालोजी हा 'महाराष्ट्र जनपदं प्रशशास' म्हणजे महाराष्ट्र देशावर अंमल चालवीत होता असें ह्मणतां आलें. पण मालोजी हा 'महाराष्ट्र भूमिप' होता, याचा अर्थ ठरवितांना अडचण पडण्याजोगी आहे. महाराष्ट्र भूमिप याचा अर्थ मराठा राजा; पण 'मराठा' हा शब्द 'महाराष्ट्रांतील हिंदुधर्मी' या अर्थाचा वाचक धरावा किंवा 'मराठा जातीचा' वाचक धरावा अशी येथें शंका येण्याजोगी आहे. 'मराठा तितुका मेळवावा' या समर्थांच्या उक्तींत देखील हा संशय पडण्याजोगा आहे. पण शिवभारतांत महाराष्ट्र–राजा हा शब्द 'मराठा जातीचा राजा' अशा अर्थीच आहे. नवव्या अध्यायांत शहाजीनें नवें राज्य उभारलें तेव्हां त्याच्या भोवतीं घाटगे, काटे, चव्हाण वगैरे 'महाराष्ट्रनृप' जमले असें कवी ५ व्या श्लोकांत ह्मणतो. तेथें मराठा जातीला अनुलक्षून महाराष्ट्र शब्द वापरला असल्याचेंच दिसतें.

द्विजन्मा ढुंढिनामा च तज्जातिश्चापि रुस्तुमः ।
घाण्टिकाद्याश्च बहवो महाराष्ट्रा महीभुजः [४/३],

या ठिकाणीं तर धुंडिराजाचा उल्लेख द्विजन्मा ह्मणजे ब्राह्मण या शब्दानें स्वतंत्रपणें करून घाटगे वगैरेंना महाराष्ट्र राजे म्हटलें आहे. यामुळें मराठे राजे म्हणजे 'मराठा जातीचे' व राजे हे उपपद धारण करणारे लोक हाच अर्थ कवीस अभिप्रेत आहे यांत शंका नाहीं. सभासदी बखरींत देखील ' मऱ्हाठा राजा छत्रपती व्हावा ' (पृ. ८२); ' मराठ्यांमध्यें बहुतेक संभाजी मोडील ' आणि ' मोडिलें राज्य हे तिघे ब्राह्मण व तिघे मराठे सावरतील ' (पृ १०५) असे शब्दप्रयोग आहेत. तेथें मराठा याचा अर्थ जातिवाचकच घेतला पाहिजे. मराठा अथवा महाराष्ट्र हा शब्द आज विशिष्ट प्रदेशांतील लोक अशा अर्थी आपण वापरतों. पण इतका व्यापक अर्थ मराठा शब्दांत शिवकालीन वाङ्मयांत होता असें म्हणतां येणार नाहीं. फार तर महाराष्ट्रांतील 'हिंदुधर्मी लोक' येथपर्यंत त्या शब्दाची व्याप्ति ओढाताणीनें नेतां येईल. पण हाहि व्यापक अर्थ पेशवाईंत विशेष रूढ झाला व त्यापूर्वी मराठे या शब्दाचा अर्थ संकुचित म्हणजे जातिवाचक होता असें प्रस्तुत लेखकास वाटतें. त्यावेळीं राज्य करण्याची महत्त्वाकांक्षा महाराष्ट्र देशांत तरी दोनच जातींनीं धारण केली होती. एक मुसलमानांनीं व दुसरी मराठ्यांनीं. धर्मस्थापनेचा हेतु उद्भूत होण्यापूर्वींहि शहाजी वगैरे मराठे लोक मुसलमानांशीं समरांगणांत सामना करण्यास दंड ठोकून उभे होते. त्यावेळीं ब्राह्मणांनीं राजे म्हणवून घेण्याची मनीषा दाखविली होती असें दिसत नाहीं. मराठे अथवा मराठे राजे म्हणजे मराठा जातीचे व क्षात्रवृत्तीचे लोक असा अर्थ प्रथम रूढ होता; व तो राजकीय महत्त्वाकांक्षेचा प्रामुख्यानें निदर्शक होता. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत हिंदु व मुसलमानी असे दोन धर्म चालू होते. त्यांपैकीं हिंदुधर्माचा उल्लेख महाराष्ट्रधर्म या शब्दानें केला जात होता. त्याचप्रमाणें शिवाजीमहाराजांनीं स्वतंत्र राज्याची मांडणी केली तेव्हांपासून तर मुसलमानी राज्य व महाराष्ट्र राज्य ऊर्फ मराठ राज्य हे शब्द स्पष्ट रूढ होऊं लागले. जेधे करीन्यांत अफजल प्रसंगीं "मुसलमान बेइमान आहे कार्य जालियावरी नस्तें निमित्य ठेऊन नाश करील. हे मऱ्हाष्ट राज्य आहे. अवधियानी हिमत धरून जमाव घेऊन राजश्री स्वामी संनिध

राहोन येक निष्टेनें शेवा करावी" असें वाक्य आहे. त्यांत राज्याची महत्त्वाकांक्षा बाळगून मुसलमान व शिवाजी असे जे दोन पक्ष उभे आहेत त्यांपैकीं मुसलमानांच्या बाजूस आपण कां जाऊं नये व शिवाजी महाराजांचा पक्ष आपण कां स्वीकारावा अशी तुलना कान्होजीस करावयाची आहे. त्या निमित्त त्यानें 'हें मऱ्हाष्ट राज्य आहे' असे शब्द उच्चारले आहेत. त्या अर्थीं 'महाराष्ट्र राज्य' या सामासिक शब्दानें 'शिवाजीमहाराजांचें स्वामित्व ज्या भागावर चालतें तें राज्य' असा भाव घ्यावयाचा आहे. म्हणजे 'स्वराज्य' शब्दाचा पर्याय 'महाराष्ट्र राज्य' हा आहे. त्यांत आज आपण ज्या अर्थानें महाराष्ट्र शब्द वापरतो तो (म्हणजे मराठी भाषा जेथें बोलली जाते तो सर्व प्रदेश) घ्यावयाचा नाहीं; तर मराठा राजा ज्या भागावर स्वामित्व चालवितो तो प्रदेश असा अर्थ घेतला पाहिजे. पेशवाईंत 'महाराष्ट्र राज्य' हा शब्द स्वराज्य अथवा मराठ्यांच्या ताब्यातला प्रदेश या अर्थानें रूढ होता हें सहज दाखवितां येण्याजोगें आहे. उदाहरणार्थ नानासाहेबांच्या कारकीर्दींत शके १६७० मध्यें नारो महादेव हा भगवंतराव प्रतिनिधीस निजामुल्मुलकाच्या तोंडचे म्हणून शब्द सांगतो ते असे आहेत. "नबाबाही बोलून दाखविले कीं **महाराष्ट्र राज्यामध्यें** तुम्ही बहुत दिवस चाकरी करितां, कामेंहि बहुत केली असतील, एक वेळ **मोगलाई**-चीहि मजा येऊन पहाणें" (खं. ८ पृ. २०५). यावरून मोगलाई नव्हे तें महाराष्ट्र राज्य. नारो महादेव याच विषयासंबंधें एक दोन महिन्यांनीं लिहितो "जो कोणी **मोगलाईत** आला आहे तो कोणी श्रमी जाला नाहीं. पदासच चढला. आणि **स्वराज्यांत** होते तेव्हांहि स्वामीस विदितच आहे." येथेंहि मोगलाई नव्हे तें स्वराज्य हाच अर्थ अभिप्रेत आहे. यावरून मराठी कागदपत्रांतून व संस्कृत ग्रंथांतून 'महाराष्ट्र राज्य' हा शब्द मराठ्यांचें राज्य अथवा स्वराज्य या अर्थी आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. खरें पाहतां 'राज्य' हा शब्द मूळचा सत्तादर्शक आहे, स्थलदर्शक नाहीं; तेव्हां स्वराज्य याचा "आपला अंमल" हा मूळ अर्थ व 'आपला अंमल ज्या प्रदेशावर चालतो तो प्रदेश' हा अर्थ स्वराज्य शब्दांत लक्षणेनें मागाहून आलेला आहे. त्याचप्रमाणें 'मराठ राज्य' याचा अर्थ मराठ्यांचा अंमल ज्या प्रदेशावर चालतो तो भाग; आणि 'महाराष्ट्र राज्य' हा समास 'मराठ राज्य' याचा पर्याय म्हणून संस्कृत कवींनीं

व मराठी शिष्ट लेखकांनीं योजलेला आहे. म्हणजे महाराष्ट्र शब्दाच्या भौगोलिक अर्थावर येथें कटाक्ष नसून 'मराठा' या शब्दांतील जातिवाचक व धर्मप्रधान भावनेवर मुख्य लक्ष्य आहे. महाराष्ट्र राज्य म्हणजे मराठ्यांचा (मराठे जातीचा अगर हिंदु सत्ताधाऱ्यांचा) अंमल ज्या प्रदेशावर चालतो तें राज्य.

मालोजी हा 'महाराष्ट्र भूमिप' होता हें सांगितल्यानंतर त्याच्या बायकोचें नांव उमा होतें, त्यानें शंभुमहादेवाच्या डोंगरावर मोठा तलाव खणविला नंतर निजामशाहाची नोकरी पत्करली; वगैरे हकीकत कवीनें दिली आहे. त्यांत मालोजीच्या डोक्यावर सापानें फणा धरल्याचें, जिजाबाई व शहाजी यांनीं रंग पंचमीच्या वेळीं रंग उडविल्याचें अगर मशीदींत डुकरें टाकून बादशहाच्या मध्यस्तीनें जाधवरावाकडून लग्नाची संमति घेतल्याचें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें कांहींच सुचविलेलें नाहीं. यापैकीं मालोजीच्या डोक्यावर सापानें फणा धरल्याची हकीकत खरी असती अगर निदान दंतकथारूपानें रूढ असती तर ती नमूद करण्याचें काम कवीनें मोठ्या हौसेनें केलें असतें. पण तें त्यानें केलें नाहीं. यावरून ही दंतकथा त्यावेळीं रूढ नसून मागाहून प्रचलित झाली असण्याचा बराच संभव आहे. त्याचप्रमाणें शहाजीस कवीनें कार्तिकस्वामीची उपमा दिली आहे व पहिल्या अध्यायाचें नांव 'कुमारप्रभव' असें दिलें आहे; त्यांतहि श्लेष त्याच कल्पनेवर आहे आणि पुढें देखील शहाजीचे चरित्र सांगतांना कवीनें त्याच्या पराक्रमाचेंच वर्णन गौरवानें केलें आहे. शंकराच्या आशीर्वादानें शहाजी झाला तो कार्तिकस्वामीप्रमाणें होता व पुढें शिवाजीमहाराज हे मात्र विष्णूचे अवतार असें कवीनें म्हटलें आहे; शंकराचे अवतार असें कोठेंहि म्हटलेले नाहीं. बखरकारांनीं मात्र हा सूक्ष्मभेद पाळलेला नसून महाराजांना शंकराचा अवतार असें त्यांनीं सांगितलें आहे.

**२ मालोजीचा मृत्यु व शहाजीचा जन्म**—निजाम व अदिल यांच्यामध्यें युद्धाचा प्रसंग उद्भवल्यावेळीं मालोजीनें पराक्रम गाजविला व तेव्हांपासून मालोजी व विठोजी हे निजामशाही नोकर बनले; नंतर कांहीं काळ मालोजीनें शंकराची आराधाना केल्यानंतर त्याला प्रथम मुलगा झाला त्याचें नांव 'शहाजी' व पुढें दोन वर्षांनीं दुसरा मुलगा झाला त्याचें नांव 'शरीफजी' अशीं ठेवण्यांत आलीं, आणि हीं नावें 'सिद्धनामांकित'

होतीं ह्मणजे शहाशरीफ याच्या स्मरणार्थ ठेवली होती वगैरे मजकूर प्रचलित शहाजी चरित्र विषयक कल्पनांशीं जुळण्याजोगा आहे. पण शहाजीच्या पांचव्या वर्षी मालोजी इंदापूरच्या युद्धांत मारला गेला वगैरे हकीकत बखरींशीं कोठेंच जमण्याजोगी नाहीं. मालोजी मेल्यानंतर विठोजीनें शहाजी व शरीफजी यांचें पालन पोषण केलें आणि शहाजीचें मुख

व्यक्तीभवन्नवश्मश्रुलेखं लेखमनोहरम् ॥ $\frac{१}{३२}$ ॥

नुकत्याच फुटू लागलेल्या मिसुरडीच्या रेषेनें मनोहर झालेलें पाहून जाधवरावानें आपली मुलगी जिजाबाई ही देऊ केली; व त्यावेळीं शहाजीच्या शरीरांतील बाल्य संपून 'नवयौवनास प्रारंभ झाला होता' असें भारतकार ह्मणतो.त्या अर्थी लग्नाच्या वेळीं शहाजीचें वय १४।१५ वर्षांचें तरी असलें पाहिजे असें दिसतें. परंतु निश्चितपणें अमक्याच शकांत हें लग्न झालें असें ह्मणण्यास आज आपणाजवळ विश्वसनीय असा कांहींच पुरावा नाहीं. शहाजीच्या पांचव्या वर्षी मालोजी इंदापूरच्या युद्धांत मारला गेला आणि शहाजीच्या १४।१५ व्या वर्षी त्याचें लग्न झालें अशीं विधानें भारताच्या आधारानें करतां येतील; पण हीं सर्व सापेक्ष आहेत; त्यापैकीं एका प्रसंगाचा तरी शक स्वतंत्रपणें ह्मणजे निरपेक्ष रीतीनें ठरवितां आला तर बाकीच्या दोनहि गोष्टींचे शक ठरवितां येतील. पण स्वतंत्र रीतीनें शक ठरविण्यास आज साधन उपलब्ध नसल्यामुळें आणखी संशोधन झालें पाहिजे असें ह्मणून सध्यां हा मुद्दा येथें सोडणें प्राप्त आहे. मात्र विठोजीच्या आठ मुलांपैकी तिसरा मुलगा, थोरला मालोजी मेल्यानंतर, जन्मला असावा व त्याच्याच स्मरणार्थ या मुलाचें नांव मालोजी असें ठेवलें गेलें असण्याचा पुष्कळ संभव आहे; आणि हा मालोजी शके १५४४मध्यें इतर भावांपासून स्वतंत्रपणें आपली वाटणी घेऊन निराळा राहिला त्या अर्थी थोरला मालोजी मरून श. १५४४मध्यें बरींच वर्षे झालीं होतीं. त्याच्या मरणानंतर विठोजीस पांच मुलगे झाले व विठोजी मेल्यानंतर शहाजी कारभार पाहू लागला इत्यादि अनुक्रमावरून मालोजीच्या मृत्यूचा अगर शहाजीच्या जन्माचा शक अंदाजानें ठरविणें शक्य आहे. पण या बाबतींत समकालीन कागद सापडण्याची आशा असल्यामुळें आजच तर्काच्या प्रदेशांत शिरण्याचें कारण नाहीं.

**२. भोसले व जाधव यांच्यामधील वैमनस्य**—(१) 'भोसले हीन कुळांतले आहेत व आपण वरिष्ठ कुळांतले आहोत' असा यादवांना अभिमान वाटत होता; आणि (२) शहाजी निजामशाही वजीर बनल्यामुळें जाधवरावास वैषम्य वाटूं लागलें अशीं दोन कारणें बखरकारांनीं भोसले व यादव यांच्यांत वितुष्ट आणणारीं म्हणून सांगितलीं आहेत. पण त्यांचा स्पष्ट किंवा अस्पष्टपणेंहि भारतकारानें निर्देश केलेला नाहीं. खंडागळ्यांच्या हत्तीचें यःकश्चित् प्रकर्ण विकोपास जाऊन अकल्पितपणें जाधवरावाचा मुलगा दत्ताजी हा, संभाजी भोसल्याच्या हातून, मारला गेला; आणि जाधवरावानें रागाच्या भरांत संभाजी भोसल्यास ठार केलें; यामुळें जाधवरावावर निजामशहाची गैरमर्जी झाली; व हें ओळखून जाधवराव निजामशाही दरबार सोडून मोंगलांच्या आश्रयास गेला असें भारतकार म्हणतो. पैकीं जाधवराव मोंगलांच्या आश्रयास गेल्याचा काळ ठरविण्यास निश्चित साधन उपलब्ध आहे. यावेळीं मोंगल व निजाम यांच्यामध्यें युद्ध सुरु होतें; व इंग्रजी व्यापाऱ्यांचा कांहीं माल बऱ्हाणपुराजवळ निजामशाही लोकांकडून लुटला गेला. त्याबद्दल तक्रार करण्यासाठीं कांहीं इंग्रज खुद्द मलिकंबराच्या भेटीस दौलताबादेस गेले होते. त्यांनीं त्यावेळीं मलिकंबराच्या भेटीचा वृत्तान्त पत्रद्वारें लिहिलेला उपलब्ध झालेला आहे. त्यावरून जाधवराव शके १५४३ च्या कार्तिकांत निजामशाहींतून निघाला व मोगलाकडे बऱ्हाणपुरास गेला; तेव्हां मोगलांनीं त्याचा मोठा गौरव करून त्याला मनसब दिली. ( English Factories pp. 318, 332. ) ही हकीकत समकालीन विश्वसनीय पत्रांत असल्यामुळें त्याबद्दल संशयास जागा नाहीं; त्याअर्थीं हत्तीचें प्रकर्ण १५४३ च्या कार्तिकापूर्वीं वर्षदीडवर्षाच्या आंत बाहेर घडलें असलें पाहिजे.

**३. निजामशाहीचें वैशिष्ट्य**—जाधवराव निजामशाहींतून मोगलाईंत गेलेला पाहून विजापूरच्या आदिलशहास हर्ष वाटला; पण पुढें निजामशहाकडून आदिलशहाचा अनेक वेळा पराभव झाला; तेव्हां त्यानें मोंगलांशी स्नेह केला आणि मोगली व आदिलशाही संयुक्त सैन्य मलिकंबरावर चालून आलें असा मजकूर भारतकारानें सूत्ररूपानें तीन श्लोकांत सांगितला आहे(अ.४,श्लो. ५-७).परंतु त्याची स्पष्ट कल्पना येण्यासाठीं यावेळीं दक्षिणेंतील शाहात मोगल

यांच्या राजकीय परिस्थितीचा थोडासा विचार करणें जरूर आहे. दक्षिणेच्या राज्यकारभारांत हात घालण्याची इच्छा मोंगली बादशहांना अकबराच्या कारकीर्दीअखेर झाली. त्यावेळीं दक्षिणेंत पांच शाह्या व गोंव्याचे पोर्तुगीज अशीं सहा राज्यें नांदत होतीं. पैकीं वऱ्हाडची शाही मोंगलांनीं प्रथम बुडविली व बरीदशाही विजापूरवाल्यांनीं खालसा केली. यामुळें जहांगिराच्या वेळीं आदिलशाही, कुतुबशाही व निजामशाही हीं तीन मुसलमानी व गोंव्यांतील फिरंग्यांचें एक अशीं चार राज्यें दिल्लीकरांशीं झगडण्यास दक्षिणेंत हयात होतीं. तीं बहुतकरून आपसांतली भांडणें भांडण्यांत आपल्या शक्तीचा व्यय करीत; यामुळें मोंगलांच्या बलिष्ठ सैन्यापुढें त्यांचा निभाव लागण्याजोगा नव्हता. परंतु ' यादवींत शक्तीचा अपव्यय केला व मोंगलांशीं लढण्याच्या बाबतींत आपण जुटीनें न वागलों तर आपणास सर्वस्वास मुकावें लागेल ' हें तत्व दाक्षिणात्य मुत्सद्यांना थोड्याशा अनुभवानें कळून आलें. या कामीं पोर्तुगीजांनीं बराच पुढाकार घेतला असावा असें दिसतें. त्याचप्रमाणें मलिकंबरानें विजापूरच्या इब्राहिम आदिलशहाशीं लीनपणें वागून निजामशाही व आदिलशाही दरबारांत बरींच वर्षें दोस्ती कायम ठेवली. मोंगलांनीं वऱ्हाड घेऊन निजामशाहींतील अहमदनगरचा किल्ला हस्तगत केला होता. यामुळें मोंगलांचें संकट निजामशाहीचा सूत्रचालक मलिकंबर याला इतरांपेक्षां फार तीव्रतेनें जाणवत होतें. इब्राहिमालाहि, निजामशाही नाहीशी झाली तर मोंगलांचा मारा आदिलशाहीवर पडेल, हें दिसत होतें. तेव्हां तोहि मलिकंबराला हरएक प्रकारें मदत पोंचविण्याच्या कामीं कसूर करीत नव्हता. यामुळें मोंगलांचें पाऊल बरींच वर्षेंपर्यंत दक्षिणेंत म्हणण्याजोगें पुढें पडलें नाहीं. मोंगली सैन्यानें निजामशाही राज्यांत जाळपोळ करीत असतां मलिकंबरानें तात्पुरती पड खावी आणि मोंगली सैन्य परतून गेलें म्हणजे मलिकानें आपला मुलूख परत घेऊन व मोंगली मुलखांत लुटालूट करून आपलें नुकसान सव्याज भरून घ्यावें असा प्रकार वारंवार होत असे. यामुळें निजामशाही राज्यांत लढण्याची एक विशिष्ट पद्धति लोकांच्या अंगवळणी पडली. शत्रूचा जोर दिसला म्हणजे नमतें घ्यावें; आणि ती लाट निघून गेली म्हणजे पुनः डोकें वर काढावें हें त्या युद्धपद्धतीचें मुख्य सूत्र होतें. या खेरीज मोंगली दरबारांत यावेळीं नूरजहानचा कारभार सुरु असून जहांगिराचे मुलगे

एकमेकाचा पाडाव करण्यासाठीं अनेक कारस्थानें उभारीत होते; त्या योगानें मोंगलांच्या दक्षिणेंतील कारस्थानांत अनेक वेळा खंड पडत असे. दक्षिणेंतील राज्यें सफाई बुडविण्यासाटीं कित्येक वर्षेंपर्यंत मोंगलांनीं अखंड चढाईचें धोरण ठेवण्याची जरूरी होती. परंतु मोगलाईतील अंतस्थ यादवीमुळें त्यांच्या चढाईंत अशा प्रकारचें सातत्य राहूं शकलें नाहीं. समुद्राला रोज भरती ओहटी येते; पण समुद्रकांठच्या लोकांना या परिस्थितीशीं तोंड देऊन आपली पगडी कशी सलामत राखावी याचें शास्त्र पूर्णपणें परिचित असतें. तोच प्रकार निजामशाहींतल्या मुत्सद्यांचा व योद्धयांचा होता. मोगली सैन्य निजामशाही सैन्याच्या मानानें समुद्राप्रमाणें अफाट असे. पण त्या अफाट सैन्यसागराशी कसें वागलें असतां आपला बचाव होईल व आपली लहान राज्यनौका या सागरावर आरूढ होऊन पैलतीर कसें गांठील हें ओळखणारे प्रत्युत्पन्नमति सरदार निजामशाहींत बरेच होते. त्या काळीं कोणत्याही राज्यांतला बादशहा मरण पावला म्हणजे सर्व राज्य गडबडून जाई. पण निजामशाहींत बादशहा म्हणजे कर्त्या माणसाच्या हातांतलें बाहुलें असें; तें कोणीहि हातीं घेऊन सत्ताधारी बनावें असें वळण चांद-बिबीनें प्रथम घालून दिलें होतें. तेंच मलिकंबरानें पुढें चालविलें; त्याचा मुलगा फत्तेखान यानेंहि बापाचाच कित्ता उचलला आणि शेवटीं शहाजीनें या सर्वांवर कडी करून दाखविण्याची हिंमत धरली होती. सारांश शत्रूशीं लढतांना गनीमी काव्याची विशिष्ट पद्धति ज्याप्रमाणें निजाशाहींत उत्क्रांत झाली त्याचप्रमाणें राजकीय महत्वाकांक्षा बाळगणाऱ्यांनीं बादशाही बाहुलें पुढें करून सर्व सत्ता आक्रमण्याची एक विशिष्ट पद्धति निजामशाहींत अस्तित्वांत आली.

४ **विजापुरांतील परिस्थिती**—विजापूरच्या अदिलशाहींत याहून कांहींशी निराळी परिस्थिती होती. तेथें बादशाहाचें वैयक्तिक महत्व कायम होतें. त्यांतून इब्राहिम अदिलशहा कर्ता पुरुष असल्यामुळें त्यानें आपला वचक कायम ठेऊन बरेंच मोठें सैन्य, अनुभवी मुत्सद्दी आणि लढवय्ये सरदार निर्माण केले होते. एखादा वजीर डोईजड होऊं लागला असें वाटतांच त्याला नेस्तनाबूद करून आपल्या तंत्रानें वागणारा दुसरा वजीर नेमण्याचा आपला हक्क इब्राहिमानें अनेक वेळा बजावून दाखविला होता. पण चाळीशी उलटल्यानंतर इब्राहिमाच्या

अंगांतली ही तडफ कमी होऊं लागली. त्यांतून त्याला गाण्याचा नाद लागून तो सरस्वतीपूजन करूं लागल्यामुळें त्याच्या पदरचे कडवे मुसलमान बरेच नाखुष झाले. या खेरीज "मलिकंबर व मोगल यांच्यामध्यें चालू असलेल्या युध्दांत इब्राहिमानें मलिकास सहाय करण्याचें जें धोरण बरींच वर्षें पत्करलें आहे त्यामुळें मलिकाचा अधिक फायदा होत आहे व तो अदिलशाहापेक्षां बलिष्ट होत चालला; यासाठीं मलिकाचा पक्ष सोडून विजापूरकरांनीं मोंगलाचा पक्ष स्वीकारावा आणि मलिकाचें जड होत चाललेलें पारडें हलकें करावें" अशी विचारसरणी प्रतिपादन करणारा एक पक्ष विजापुरास निर्माण झाला. तो इब्राहिमास सर्वस्वीं मान्य होता असें नव्हे तरी त्याचें मन मलिकाविषयीं कलुषित होत चाललें होतें, एवढें खरें. पण राजकीय व धार्मिक पक्षभेदांपेक्षां इब्राहिमाच्या जनानखान्यांतील भांडणांमुळें राज्यावर मोठें संकट ओढवणार असाहि रंग दिसूं लागला इब्राहिमाला चार बायका असून त्या चौघींनाहि मुलगे होते. यामुळें इब्राहिमाच्या मागून आपल्या मुलास आदिलशाही गादी मिळावी अशी अंतस्थ खटपट प्रत्येक मुलातर्फे सुरु झाली होती. या चार मुलांपैकीं वडील मुलगा दुरवेष याला गादी मिळावी असें इखलासखान वजीर व दियानतुल्मुल्क वगैरे प्रमुख सरदार यांना वाटत होतें. कांहीं वर्षें इब्राहिमाचेंहि मत असेंच होतें. पण पुढें पुढें त्याच्या मतांत फरक पडत चालला. तिसऱ्या बायकोचा मुलगा महमूद यास युवराजपद द्यावें व आपल्या मागें त्यानें विजापूरची गादी चालवावी असें त्यास वाटूं लागलें. अर्थात तें वडील बायकोला आवडण्याजोगें नव्हतें; आणि ती आपल्या मुलासच गादी मिळावी या प्रीत्यर्थ खटपट करूं लागली. याचें पर्यवसान असें झालें कीं तिच्यांत व इब्राहिमांत तेढ वाढली आणि 'आपणास मारून दुरवेषास गादीवर बसविण्याचा कट ही करीत आहे' असा संशय इब्राहिमास येऊं लागला. सारांश इब्राहिमाचें मन अनेक कारणांमुळें व्यग्र होऊन अंतस्थ आणि बाह्य राजकारणांत कोणत्या धोरणानें वागावें याविषयींचा त्याला निर्णय करतां येईना. दरबारांत तर कित्येक वर्षांपासून दोन समबल पक्ष अस्तित्वांत होते, व त्यांपैकीं एका पक्षास हाताशीं धरून इब्राहिमानें आपल्या जबाबदारीवर राज्ययंत्र चालविण्याचा शिरस्ता पाडला होता.यामुळें इब्राहिमाची हिंमत कमी पडूं लागली तेव्हांपासून

राजकीय पक्षभेद फारच विकोपास जाऊं लागले; व त्यांचा उच्छृंखलपणा आंवरून धरणारी शक्ति तर किंकर्तव्यमूढ बनत चालली. दिल्ली दरबारांत नूरजहान ही एकटी बाई सर्व सत्ताधारी बनली म्हणून जहांगिराचे मुलगे बंडें उभारूं लागले; आणि विजापुरास चारहि स्त्रिया एकसारख्याच सामर्थ्यवान असल्यामुळें त्यांच्या पुढारपणांखालीं कारस्थानांची उभारणी होऊं लागली; मिळून दोनहि ठिकाणीं चालू बादशहांच्या मागें कोणास तक्तावर बसविण्यांत यावें हा प्रश्न सर्वांत महत्वाचा होऊन बसला. मलिकंबराच्या मागें मात्र अशा प्रकारचें कोणतेंच लफडें नसल्यामुळें तो आपलें घोडें पुढें दामटण्यास कचरत नव्हता. आणि मलिकाचा हा अरेरावीपणा असह्य वाटूनच इब्राहिमानें मोगलाशीं मित्रत्वाचा तह केला व त्यांचे सैन्य घेऊन मलिकाशीं लढण्यास तो सिद्ध झाला. याचेंच पर्यवसान भातवडीच्या युद्धांत झालें.

**५ भातवडीचें युद्ध**—या भातवडीच्या युद्धाचा संबंध शहाजीच्या चरित्राशीं आहे याची जाणीव बखरकारांना होती. पण हें युद्ध केव्हां व कोणाकोणांमध्यें झालें या विषयींची त्यांची कल्पना अत्यंत अनैतिहासिक आहे. त्याचप्रमाणें मुसलमानी इतिहासकारांना हें युद्ध माहीत आहे पण त्यांत शहाजीचा संबंध होता हें त्यांनीं नमूद केलें नाहीं. सारांश मुसलमानी, मराठी व युरोपियन समकालीन आधारांचें एकसमयावच्छेदेंकरून अवलोकन करावें तेव्हां या युद्धाचें व शहाजीच्या पूर्वचरित्राचें खरें स्वरूप लक्षांत येतें. शके" १५४६ कार्तिक मासीं भातवडीस मोगलाचा सुभेदार लष्करखान व येदिलशाही मुला महमद यैसी दोन कटके मलिकअंबरे बुडविली" असा उल्लेख शिवशकावलींत आहे (शि. च. प्र. पृ. ५३). यावरून या युद्धाचें नांव व तीनहि सेनापतींचीं नांवें आपणांस समजतात. इकबलनाम्यांत या युद्धाचें विस्तृत वर्णन आहे; पण त्यांत मोंगलांच्या बाजूचीच हकीकत विशेष आहे. हें युद्ध अहमदनगरपासून पांच कोसांवर झालें; त्यांत प्रारंभींच विजापूरचा सेनापती मुल्ला महमद, अथवा महमद लारी हा मारला गेला; मोंगलांकडील जाधवराव व उदाराम यांनीं पळ काढला. शेवटीं इखलासखान वगैरे अदिलशाही अधिकारी कैद झाले, त्यापैकीं फराहादखान मलिकंबराचा जीव घेण्याच्या कटांत सामील असल्याच्या संशयामुळें त्याला देहान्तशिक्षा देण्यांत आली; मोंगलांचा सेनापती लष्करखान वगैरे सरदार मलिकंबराकडे पाडाव सांपडले; खंजरखान

अहमदनगराकडे, जानसिपारखान बीडकडे आणि इतर कांहीं बऱ्हाण-पुराकडे पळून गेले वगैरे तपशील इकबलनाम्यांत आहे.* विजापूरच्या इतिहासांत भातवडीचें नांव दिलेलें आहे; व मुल्ला महमद यास सरलष्कर हा किताब असल्याचें सांगितलें आहे.

या युद्धाच्या वेळीं 'पेड्रो डेला व्हाली,' हा इटालियन प्रवासी गोव्यास होता. त्यानें असें वर्णन दिलें आहे:—" इ. स. १६२४ आक्टोबर ३१ तारखेस गोव्यांत बातमी आली कीं मलिकंबर व आदिलशहा यांत बरेच दिवसापांसून युद्ध चाललें होतें त्यांत अखेरीस मलिकानें आदिल-शहाचा सेनापति मुल्ला महमद यास कैद केलें. या मुल्लानें मलिकास विष घालून मारण्याचा प्रयत्न केला होता; व याच्यामुळेंच आदिलशहा व मलिक यांच्यांत वैमनस्य आलें होतें. यासाठीं मलिकानें त्याचा शिरच्छेद करून त्याची धिंड काढली आणि 'या विश्वासघातकी मुल्लानें आदिल-शाही व निजामशाही राज्यांत वितुष्ट वाढविलें यासाठीं यास ठार करण्यांत आलें' अशी दवंडी पिटली. त्यांत मलिकाला असें भासावावयाचें आहे कीं मुल्लामहमदाच्या लुडबुडीनें आपणांस हत्यार उपसावें लागलें; एरव्हीं आदि-लशहाविषयीं आपल्या मनांत कांहीं वांकडें नाहीं. या युद्धांत मोंगलांनीं आदिलशाही सैन्यास २० हजार घोडेस्वारांची मदत पोंचविली होती अशी बोलवा आहे. मलिकानें विजापूरच्या वेशीपर्यंत मजल मारली असून अदिलशहावर किल्ल्यांत दरवाजे लाऊन बसण्याचा प्रसंग आला आहे. थोडया महिन्यांपूर्वी आदिलशहानें आपल्या बायकोस जिवें मारलें; कारण ती अंतस्थ रीतीनें मलिकाच्या कटांत सामील होती आणि तिच्या मनांतून आदिलशहास मारून आपल्या मुलास विजापूरच्या गादीवर बसवावयाचें होतें' (Travels of P. D V. pp. 442, 443 ) यावरून मोगली व विजापुरी इतिहास आणि युरोपियन प्रवाशांचीं व व्यापाऱ्यांचीं वर्णनें यांतून विश्वसनीय माहिती असली तरी ती मराठ्यांच्या उल्लेखाच्या दृष्टीनें कशी अपुरी पडते तें समजून येण्याजोगें आहे; आणि याच करितां शिवभारतासारख्या विशिष्ट ग्रंथांचा व मराठी कागदपत्रांचा आधार मिळाल्यावांचून शहाजी व शिवाजी यांचें चरित्र रेखाटतां येत नाहीं. वर सांगितलेलीं सर्व वर्णनें भातवडीच्या

---

* Elliot and Dowson vol VI P. 415

युद्धाची असून त्यांत शहाजीचें नांवहि नाहीं. पण शहाजीचें चरित्र सांगण्यासाठींच लिहिलेल्या शिवभारतांत शहाजीच्या व भोसल्यांच्या पराक्रमाचा उल्लेख स्वाभाविकपणेंच विस्तृत रीतीनें आलेला आहे. निजामशहाकडल्या २९, मोंगलाकडल्या १६ आणि विजापूरकराकडल्या ११ मिळून ५२ सरदारांचीं नांवें यांत दिलीं आहेत व मलिकाच्या सैन्यानें मोंगली व आदिलशाही सैन्यांचा पराभव केला हा भाग भारतकारानें सांगून भोसल्यांच्या पराक्रमाचें वर्णन करण्यास १०।१२ श्लोक स्वतंत्रपणें खर्ची घातले आहेत. मनचेहर नांवाच्या मोंगली सरदाराची भोसल्यांच्या सैन्याशीं गांठ पडली; त्यांत शरीफजी ठार झाला. पण शेवटीं भोसल्यांनीं या मोंगली सरदारांस पळवून लावलें असा या श्लोकांतील भावार्थ आहे. यावरून या युद्धांत शहाजीनें मलिकंबरापेक्षां पराक्रम केला असेल असें समजण्याचें कारण नाहीं. पण त्यानें या युद्धांत पराक्रम केला व तो लहान असो किंवा मोठा असो त्याची माहिती शहाजीच्या चरित्रांत येणें अवश्यक आहे. या दृष्टीनें भारतकारानें ती नमूद केली व आपणासहि शिवचरित्राच्या पूर्ततेसाठीं तिचा संग्रह करणें अवश्य आहे. नुस्तें शिवभारत आपणापुढें असतें तर हें युद्ध भातवडी गांवाजवळ झालें हें आपणांस समजलें नसतें; नुसत्या शकावलीवरून यांत शहाजीचा संबंध होता किंवा नाहीं याचा थांग लागला नसता आणि मुसलमानी तवारिखावरून व युरोपियन प्रवाशांच्या लेखांवरून या लढाईचे नांवगांव किंवा शहाजीचा संबंध यांपैकीं कशाचाच थांग लागला नसता. पण हे सर्व आधार मिळून आपणांस बरीच समाधानकारक माहिती मिळते.

६ शहाजीचें विजापुरास जाणें—मुसलमानी इतिहासांत भातवडीचें युद्ध असून त्याचा संबंध शहाजी चरित्राशीं असल्याचा संशय डफ अगर सरकार यांना कां आला नाहीं त्याचें दिग्दर्शन केलें. आतां विजापूरच्या इतिहासांत मुळींच न उल्लेखलेलें असें एक प्रकर्ण सांगावयाचें आहे. 'भातवडीच्या युद्धानंतर शहाजीचें भाऊबंदांशीं व मलिकाशीं वांकडें आल्यामुळें निजामशाही सोडून तो विजापूरकरांच्या आश्रयास आला; इब्राहिम आदिलशहाकडे त्यानें दोन वर्षें घालविलीं आणि इब्राहिमाच्या मृत्यूनंतर तो पुनः निजामशाहींत गेला' वगैरे मजकूर परमानन्दानें दिला आहे. तो विजापूरच्या इतिहासांत नाहीं. बखरकारांना ही गोष्ट ओझरती माहीत आहे; पण ती फारच विकृत स्वरूपांत

माहीत आहे; यामुळें डफ अगर सरकार यांना त्याचा पत्ताच लागला नाहीं. सरकार यांच्या मतें तर शहाजीचा खरा उदय मलिकंबराच्या मृत्यूनंतर फत्तेखानाच्या अमदानींत म्हणजे शके १५४९ नंतर झाला; त्यापूर्वी तो अगदीं ( petty chieftain ) किरकोळ सरदार होता. अर्थात त्याचा इब्राहिम आदिलशहाशीं संबंध असण्याचा प्रसंगच नाहीं. कै. राजवाडे यांनीं मात्र तंजावरच्या शिलालेखाच्या आधारें शहाजी इब्राहिम आदिलशहाच्या कारकीर्दींत विजापुराकडे गेला वगैरे हकीकत राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेंत दिली आहे. आणि आतां या शिलालेखालाहि आधारभूत अशी शिवभारतांतली विश्वसनीय हकीकत आपणास मिळाली आहे तिची सत्यता शिवाजी महाराजांनीं मालोजी घोरपड्यास लिहिलेल्या एका पत्रानें आपणास पारखतां येण्याजोगी आहे. हें पत्र कै. राजवाडे यांनीं सरस्वतिमंदिरांत छापलें होतें. त्यांत शहाजीच्या चरित्राचें सार महाराजांनीं समजाऊन सांगितलें आहे; प्रस्तुत मुद्याचा त्यांत स्पष्टपणें निर्देश आहे, याकरितां त्याचें अवतरण येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं.*

शिवाजीमहाराज मालोजी राजे घोरपडे यांस लिहितात:—

' पूर्वीं निजामशाहीतून आमचे बाप कैलासवासी महाराज इभराईम आदिलशहा पादशहाचे कारकीर्दीस इकडे आले. त्यास इभराईम आदिलशहानें पादशाही कारभाराचा मदार महाराजाचे सिरी टाकिला. तेव्हां महाराजानें हा विचार केला कीं “ पादशाही मदार आपले हातास आला असतां आधीं तो आपले जातीचे लोक मराठे याला हातीं धरून सरदारकी करून पोटें भरतात ते पादशाही वजीर करावे. पादशाही कामें याजकडून करवून नामोश होय, इज्जती थोर पावेत तें करावें. ” म्हणून तुमचे बाप बाजी घोरपडे सरदारकी करून होते ते आणून पादशहास भेटऊन पादशाही वजीर केलें. त्या दिवसापासून तुमच्या बापाच्या हातें व तुमच्या हातें पादशाहीचीं कामें होत आलीं. पादशाहानीं तुमचें चालविलें. ऐशा तीन पिढ्या पादशाहाच्या, दोनी पिढ्या तुमच्या जाल्या. ऐशियास, महाराजानें तुमच्या बापास इतकें बरें केलें हें

* हें अस्सल पत्र उपलब्ध नसून कै. राजवाड्यांना नक्कल पहाण्यास मिळाली होती. त्यांत क्वचित शब्दांचें आधुनिकीकरण असेल.

स्मरण न धरून, जेव्हां कांहीं मुस्तफाखानानें महाराजास दस्त करविले तेव्हां तुमचे बाप बाजी घोरपडे हमी होऊन महाराजास दस्त करून मुस्तफाखानाचे हाती दिल्हे. त्या दिवसापासून तुमच्या घराणियाचा व आमच्या घराणियाचा दावा वाढत चालिला" इत्यादि.

यावरून इब्राहिम आदिलशहाच्या कारकीर्दींत शहाजी विजापूरकरां-कडे गेला व त्यावेळीं त्याच्या मनांत मराठे सरदारांना वजीरी ह्मणजे महत्त्वाचें स्थान मिळवून देण्याचें होतें आणि त्याप्रमाणें घोरपड्यांना त्यानें महत्त्वाचें पद मिळवून दिलें वगैरे गोष्टी आपल्या लक्षांत येतात.

भातवडीच्या युद्धा नंतर मलिकंबरानें थेट विजापुरापर्यंत चाल केली आणि इब्राहिमानें मोठ्या हौसेनें वसविलेलें 'नौरसपूर' जाळून लुटून उध्वस्त करून टाकलें. यामुळें इब्राहिमाचें मन मलिकंबरासंबंधीं फारच विटून गेलें. यापूर्वींच महमद अमीन उर्फ मुस्तफाखान याला तर मलि-काचा सूड घेण्या वाचून दुसरा विचारच सुचेनासा झाला होता. कारण भातवडीच्या युद्धांत कैदी म्हणून सांपडलेला मुल्ला महंमद सरलष्कर यास मलिकंबरानें धिंड काढून फाशीं दिलें होतें; तो मुल्ला या मुस्तफाखानाचा सासरा होता. अशा स्थितींत शहाजी मलिकंबरावर रुसून निजामशाही सोडून विजापुराकडे आला. यामुळें इब्राहिम, मुस्तफा व शहाजी या तिघांना मलिकाचा सूड घेण्याची इच्छा होऊन, समान शत्रुत्वामुळें हे तिघे तात्पुरते स्नेही बनले. परंतु त्यांच्या दुर्दैवानें मलिकंबर १५४८ च्या वैशाख व॥ १२स एकाएकीं मरण पावला. या मरणानें निजामशाहीविरुद्ध लढण्यासाठीं केलेली विजापुरांतील तयारी निरर्थक ठरण्याची वेळ आली. तेव्हां शहाजीला सैन्यासह कर्नाटकच्या व केरळ प्रांताच्या स्वारीवर पाठविण्यांत आलें असावें असें भारतांतील उल्लेखावरून वाटतें. ही स्वारी आटपून शहाजी परत विजापुरास आला तेव्हां इब्राहिम आजारी पडून मृत्युपंथास लागला होता व आपल्या मागें वडील मुलगा दुरवेष यानें गादीवर न बसतां तिसरा मुलगा महमुद यानें बसावें; आणि इखलासखानाऐवजीं महंमद अमीन व दौलतखान यांनीं कारभार पहावा असें इब्राहिमानें मरतांना ठरविलें.

**७. इब्राहिम आदिलशहाचा मृत्यु**—इब्राहिम अदिलशहाच्या मृत्युका-लासंबंधानें बराच मतभेद आहे. Ibrahim Adil Shah of Beeja-

pur did not survive Mullik Umber above a year (p. 82) म्हणजे 'मलिकंबराच्या मागें इब्राहिम अदिलशहा एक वर्षापेक्षां अधिक दिवस जगला नाहीं.' असें डफ म्हणतो. प्रो. सरकार यांनीं १६२६च्या मे १४ तारखेस मलिकंबर* मेला व त्यानंतर चारच महिन्यांनी सपटेंबर २२ तारखेस इब्राहिम मेला (मॉ. रि. १९१७ सपटं. पृ.२४७) असें लिहिलें आहे; आणि पुढच्या पृष्ठावर (पृ. २४८) टिपेंत B. S. gives 12 Sep. 1627 as the date, but it is inconsistent with other parts of the same work असा शेरा मारला आहे. पण प्रो. सरकार या ठिकाणीं चुकले असून (B S.) बुसातिने सलातिन कारानें दिलेली तारीखच बरोबर आहे असें म्हणणें भाग आहे. कारण बु. स. कारानें या मितीस जो वार दिला आहे त्याचा मेळ इ.स.१६२७ शीं बसतो; १६२६ शीं बसत नाहीं. पण याहिपेक्षां महत्त्वाचा पुरावा असा आहे कीं इब्राहिम अदिलशहाच्या थडग्यावर त्याच्या मृत्यूचा हिजरी सन 'अबजद' पद्धतीनें कोरलेला आहे. त्यावरून इब्राहिमाच्या मृत्यूचा इसवी सन १६२७ हाच आहे असें ठरतें. याखेरीज कुंदगोळ येथील देसायांच्या संग्रहीं असलेल्या एका विश्वसनीय अशा शकावलींत इब्राहिमाच्या मृत्यूची तिथी शके १५४९ भाद्रपद शु. १२ अशी दिली आहे. सारांश प्रो. सरकार यांचें मत यासंबंधीं ग्राह्य धरतां येण्याजोगें नाहीं.

८. **सुलतान महमूदाचें राज्यारोहण**-इब्राहिम अदिलशाहा जहाल मुसलमानी पंथाचा नसल्यामुळें त्याच्या कारकीर्दीचे गोडवे गाण्यास मुसलमानी लेखक व ग्रंथकार मनापासून तयार नव्हते. परंतु महमुदाच्या कारकीर्दीत कडव्या मुसलमानी पक्षाची बरीच सरशी होती. इब्राहिमाच्या तालमींत वाढलेल्या जुन्या मुत्सद्यांचा व या नव्या मताच्या लोकांचा जम बसण्याजोगा नव्हता. इब्राहिम मेला त्याच दिवशीं या दोनहि पक्षांचा खटका उडण्याचा प्रसंग आला. त्याची हकीकत बुसातिने सलातीन नांवाच्या विजापूरच्या इतिहासांत दिली आहे. शहाजीच्या चरित्रांतील हा एक महत्त्वाचा प्रसंग असल्यामुळें त्याची माहिती येथें नमूद करून ठेव-

* याची तिथि शिवशकावलींत दिलेली आहे. [शि. च. प्र. पृ. ५४ पहा.]. इकबलनाम्यांत अर्दिबिहिस्त महिन्याची ३१ वी तारीख सांगितली आहे (इ. व्हा. ६ पृ. ४२८) व प्रो. जदुनाथ सरकार यांनीं १४ मे १६२६ अशी तारीख मलिकाच्या मृत्यूची दिली आहे. (मॉ. रि. १९१७ सपटं. पृ. २४८).

ण्यास हरकत नाहीं. इब्राहिमाचें प्राणोत्क्रमण झालें तेव्हां मिरजा महंमद अमीन व दौलतखान हे दोघे जवळ होते. त्यानीं ती बातमी गुप्त ठेऊन दरवाजे बंद केले आणि लोकांना येण्याजाण्यास फक्त दिंडीची वाट ठेवली. नंतर एकलासखान, दियानतुल्मुल्क व कांहीं ब्राह्मण मुत्सद्दी यांना एकेकांना बोलाऊन आणून दिवाणखान्यांत बसविलें; आणि मुख्य मुत्सद्दी मंडळी जमा झाल्यावर खोजानें तेथें येऊन असें जाहीर केलें कीं, 'इब्राहिम पातशहानीं हुकूम केला आहे कीं आमच्या मागें सुलतान महंमद यास तक्तावर बसवावें." हें ऐकून दियानतुल्मुल्क म्हणाला, "थोरला मुलगा दुरवेष हा हयात असतां, धाकट्यास तक्तावर कसें बसवितां येईल ? डोकीचें पागोटें गुडघ्यास कसें घालावें ?" हे शब्द ऐकून दौलतखानानें चार शिव्या हसडल्या आणि चिडून "तुला कोणीं विचारलें आहे; तूं गप्प बैस" असें म्हणून दियानतास दबकावलें. नंतर मुख्य वजीर एखलासखान याजकडे वळून "पुढें काय करावें" असा दौलतखानानें प्रश्न टाकला. तेव्हां तो वजीर उडवाउडवी करून म्हणाला "मला यापुढें वजीरीचें काम करावयाचें नाहीं. तेव्हां मला दोघेहि शहाजादे सारखेच आहेत. बडे साहिबिणीस विचारून काय तें करणें बरें, असें मला वाटतें." त्याबरोबर दौलतखान रागारागानें बडे साहिबिणीच्या महालांत गेला. तेव्हां ती म्हणाली "पादशहानीं सांगितलें आहे त्याप्रमाणें तुम्हीं करावें." ही पडत्या फळाची आज्ञा मिळतांच मिरजा महमद व दौलतखान यांनीं सुलतान महमूद यास तक्तावर बसविलें. त्याच वेळीं एखलासखान यास निरोप देऊन इतर मुसलमान व ब्राह्मण मुत्सद्दी यांना दरबारांत बसल्या जागीं कैद केलें. नंतर इब्राहिमाचें प्रेत बाहेर काढून जोरापूरच्या रोजांत नेऊन पुरलें. तथापि वडील मुलाच्या नांवानें बंडाळी माजण्याचा संभव आहे असें वाटल्यामुळें महमद अमीन व दौलतखान यांनीं वडील शाहाजाद्याच्या डोळ्यांत सळई फिरवून त्याला आंधळें केलें आणि इतर दोन भावांच्या हातांचीं, अंगठी घालण्याचीं, बोटें तोडून टाकलीं. अशा प्रकारें बंदोबस्त केल्यानंतर कैद केलेल्या बऱ्याच मुत्सद्यांना बंधमुक्त करण्यांत येऊन किताब देण्यांत आले. त्यावेळीं मिरजा महमद अमीन याला 'मुस्तफाखान' व दौलतखान याला 'खवासखान' असे किताब मिळाले. मुस्तफा व खवास हे दोघे खान या वेळेपासून विजा-

पूर दरबारांत प्रमुखपणें वावरूं लागले; आणि या दोघांचाहि संबंध शहाजी चरित्राशीं वारंवार येणार असल्यामुळें त्यांचीं नांवें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

९. शहाजीचा अपमान—इब्राहिमाच्या मृत्यूनंतर महमूद गादीवर बसला तेव्हां प्रधानमंडळांत कशी बदलाबदल झाली व ब्राह्मण मुत्सद्यांवर कैदेचा प्रसंग कसा आला वगैरे हकीकत लक्षांत घेतली असतां शहाजीला या सुमारास आदिलशाही दरबार सोडावा लागला याचें आश्चर्य वाटत नाहीं. नवी अमदानी सुरू होतांच सर्व उलथापालथ झाली; त्याबरोबर शहाजीलाहि दरबार सोडणें किंवा अपमान सोसून दरबारांत राहणें यांपैकीं एक मार्ग पत्करणें भाग होतें. पैकीं पहिला मार्ग त्यानें पत्करला असें भारतकार सांगतो. पण शहाजीचा अपमान महमूदानें कोणत्या प्रसंगीं केला याचा तपशील तो देत नाहीं. या प्रसंगाची आठवण म्हणून महमूदाच्या तोंडीं भारतकारानें हे शब्द घातले आहेत.

पूर्वमस्यैवावलंबाद्भिरामः पिता मम ।
विध्वस्ताराातिरध्यास्त निर्विशंकः स्वमानसम् ॥ १६/१६
सहसावमतः सोऽयं मतिमंदतया मया ।
मामुपेक्ष्य गतो मानाद्भिरामादनंतरम् ॥ १६/१७

यावरून महमूदाच्या हातून शहाजीचा कांहीं अपमान झाला म्हणून त्याला विजापूर दरबार सोडणें भाग पडलें हें उघड आहे. तथापि शहाजी १५४९ च्या फाल्गुनापर्यंत विजापूर दरबारांतला 'सरलष्कर' म्हणजे सेनापति या नात्यानें वावरत होता व निजामशाहीतर्फे विजापूरकरांविरुद्ध मोहीम करण्यांत आली तेव्हां शहाजीनें पुण्याच्या बाजूस स्वारी करून तो परगणा कबज केला असें खं. १५ ले. २३० वरून म्हणतां येतें. यानंतर

प्रतनेनानुबंधेन निजामोपाचिकीर्षया ।
शाहराजो महाबाहुर्विजयाह्वं पुरं जहौ ॥ ६/८

असें शिवभारतकार म्हणतो; त्यावरून शहाजहानाचें सैन्य दक्षिणेंतील राज्यें बुडविण्यासाठीं येणार असें दिसतांच 'निजामशाही बुडूं नये' अशी आस्था शहाजीच्या अंतःकरणांत असल्यामुळें त्यानें विजापूरचा आश्रय सोडला असें म्हणावें लागतें.

**१०. शहाजीचें निजामशाहींत पुनरागमनः**—शहाजी अदिलशाहीचा आश्रय सोडून परत निजामशाहींत आल्यानंतर त्यानें तेथें काय काय उलाढाली केल्या हें कळण्यास चांगलेंसें साधन उपलब्ध नाहीं. या वेळच्या निजामशाही कारभारांत हमीदखान व फत्तेखान यांचीं नांवें प्रामुख्यानें येत असून खानजहान लोदी व दर्याखान या दोन बंडखोरांचा संबंध शहाजी-चरित्राशीं येतो. यामुळें या चार मुसलमानी सरदारांची माहिती बारकाईनें मिळाली तर शहाजीच्या या वेळच्या हालचाली समजण्यास चांगली मदत होणार आहे. 'मलिकंबराच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा फत्तेखान निजामशाही कारभार पाहूं लागला; पण निजामशहास त्याची वागणूक पसंत न पडल्यामुळें त्यानें फत्तेखानास कैद करून खैबर ( जुन्नर ? ) येथें अटकेंत ठेवलें; तेथून त्यानें आपली सुटका करून घेतली. पण निजामशहानें त्याला पुनः पकडून दौलताबादच्या किल्ल्यांत ठेवलें; पुढें निजामशहानें कांहीं कालानें त्याची सुटका करून त्याजकडे कारभाराचीं सूत्रें सोंपविलीं. परंतु निजामशहाच्या लहरी स्वभावामुळें आपणावर पुनः कैदेचा प्रसंग येईल अशी फत्तेखानास भीति वाटत असल्यामुळें त्यानें निजामशहासच कैदेंत टाकलें आणि ही हकीकत त्यानें गुप्तपणें शहाजहानाकडे कळविली. शहाजहानानेंहि फत्तेखानाची पाठ थोपटून निजामशहास ठार मारून टाकण्याची सल्ला दिली; व त्याप्रमाणें फत्तेखानानें बुऱ्हाण निजामशहास ठार मारलें.' अशी हकीकत बीलनें दिली आहे. ( पृ. १३२ ). परंतु फत्तेखानानें बुऱ्हाणास ठार मारल्याचा काळ बीलनें इ. स. १६२८ दिला आहे तो ग्राह्य दिसत नाहीं. प्रो. सरकार यांनीं ही गोष्ट १६३२ च्या फेब्रुवारींत झाली असावी असें सुचवून त्या मागें संशयनिदर्शक प्रश्नचिन्ह घातलें आहे ( मॉ. रि. १९१७ सप. पृ. २४७ ); त्याअर्थीं त्यांना या बाबतींत संशय आहे हें उघड आहे. शिवशकावलींत शके १५५३ मध्यें फत्तेखानानें बुऱ्हाण निजामशहास मारलें ( शि. प्र. पृ. ५४ ) असें म्हटलें आहे त्याचा, प्रो. सरकार यांच्या म्हणण्याशीं, मेळ बसण्याजोगा आहे. त्याचप्रमाणें शके १५५१ च्या पौषांत फत्तेखान कैदेंतून सुटला हेंहि शकावलींतील विधान प्रत्यंतर पुराव्यानें सुसंगत ठरत आहे ( पोर्तुगीज अप्रकाशित कागद ). मात्र जाधवरावाचा खून १५५१ च्या श्रावण शुद्ध १५ स झाला असें शकावली म्हणते आणि प्रो. सरकार यांच्या मतें

हा खून इ. स. १६३० च्या जूनमध्यें (म्हणजे शके १५५२ मध्यें) झाला; पण खुद्द सरकार यांनींच आपण दिलेल्या मितीबद्दल संशय प्रकट केला आहे. त्याचप्रमाणें फत्तेखानाची सुटका आधीं झाली कीं जाधवरावाचा खून आधीं झाला हाहि प्रश्न अद्याप वादग्रस्त आहे. डफनें खाफीखानाच्या आधारावर असें विधान केलें आहे कीं "निजामशहानें तकरीबखानाच्या मदतीनें फत्तेखानास कैदेंत टाकलें; तेव्हां लुखजी जाधवराव निजामशाहींत येण्यास तयार झाला" ( आवृत्ति ४; व्हा. १ पृ. ८९ ). असो. सध्यां जे आधार उपलब्ध आहेत त्यांवरून शहाजीच्या या वेळच्या हालचाली सांगतां येतात त्या अशा.

शहाजी निजामशाहींत आल्यावर शके १५५० च्या श्रावण भाद्रपदापूर्वीं त्याला पुणें परगण्याचा मोकासा मिळाला ( खं. १५ पृ. ४३६; आणि खं. २० पृ. ३४६ ).

या वेळीं निजामशाही व आदिलशाही सैन्यांत वारंवार चकमकी झडत असून कधीं निजामशाही सरदारांचा जय होई तर कधीं आदिशाहीचा होई. निजामशाहीचीं सूत्रें हमीदखानाच्या हातीं असून त्यानें उत्तरेकडील मोंगलांची बाजू ( लोदीला पैसे चारून ) निर्धास्त बनविली होती. यामुळें विजापूरकरांशीं कुरापत काढण्याला तो भीत नव्हता. परंतु शहाजहानानें लोदीला दक्षिणेंतून आग्र्याकडे बोलावलें व 'त्यानें दिलेला मुलूख आमचा आम्हांस परत द्या' असा निजामाकडे तगादा पाठविला, तेव्हां हमीदखानाचें धाबें दणाणलें. या वेळीं मोंगलाशीं वरपांगीं नरमाईचें बोलणें ठेऊन 'ठिकठिकाणच्या सुभेदारांनीं किल्ले मोंगलांच्या ताब्यांत देण्याच्या कामीं टाळाटाळी करावी' अशी व्यवस्था हमीदखानानें अंतस्थ रीतीनें केली होती. आणि मोंगली सैन्य बीडचा किल्ला घेण्यासाठीं आलें तेव्हां फत्तेखानानें शहाजीच्या हाताखालीं ६ हजार घोडेस्वार देऊन पूर्वखानदेशाकडे पाठविलें, त्यांत त्याचा हेतु मोंगली सैन्यास तिकडून पायबंद बसावा हा होता. पण तेथें दर्याखान रोहिला नांवाचा मोंगली सरदार होता त्यानें या निजामशाही सैन्यास तापी व पूर्णा यांच्या दुआबांतून हाकून दिलें. ही हकीकत इ. स. १६२८ ( शके १५५० ) मध्यें घडली असें प्रो. सरकार पादिशाहनाम्याच्या आधारें ह्मणतात ( मॉ. रि. १९१७ सप. पृ. २४८ ). यानंतर निजामशहानें फत्तेखानास कैदेंत टाकलें व

जाधवराव निजामशाहींत आला व मारला गेला. त्यावेळीं शहाजी परां‑ड्यास होता. त्याला सासरा मारला गेल्याची बातमी कळतांच तो संगम‑नेरावरून पुण्याच्या बाजूस आला व तेथें आदिलशाही मुलखास त्याच्या हातून कांहीं उपसर्ग पोंचला. तेव्हां विजापुराहून खवासखानानें मुरार‑पंताबरोबर कांहीं सैन्य देऊन पुण्याकडे रवाना केलें. शहाजीची स्थिती या वेळीं पंचाइतीची होती. निजामशाहींत जाधवराव मारला गेल्यापासून फारच अव्यवस्था माजली होती; आणि निजामशाही दरबारांतील जाधवरावाच्या शत्रूंनीं शहाजीवरहि हात टाकिला असता. यामुळें 'मुरार जगदेवाच्या हाताखालच्या विजापुरी सैन्याशीं लढण्यास लागावें तर त्याच वेळीं निजामशाही दरबारांतील मुत्सद्यांना आपणाविरुद्ध डाव साधण्यास आयती संधी मिळणार' असा विचार करून शहाजी शिव‑नेरीच्या किल्लेदाराकडे आश्रयार्थ गेला. (हिं. बु. पृ. ४४१). इकडे मुरारपंतानें पुणें, इंदापूर वगैरे शहाजीच्या जहागिरीच्या प्रांतांत शिरून त्यानें पुणें तर जाळून टाकलें आणि भुलेश्वरानजीक दौलतमंगळचा किल्ला बांधून तेथून प्रांताची व्यवस्था तो पाहूं लागला. शहाजीनें शिवनेरीस जाऊन विजयराज नांवाच्या तेथील सरदाराची मुलगी जयन्ती इचें आपला मुलगा संभाजी याजबरोबर लग्न केलें. हा लग्नसमारंभ आटोपल्यानंतर आपल्या गरोदर पत्नीस ह्मणजे जिजाबाईस व्याह्याच्या संमतीनें शिवनेरीस ठेऊन शहाजी दर्याखानावर स्वारी करण्यासाठीं निघाला. (शि. भा. अ. ८ श्लो. १७।१८).

११. **दर्याखान**-दर्याखानाची विशेष हकीकत शिवभारतांत दिलेली नाहीं. परंतु बादशाहनाम्यावरून या सुमारास दर्याखानावरची मोहिम चालू होती एवढें निश्चितपणें ह्मणतां येतें. या वेळच्या शहाजीच्या हालचालीची हकी‑कत बादशहानाम्यावरून अशी दिसते. सासऱ्याचा खून झाल्यावर शहाजी पुण्याकडे गेला, तेव्हां आदिलशाही व निजामशाही या दोनहि राज्यांत आतां आपणास आश्रय मिळणार नाहीं हें त्याच्या ध्यानांत आलें आणि त्यानें मोंगलांच्या आश्रयास जाण्याचा विचार केला. या वेळीं मोंगलांचा सेना‑पति अजमखान हा, लोदी व दर्याखान यांच्या शासनार्थ, निजामशाही राज्याच्या सरहद्दीपर्यंत आला होता. ही संधि साधून "बादशाही आश्रय मिळत असेल तर मी तुमच्याकडे येतों" असें शहाजीनें अजमखानाकडे सांगून

पाठविलें. खानानें शहाजहानाकडे ही हकीकत कळविली; तेव्हां बादशाही फर्मान पाठविण्यांत आला. त्याप्रमाणें शके १५५२च्या पावसाळ्यानंतर अश्वीन महिन्यांत शहाजी अजमखानाच्या भेटीस गेला. तेथें त्याला पंचहजारी मनसब, खिलत, रोख दोन लाख रुपये वगैरे देण्यांत आले. याच वेळीं शहाजीचा भाऊ मीनाजी (मालोजी ?) याला तीन हजारांची मनसब देण्यांत आली. शहाजीचा मुलगा संभाजी यालाहि पोषाख, दोन हजारांची मनसब व १००० स्वारांची तैनात देण्यांत आली. सारांश यावेळीं भोसले मंडळी मोंगलांना मिळाली व त्यांची सरदारी त्यांनीं पत्करली. (इ. व्हा. ७ पृ. १९).

या सुमारास खानजहान लोदी व दर्याखान हे बंडखोर, निजामशाहीच्या आश्रयास येऊन राहिले होते ते मोंगली सैन्याची बातमी ऐकून, दौलताबादेहून निघाले. पैकीं दर्याखानानें एक हजार अफगाण शिपायांची टोळी घेऊन चांदोरच्या रोखानें कूच केलें; त्यांत त्याचा हेतु अंदोल व धरणगांव येथील मोंगली ठाण्यांवर हल्ला करावा असा होता. मोंगली सेनापतीनें हा रोख ओळखून अबदुल्लाखानाकडे दर्याखानाच्या पाठलागाचें काम १५५२ च्या मार्गशीर्षांत सोंपविलें. अबदुल्लाचें सैन्य जवळ येत चाललेलें पाहून दर्याखान बालाघाटाकडे वळला. तेव्हां अबदुल्लानें धारूर, आंबेजोगाई या बाजूनें घाट चढून अहमदनगरपासून वीस कोसांवर असलेलें धामणगांव गांठलें. नंतर जामखेडकडे वळून मांजरा नदीच्या कांठीं धारूरपासून बारा कोसांवरच्या एका खेड्यांत मोंगली सैन्य पोंचलें. तेव्हां 'दर्याखानाचे हस्तक बीडकडे गेले आहेत' असें अजमखानास समजलें. त्यावरून खानानें शहाजीला जुन्नर संगमनेरची बाजू हस्तगत करण्यास रवाना केलें; आणि आपण पडदुराकडे निघाला. (इ. व्हा. ७ पृ. १६।१७).

हा दर्याखान शेवटीं १५५२ च्या पौषांत बुंदेलखंडांत मारला गेला. अशा रीतीनें मोंगलांनीं दर्याखानाचा जो पाठलाग केला त्या स्वारींत शहाजी होता हें बादशाहनाम्यावरून ठरतें. परंतु त्या संबंधीची तपशीलवार माहिती यावरून मिळत नाहीं. शिवभारतांत देखील

दर्याखानं शरैर्भित्वा नीत्वा निरवलेपताम् ।
विजयी शाहराजोऽपि शिवंगिरिमथाव्रजत् ॥

अ. ६ श्लो. ९२.

असा उल्लेख आहे. त्यावरून दर्याखानाशीं शहाजीची चकमक झडली; त्यांत खान जखमी होऊन त्याचा गर्वपरिहार झाला; तेव्हां शहाजी शिवनेरीस परत आला असें दिसतें. परंतु दर्याखानावरची मोंगली स्वारी संपल्यानंतर शहाजी शिवनेरीस आला कीं एक दोन महिने आधीं आला याचा निर्णय करण्यास साधन मिळत नाहीं. बालशिवाजीचें उपवेशन व अन्नप्राशन हे संस्कार झाल्यानंतर शहाजी शिवनेरीस आला असें भारतकार म्हणतो. अन्नप्राशनसंस्कार सहाव्या महिन्यांत करण्याचा पांरपाठ आहे. त्यावरून शहाजी परत आला तो १५५२ च्या भाद्रपदानंतर आला एवढें म्हणतां येईल; पण नंतर किती महिन्यांनीं हें सांगतां येत नाहीं. तथापि ठोकळ मानानें आश्वीनापासून पौषापर्यंत केव्हां तरी आला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१२. **निजामशाहीतील अंदाधुंदी**—शके १५५१च्या अश्विनांत लोदी आग्र्याहून पळाला तो १५५२च्या माघ शुद्ध २ रोजीं मारला जाई पर्यंत मोगलांना साक्षत् निजामशाहिवर शस्त्र धरण्यास फुरसत मिळाली नाहीं. परंतु या बंडखोरास निजामशाही राज्यांत आश्रय देण्यांत आला होता, त्या अर्थीं मोंगलांना फुरसत मिळतांच ते निजामशाहीवर चाल करून येणार हें उघड दिसत होतें. आणि ही मोहीम आली म्हणजे मोगलाशीं सामना करण्याचें सामर्थ्य निजामशाहींत नसल्यामुळें निजामशाहीच्या आश्रयानें राहणाऱ्या सरदारांची धडगत नाहीं असें वाटून जो तो पुढें काय करावें या विवंचनेंत पडला होता. आदिलशाही व निजामशाही सरदार एकमेकाशीं झगडून क्षीण होत चालले होतेच; पण त्या खेरीज दोनहि दरबारांतील मुत्सद्यांत मोगलांशीं कोणत्या धोरणानें वागावें या मुद्यावर तीव्र मतभेद माजला होता. निजामशाही दरबारांत फत्तेखानाचा कल मोगलांशी स्नेह राखण्याकडे होता, यामुळें त्याला कैदेंत टाकण्यांत आलें. नंतर जाधवराव निजामशाहींत आला. परंतु 'तो निजामशाहीतली अंतस्थ परिस्थिती पहाण्यासाठीं आला असून तो पुनः मोगलांकडे जाणार' अशी कुजबुज निजामशहाच्या कानीं पडल्यावरून त्याला कैद करण्याचा विचार कायम झाला. त्यांत शेवटीं जाधवराव ठार झाला व शहाजी मोंगलांना मिळाला; आणि ही बेबंदशाही पाहून विजापूरकरांचें सैन्य पुण्यावरून दौलतमंगळपर्यंत

आलें व त्यानें तळकोंकणहि हस्तगत करण्यास सुरुवात केली. 'फत्तेखानास कैदेंत टाकल्यामुळें हा सर्व घोंटाळा माजला व आतां त्याच्यावाचून निजामशाही राज्यास कोणी त्राता नाहीं' असें याकूतखान व उदाजीराव या वजनदार सरदारांनीं निजामशहास स्पष्टपणें बजावलें. मोंगलांकडूनहि फत्तेखानास कैदेंतून सोडण्याविषयीं लिहून आलें होतें. यामुळें मोंगलांची ब्याद टाळण्यासाठीं निजामशहानें फत्तेखानास सोडून त्याच्या हातीं राजकारणाचीं सूत्रें दिलीं. या सुटकेचें श्रेय अर्थातच मोंगलांना होतें. आणि फत्तेखानानें त्यांच्याशीं उघड रीतीनें तहाचें बोलणेंहि लावलें. तथापि निजमशाहींतल्या बऱ्याच मुत्सद्यांना फत्तेखानाचें हें धोरण पसंत नव्हतें. यामुळें त्यांच्या सल्ल्यावरून 'निजामशहाचें मन बदलून तो आपणास केव्हां कैद करील याचा नेम नाहीं' अशी शंका फत्तेखानास वाटूं लागली. तेव्हां निजामशहास वेड लागलें आहे अशी सबब पुढें करून फत्तेखानानें त्याला प्रतिबंधांत ठेवलें आणि शेवटीं तो कैदेंत मरण पावला किंवा मारला गेला.

१३. आदिलशाही दरबारांतील पक्षभेदः-निजामशाहीप्रमाणें आदिलशाही दरबारांतहि मोंगली संकटामुळें मुत्सद्यांचें धाबें दणाणून गेलें होतें. शहाजहान गादीवर बसल्यानंतर त्यानें आपला वकील शेख मोइनुद्दीन हिजरी १०३८ मध्यें (श. १५५०) विजापुरास पाठविला. तेव्हां त्या वकीलानें विजापूरकरांशीं दोस्तीचा तह करण्याविषयीं बोलणें लावलें. "निजामशाही बुडवून त्यांचा अर्धा मुलूख विजापूरकरांनीं व अर्धा मुलूख मोगलांनीं घ्यावा" अशा अर्थाचा तह करण्याची मुस्तफाखानाची इच्छा होती; आणि त्याच्या भिडेखातर खवासखान, मुरारराव व रणदुल्लाखान हे या मसलतीस हो म्हणत. परंतु हें धोरण आत्मघातकीपणाचें आहे व तें अमलांत येऊं नयें असें त्यांच्या मनांत होतें. रणदुल्लाचा वकील काजी सैद यानें तर महमूद आदिलशहास भरदरबारांत असें सांगितलें कीं "निजामशाही राज्य बुडवून आदिलशाही वाढविण्याची कल्पना अगदीं चुकीची आहे. कारण निजामशाही राज्याची पाचर नाहींशी होतांच मोंगलांचें सैन्य थेट आदिलशाहीवर हल्ला करूं शकेल." या भाषणाबद्दल मुस्तफाखान काजी सैद यावर फार रागावला; व बरीच बोलाचाली झाली. परंतु शेवटीं मुस्तफाच्या इच्छेप्रमाणें मोंगलांशीं तह करण्याचा विचार कायम होऊन

मोगलाचा वकील शेख मोइनुद्दीन याजबरोबर आदिलशाही सैन्य रवाना करण्यांत आलें. इतक्यांत विजापुरास अशी बातमी आली कीं मोगलांनीं तह व करारमदार बाजूस ठेऊन विजापूरच्या राज्यावरच आपलें सैन्य रवाना केलें व तें केसदारूरपर्यंत (!) येऊनहि पोंचलें! मोगलांची ही दगाबाजी ऐकून आदिलशाही दरबारांतील मुस्तफाचें वजन एकदम संपुष्टांत आलें व खवासखान उघडपणें मुस्तफाखानाशीं विरोध करूं लागला. महमूदशहानेंहि खवासखानाचा सल्ला मान्य करून मोंगलांचा वकील शेख मोइनुद्दीन यास कैद करविलें. अशा रीतीनें विजापूर दरबारांत मुस्तफाचा अधिकार लुप्त होऊन खवासखान व त्याचा हस्तक मुरारपंत यांची कारकीर्द सुरु झाली. ती सात वर्षें टिकली. त्यांत प्रारंभापासून निजामशाही व आदिलशाही सैन्यानें एकजुटीनें मोंगलास अडविण्याच्या धोरणास प्राधान्य देण्यांत आलें होतें. आणि श. १५५२ अखेर मोंगलांनीं परांड्यास वेढा दिला तेव्हां या धोरणानुरुप आदिलशाही व निजामशाही सैन्यानें जुटीनें मोगलाशीं टक्कर देऊन त्यांना परांड्याचा वेढा उठविणें भाग पाडलें (इ. व्हा. ७ पृ. २३).

१४. **दुष्काळ**—निजाम, अदिल व मोंगल या तीन शाह्यांमधील युद्धाची धुमश्चक्री चालली असतां दैवी आपत्तींनीं देखील याचवेळीं आपलें भयंकर स्वरूप प्रकट केलें. शके १५५१ व १५५२ या दोन सालांत निजामशाही राज्यांत व गुजराथेंत अवर्षणामुळें फार मोठा दुष्काळ पडला. या दुष्काळाचीं वर्णनें समकालीन कागदपत्रांतून, युरोपियनांच्या प्रवासवर्णनांतून व मुसलमानीं इतिहासांतून हृदयद्रावक शब्दांत दिलेलीं आढळतात.

> सस्यं सुदुर्लभमभूत्स्वर्णं तु सुलभं तदा
> प्रस्थमात्राणि रत्नानि विनिमय्य धनी जनः ।
> कथंचन समादत्त कुलत्थान्प्रस्थसंमितान् ।
> आहाराभावतोऽत्यर्थं हाहाभूताः परस्परम् ।
> पशून्वै पशवो जक्षुर्मानुषा अपि मानुषान् ॥

हें शिवभारतांतील ८ व्या अध्यायांतील दुष्काळाचें वर्णन बादशाहनाम्यांतील शब्दचित्राशीं ताडून पाहण्याजोगें आहे. बादशहानाम्याचा कर्ता लाहोरी ह्मणतो:—

Life was offered for a loaf, but none would buy; rank was to be sold for a cake, but non cared for it; the ever bounteous hand was now stretched out to beg for food; and the feet which had always trodden the way of contentment walked about only in search of sustenance. For a long time dog's flesh was sold for goat's flesh and the pounded bones of the dead were mixed with flour and sold. Destitution at length reached such a pitch that men began to devour each other and the flesh of a son was preferred to his love (. E. Vol VII p. 24.)

शके १५५३ मधील एका पत्रांत ( खं. १८ पृ. २९ ) पुणें जाळल्याचा व दुष्काळ पडल्याचा उल्लेख आहे तो असा—

इदलशाई नामजादी पुणा एउनु बसली. पुणें लुटून जाळून तळक केले, कोट पाडिला. यावर काळ दुकोळ कहर पडला. दर मणी होन दीड जाला. आपले दाईज व गोत्रीज होते ते सुजोन मेले.

दुसऱ्या एका ठिकाणीं( खं. १८ पृ. ४४ ) असे शब्द आहेत—

एदिलशाही तर्फेनें विज्यापुरीहून मुऱ्हारी जगदेव सुभा एऊन पुणें जाळून लुटून तलाख केले. ते वख्ती दौलतमंगल उर्फ भुलेश्वर एथें मुऱ्हारीनें किल्ला साधोन शाहार वसविले.*

१५. आदिलशाहीवर मोंगलांची मोहीम—अशा रीतीनें दुष्काळानें निजामशाही राज्यांतले लोक त्रस्त झाले असतां फत्तेखानाच्या गैरमुत्सद्दीपणामुळें सरदारांची फाटाफूट होऊन कित्येकांनीं मोंगलांचा, तर कित्येकांनीं आदिलशहाचा आश्रय केला आणि कित्येक तटस्थ राहिले. यामुळें निजामशाही राज्य बुडवून तो मुलुख हस्तगत करण्यासाठीं मोंगली सेनापती मोठ्या उत्सुकतेनें पुढें सरसावले. लोदी व दर्याखान यांच्या बंडांमुळें त्यांना १५५२ अखेर पर्यंत निजामशाही मुलुखाकडे लक्ष देण्यास फुरसत झाली नव्हती. पण

* हा प्रकार १५५१ मध्यें झाला कीं १५५२ मध्यें झाला हें निश्चितपणें सांगण्यास या उताऱ्यांत साधन नाहीं. मात्र खं. १६ ले. १६ या १५५१ च्या पौषांतलि पत्रांत 'विजापूरकरांनीं निजामशाहीचा शिरवळ परगणा कबज केला' व उलटपक्षीं निजामशाही 'तरफेची नामजादी विजापूर पावेतोवरी गेली आहे' अशा अर्थाचा मजकूर आहे. त्यावरून हा प्रकार श. १५५१ च्या माघाच्या सुमारास झाला असावा असें दिसतें.

बंडखोर नेस्तनाबूद होतांच त्यांनी निजामशाही राज्याकडे आपली दृष्टि वळविली. तेव्हां धारूरचा किल्ला त्यांना सहज घेतां आला. पण परंडा व कंदाहार हे किल्ले घेण्यासाठीं मोगली सरदार चालून गेले तेव्हां निजामशाही व आदिलशाही सैन्यें एकजुटीनें आपणाशीं झगडण्यासाठीं सज्ज आहेत असें त्यांना आढळून आलें. अशा परिस्थितींत पुढें जाणें धोक्याचें असून प्रथम हें जूग फोडल्यांवाचून दक्षिणेंत आपलें पाऊल पुढें पडणार नाहीं हें मोगली सेनापतींना कळून चुकलें. रणदुल्लाखान, मुकरबखान वगैरे आदिलशाही सरदारांनीं निजामशाही किल्ले लढविणाऱ्यांना इतक्या उत्तम रीतीनें सहाय्य पोंचविलें कीं जो कंदाहारचा किल्ला आठ पंधरा दिवसांत सहज घेतां येईल असें मोंगलांना वाटत होतें तो किल्ला घेण्यास त्यांना साडेचार महिने लागले. सारांश अदिल व निजाम या दोन शाह्यांमध्यें वितुष्ट कसें आणावें हा प्रश्न मोंगली मुत्सद्यांना सोडविणें या वेळीं भाग पडलें. इतक्यांत त्यांच्या सुदैवानें फत्तेखान व बुऱ्हाण निजामशहा यांमध्यें वितुष्ट येऊन बुऱ्हाणास फत्तेखानानें कैदेंत टाकलें आणि मोंगलांच्या सूचनेवरून त्याला ठारहि केलें. यानंतर फत्तेखानानें हुसेन नांवाच्या दहा वर्षांच्या मुलास निजामशाही गादीवर बसविलें. आणि मोंगलांचा स्नेह संपादण्यासाठीं आपण वाटेल तें करण्यास तयार आहों असें असफखानामार्फत शके १५५३ च्या ज्येष्ठांत कळविलें. मोंगलांनाहि तेंच पाहिजे होतें. त्यांनीं फत्तेखानाचा गौरव करून कांहीं मुलूख जहागिरीदाखल त्याजकडे लाऊन दिला. त्यांत शहाजीकडे असलेला कांहीं मुलूख मोंगलांनीं फत्तेखानास दिला; यामुळें शहाजी मोंगलांचा पक्ष सोडून विजापूरकरांना मिळण्याचा विचार आमल्या मनांत घोळवू लागला.*

अशा प्रकारें निजाम व अदिल यांचें जूग फुटल्यानंतर मोंगल विजापुरावर चालून गेले. या मोहिमेच्या वेळीं मोंगली सैन्याचें आधिपत्य असफखान याजकडे होतें व विजापूरचें सैन्य खवासखान, रणदुल्ला व मुरारपंत यांच्या हाताखालीं होतें. असफखान व अजमखान हे मोंगली सेनापति कंदाहार, भालकी, सुलतानपूर, गुलबर्गा या मार्गानें थेट विजापुरानजीक आले; आणि नौरसपूर व शहापूर यांच्या दरम्यान रंगाऱ्याच्या

* या वेळीं शहाजीचा अंमल पांडेपेडगांवच्या बाजूस होता. ( खं. १५ ले. १५. )

तळावर त्यांनीं ( १५५३ च्या फाल्गुनांत ) तळ दिला. असफखाना-बरोबर या वेळीं मोठें सैन्य असून त्यानें आपल्या हालचाली फार सावधपणें केल्या. परंतु आदिलशाही सेनापतींच्या डावपेचापुढें त्याला हात टेकावे लागले. मोंगलांच्या सैन्याभोंवतीं घिरटया घालून त्यांना रसद पोंचूं न देण्याचें काम आदिलशाही सैन्यानें फारच शिताफीनें बजावलें; आणि मुत्सद्यांनीं तहाची वाटाघाट करण्याचा डौल अशा कुशलतेनें घातला कीं अफसखानाला तह खात्रीनें होणार असें रोज वाटत असे. विजापूर दरबारांत खवासखान व मुस्तफाखान यांच्यांत बेबनाव असून मुस्तफा गुप्त रीतीनें मोगलांचें सैन्य विजापुरांत येऊं देण्याची व्यवस्था करील असा असफखानाचा अंदाज होता. खवासखानाच्या वकीलामार्फत देखील तहाची वाटाघाट चाललीच होती. शेवटीं मुस्तफाखान व ( रणदुल्लाचा चुलता ) खैरीयतखान हे तहाच्या अटी व खंडणीची रक्कम ठरविण्यासाठीं म्हणून असफखानाच्या डेऱ्यात आले; तेव्हां बरीच वाटाघाट होऊन ४० लाख रुपये खंडणीदाखल अदिलशहानें द्यावे असा ठराव झाला. दुसरे दिवशीं या करारांत किरकोळ स्वरूपाच्या दुरुस्त्या सुचविण्यांत आल्या. मोंगलांनीं त्याहि मान्य केल्या. अशा रीतीनें तह झाल्यासारखाच आहे असें असफखानास वाटूं लागलें होतें; पण दाणावैरण संपल्यामुळें व रसद बंद पडल्यामुळें लष्करांत उपासमार होण्याचे दिवस जवळ आले अशी त्याच्या सैन्यांत फार जोराची ओरड सुरू झाली. तेव्हां 'रसद मिळविण्यासाठीं लष्कराचा तळ हालवावा तर तहाचा जमत आलेला घाट बिनसतो; आणि तहाच्या नादीं लागावें तर सैन्याची उपासमार होते' अशा पेंचांत असफखान सांपडला. इतक्यांत मुस्तफाच्या वकीलानें एक पत्र गुप्तपणें असफखानास पोंचविलें. त्यावरून 'अशी दिवसगत करण्यानें असफखानाच्या सैन्यावर उपासमारीचा प्रसंग येईल हें जाणून खवासखान तहाची कोरडी वाटाघाट करीत आहे; पण त्याच्या मनांतून तह करण्याची खरी इच्छा मुळींच नाहीं' ही गोष्ट असफखानास कळून आली. त्याबरोबर आपल्या सैन्याचा तळ विजापुराहून हालवून कृष्णेच्या काठानें रायबाग मिरजपर्यंत असफखान आला. वाटेंत जेथें जेथें म्हणून त्याला लुटीची व कत्तल करण्याची संधि सांपडली तेथें तेथें त्यानें ती साधून घेतली. आणि विजापूरकरांच्या मुलखांत शक्य तितकी नासाडी करीत

शके १५५४ च्या वैशाख ज्येष्ठांत मोंगली सैन्य सोलापुरावरून आपल्या मुलुखांत निघून गेलें. ( इ. व्हा. ७ पृ. २८–३१; हिं. बु. ४५१ ).

१६ **शिवजन्मकालनिर्णय**—शहाजी आदिलशाही सोडून शके १५५० मध्यें परत निजामशाहींत आल्यापासून पुढील चार पांच वर्षें त्याला किती बिकट परिस्थितींत घालवावीं लागलीं याची कल्पना येथवर दिलेल्या हकीकतीवरून येण्याजोगी आहे. पण या अत्यंत अडचणीच्या परिस्थितींतच त्याला शिवाजी हा मुलगा झाला. शिवजन्मकालीन परिस्थितीसंबंधानें बखरकारांना अगदींच थोडी माहिती असल्यामुळें त्यांनीं जाधवरावाच्या पाठलागाची हकीकत सांगून शिवजन्माचें वर्ष शके १९४८ अगर १९४९ असें सांगितलें आहे. शके १५४८ मध्यें शहाजी विजापूरकराकडे गेला तो पुनः निजामशाहींत परत आला नाहीं अशी बखरकांरांची समजूत असल्यामुळें शिवनेरीस शिवाजी जन्म शके १५४८ अगर १९४९ मध्यें झाला असला पाहिजे असें मानणें त्यांना भाग पडलें. त्याचप्रमाणें शिवाजी महाराजांची म्हणून जी कुंडली* त्यांच्यापुढें होती तिच्यांत रवि मेषराशीस व चंद्र वृषभराशीस असल्यामुळें वैशाख शु. २ पासून ५ पर्यंत कोणती तरी शिवजन्मतिथी मानणें त्यांना अपरिहार्य भासलें.

बखरकार वैशाख महिना एकमतानें देत असले तरी वर्ष व तिथी यांच्या बाबतीत त्यांचें लिहिणें विनमेळाचें आहे. यावरून त्यांना महाराजांचें जन्मटिपण पाहण्यास मिळालें नव्हतें हें उघड आहे. जन्मटिपणांत वर्ष व तिथी हा तपशिल दिलेला असतो; आणि तो पहाण्यास मिळाला असतां तर याबाबतींत बखरकारांच्या लिहिण्यांत मेळ राहिला असता. पण त्यांच्या लिहिण्यांत असा मेळ नाहीं त्या अर्थी त्यांनीं या गोष्टी तर्कानें लिहिल्या

---




* ही कुंडली शिवाजी महाराजांची म्हणून मानण्यांत येत असे. परंतु गणित दृष्ट्या तिचा मेळ कोठेंच बसत नाहीं. ( शि. च. प्र. पृ. ५१६ पहा ).

असें ह्मणणें भाग आहे. पैकीं वर्षासंबंधींच्या विसंगतीची उपपत्ति 'शके १५४८मध्यें शहाजी विजापुराकडे गेला' या वाक्यानें लागण्याजोगी आहे. शहाजी १५४८ शकांत विजापुराकडे गेला याचा अर्थ १५४८ शकाच्या चैत्रांत गेला किंवा फाल्गुनांत गेला असा होतो व त्यानंतर १५४८ किंवा १५४९ च्या वैशाखांत शिवजन्म धरणें भाग पडतें. आणि त्याप्रमाणें कित्येक बखरकारांनीं शिवजन्माचें वर्ष शके १५४८ दिलें आहे तर कित्येकांनीं १५४९ दिलें आहे. एकंदरींत एक कुंडली व कांहीं ऐकीव माहिती बखरकारांपुढें होती; पण जन्मटिपण त्यांच्यापुढें नव्हतें. यामुळें त्यांना वर्ष व तिथी देतांना तर्काचा आश्रय करावा लागला; आणि याचा परिणाम असा झाला कीं त्यांच्या लिहिण्यांत एकमेकांशीं तर मेळ नाहींच पण तिथिवारांची संगतिहि राहिली नाहीं.

उलटपक्षीं शिवकालीन लेखकांना शिवजन्मतिथीच्या बाबतींत कल्पना चालविण्याचें कांहीं कारणच नव्हतें. त्यावेळच्या जिज्ञासूंना शिवाजी महाराजांची जन्मपत्रिकाच पाहण्यास मिळण्याजोगी होती. त्या पत्रिकेवरून लेखकाला तिथि, जन्मघटिका अगर कुंडली यांपैकीं कशाचाहि तपशील उतरून घेतां येत होता; आणि अशा प्रकारें जन्मपत्रिकेवरून उतरलेल्या निरनिराळ्या लेखकांच्या लेखांचें लक्षणच हें असतें कीं त्यांत एकमेकांशीं केव्हांहि विसंगति नसते व तिथिवारांचा मेळ बरोबर जमतो. याप्रमाणें शिवकालीन तीन लेखकांचे लेख आपणांस उपलब्ध झाल्यामुळें या जन्मकालासंबंधीं आपणास आतां संपूर्ण माहिती मिळाली आहे; ती अशी:—

( १ ) शिवशकावली—"शके १५५१ शुक्ल नाम संवत्सरे फाल्गुन वद्य ३ शुक्रवार हस्त घटी १८ प. ३२ गंड ५।७ ते दिवशीं राजश्री सिवाजी राजे शिवनेरीस उपजले." (शि. च. प्र. पृ. ६५.) यांत तिथिवारांपर्यंत बिनचूक माहिती असून पंचांगशुद्धीपैकीं नक्षत्र व योग यांच्या घटका दिल्या आहेत व गणित करून पाहतां त्या बरोबर आहेत. यावरून नकलकारांचीहि या ठिकाणीं चूक नाहीं असें आपण म्हणूं शकतों.

( २ ) शिवभारत—

भूबाणप्राणचन्द्राब्दैः संमिते शालिवाहने ।
शाके संवत्सरे शुक्ले प्रवृत्ते चोत्तरायणे ॥

शिशिरर्तौ वर्तमाने प्रशस्ते मासि फाल्गुने
कृष्णपक्षे तृतीयायां निशि लग्ने सुशोभने ॥

यांत 'शके १५५१ शुक्ल संवत्सर, उत्तरायण, शिशिरऋतु, फाल्गुन वद्य ३ रात्रीं' अशी माहिती दिलेली आहे; हीहि पत्रिकेवरूनच मिळण्याजोगी आहे; व तिचा मेळ शिवशकावलींतील माहितीशीं चांगल्या प्रकारचा असून जन्म "रात्रीं" झाला ही माहिती जास्तीची आहे.

(३) **कुंडली**—वरील दोन ठिकाणच्या माहितीवरून शिवजन्माची नक्की वेळ अगर जन्मकुंडली समजण्यास साधन नव्हतें. तें बिआवर संस्थानांतील पंडीत मीठालाल व्यास यांच्या संग्रहांतील जुन्या बाडांतील कुंडलीनें उपलब्ध झालें आहे. या बाडांत शिवकालीन अनेक कुंडल्या आहेत व त्या विश्वसनीय आहेत. याविषयीं अजमेर येथील संशोधनखात्याचे मुख्याधिकारी रायबहादुर पंडित गौरीशंकर ओझा यांनीं सविस्तर विवेचन केलें आहे. त्यावरून या बाडांतील शिवाजी महाराजांच्या कुंडलीचें हस्ताक्षर शिवराम ज्योतिष्याच्या हातचें आहे व हा शिवराम ( ज. श. १५५९ व मृ. श. १६४२ ) केव्हां जन्मला व केव्हांपर्यंत हयात होता हें निश्चित करण्याचें साधन या बाडांत असल्यामुळें तो शिवाजी महाराजांचा समकालीन होता हेंहि म्हणतां येतें. अशा रीतीनें महाराजांच्या वेळींच लिहिलेलें टिपण आपणास मिळालें आहे. तें हें:—

संवत १६८६ फाल्गुन वदि ३ शुक्रे उ. घटी ३०।९ राजा शिवाजी जन्मः । र १०।२३ ल ४।२९.




यावरून सूर्यास्तानंतर लौकरच शिवजन्म झाला असें ठरतें.

हें टिपण शिवाजी महाराजांच्या वेळींच लिहिलें गेलें व त्याच स्थितींत

आपणास सांपडलें आहे. शिवभारत हा ग्रंथ शिवाजी महाराजांच्या आज्ञेनें व त्यांच्याच पदरच्या परमानंद कवीनें लिहिला असल्यामुळें त्याला शिवजन्मकाल समजण्यास मुळींच अडचण पडण्याजोगी नव्हती. शिवशकावलीचें प्रथम लेखन राज्याभिषेकानंतर लौकरच झालेलें असलें तरी त्याची मूळ प्रत आपणास मिळालेली नसून नकल मिळालेली आहे. यामुळें तिच्यांत नकलकाराचे हस्तदोष आढळतात. परंतु अनेक प्रती एकमेकांशी ताडून पाहिल्या असतां नकलकाराचे दोष निवडून काढून शकावलीचें मूळ स्वरूप लक्षांत घेण्यास अडचण पडत नाहीं.

१७ शहाजी व आदिलशहा यांचा स्नेह—फत्तेखानानें बुऱ्हाण निजामशहास ठार करून मोंगलाचा स्नेह संपादन केला व त्याच वेळीं शहाजीनें मोगलांचा पक्ष सोडला हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यानंतर त्यानें नाशीक, त्रिंबक, संगमनेर, जुन्नरपासून कोकणापर्यंतचा प्रदेश हस्तगत केला व शके १५५४ च्या भाद्रपदांत स्वतंत्रपणें निजामशाहीची पेमगिरी येथें स्थापना केली. ( इ व्हा. ७ पृ. ३५ व जेधे श. ).

त्यावेळीं गाळणा किल्ला महमूदखान नांवाच्या सरदाराकडे होता; तो फत्तेखानाच्या नाकर्तेपणास कंटाळून किल्ला शहाजीच्या ताब्यांत द्यावा अशा विचारांत होता. परंतु मोंगलांच्या सेनापतींनीं भीड घालून व मोठ्या बक्षीसाची लालूच दाखवून तो किल्ला शहाजीच्या ताब्यांत जाऊं दिला नाहीं. अशा रीतीनें मोंगलांशीं दिवसेंदिवस जास्त वितुष्ट येऊं लागलें तेव्हां शहाजीनें विजापूरकरांचा स्नेह संपादण्याची खटपट चालविली. ती यशस्वी होऊन विजापूरकरांतर्फे बरेंच मोठें सैन्य मोंगलांशी सामना देण्यासाठीं म्हणून निघालें. या सैन्यापुढें फत्तेखानाचा निभाव लागण्याजोगा नव्हता. त्याला काय करावें तें सुचेना. निजामशाही राज्यांतले बरेच लोक, फत्तेखानानें मोगलांशीं स्नेह केल्यामुळें, त्याच्यावर रागावले होते व ते आपल्या विरुद्ध विजापूरकरांच्या कारस्थानांत सामील होतील हें त्याला उघड दिसत होतें. त्यानें मोंगलांचा सेनापति खानखानान महबतखान याजकडे सर्व हकीकत लिहून पाठविली व मदतीची मागणी केली; आणि “ तुम्ही लौकर याल तर दौलताबादचा किल्लाच तुमच्या हवालीं करतों ” असेंहि कळविलें. तेव्हां महबतखानानें आपला मुलगा खानजमान यास दौलताबादेकडे सैन्यासह रवाना केलें. अशा रीतीनें १५५४च्या पौषांत दौलताबाद मोंगलाच्या

ताब्यांत जाणार असा रंग दिसू लागला. ही आपत्ती टाळण्यास फत्तेखान व मोंगल यांच्यांत बेबनाव उत्पन्न करणें हा एकच उपाय होता. तो विजापूरच्या मुत्सद्यांनीं करून पाहिला. "दौलताबादचा किल्ला तुमच्या हातीं राहूं देण्यास आणि खर्चासाठीं ३ लाख होन व अन्नसामुग्री पुरविण्यास आम्ही तयार आहों. तेव्हां तुम्ही किल्ला मोंगलाच्या ताब्यांत देण्याचें कांहीं कारण नाहीं" असें बोलणें विजापूरकरांमार्फत फत्तेखानाशीं सुरू झालें आणि त्यानें तें मान्य केलें. अर्थात मोंगलांचें जें सैन्य त्याला मदत करण्यासाठीं व किल्ला ताब्यांत घेण्यासाठीं म्हणून आलें होतें त्याला फत्तेखानानें धुडकाऊन लावलें. यामुळें मोंगलांचा सेनापती महबतखान इरेस पडून आदिलशाही व निजामशाही या दोनहि सैन्यांचा पराभव करून दौलताबाद हस्तगत करण्याच्या ईर्षेनें १५५४ च्या फाल्गुनांत मोठ्या सैन्यानिशीं चालून आला. तेव्हां दौलताबादेचा किल्ला मोंगलाच्या ताब्यांत जावा कीं विजापूरकरांच्या ताब्यांत जावा या प्रश्नाचा निर्णय लागण्याची वेळ आली. मोगलांनीं दौलताबादेभोंवतीं वेढा घालून किल्लयांत रसद पोचूं न देण्याची खटपट करावी आणि विजापूरकरांनीं मोगलांची फळी फोडून दाणागोटा किल्यांत पोचविण्यासाठीं पराकाष्ठा करावी असा प्रकार दोन महिने सुरू होता. भारतकारानें म्हटल्याप्रमाणें

सैन्यं साहिजहानस्य महमूदस्य चान्वहम् ।
अयुध्येतां मिथस्तत्र धारागिरिजिघृक्षया ॥ ८/३६

दौलताबाद घेण्यासाठीं शहाजहानाचें सैन्य व महमूद आदिलशहा याचें सैन्य यामध्यें रोज चकमकी झडूं लागल्या. आणि हीं दोन कोंबडीं झुंजवून आपण गंमत पहावी व किल्ला कोणाच्याच ताब्यांत देऊं नये आणि देणें भागच पडेल तेव्हां तो मोंगलाच्या ताब्यांत देऊन आपण त्यांची सरदारी पत्करावी असा फत्तेखानाच्या पोटांतला डाव होता. त्याप्रमाणें विजापूरकरांविरुद्ध तो नेहमीं कांहींना कांहीं कुरापत काढीत असे. विजापूरकरांकडून वेळेवर मदत पोंचत नाहीं यामुळें किल्ला मोंगलाच्या ताब्यांत देणें भाग पडेल असा निरोप त्यानें बाहेर पाठविला. तेव्हां रणदुल्ला व खवासखान यानीं भरपूर अन्नसामुग्री देऊन ती फत्तेखानाकडे पोंचती करण्याचें काम मुरार जगदेवाकडे सोंपविलें. त्याप्रमाणें तो दौलताबादेनजीक सामुग्रीसह येऊन पोचला. परंतु सामुग्री तावडतोब

किल्यांत न पाठवितां " किल्ला आमच्या ताब्यांत द्या; आम्ही तो संभाळतों व मोगलाशींहि लढतों " असा निरोप मुरारपंतानें फत्तेखानाकडे पाठविला. याचा अर्थ फत्तेखानानें विजापूरकरांच्या आश्रयास यावें असा होता. हें ओळखून फत्ते-खानानें मोंगलांचा सेनापति महबतखान यांजकडे वकील पाठवून तह केला आणि किल्ला मोंगलांच्या ताब्यांत देऊन टाकला ( श. १५५५ ज्येष्ठ )! यामुळें मुरारपंतावर या वेळीं खवासखान व रणदुल्लाखान यांचा रोष झाला. हुकुमाप्रमाणें फत्तेखानास सामुग्री पोंचविण्याचें सोडून त्याच्याशीं बोला-चाली करून सर्व मसलत बिघडविली व दौलताबादेचा किल्ला मोंगलांच्या हातीं जाऊं दिला; याचें खापर विजापूरच्या मुत्सद्यांनीं मुरारजगदेवाच्या माथ्यावर फोडलें. वस्तुतः मुरारपंताकडे म्हणण्याजोगा दोष नव्हता. फत्तेखान निमित्तासच टेकला होता व त्यानें मोंगलास मिळण्याचें आधींच ठरविलें होतें. त्याप्रमाणें करतांना विजापूरकरांशीं झालेला करारनामा मोड-ण्यास कांहीं सबब दाखविली पाहिजे यासाठीं त्यानें मुरारपंताच्या बोल-ण्याचा गवगवा केला. आणि मुरारपंताविरुद्ध आदिलशाहींत असलेल्या पक्षानें हा बोभाटा आणखी वाढविला. तथापि एवढें खरें कीं 'दौलताबाद मोंग-लांच्या ताब्यांत जाऊं देऊं नये ' असें प्रतिपादन करणाऱ्या ( खवासखान व मुरारपंत यांच्या ) पक्षाचें वजन, या अपयशामुळें कमी होत चाललें; व त्याला मान खाली घालून व सैन्याचा धीर खचून परत फिरण्याचा प्रसंग आला. ही हकीकत भारतकारानें या शब्दांत मांडली आहे.

लब्ध्वा देवगिरिं दैत्यो दिल्लीन्द्रो मुदमागतः ।
तथा येदिलशाहोपि सैन्यभंगात् विलज्जितः ॥

निरुध्य धारागिरि दुर्गमुग्रं । ताम्राननैस्तत्र धृते निजामे ॥
गताभिमाना विहितापयाना । बभूव सेना किल येदिलस्य॥ [८४]

१८ निजामशाहीच्या पुनरुद्धाराचा प्रयत्न—फत्तेखानाच्या फितू-रीमुळें हुसेन निजामशहा कैदी बनून दौलताबादेचा किल्ला मोंगलाच्या ताब्यांत गेला. पण निजामशहा गेला तरी निजामशाही बुडूं नये असें पुष्कळांना वाटत होतें. त्यांतल्या त्यांत शहाजी व विजापूरचे खवासखान, मुरारपंत व रणदुल्लाखान वगैरे मुत्सद्दी यांना तर निजामशाहीचें नांव हरप्रयत्न करून कायम ठेवलें पाहिजे ही गोष्ट मनापासून पटली होती.

निजामशाही बुडाली म्हणजे मोगली सत्तेचा वरवंटा साऱ्या दक्षिणेवर फिरल्यावांचून राहणार नाहीं याकरितां सर्वांनीं मिळून या वेळीं मोगलांची लाट अडविण्यासाठीं झटलें पाहिजे हें तत्व यानीं फारच चांगल्या रीतीनें ओळखलें होतें. परंतु विजापूरच्या इतर मुत्सद्यांना ही गोष्ट तादृश पटली नव्हती. मुस्तफाखान तर 'मोंगलांचा स्नेह संपादन करावा' असा महमूद आदिलशहास उघडपणें आग्रह करीत होता. आणि महमूदाच्या मनाचा कलहि मुस्तफाच्या सल्यानें वागण्याकडेच होता. पण अद्याप खवासखानाची सद्दी होती, यामुळें मुस्तफाखानाचें फारसें चाललें नाहीं व निजामशाही पुन: उभी करण्याच्या मसलतीस खवासखानानें महमूदाची मान्यता मिळविली व त्याप्रीत्यर्थ मुरारपंताची रवानगी करण्यांत आली. परंतु निजामशाही उभी करण्याच्या बाबतींत निजामशाही सरदारांचेंच असावें तसें एकमत नाहीं, असें मुरारपंताच्या निदर्शनास आलें. दौलताबादेचा किल्ला खानडौरान नसिरीखान याच्या ताब्यांत देऊन मोंगलांचा सेनापति मोहबतखान बुऱ्हाणपुरास परत गेला; तेव्हां दौलताबादेच्या आसपासचा प्रदेश वगळून बाकीच्या निजामशाही प्रदेशावर कोणाची तरी एकतंत्री सत्ता निर्माण करणें अवश्य होतें. परंतु वस्तुस्थिति अगदीं भिन्न होती. निजामशाही राज्यांत या सुमारास चार पांच सरदार शिरजोर असून ते आपापल्या प्रांतापुरते मालक बनले होते. त्यांत सिद्दी रेहान यानें सोलापूर हाताखालीं घातलें, शहाजी पेमगडच्या आसपास अंमल गाजवूं लागला; श्रीनिवासराव जुन्नरचा धनी बनला आणि सिद्दी साबा सैफखान यानें तळकोंकणचा प्रदेश गिळंकृत केला. आणि शिद्दी अंबर दंडाराजपुरी दडपून बसला. पण यापैकीं शहाजी खेरीज इतर सरदारांनीं स्वतंत्र निजामशाहीची उभारणी करण्याची हिंमत केव्हांहि धरली नव्हती. आपली जहागीर आपणाकडे कायम राहून विजापूर किंवा दिल्ली यापैकीं ज्या बादशाहीकडे जाण्यांत जास्त स्वार्थ साधत असेल तिकडे आपण जावें असें या सरदारांनीं आपल्या मनाशीं ठरविलें होतें. त्याप्रमाणें सिद्दी रेहान यानें विजापूरकरांचें अंकितत्व मान्य करून कऱ्हाड, कोल्हापूर वगैरे बाजूस एक लाख होनाच्या उत्पन्नाचा मुलूख जहागिरी दाखल मिळविला. सिद्दी साबा सैफखान याचाहि कल विजा-

पूरकरांची सरदारी पत्करण्याकडेच होता. हें पाहून शहाजीनें निराळाच डाव मांडला.

इतर निजामशाही सरदारांप्रमाणें मोगली किंवा आदिलशाही दरबारांत नोकरी मिळविण्याचें ध्येय न धरतां शहाजीनें भीमगड येथें स्वतंत्र बादशाहीचें निशाण उभारून पुणें, चाकण, जुन्नर, अहमदनगर, संगमनेर, नाशिक, त्रिंबक वगैरे मुलूख ताब्यांत घेतला. यावेळीं दौलताबादेस मोंगलांचा सेनापति इरादतखान हा होता; त्याला शहाजीच्या कर्तबगारीची चांगली कल्पना होती. याकरितां शहाजीस सामोपचाराच्या मार्गानें मोंगलांचा हस्तक बनवावा ह्मणजे निजामशाही मुलखांतील दंगे मोडण्यास सोपें जाईल असें इरादतखानाचें मत होतें. त्यानें शहाजीचा चुलत भाऊ मालोजी भोसले या मार्फत शहाजीशीं सलोख्याचें बोलणें चालू केलें; आणि शहाजीचा मुलगा संभाजी याच्या नांवें बावीस हजारी मन्सब देण्याचा फर्मान व पोषाख शहाजहानाकडून आणवून ठेवला. पण मोंगलाच्या दरबारीं मोठी मन्सब मिळविण्यापेक्षां स्वतंत्र निजामशाहीचा मालक बनण्याचा शहाजीचा या वेळीं हेतु होता. यामुळें इरादतखानानें देऊं केलेल्या आमिषास शहाजी बळी पडला नाहीं. त्यानें गुप्तपणें मुरारपंतामार्फत खवासखानाकडे बोलणें लावलें कीं "निजामशाही सलतनतेतील चौऱ्याऐंशी किल्यांतून एक दौलताबाद मोगलांनीं घेतला म्हणून काय झालें! जुन्नरासारखी प्राचीन राजधानीची जागा आपल्या हातीं आहे. तेव्हां तुमची मदत होत असेल तर निजामशाही पुनः उभी करून दाखवितों." ही गोष्ट मुस्तफाखेरीज विजापुरांतील इतर मुत्सद्यांनीं मान्य केली; आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शहाजीच्या मदतीसाठी मुरारपंताची रवानगी करण्यांत आली.

विजापूरकरांशीं दोस्तीचा तह कायम झाल्यानंतर शहाजीनें पेमगड उर्फ भीमगड येथें स्थापलेल्या मूर्तजा निजामशहाच्या नांवें मोठें लष्कर जमा केलें आणि निजामशाही राज्यांतील इतर सरदारांनीं बादशहाकडे येऊन भेटून जावें असा तगादा सुरू केला. पण निजामशाही राज्यांतील मुसलमानी सरदारांना ही गोष्ट पटण्याजोगी नव्हती; कारण भीमगडास मूर्तजा निजामशहाच्या भेटीस जावयाचें ह्मणजे शहाजीचें अंकितत्व मान्य करावयाचें असा अर्थ होता. तेव्हां शहाजीसारख्या हिंदू सरदाराचें अंकि-

तत्व मान्य करण्यापेक्षां विजापूर अगर दिल्ली येथील बादशाहीच्या आश्रयास जाणेंच जास्त श्रेयस्कर अशी खूणगांठ निजामशाही सरदारांनीं आपल्या मनाशीं बांधली. अशा स्थितींत सिद्दीसाबा व सैफखां हे जे तळकोंकणांत मुखत्यारी गाजवीत होते त्यांजकडे मुरारपंत व शहाजी यांच्या नांवचें पत्र गेलें कीं "तुम्हीं नवीन बादशहाच्या भेटीस या; आणि आमच्या सांगण्याप्रमाणें चाला." परंतु सैफखानानें साफ सांगून पाठविलें कीं, "मी शहाजीच्या हाताखालीं वागण्यास तयार नाहीं; मी आदिलशाही नोकरी पत्करतों." असें सांगून जव्हार पर्यंतचा तळकोंकणचा मुलूख (किल्लेखेरीज करून) त्यानें शहाजीच्या ताब्यांत दिला आणि आपण स्वतः दोन हजार स्वारांनिशीं मुरारपंताकडे आला. यानंतर मुरारपंतानें शहाजीच्या नवीन राज्यास विजापूरकरांतर्फे मान्यता देऊन अंबरखानाची नेमणूक ५।६ हजार स्वारासह शहाजीच्या मदतीसाठीं केली आणि तो विजापूरास जाण्यास निघाला. जातांना भीमा व इंद्रायणी यांच्या संगमाजवळ त्यानें मुक्काम करून मोठा दानसमारंभ केला. शके १५५५ च्या भाद्रपद अमावास्येच्या सूर्यग्रहण प्रसंगीं मुरारपंतानें 'गजदान, अश्वदान, गोशतदान करून सुवर्णरजतादि चोवीस तुलामहादानें केलीं' ही गोष्ट प्रसिद्ध आहे. पण मुरारपंत या कामांत गुंतला असतां शहाजीची सैफखानाशीं घडलेली झटापट तितकी प्रसिद्ध नाहीं. सैफखान तळकोंकणांतून मुरारपंतास मिळण्यासाठीं ह्मणून आला तो खेडकडूसच्या बाजूस होता. त्याच्यावर शहाजीच्या सैन्यानें अचानक रीतीनें हल्ला केला; तेव्हां दोनहि लष्करांत मोठी लढाई झाली. त्यांत सैफखानाचा सेनापति सिद्दी अंबर आतषखानी जखमी होऊन शहाजीच्या हातीं सांपडला; आणि सैफखान खेड येथें होता त्याच्याभोंवतीं शहाजीच्या सैन्याचा वेढा पडला. मुरारपंतास ही बातमी समजतांच त्यानें आपलें लष्कर सैफखानाच्या मदतीस पाठविलें आणि त्याची सुटका करवून त्याच्यासह विजापुरास गेला. मुरारपंत गेल्यानंतर शहाजीनें जुन्नरच्या किल्लेदारास कैद करून तो किल्ला हस्तगत केला; आणि इतरहि बरेच किल्ले घेऊन त्यानें मूर्तजास भीमगडाहून जुन्नर येथें आणून ठेवलें. यावेळीं जुन्नर येथें जडजवाहीर व पैसा मिळून बराच खजीना शहाजीच्या हातीं आला व त्याच्या जोरावर शहाजीनें १०।१२ हजार स्वार ठेऊन तो फौजबंद बनला.

शहाजीनें उभारलेला हा नवा डाव मोडण्यास सामोपचार उपयोगी पडणार नाहीं; या कामासाठीं दिल्लीहून मोठें सैन्य आणून शहाजीचें हें बंड मोडलें पाहिजे ही गोष्ट आतां मोंगलांच्या लक्षांत आली. पण त्यांनीं प्रथम शहाजीवर साक्षात शस्त्र न धरतां त्याच्या मदतीस जाणाऱ्या आदिलशहाचे लचके तोडण्याचा प्रयत्न केला. मोंगलांचा सेनापती मोहबतखान परंड्यावर चालून गेला व सुरुंग लावून किल्ला पाडण्याच्या उद्योगास लागला. त्याबरोबर रणदुल्ला, फरादखान, अंकुशखान वगैरे विजापूरच्या सरदारांनीं परांड्याच्या आसपास जमून मोंगलांच्या सैन्यास असे जर्जर केलें कीं मोहबतखानास वेढा उठवून बऱ्हाणपुरास परत जाणें भाग पडलें.

अशा रीतीनें मोंगलांशीं दोन हात करून निजामशाही उभारण्याच्या कामीं शहाजी व विजापूरकर यांना यश येणार असा रंग दिसूं लागला; व दोघेहि मोठ्या उत्साहानें आपलीं कामें करूं लागले. पण मोंगलांविरुद्ध दाक्षिणात्यांनीं एकजुटीनें लढण्याच्या या प्रयत्नास यश येणें कठिण होतें. कारण शहाजी हिंदू असल्यामुळें त्याच्या हाताखालीं वागण्यास निजामशाहींतले मुसलमानी सरदार कबूल नव्हते; यामुळें त्याच्याजवळ शेवटीं फक्त घाटगे, कांटे, गायकवाड, मोहिते, महाडीक वगैरे मराठे सरदार मात्र शिल्लक राहिले; ह्मणजे शहाजी 'हिंदू राज्य उभारण्यासाठीं झटत आहे' असा उघड अर्थ दिसूं लागला. यामुळें या हिंदू राज्याविरुद्ध विजापूर व दिल्ली येथील मुसलमानी बादशहा केव्हां एक होत होतील याचा नेम नाहीं असें वाटूं लागले. हिंदू राज्य मोडण्यासाठीं मुसलमानी बादशहा आपलीं भांडणें बाजूस ठेवून एकजुटीनें वागूं शकतात असा अनुभव राक्षस तागडीच्या ऊर्फ तालिकोटच्या लढाईंत आला होता. तोच शहाजीला आतां ७०।७५ वर्षांनीं पुनः यावयाचा होता. निजामशाही उभारण्याच्या प्रयत्नास आम्ही मनापासून साह्य करूं असें विजापूरदरबारातर्फे खवासखान व मुरारपंत यानीं अभिवचन दिल्यामुळें शहाजी या खटाटोपांत पडला होता, हें खरें. परंतु या अभिवचनावर विश्वसून राहण्याची सोय नव्हती. कारण खवासखानाच्या विजारपूरदरबारांतील स्थानाची कोठें शाश्वति होती? त्याच्याविरुद्ध मुस्तफाखान बादशहाचें मन एकसारखें दूषित करीतच होता; आणि बादशहा हलक्या कानाचा असल्यामुळें तो खवासखानावर केव्हां उलटेल यांचा कांहीं नेम नव्हता. हें पाहून

खवासखानानें मुस्तफास कैद करून बेळगांवच्या किल्ल्यांत नेऊन ठेवलें. यामुळें महमूदाच्या मनांत सांचावयास लागलेला क्रोधाग्नी प्रज्वलित झाला. पण तो उघड रीतीनें व्यक्त करण्याचें धाडस त्याच्या हातून होईना. त्यानें रणदुल्लास एकांतांत बोलऊन "कसेंहि करून खवासखानाची ब्याद दूर करा" असा कानमंत्र सांगितला आणि रणदुल्लालाहि तो पसंत पडला. कारण मुरारपंत व रणदुल्ला यांच्यांत अलीकडे वैमनस्य वाढत चाललें होतें. तेव्हां त्यानें या संधीचा फायदा घेऊन खवासखानाकडे विनंतिपत्र पाठविलें कीं "मुरारपंत फार चढेलपणानें वागतो; यामुळें त्याच्या हाताखालीं वागण्यास लोक नाखुष आहेत. याकरितां त्याला कामांतून काढून काशीयात्रेस जाण्यास निरोप द्यावा. तुमच्या विरुद्ध आमचें कांहीं ह्मणणें नाहीं. तुम्ही सांगाल ती आज्ञा आम्ही मानूं." या निरोपांतला गर्भितार्थ खवासखानानें तत्काळ ओळखला आणि उत्तर लिहिलें कीं "आज तुम्ही मुरारपंताच्या हाताखालीं राहण्यास राजी नाहीं असें ह्मणतां. पण हें तुमचें ह्मणणें मान्य केलें तर उद्यां याच्याहि पुढें पाऊल टाकून माझ्याहि हाताखालीं वागण्यास तयार नाहीं असें ह्मणणार नाहीं कशावरून?" तथापि एक गोष्ट खवासखानास पक्केपणीं समजून चुकली; ती ही कीं 'महमूदशहा आपल्यावर उलटला असला पाहिजे व त्याच्याच जिवावर यांनीं हा सर्व खेळखंडोबा मांडला आहे. यांना शह देण्यास दिल्लीकरांना निमंत्रण देणें हा एकच मार्ग मोकळा आहे'. हें लक्षांत येतांच त्यानें शहाजहान बादशहाकडे निरोप पाठवून कळविलें कीं "विजापूर दरबारांत फार यादवी माजली आहे. अशा वेळीं तुम्ही सैन्य पाठविल्यास मी विजापूरचा किल्ला तुमच्या ताब्यांत येईल असें करतों." खवासखानानें याप्रमाणें दिल्लीकराकडे खरोखरच आमंत्रण पाठविलें किंवा नाहीं हा वादग्रस्त प्रश्न आहे. परंतु एवढें निश्चित दिसतें कीं विजापूर दरबारांतील रणदुल्ला वगैरे मुत्सद्यांनीं खवासखानाविरुद्ध उठलेल्या या बातमीचा फायदा घेऊन त्याच्यावर उघड मोहिम काढली. त्यांत अल्ली फरादखान, खैरतखान, अल्लीखुदाबंदखान, महंमद याकुतखान, राघोपंडीत (याकुतखानी), खेळोजी भोसले, सरजेराव घाटगे वगैरे अनेक सरदारांचीं नांवें आढळतात. यांनीं मुरारपंतावर चाल करून त्याला चोंहोकडून कोंडीत आणलें. इकडे खवासखान विजापुरांत होता, त्याला मारण्याचें काम बादशहानें सिद्दी

रेहान यांजकडे सोपविलें. त्यानें भरदरबारांत खवासखानावर मारेकरी घालून त्याला जखमी केले; आणि तो तसाच आपल्या वाड्याकडे गेला असें पाहून रेहान सैन्यासह त्याच्या वाड्यावर चालून गेला आणि खवासखानाचें शिर धडापासून वेगळें केलें! भरदरबारांत या गोष्टी होऊं शकल्या, यावरून खवासखानाच्या विरुद्ध विजापुरांतील लोकमत फार प्रक्षुब्ध होतें हें तर उघडच दिसतें. बुसातिने सलातीनकार तर ही हकीकत देऊन असेंहि सांगतो कीं "खवासखानाचें शीर कापलें तें पाटींत घालून रणदुल्लाखानाकडे पाठविण्यांत आलें. या वेळीं पाऊस नसल्यामुळें सगळीकडे दुष्काळाची भीति वाटत होती. पण खवासखान मारला गेल्याबरोबर त्याच दिवशीं भरपूर पाऊस पडला, आणि लोकांना आनंदी आनंद झाला! बादशहानें मोठ्या थाटानें दरबार भरवून सरदारांचे मुजरे घेतले. अनेक लोकांना बक्षिसें वाटलीं. आणि खवासखानाचा खून करणारा सिद्दी रेहान यास 'इखलासखान वजीर' असा किताब दिला. खुदावंदखानाचा मुलगा अहमदखान यास सरनोबतीची मनसब दिली आणि नबाब खानबाबा यांजकडे मुलकी कारभार सोंपविण्यांत आला. त्याचप्रमाणें मुस्तफाखानास बेळगांवच्या किल्ल्यांतून आणून त्याचा मोठा सन्मान केला व त्याच्याकडे दौलतीच्या कारभाऱ्याचें काम सांगितलें. आणि स्वतः महमूदशहा राजकारणांत लक्ष घालूं लागला." (हिं. बु. पृ. ४८८–४८९). मुरारपंत धारवाडास गेला होता; तेथें त्याला खवासखान मारला गेल्याची बातमी समजली; तेव्हां तो बेळगांवास गेला. तेथल्या किल्लेदारानें मुरारीला कैद करून विजापुरास पाठवून दिलें. तेथें गेल्यावर त्याचा फार क्रूरपणें वध करण्यांत आला. तो प्रकार वाचून कोणासहि संभाजीच्या वधाची आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं. विजापूरचा इतिहासकार ह्मणतो "मुरारराव निराश होऊन बादशहास शिव्या देऊं लागला. तेव्हां बादशहानें त्याची जीभ कापविली व शहरभर धिंड काढली. आणि नंतर हातपाय तोडून त्याचे हालहाल करून त्याला मारण्यांत आलें!" खवासखान मारला गेल्यानंतर एक महिन्यानें मुरारपंताचा शेवट झाला.*

---

* हा प्रकार हि. १०४५ (=श. १५५७) मध्यें बुधवारी झाला असें बुसातिने सलातीन मध्यें आहे. पण महिना व तारीख सांगितली नसल्यामुळें मिति निश्चित करण्यास मार्ग नाहीं.

विजापूर दरबारांत हा प्रकार चालला असतां मोगल स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं पन्नास हजार सैन्य जमवून शहाजीनें उभारलेली निजामशाही बुडविण्यासाठीं मोहीम काढली. शहाजहान स्वतः दौलताबादेपर्यंत आला होता. व त्यानें मोगली सैन्याचे तीन भाग करून प्रत्येक भागानें निरनिराळ्या दिशेनें चालून जावें असें ठरविलें. खान डौरान यानें वीस हजार सैन्यासह विजापूर व गोवळकोंडा यांच्या सरहद्दीवरून जाऊन उदगीर व आंवसे या किल्ल्यांना वेढा द्यावा. खानजमान यानें वीस हजाराची दुसरी तुकडी घेऊन अहमदनगराकडे जावें व चांभारगोंदे अष्टी वगैरे शहाजीचा खास प्रदेश हस्तगत करावा आणि नंतर कोंकण प्रांतावर जावें. षाइस्तेखानानें ८।१० हजार सैन्यासह जुन्नर, संगमनेर, नाशिक, त्रिंबक वगैरे शहाजीचे किल्ले घ्यावे. याप्रमाणें योजना ठरून १५५७ च्या माघांत तीनही बाजूस सैन्याची रवानगी करण्यांत आली.

उलटपक्षीं उदगीर व आवसें या किल्ल्यांच्या मदतीस विजापूरकरातर्फे खैरियतखानाची रवानगी झाली आहे व शहाजीच्या मदतीस रणदुल्लाखान येणार असें मोंगलांना समजलें. तेव्हां विजापूरकरांच्या मुलखावरच प्रथम हल्ला करावा असें शहाजहानानें ठरविलें. षाइस्तेखानानें मात्र शहाजीच्या ताब्यांतले संगमनेर वगैरे प्रांत घेतले. तेव्हां संभाजी मोगलाशी लढण्याइतक्या वयाचा होता हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. यानंतर मोगल जुन्नरावर व माहुलीवर चालून आले. तेव्हां देखील संभाजी मोगलाशीं लढला. शेवटीं मोगलांना विजापूरकरही मिळाले, कारण खवासखानाचा, मागें सांगितल्याप्रमाणें, खून होऊन मुस्तफाखानाच्या हातीं सूत्रें येतांच त्यानें मोगलाशीं विजापूरकरांचा तह घडवून आणला. तेव्हां शहाजीनेंही निजामशाही उभारण्याचा प्रयत्न सोडून विजापुरकरांचें अंकितत्व मान्य केलें.

शहाजीला या वेळीं जेरीस आणण्याचें काय मोंगलांनीं केलें व त्याच्या मनांतून आपण मोंगलांच्या नोकरींत जावें असें होतें पण मोगलांनींच तें मान्य केलें नाहीं असें बादशहानाम्याचा कर्ता लाहोरी यानें प्रतिपादन केलें आहे. पण विजापूरच्या इतिहासांत विजापूरकरांच्या सैन्याची बहादुरी वर्णन करून या सैन्याची मदत होती म्हणून मोंगलांना हें यश मिळालें असें म्हटलें आहे. रणदुल्लाखानाच्या मनांतून तर शहाजीला मदत करावी असेंच होतें; पण दरबारांतील इतर सर्व मुत्सद्यांच्या मतें मोगलाशीं

स्नेह करणेंच श्रेयस्कर असें ठरल्यामुळें रणदुल्लाखानानें नाइलाज म्हणून मोगलाशीं तह करण्यास संमति दिली. आणि खान व मलिक रेहान यांनीं मोंगलांना मदत केल्यामुळेंच शहाजीचा निरुपाय झाला असें बु. स. कार म्हणतो. मात्र मोगली व विजापुरी दोनही इतिहासांत शहाजीशीं यावेळीं कोणत्या अटीवर तह ठरला यांची माहिती दिलेली नाहीं. जेधे करीन्यांत या विषयीं माहिती आली आहे ती अशी आहे. "शके १५५७ युत्रा संवछरी रणदुलाखान इदलशाही व खान जमान (मोगलाचा सुभा) जाऊन दुतर्फा [माहुलीस] वेढा घालून बैसले. कान्होजी नाईक रणदुल्लाखानासन्नागमे गेले होते. त्याणीं अंतस्थें महाराजाशीं राजकारण राखिलें होतें. किलियावरी सामान नाहींसें जालें, लोकांस उपवास पडो लागले, किला जेर जाला. तेव्हां महाराजांनीं सल्याची बोली घातली. तेव्हां तह जाला कीं गंगेपलीकडील मुलूख व पादशाही नसल (= वंश) मोंगलांच्या सुभ्याकडे द्यावे, गंगेअलीकडील मुलूक इदलशाहाकडे द्यावा, तो महाराजास जहागीर द्यावा. महाराजांनीं बारा हजार स्वारानिशीं चाकरी करून वजीरी करावी. यैसी बोली घातली. त्याप्रमाणें खानानीं विजापुरास लेहून पादशहाचा कौल व फर्मान आणविला. त्यावरी महाराजांनीं असल नसल राजपुरीस पाठविले. दुसरें मुसलमानाचें मूल, नसल, मोगलाकडे दिले. माहाराज किलियाखाले उतरोन आले. खानाची भेटी जाली. सन्मान जाला. माहाराज डेरियास गेले. त्यावरी कान्होजी नाईक व दादाजी कृष्ण महाराजांच्या भेटीस गेले. भेटी जाली. महाराजांनीं समाधानाच्या गोष्टी सांगितल्या. "तुम्ही वतनदारीस चुकले नाहींत. भेटीस आलेत उत्तम केले. तुम्ही मावळांत जबरदस्त वतनदार देशमुख आहा. हा मुलूक आपल्याकडे जहागीर जाला आहे. मावळचे देशमुख पाळेगार, पुंड आहेत. रुजुवाती होऊन अमल सुरलीत चाले यैसे करावे" यैसे बोलिले. त्यावरी कान्होजी नाईक बोलिले कीं "खानाजवळ आम्हांस आपणाकडे मागोन घ्यावे; आपण चाकरीस चुकणार नाहीं." त्यावरी विज्यापुरास गेले. पादशाहाची भेटी जाली. बोलीप्रमाणें सरंजाम जाला. त्यावरी महाराजांनीं रणदुलाखानास भीड घालून कान्होजी नाइकास आपणाकडे मागोन घेतले."

विजापूरकर व मोंगल यांत झालेल्या तहाअन्वयें दोघांच्या राज्याची मर्यादा

कृष्णा नदी होती असें बु. स. मध्यें आहे. जेधे करीन्यांत 'गंगे'चें नांव घेतलें आहे, त्याचा अर्थ गोदावरी किंवा भीमा असा होईल. शिवभारतांत '**तयोस्समभवत्सीमा भीमा नाम महानदी**' असें ह्मटलें आहे; यावरून भीमा नदीचीच सीमा ठरली हें जास्त विश्वसनीय दिसतें. शहाजीला मिळालेला मुलूख विजापूरकरांनीं दिला असें भारतकार सांगत नाहीं. त्याच्या मतें तह ठरला तेव्हां आपला जहागिरीचा मुलूख वगळून, बाकीच्या निजामशाही मुलखांतला कांहीं भाग मोंगलांना व कांहीं विजापूरकरांना असे शहाजीनें वाटून दिले. तेव्हां मोंगल आनंदित होऊन परत गेले. पण आदिलशहाला मात्र अशी भीति वाटू लागली कीं 'मोंगलांनीं ज्याप्रमाणें निजामाला बुडविला त्याप्रमाणें पुढेमागें ते मलाहि बुडवितील; यासाठीं शहाजीसारखा बलिष्ट सरदार आपल्या बाजूस असावा हेंच श्रेयस्कर' असा विचार करून महमूद आदिलशहानें शहाजीकडे बोलणें लाविलें व शहाजीनेंहि तें मान्य केलें.

या वर्णनांत भारतकारानें शहाजीच्या गौरवार्थ थोडीशी अतिशयोक्तीची भाषा वापरली असेल असा संभव आहे. पण "मी मोगलाकडे नोकरी करण्यास तयार आहे असें शहाजी म्हणत असून मोगलांनीं तें मान्य केलें नाहीं व त्यानें विजापुरकराकडेच नोकरीस गेलें पाहिजे असें सांगितलें" हें बादशहानाम्यांतलें वर्णन फारच असंभाव्य दिसतें. शहाजी आपल्या नोकरीस यावा अशी खटपट मोगलांनीं मालोजी भोसल्यामार्फत किती तरी वेळा केली; पण ती त्यानें मान्य केली नाहीं. तोच अनुभव याहि वेळीं आला. सारांश स्वतंत्र राज्याची उभारणी करण्याचें काम या वेळीं आपल्या आटोक्याबाहेरचें आहे हें लक्षांत आल्यावर शहाजीनें रणदुल्लाच्या मार्फत विजापूरकरांची नोकरी आपखुषीनें मान्य केली हें जास्त संभवनीय दिसतें. मात्र पुणें व सुपे हे परगणे शहाजीकडे राहिले ते कोणत्या नात्यानें राहिले हा वादग्रस्त प्रश्न दिसतो. भीमेच्या उत्तरेचा मुलूख मोगलांना द्यावा, दक्षिणेचा विजापूरकरांना द्यावा व विजापूरकरांनीं तो शहाजीकडे जहागीर म्हणून ठेवावा असा करार झाल्याचें जेधे करीना सांगतो; आणि शहाजीनें आपला मुलूख ठेऊन घेऊन बाकीचा मोगल व विजापूर यांमध्यें वाटून दिला असें भारतकार ह्मणतो. या दोहींचें तात्पर्य हेंच कीं पुणें व सुपे हे परगणे शहाजीचे शहाजीकडे ठेवण्यांत

आले. मात्र मावळाचा अंतर्भाव शहाजीच्या जहागिरींत झाला होता किंवा नाहीं तें समजत नाहीं. "मावळचे देशमुख पाळेगार पुंड आहेत. ते रुजुवाती होऊन अमल सुरळीत चाले येसे करावे" या कान्हियांतल्या शब्दावरून मावळच्या देशमुखांचीं बंडे मोडल्यावांचून शहाजीच्या प्रदेशांत शांतता नांदणें शक्य नव्हतें हें उघड दिसतें. पण हीं बंडें मोडण्याची जबाबदारी व मोडण्यासाठीं लागणारा अधिकार शहाजीला देण्यांत आला होता किंवा नाहीं? शहाजी 'जहागीरदार' होता व कान्होजी जेधे 'वतनदार' होता असें करीना म्हणतो त्या अर्थीं जहागीरदाराच्या तांबेदारींत वतनदारांनीं नांदावयाचें असा अर्थ घ्यावा किंवा काय? इत्यादि प्रश्नांचा निर्णय अधिक माहिती उपलब्ध झाल्यावाचून करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें जहागीरदार व मोकासेदार यांचीं कर्तव्यें निरनिराळीं होतीं. मोकासेदार हा मध्यवर्ती सत्तेच्या इच्छेस येईल तेव्हां बदलतां येई; पण जहागीर ही कायमची असे. पुणें परगण्याचा मोकासा शहाजीला श. १५५८ अखेर मिळाला होता. असें खं. २० ले. २३५ मध्यें स्पष्टपणें ह्मटलेलें आहे. त्या अर्थीं यावेळीं तह होऊन त्या अन्वयें शहाजीच्या ताब्यांत हा परगणा आला होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

१९ **कर्नाटची स्वारी**—रणदुल्ला व शहाजी यांची रवानगी विजापूर दरबाराकडून कर्नाटकच्या स्वारीवर करण्यांत आली त्यावेळीं कर्नाटकांत राजकीय परिस्थिति कशा प्रकारची होती तें समजून घेणें अवश्यक आहे. महाराष्ट्रांत बहामनी राज्याची स्थापना झाली त्या सुमारास कर्नाटकांत विजयनगरचें राज्य प्रस्थापित झालें; आणि बहामनी राज्य मोडून त्याच्या पांच शाखा बनल्या तरी विजयनगरचें साम्राज्य भरभराटींत होतें. अशा रीतीनें दोन अडीचशें वर्षेंपर्यंत विजयनगरचें साम्राज्य अव्याहत चालू राहिल्यामुळें तुंगभद्रेच्या दक्षिणेस रामेश्वरापर्यंत राजकीय व्यवहाराची घडी व्यवस्थित रीतीची बसली होती. तालिकोटच्या उर्फ राक्षसतागडीच्या युद्धानें ही घडी मोडली. पण त्यामुळें विजयनगरचें साम्राज्य एकदम नष्ट झालें, असा जो सामान्य समज रूढ आहे तो चुकीचा आहे. नादिरशहाच्या स्वारीनें मोंगली राज्यास जबर धक्का बसला पण तें अजीबाद नष्ट होण्यास पुढें ५०।७५ वर्षें लागलीं; त्याप्रमाणें तालिकोटच्या युद्धांत रामराजा मेला; तरी त्यावेळीं विजयनगरचें साम्राज्य अजी-

बांत नष्ट झालें नाहीं. रामराजाचा भाऊ तिम्मराज यानें मुसलमानाविरुद्ध आपला टिकाव लागत नाहीं हें लक्षांत घेऊन घनागिरी ऊर्फ पेनुकोंडा येथें राजधानी नेली; आणि तेथें राहून तो राज्यव्यवस्थेचें काम पाहूं लागला. कसा तरी जीव बचाऊन पळून आलेल्या या तिम्मराजाचें आधिराज्य या साम्राज्यांतील मांडलिकांनीं पूर्ववत् मान्य करणें शक्यच नव्हतें. मात्र त्याची नामधारी सत्ता कां होईना पण ती दक्षिणेंतील संस्थानिकांना मान्य होती हें लक्षांत ठेवलें पाहिजे. उत्तरेस ज्याप्रमाणें दिल्लीपतीचें नामधारी वर्चस्व मान्य करून ठिकठिकाणच्या नबाबांनीं स्वातंत्र्य पुकारण्याचा शिरस्ता पुढें पाडला, अगर बहामनी साम्राज्य मोडून पांच शाह्या ज्या प्रमाणें महाराष्ट्र व तेलंगण यांत नांदत होत्या, त्याचप्रमाणें विजयनगरचें साम्राज्य मोडून तुंगभद्रेच्या दक्षिणेस जे दहा संस्थानिक अस्तित्वांत आले ते पूर्ण स्वातंत्र्य व नामधारी मांडलिकत्व यांच्यामध्यें हेलकावे खात होते. त्यांच्या मनाची स्थिती अशा रीतीनें अनिश्चित स्वरूपाची होण्याचें कारण त्यांच्या मनांत विजयनगरच्या राजवंशाविषयीं विलक्षण राजनिष्ठा वसत होती असें नव्हे; हा केवळ त्यांच्या सोयीचा प्रश्न होता. सोईच्या दृष्टीनें त्यांना एकाद्या वेळीं या राजवंशाचें नांव पुढें करून आपलें घोडें पुढें दामटतां येईल असें वाटलें म्हणजे ते राजनिष्ठेचा डौल घालीत; आणि राजवंशांतील इसम शत्रुपक्षाकडे असला म्हणजे राजनिष्ठेची चेष्टा करीत. सारांश मनगटाच्या जोरावर शेजाऱ्याच्या हल्ल्यापासून स्वसंरक्षण कसें करून घ्यावें व त्याकरितां आपणास कोणता संस्थानिक मित्र म्हणावा लागेल व कोणास शत्रु मानावें लागेल हें ठरविण्यांत हे कर्नाटकांतील संस्थानिक गुंतले होते. आणि ही आपसांतील यादवी बोकाळल्यामुळें त्यानीं विजापूर व गोवळकोंडा येथील पादशहाकडे देखील मदत मागण्यास कमी केलें नाहीं. अशा रीतीनें आपसांतील भांडणापायीं मुसलमानांना आपल्या घरांत आणून दक्षिणेंतील सर्वच संस्थानिक पंचतंत्रांतील गंगदत्ताच्या दायादाप्रमाणें नाश पावले हें खरें. पण प्रारंभीं ही गोष्ट सहजासहजीं त्यांच्या लक्षांत येण्याजोगी नव्हती. दिल्लीकरांच्या जबर पेचामुळें विजापूर व गोवळकोंडा येथील मुसलमानी पादशहांना बहुधा दक्षिणेकडे दिग्विजय करण्याच्या कामांत लक्ष घालण्यास सवडच नव्हती. स्वतःचें राज्यच जिवंत राहणार किंवा नाहीं असा प्रश्न दोघांपुढें असल्यामुळें त्यांनीं

कर्नाटकांतील स्वारींचा विचार या वेळीं न करणें स्वाभाविक होतें. यामुळें हे दोन बादशहा एक होऊन कर्नाटक बुडवितील अगर या साठीं ते एकजुटीनें प्रयत्न करतील असें कर्नाटकांतील यादवींत गढलेल्या या वेळच्या संस्थानिकांना वाटलें नाहीं तर त्यांत आश्चर्य कसलें ? अगदीं दक्षिणेकडील या संस्थानिकांना मुळीं मुसलमानांच्या धडाडीचा साक्षात असा अनुभव नव्हता. एवढेंच नव्हे तर उलट विजयनगरच्या राजांनीं मुसलमानांचा पराभव अनेक वेळा केला होता असेंहि त्यानीं ऐकलेलें होतें. यामुळें मुसलमानांची मदत कामापुरती घेऊन नंतर त्यांना सहज घालवून देतां येईल असें त्यांना वाटण्याजोगें होतें. पण शके १५५८ मध्यें परिस्थितींत एकदम क्रांती झाली. शहाजी प्रकरण आटोपतांच दिल्लीकरांनीं विजापूर व गोवळकोंडा येथील बादशहांशीं मित्रत्वाचा तह केला; यामुळें या दोघांनाहि दक्षिणेकडे लक्ष घालण्यास चांगली फुरसत मिळाली. त्या वेळीं विजयनगरच्या राजवंशांतील इसम पेनुकोंडा येथें वेलूरच्या बाजूस पूर्वेकडे रहात असल्यामुळें त्याचा अंमल अगदीं पश्चिमेस असलेल्या बेदनूर वगैरे भागावर मुळींच चालत नव्हता; म्हैसूर वगैरे मध्यभागांतील संस्थानिकावर अर्धवट स्वरूपाचा अम्मल होता आणि जिंजी, तंजावर व मदुरा या पूर्व प्रांतांतील संस्थानिकांना मात्र विजयनगरकरांचें आधिराज्य कांहींसें मानणें भाग पडे; व त्यांच्या पुरतें राजनिष्ठा अगर बंडखोरी हे शब्द योजणें यथार्थ होतें. पण प्रथम विजापूरकरांचा प्रवेश अगदीं पश्चिम भागांत झाला व तेथून पूर्व किनाऱ्यापर्यंत यांचें सैन्य पोंचण्यास १०।१२ वर्षें लागलीं. तेव्हां या अवधींत अनेक स्वाऱ्या व पोटस्वाऱ्या झाल्या असतील हें उघड आहे. पैकीं दोन तीन स्वाऱ्यांचा संबंध शहाजी चरित्राशीं येत असल्यामुळें तेवढ्यापुरता तपशील येथें देणें अवश्य आहे.

बेदनूर येथें वीरभद्र नांवाचा राजा राज्य करीत असून बसवापट्टणचा केंग हनुम नायक हा त्याचा मांडलीक होता. परंतु केंग नायकानें वीरभद्राविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें; यामुळें वीरभद्रानें त्याचा पराभव करून त्याची जहागीर काढून घेतली. अशा रीतीनें भणंग बनलेला केंगनायक वीरभद्राविरुद्ध मदत मागण्यासाठीं विजापूरदरबारकडे गेला. त्यावेळीं रणदुल्ला व शहाजी हे आपापल्या सैन्यासह नुकतेच विजापुराकडे आले होते; व त्यांना कांहींतरी कामगिरी पाहिजेच होती. यामुळें केंगनायकाचें आमंत्रण

त्यांच्या पथ्यावरच पडलें. त्यांनीं कर्नाटकांत स्वारी काढण्याचें तावडतोब कबूल केलें. गेल्या दहा वर्षांत विजापूरकरांना मोगलांविरुद्ध म्हणजे मुसलमानांविरुद्ध लढावें लागलें; पण ही स्वारी काफरांविरुद्ध काढण्यांत आली व तिला जिहादचें स्वरूप होतें असें बुसातिने सलातीनकार म्हणतो*महमूद व मुस्तफाखान यांच्या मनांत मुसलमानी धर्माचा प्रसार करण्याची कल्पना होतीच; तिला आजपर्यंत व्यक्त स्वरूप आलें नव्हतें; तें आतां हळुहळु यापुढें येऊं लागलें. अर्थात् मुसलमानांच्या या धर्मयुद्धांत शहाजीनें मनापासून व तद्रूप होऊन सामील होणें वस्तुगत्याच अशक्य होतें; आणि रणदुल्लाखानाचें देखील या बाबतींत मुस्तफाखानाशीं एक मत होतें किंवा नाहीं याची शंकाच आहे. तथापि रणदुल्ला हा वेळ पडेल त्याप्रमाणें वागणारा होता. त्यानें प्रथम खवासखानाची बाजू वाढती दिसली तेव्हां तिचा पुरस्कार केला आणि पुढें खवासखानाविरुद्ध बादशहाचा व बहुतेक मुत्सद्यांचा रोख दिसतांच खवासखानास ठार करण्याच्या मसलतींत सामील होण्यासहि त्यानें कमी केलें नाहीं. यावरून त्याला स्वतःचें असें निश्चित मत नसून प्रसंग पडेल त्याप्रमाणें रंग बदलण्याचा त्याचा स्वभाव होता असें दिसतें. तथापि तो लढवय्या सेनापति होता व प्रारंभीं तरी त्याच्या हाताखालीं काम करण्यास शहाजी तयार होता एवढें गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं. या स्वारींत मलिक रेहान चार हजार स्वारांसह सामील झाला व सर्वांनीं मिळून बेदनूर ऊर्फ रायगिरी किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां वीरभद्राचा निरुपाय होऊन त्यानें रेहानच्या मार्फत तहाचें बोलणें लावलें.

अखेर वीरभद्रानें तीस लाख होन खंडणीदाखल द्यावे (पैकीं सोळा लाख रोख द्यावे आणि बाकीचे चौदा लाख तीन हप्त्यानें भरावे) अशा अटीवर तह झाला. त्याप्रमाणें वीरभद्राकडून आलेले सोळा लाख होन रणदुल्लानें बादशाही खजिन्यांत भरले. यामुळें त्याच्या राजनिष्ठेची तारीफ

* तमाम हिम्मत आदिलशाहकी दीन इस्लाम फैलाने और काफरोंसे लडनेकी थी; इस वास्ते उसने जिहादका झंडा खडा करके कर्नाटकके काफरोंपर लष्कर भेजनेकी तदबीर की; और रन्दोलेको उस लष्करकी सरदारी देकर रायगिरी तरफ रवाना किया. ( हिं. बु. स. पृ. ४९५ ).

सर्वतोमुखीं झाली व रणदुल्ला बादशहाचा निरोप घेऊन रायबागच्या बाजूस आपल्या जहागिरीच्या ठिकाणीं गेला. इकडे पुढच्या वर्षीं वीरभद्रानें खंडणीची बाकी देण्याच्या कामीं चालढकल चालविली व बसवापट्टणच्या केंगनायकावर पुनः हत्यार धरलें.* तेव्हां विजापुराहून पुनः सैन्य रवाना होऊन वीरभद्राचा सर्व मुलूख जप्त करण्यांत आला व केंगनायकाची पूर्ववत् बसवापट्टणास स्थापना करण्यांत आली. अशा प्रकारें ही बसवापट्टणाची स्वारी शके १५५८ ते १५६१ पर्यंत चालली असावी असें दिसतें. (शि. च. प्र. पृ. १७)

रणदुल्लाच्या पहिल्या स्वारींत बंगळूर व शिरें हे परगणे हस्तगत झाले (हि. १०४८=१५६०, ६१ शके हिं. बु. पृ. ५३५), त्यांची व्यवस्था शहाजीकडे सोपविण्यांत आली होती.

युद्धशौण्डात् किंपगौडात् गृहीतं सुमनोहरम् ॥
रणदूलहखानेन पारिबर्हमिवार्पितम् ।
सोऽध्यास्त विजयी राजा बिंगरूळाभिधं पुरम् ॥ ४४

* शिवतत्वरत्नाकर ग्रंथांत २७ व्या तरंगांत वीरभद्र व बसवापट्टणाचा केंग हनुमनायक यांचे युद्ध होऊन शेवटीं हनुमापासून बसवापट्टण वीरभद्रानें काढून घेतल्याची हकीकत आली आहे. त्यांतले कांहीं श्लोक असे आहेत.--

जातु व्याधे तु बसवापट्टणाख्यपुराधिपे ।
नृपे पूवलवंशस्थे दृप्ते हनुमनायके ॥
आदाय यावनीं सेनामिक्केरिनगरावधि ।
आगत्य योधयित्वा तु प्रयाते स्वपुरीं प्रति ॥
तदा निजबलैस्सार्धं वीरभद्रमहीपतिः ।
ततः परंतु बसवापट्टणाख्यं निरुध्यच ॥
तत्प्राकारं समाक्रम्य सद्ध (?) एवं समं बलैः ।
हनुमन्नायकं तं च निर्जित्य निजतेजसा ॥
तद्राराज्यलक्ष्मीं तत्काले परिणीय ततः परम् ।
सप्तांगं यौतकमिव ततोऽगृण्हान्महीपतिः॥

यावरून विजापूरकराकडून पराभूत होऊन खंडणीचा करार झाल्याचा व तो करार मोडल्याचा मुळींच उल्लेख न करतां वीरभद्रानें केंगनायकापासून बसवापट्टण घेतल्याचें वर्णन रत्नाकरांत आहे हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

बंगळूर शहर किंपगौडाकडून घेण्यांत आलें ही भारतकाराची माहिती प्रत्यंतर पुराव्यानें निश्चित ठरते ×

२० रणदुल्लाची दुसरी स्वारीः—बसवापट्टणावरील स्वारी झाल्यानंतर विजापुरचें सैन्य

श्रीरंगपतनेंद्रं च क्रूरं कंठीरवाभिधम्॥ ३८

श्रीरंगपट्टणाच्या कंठीरव नरस नांवाच्या संस्थानिकावर चालून गेलें. त्या-वेळीं रणदुल्लाखानास मुख्यसेनाधिपत्य देऊन बादशहानें असें जाहीर केलें होतें कीं "रणदुल्लाखानाशीं वागतांना कोणीं कुचराई केल्यास त्याची जहागीर जप्त करण्याचा अगर कोणतीहि शिक्षा फर्मावण्याचा अख-त्यार खानास देण्यांत आला आहे." या वेळीं सिद्दी अंबरखान दोन हजार स्वारांनिशीं सिधनूरास रहात असे. त्यानें रणदुल्लाच्या सैन्यांत सामील होण्याचें नाकारलें. तेव्हां खानानें अफजलखान नांवाच्या आपल्या हाता-खालच्या सरदारास पांच हजार स्वारांसह अंबरखानावर पाठविलें; आणि अफजलानें त्याला कैद करून खानापुढें आणलें. पण या अंबराची मलिक रैहान व खैरियतखान यांच्याशीं मलिकंबराच्या वेळेपासून मैत्री होती; यामुळें त्याच्या मध्यस्तीनें या अंबरखानास कैदेंतून सोडलें; एवढेंच नव्हे तर त्याची जहागीरहि त्याला परत देण्यांत आली. यानंतर चाळीस हजार सैन्यानिशीं चालून जाऊन रणदुल्लानें अनेक किल्ले काबीज केले व हवा मानवेनाशी झाल्यामुळें तो कर्नाटकांतून परत आला असें विजापूरचा इतिहासकार ह्मणतो. पण चिक्कदेवराय वंशावळी वगैरे कर्नाटकांतील प्रा-चीन ग्रंथांच्या आधारें डॉ. कृष्णस्वामी आय्यंगार ( Ancient India p. 293.) यानीं असें दाखविलें आहे कीं या युद्धांत रणदुल्लास मुळींच जय मिळाला नाहीं. विजापूरच्या सैन्यानें श्रीरंगपट्टण

---

× In 1638 Randullakhan captured Bangalore from Kempa Gauda......on Randulla Khan's return to Court Shahaji was appointed to govern the districts of Karnatic Bijapur. He fixed his residence at first at Bangalore and afterwords lived sometimes at Ballapur and sometimes at Kolar.

( Mysore & Coorg Gaz. Rice pp. 21-22).

व म्हैसूर या दोनहि किल्ल्यांना वेढा दिला. परंतु किल्ल्यांतील लोक निकरानें लढल्यामुळें मुसलमानांचा मारा लागू झाला नाहीं. शेवटीं असा तह ठरला कीं कावेरीच्या दक्षिणेकडचा मुलूख कंठीरवाकडे पूर्ववत् असावा; आणि उत्तरेकडचा प्रांत मात्र त्यानें विजापूरकरांना द्यावा. पण हीं कलमें विजापूरकरांच्या विजयाचीं निदर्शक वाटलीं तरी तीं पोकळ व निरुपयोगी अशीं होतीं कारण कावेरीच्या उत्तरेकडचा मुलूख विजापूरकरांचा म्हणावयाचा; पण तो कंठीरवाकडेसच राहूं द्यावयाचा; आणि त्याची व्यवस्था लावून जी शिल्लक राहील ती कंठीरवानें विजापुराकडे पाठवावी असें एक पोटकलम तहांत ठेवलें होतें. अर्थात् ही पळवाट अशा जातीची होती कीं कंठीरवाला 'यंदा उत्पन्नांतून खर्च वजा जातां शिल्लक कांहीं राहिली नाहीं' असें केव्हांहि म्हणतां येण्याजोगें होतें. शहाजीशीं तह करतांना ज्याप्रमाणें भीमेच्या दक्षिणेकडचा मुलूख विजापूरकरांना देण्यांत यावा व तो त्यांनीं परत शहाजीला जहागीर म्हणून द्यावा असें ठरलें होतें त्याच धर्तीवर श्रीरंगपट्टणच्या कंठीरवाशीं रणदुल्लानें तह ठरविला. परंतु त्याबद्दल फार बोभाटा झाला असें दिसतें. कारण रणदुल्ला परत दरबारांत गेल्यावर त्याच्याविरुद्ध वीरभद्रानें तक्रार केली व या प्रकरणाच्या चौकशीसाठीं एक मंडळ नेमण्यांत आलें. त्यावरून रणदुल्लाचा कारभार अव्यवस्थित स्वरूपाचा होता असें दिसून आलें. परंतु याबद्दल शिक्षा भोगण्यास रणदुल्ला जिवंत राहिला नाहीं. तो शके १५६३ मध्यें रहिमतपुराजवळ मरण पावला.

रणदुल्ला व शहाजी यांच्या कर्नाटकांतील स्वारीचें वर्णन म्हैसूर ग्याझिटिअरच्या सुधारलेल्या आवृत्तींत पृ. ३५९ वर विस्तृत रीतीनें दिलेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं बसवापट्टण अथवा तरिकेरी येथील पाळेगारानें विजापूरकरांच्या सैन्यास बोलावणें केलें. त्याप्रमाणें विजापूरच्या सैन्यानें बंकापूर, हरिहर, बसवापट्टण, व तरिकेरी हीं ठाणीं हस्तगत केलीं. बेदनूरच्या संस्थानिकानें खंडणी कबूल करून आपला बचाव केला. नंतर श्रीरंगपट्टणावर स्वारी करण्यांत आली; पण म्हैसूरकरांच्या माऱ्यापुढें विजापूरकरांच्या सैन्यास माघार घेणें भाग पडलें. तेव्हां मुसलमानांचें सैन्य मेलुकोटें येथें येऊन पूर्वेकडे वळलें. तेथें बंगळूर, मागडी आणि सावणदुर्ग यांचा मालक केंपगौडा यावर इ.स. १६३८ (श. १५६०) मध्यें चालून जाऊन बंग-

ळूर शहर आदिलशाही सैन्यानें हस्तगत केलें. पुढच्या वर्षी इ.स.१६३९ (श.१५६१) मध्यें चिक्कराय याच्या ताब्यांतील होसकोटे व कोलार हे परगणे विजापूरकरांनीं घेतले आणि या सैन्यानें नंतर घाटाखालचे वेलोर व जिंजी हे प्रदेश हस्तगत केले. त्यानंतर दोड्डबाळापूर, शिरें व चित्रदुर्गाचा दक्षिण भाग इ. स.१६४४ (श.१५६६) मध्यें विजापूरकरांच्या ताब्यांत आला.

अशा रीतीनें कर्नाटक पायाघाट व कर्नाटक बालाघाट असे दोन प्रांत राज्यांत सामील झाल्यावर हा सर्व भाग शहाजीकडे व्यवस्थेसाठीं सोंपविण्यांत आला; पैकी बंगळूर, होसकोटे, कोलार, दोड्ड बाळापूर व शिरें यांचा अंतर्भाव ज्या सुभ्यांत करण्यांत आला तो बालाघाट सुभा शहाजीस जहागिरीदाखल मिळाला. शहाजी प्रायः बंगळुरास रहात असे; परंतु शांततेच्या काळांत कधीं कोलार येथें तर कधीं दोड्ड बाळापूर येथें त्याची वस्ती असे.

कर्नाटकांतील या वेळच्या विजापूरकरांच्या स्वाऱ्यांसंबंधीं एक विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट होती ती अशी कीं त्यांत त्यांनीं ज्याचा मुलूख घेतला त्याला नेस्तनाबूद करण्याचें धोरण न स्वीकारतां त्याच्या ताब्यांतला सुपीक भाग खालसा करून बिनवस्तीचा भाग पूर्वीच्या मालकाकडेच चालू ठेवला. या धोरणामुळें तिकडील पाळेगार खुनशी न बनतां जंगली भाग वहितीखालीं आणण्यासाठीं झटूं लागले. उदाहरणार्थ बसवापट्टण खालसा केलें, पण तरिकेरी पाळेगाराकडे ठेवण्यांत आली. केंपगौडाकडून बंगळूर घेतलें, पण मागडी त्याच्याकडे ठेवली. त्याचप्रमाणें होसकोटें खालसा केलें आणि आनेकल पाळेगाराकडे राहूं दिलें; हाच प्रकार कोलार पुंगनूर व शिरे रत्नागिरी यांसंबंधीं करण्यांत आला. अशा प्रकारें हिंदू पाळेगारांचीं राज्यें घेऊन देखील त्यांना नेस्तनाबूद करावयाचें नाहीं; व त्यांचीं पाळेंमुळें खणून न काढतां त्यांना जगण्यास वाव ठेवावयाचा हें राजकीय धोरण शहाजीनें किंवा त्या वेळच्या विजापूरच्या अधिकाऱ्यांनीं पत्करलें असें राइस ह्मणतो तें विचार करण्याजोगें आहे. विजापूरचा इतिहासकार ह्मणतो त्याप्रमाणें कित्येक मुसलमानी मुत्सद्यांना ही कर्नाटकाची मोहीम म्हणजे धर्मयुद्ध वाटत होतें हें खरें असेल तर त्यानीं हिंदू राजे जाणूनबुजून जीवंत ठेवण्याचें धोरण पत्करणें संभवत नाहीं. हिंदू पाळेगार व संस्थानिक यांचा निर्वंश कसा होईल हाच विचार प्रामुख्यानें त्यानीं मना-

पुढें वागविणें स्वाभाविक होतें. परंतु शहाजीला मुसलमानांची धर्मयुद्धाची कल्पना पटण्याजोगी नव्हती. त्याला तिच्याविरुद्ध वागणें भागच होतें. आणि तो याप्रमाणें हिंदूंना आंतून मदत करीत होता हाच आरोप त्याच्यावर विजापुरच्या अधिकाऱ्यांनीं ठेवला असें जेधे–करीना सांगतो. राचेवार नांवाचे मराठे राजे कर्नाटकांत होते त्यांना शहाजी अंतस्थ रीतीनें मदत पोचवितो अशा आरोपावरून शहाजीची चौकशीहि करण्यांत आली, पण आरोप शाबीत झाला नाहीं यामुळें तो सुटला अशी हकीकत जेधेकरीन्यांत दिलेली आहे. शिवभारतांत देखील वीरभद्र वगैरे राजे रणदुल्लानें काढून टाकले होते, ते शहाजीच्या सहाय्यानें पुनः स्थानापन्न झाले असें ह्मटलें आहे. यावरून कर्नाटकांतील हिंदू राजांविषयीं आपलेपणाची भावना वागवून त्यांना जगविण्याची राजनीति कर्नाटकांत योजली गेली याचें श्रेय शहाजीसच द्यावें लागेल असें उपलब्ध पुराव्यावरून दिसतें.

---

# ५ शिवशाहीचा वृत्तांत.

१ **महाराजांची पुण्यास रवानगी**— शहाजीच्या ताब्यांत बंगळूर आल्यानंतर व तो तेथें राहूं लागल्यावर त्यानें बालशिवाजीची रवानगी बंगळुराहून पुण्याकडे केली. अर्थात् यावेळीं जिजाबाईचीहि रवानगी पुण्याकडे झाल्यामुळें त्या वेळेपासून शहाजी व जिजाबाई यांच्या वियोगास सुरुवात झाली. यासंबंधीं भारतांतली हकीकत बखरींतल्या वृत्तान्ताहून निराळी आहे. शिवजन्मापूर्वींच हा वियोग घडला व महाराजांच्या सातव्या वर्षीं विजापुरास पुनः गांठ पडली असली तरी महाराजांच्या स्वाभिमानी वर्तनामुळें शहाजीनें जिजाबाईची रवानगी पुण्याकडे केली असें चिटणीस सांगतात. पण भारतकार असें सांगतो कीं शके १५४७मध्यें शहाजी विजापुराकडे गेला. तो तिकडे दोन अडीच वर्षें होता; तेव्हां त्याच्याबरोबर जिजाबाई होती (अ. ५।२१). त्यानंतर श. १५५१च्या अखेरीस संभाजीच्या लग्नासाठीं शहाजी व जिजाबाई शिवनेरीस गेली. तेव्हांपासून ६।७ वर्षें जिजाबाई शिवनेरीस होती. दर्याखानाचा पराभव करून शहाजी परत शिवनेरीस आला तेव्हां शहाजीनें बालशिवाजीस प्रथम

पाहिलें ( अ. ६ श्लो. ९४ ). त्यानंतर शहाजीनें शिवनेरीचा किल्ला ताब्यांत घेतला व १५५७।५८पर्यंत मोंगलांशीं युद्ध केलें. शेवटीं तह ठरला तेव्हां जिजाबाई वगैरे मंडळी शिवनेरीस होती असा पादशाहनाम्यांतहि स्पष्ट उल्लेख आहे. त्यानंतर बंगळुरास गेल्यावेळीं

जननी शंभुशिवयोस्तत्र यादवनंदिनी ।
जग्राह हृदयं पत्युः शुद्धान्ते सुमहत्यपि ॥ ९/६०

असें शिवभारतकार ह्मणतो. त्यावरून शहाजीला यावेळीं आणखी बायका होत्या, तरी शहाजीचें अंतःकरण जिजाबाईनेंच काबीज केलें होतें. त्याचप्रमाणें संभाजी व शिवाजी हे दोन मुलगे असून आणि संभाजी वयानें वडील असून देखील शहाजीचें शिवाजीवर फार प्रेम होतें; याचें कारण शिवाजीच्या जन्मापासून शहाजीचें ऐश्वर्य वृद्धिंगत होत गेलें; त्याच्या दारांत हत्ती झुलूं लागले; हजारों घोडेस्वार हाताखालीं वागूं लागले आणि कर्नाटकांतील शत्रूंचा पराभव होऊन शहाजीचा दरारा सर्वत्र वाढला. [ अ. ९ श्लो. ६३-६८ ]. सारांश शिवाजी हा चांगल्या पायगुणाचा मुलगा आहे असें शहाजीच्या अनुभवास आलें असल्यामुळें त्याचें शिवाजीवर अत्यंतिक प्रेम होतें; परंतु शिवाजीला बारावें वर्ष लागलें तेव्हां म्हणजे शके १५६३च्या सुमारास स्वप्नांत शंकराचा दृष्टांत झाल्यामुळें शहाजीला शिवाजी व जिजाबाई यांची रवानगी पुण्याकडे करावी लागली ( अ. १० श्लो. १-२ ). सभासदानें देखील बाराव्या वर्षीं महाराजांची रवानगी पुण्याकडे होण्यास हेंच कारण सांगितलें आहे. "बारा वर्षेपर्यंत तुम्हीं आपले जवळ ठेवावें. पुढें न ठेवणें" असें श्रीशंभुमहादेव जागृतीं येऊन स्वप्न जालें असें सभासद सांगतो ( पृ. ३ ). मात्र शिवाजी राजे जन्मतांच हा दृष्टांत शहाजीला झाला असें सभासद ह्मणतो आणि भारतकार बाराव्या वर्षीं बंगळुरास हा दृष्टांत झाल्याचें सांगतो. शिवाजीच्या लहानपणीं

"न जानीतः स्म पितरावमानुषमुरुक्रमम् ॥ ७/१

ह्मणजे शहाजी व जिजाबाई यांना शिवाजी हा अमानुष व महापराक्रमी आहे हें माहीत नव्हतें असें भारतकारानें स्पष्ट सांगितलें आहे. त्यानंतर शके १५९८च्या सुमारास शहाजीनें यवनांशीं लढण्याचा विचार केला होता. तेव्हां "तुझा शिव नांवाचा मुलगा विष्णूचा अवतार आहे. त्याच्या हातून

यवनांच्या संहाराचें काम होणार आहे; यासाठीं तूं कांहीं काळ वाट पहा " असें शंकरानें शहाजीला स्वप्नांत सांगितलें ( अ. ९ श्लो. १८ ). त्यानंतर श. १५६३ मध्यें 'शिवाजीला पुण्याकडे पाठीव' असें पुनः शंकरानें सांगितलें असा तपशील शिवभारतांत आहे. तथापि दृष्टांत एक-वेळा झाला कीं दोन वेळां झाला, व तो कोणत्या वर्षीं झाला याचें विवेचन ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचें नाहीं. शंकराचा दृष्टांत झाल्यामुळें शहाजीनें शिवाजीस पुण्याकडे पाठविलें, यासंबंधीं सभासद व भारतकार यांच्यांत एकवाक्यता आहे. इतर बखरी मात्र बालशिवाजीच्या स्वाभिमानाचा अतिरेक पाहून शहाजीला विजापुराहून त्याची रवानगी करावी लागली असें सांगतात, आणि जिजाबाईचें तारुण्य संपल्यामुळें शहाजीनें तिला दूर केली अशी मीमांसा प्रो. सरकार यांनीं केली आहे. पैकीं श. १५५६ पासून कांहीं काळपर्यंत शहाजी व शिवाजी विजापुरास असल्याची बखरींतील हकीकत कालदृष्ट्या अशक्य कोटींतली आहे. कारण श. १५५६–५८ शहाजी विजापुरास नसून निजामशाही उभारण्याच्या खटपटींत जुन्नराकडे होता हें प्रत्यंतर पुराव्यानें व निर्विवाद रीतीनें सिद्ध आहे. त्याचप्रमाणें जिजाबाई व शिवाजी नावडतीं ह्मणून शहाजीनें पुण्याकडे रवाना केलीं हा तर्कहि विसंगत दिसतो; कारण शिवाजीप्रमाणें संभाजी हाहि जिजाबाईचाच मुलगा होता व तो वयानें मोठा जाणता होता; तेव्हां आपल्या आईला नावडती ह्मणून शहाजी दूर पाठवीत आहे हें दिसून येतांच तोहि बंगळुरास न राहतां आईबरोबर पुण्याकडेच गेला असता. तात्पर्य, खरा प्रकार एवढाच दिसतो कीं, संभाजीची कर्तबगारी बाराव्या चौदाव्या वर्षापासून शहाजीला दिसून आली होती; त्याप्रमाणें शिवाजीहि प्रत्यक्ष जबाबदारी अंगावर पडली असतां तीं बाराचौदा वर्षांच्या सुमारापासून संभाळण्याचा अभ्यास करील असें वाटून त्याला पुण्याकडे पाठविलें. शहाजीची कांहीं जहागीर कर्नाटकांत व कांहीं पुण्याकडे होती. पैकीं कर्नाटकांतील जहागिरीपैकीं कांहीं भाग संभाजीच्या नांवें केला, त्याप्रमाणें पुणें सुपें प्रांताकडील जहागिरींतला थोडासा भाग ( म्हणजे कर्यात मावळ ) शिवाजीच्या नांवें शहाजीनें करून दिला. स्वतः स्वारी शिकारींत गुंतल्यामुळें शहाजीला जहागिरीची व्यवस्था विश्वासूक माणसाकडे सोंपविण्यावाचून गत्यंतर नव्हतें. आणि हीं विश्वासूक माणसें व्यवस्था पहात असतां त्यांनीं

खाशा मंडळींच्या सहाय्यानें व्यवहार चालविण्याची वहिवाट पडली म्हणजे उभयपक्षीं श्रेयस्कर होईल अशा सरळ विचारानें ही मांडणी करण्यांत आली असली पाहिजे. याखेरीज त्या वेळच्या कर्नाटकांतील राजकीय परिस्थितीमुळें देखील शहाजीला जहागिरींची व्यवस्था अशा रीतीनें लावणें भाग होतें. विजापूर दरबारांत खवासखान, मुरारपंत, रणदुल्ला, मुस्तफाखान वगैरे मुत्सद्दी वावरत होते. त्या सर्वांच्यावर कैदेचा व बादशाही गैरमर्जीचा खडतर प्रसंग आलेला शहाजीनें पाहिला होता; करितां आपल्यावरहि तो प्रसंग केव्हां येईल याचा नेम नाहीं हें लक्षांत ठेऊनच शहाजीला रोजचा व्यवहार करावा लागे. तेव्हां या दृष्टीनें आपणावर बरा वाईट कसाहि प्रसंग आला तरी दोनहि ठिकाणच्या जहागिरींची व्यवस्था आपल्या दोन मुलांनीं, जिजाबाईनें व अनुभविक नोकरांनीं मिळून योग्य रीतीनें चालविण्यास अडचण पडूं नये यासाठीं शहाजीनें एका मुलास कर्नाटकांत व दुसऱ्यास पुण्याकडे पाठविलें. आणि भलता प्रसंग न येतां सर्व गाडें सुरळीत चाललें असतें तर शहाजीला पुण्याकडे जाण्यास अगर जिजाबाईला बंगळुराकडे जाण्यास कांहींच अडचण पडण्याजोगी नव्हती. त्या अर्थी जिजाबाई व शिवाजी यांच्या पुण्याकडील रवानगींत नावडतेपणाचें कारण गृहीत धरण्याचें कारण मुळींच दिसत नाहीं.

**२ अवतार कल्पना**—शिवाजीमहाराज हे अवतारी पुरुष होते असें वर्णन शिवभारतांत व सर्व बखरींतून तर आहेच. पण अलीकडच्या इतिहासकारांनीं देखील महाराजांना 'अवतारी' हें विशेषण लावलेलें आढळतें. तथापि आजकालच्या लेखकांनीं योजलेला 'अवतारी' हा शब्द बखरकारांच्या शब्दाहून निराळ्या अर्थाचा वाचक असतो. बखरकार पौराणिक अर्थानें 'अवतारी' शब्दाची योजना करतात आणि आधुनिक लेखक 'फार मोठी व असामान्य कामगिरी करणारा पुरुष' याचा पर्याय म्हणून 'अवतारी' शब्द योजतात आणि अवतारांची कल्पना शब्दशः खरी धरावयाची असेंहि त्यांच्या लिहिण्याचें तात्पर्य नसतें; किंबहुना धर्मभोळ्या लोकांनीं मानलेली ही कल्पना आपण खरी धरण्याचें कारण नाहीं असेंहि, प्रसंग पडल्यास, ते प्रतिपादन करतील. यामुळें आधुनिकांनीं योजलेला 'अवतारी' हा शब्द जुन्या लेखकांच्या बखरींतील शब्दाहून

भिन्नार्थाचा वाचक आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. येथें आपणास भारतांतील शब्दांचेंच विवेचन करावयाचें असल्यामुळें आजचा अर्थ विचारांत घेण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें परमेश्वर धर्मग्लानीच्या प्रसंगीं मानवी देह धारण करतो किंवा नाहीं याचेंहि विवेचन करणें अप्रस्तुत ठरेल. कारण हा विषय धर्मश्रद्धेचा आहे, ऐतिहासिक चिकित्सेचा नाहीं. शिवाजीमहाराजांच्या वेळीं व त्यांच्या मागून कित्येक वर्षेपर्यंत त्यांना 'अवतारी पुरुष' असें मनापासून मानणारे लोक होते हें निर्विवाद असल्यामुळें ही कल्पना प्रथम कोणत्या स्वरूपांत रूढ होती व कालांतरानें तिच्यांत कोणकोणते फरक होत गेले याचा इतिहास येथें आपणास पहावयाचा आहे.

खुद्द महाराजांच्या वेळचे असे चार ग्रंथ सध्या उपलब्ध आहेत. (१) शिवभारत, (२) जयरामकृत पर्णालपर्वतग्रहणाख्यान (३) रघुनाथपंडितकृत राजव्यवहारकोश आणि (४) संभाजीकृत 'बुधभूषण.' या चारहि ग्रंथांत महाराजांचें अवतारीपण विस्तारपूर्वक वर्णन करून त्यांना विष्णूचा अवतार असें म्हटलें आहे. इतर पुराणग्रंथांतून कोणत्या परिस्थितींत परमेश्वर मानवी रूपानें अवतार घेतो यासंबंधीं एक ठरीव कल्पना सांगितलेली असते तीच शिवभारतांत ग्रथित केलेली आहे. तिचा सारांश असा. पूर्वी कलीनें घोर तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतलें; आणि त्याच्या आशिर्वादानें तो प्रबळ झाला; इतर दैत्य देखील म्लेच्छरूपानें पृथ्वीवर अवतरले व त्यांनीं सर्व पृथ्वी पादाक्रांत केली. या म्लेच्छांत यज्ञाची प्रवृत्ति नव्हती तरी कलियुगाच्या प्रभावामुळें त्यांचें ऐश्वर्य वाढलें आणि क्षत्रिय क्षीणबल झाले. तेंव्हां म्लेच्छांच्या पीडेनें गांजलेली धरित्री ब्रह्मदेवाकडे गेली, व त्याला ह्मणाली

दुष्टदैत्यांतके कृष्णे निजं धामाधितिष्ठति ।
बुद्धावतारे भगवत्यपि मौनावलंबिनि ॥ ५/१८
दुर्जना यवनास्तात वृजितानि वितन्वते ।
त्रातारं नाधिगच्छामि नियच्छेयं कथं व्यथाम् ॥ ५/१९

म्हणजे दैत्यांचा नाश करणारा श्रीकृष्ण निजधामास गेला व भगवान् बुद्धानें मौन स्वीकारलें आहे; यामुळें दुष्ट यवन पापें करीत असूनहि मला कोणी त्राता मिळत नाहीं.

हें गाऱ्हाणें ऐकून ब्रह्मदेवानें तिचें सांत्वन करून सांगितलें कीं, 'मी या-संबंधीं भगवान् विष्णूस विनवून आलों आहे, व त्यानें शहाजी व जिजाबाई यांच्या पोटीं पुत्ररूपानें अवतार घेऊन धर्मस्थापना करण्याचें अभिवचन दिलें आहे' (अ. ५ श्लो. २६-५८).

संभाजीकृत 'बुधभूषण' नांवाच्या काव्यांत वर सांगितलेलीच कल्पना निराळ्या शब्दांत मांडली आहे ती अशी—

कलिकालभुजंगमावलीढम्
निखिलं धर्ममवेक्ष्य विक्लवं यः ।
जगतः पतिरंशतोवतापो ( तीर्णः )
स शिवच्छत्रपतिर्जयत्यजयेः ॥ ९ ॥
येन क्षोणितले कलावविकले बुद्धावतारंगते ।
गोपालेखिलवर्णधर्मनिचये म्लेच्छैः समासादिते
भूयस्तत्परिपालनाय सकलाञ्जित्वा सुरद्वेषिणः ।
स्वे स्वे वर्णपथे चिरेण विहिता विप्रादिवर्णाः क्रमात् ॥१०॥

जयरामानें देखील विष्णूचा दहावा अवतार जो कल्की त्याचा दूत शिवाजी महाराजांच्या रूपानें अवतरला आहे असें वाक्य बहलोलखानाच्या तोंडीं घातलें आहे; तें असें—

श्रूयते किल हिन्दूनां शास्त्रे कैश्चिदुदाहृतम् ।
कल्की विष्ण्वताराणां दशमः संभविष्यति ॥
छेत्स्यते तेन सर्वत्र व्याप्तं यावनमंडलम् ।
तस्यैव कल्किनस्तावदसावग्रे समागतः ।
दूतो वै प्रतिभात्यस्मान्यतोऽस्मन्निधनोद्यतः ॥

यानंतर व्यंकोजीशीं बोलतांना देखील जयरामानें—

चरितं देववर्यस्य विष्णोरिवजगत्प्रभोः
कल्किनो निष्कलंकस्य तुरुष्कवरमर्दनम् ॥

या शब्दांत महाराजांचा संबंध विष्णूच्या दहाव्या अवताराशीं म्हणजे कल्कि अवताराशीं जोडला आहे.

रघुनाथपंडित कृत राजव्यवहार कोशांत तर अवताराची कल्पना विस्तृत रीतीनें सांगितली असून शिवाजी महाराज हे शंकराचे अवतार नसून

विष्णूचे अंशधारी आहेत असें खुलासेवार सांगितलें आहे ( शि. च. प्र. पृ. १३७–४० ) त्याचें तात्पर्य असें. एकदां यवनरूपी दैत्यांच्या तापानें त्रस्त झालेली पृथ्वी ब्रह्मदेवास शरण गेली ( उपोद्‍घात श्लो. ७ ) आणि 'कलिदैत्यसंघाची' आपणास फार बाधा होत आहे अशी तिनें तक्रार केली. ब्रह्मदेवानें तिचें सांत्वन केलें आणि तिच्यासह वैकुंठास जाऊन—

न यावनं दुर्नयजातमेषां सर्वंसहापि क्षमते विसोढुम् ।
तद्भारमस्याः परिहर्तुमाशु म्लेच्छापहाराय हरे यतेथाः ॥ २७ ॥

अशा शब्दांत दाद मागितली. तेव्हां विष्णूनें—

कार्ये महत्यत्र नियोजयामश्चंद्रार्धचूडं वयमेव गत्वा ॥

म्हणजे 'या कामीं आम्हींच जाऊन शंकराची योजना करतों' असें सांगितलें. त्याप्रमाणें विष्णूनें शंकराकडे जाऊन सर्व हकीकत सांगितली. परंतु ती ऐकून घेतल्यावर देखील शंकरानीं तें काम स्वतःकडे न घेतां विष्णूकडेच सोंपविलें व भवानी तुम्हाला या कामीं सहाय करील असें अभिवचन दिलें. याचें कारण धर्मस्थापनेकरितां अवतार घेण्याचें अभिवचन कृष्णानीं अर्जुनास भगवद्गीतेंत दिलेलें सर्वश्रुत आहे

पार्थं प्रति प्राक् तव 'धर्महानौ सृजेयमात्मान'मिति प्रतिज्ञा ।
जगत्सुगीतैव तदत्र कार्षीः कार्येऽधुना माधव मा विचारम् ॥ ५२ ॥

तिचें स्मरण देऊन शंकरांनीं विष्णूला अवतार घेण्यास भाग पाडलें.

यावरून एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, शिवाजी महाराजांच्या हयातींतल्या चरित्रकारांना शिवाजी महाराज हे विष्णूचे अवतार आहेत ही गोष्ट वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या मनावर बिंबवावयाची होती. बखरकार मात्र शिवाजी महाराज हे शंकरावतारी होते असें एकमतानें सांगतात. तेव्हां दोघांच्या सांगण्यांत असा फरक पडण्याचें कारण काय याचा छडा लावला पाहिजे.

महाराजांच्या हयातींतल्या चरित्रकारांना कलियुगाची रूढ कल्पना बदलून लोकमत स्वराज्याचा उभारणीस अनुकूल करून घ्यावयाचें होतें. शिवाजी महाराजांनीं आरंभिलेलें कार्य धर्मसंस्थापनेचें, उदात्तस्वरूपाचें व पवित्र आहे असें सांगण्यानें त्यांच्या कामास प्रत्यक्ष सहाय करण्याची प्रवृत्ति लोकांत उत्पन्न होईल असें दिसेना. कार्य पवित्र असलें तरी

कलियुगांत तें तडीस जाण्याऐवजीं बुडण्याचाच संभव अधिक असतो; यामुळें अशा फंदांत पडणें ह्मणजे व्यवहारदृष्ट्या आपल्या पायावर आपणहून धोंडा पाडून घेण्यासारखें आत्मघातकीपणाचें आहे असें सामान्य लोकांना वाटत होतें. तेव्हां किंकर्तव्यतामूढ बनलेल्या या लोकांना महाराजांचा पक्ष यशस्वीच होणार आहे हें प्रथम बजावून ठेवणें महत्वाचें होतें. कार्य पवित्र आहे एवढेंच नव्हे, तर तें तडीस जाण्यास काळाची जी अनुकूलता लागते तीहि आली आहे आणि तिच्या जोरावर शत्रूचा निःपात करून यश संपादन करणारा अलौकिक पुरुष निर्माण झाला आहे इतकी विचारसरणी महाराजांच्या कृत्यांविषयीं लोकांच्या मनांत समकालीन चरित्रकारांना बिंबवावयाची होती. कलियुगाची कल्पनाच खोटी असें सांगून काम भागण्याजोगें नव्हतें. कारण ती कल्पना फार दिवसापासून दृढमूल झालेली होती. तेव्हां ती मान्य करून पुराणांच्याच आधारें अवतारी पुरुष जन्मला आहे असें प्रतिपादन करण्यावाचून त्यांना गत्यंतर नव्हतें. या प्रतिपादनानें एकदम लोक महाराजांच्या पक्षास मिळणार होते असें नव्हे. पण ज्या परिस्थितींत सामान्य लोकांची बुद्धि कुंठित झाली होती त्या परिस्थितींत यश मिळविणारा इसम अवतारी असला पाहिजे असें अनुभवानें तरी लोकांना पटण्याचा संभव होता. कलियुगाच्या पौराणिक कल्पनेप्रमाणेंच परमेश्वर अवतार घेऊन धर्मस्थापना करणार हीहि कल्पना जुनीच असल्यामुळें ती वेळ आज आली आहे किंवा नाहीं व तो अवतारी पुरुष ह्मणजे शिवाजी महाराजच होय किंवा नाहीं एवढीच संशयाला जागा रहात असे. आणि या संशयाचा परिहार प्रत्यक्ष अनुभवानेंच होण्याजोगा होता. स्वराज्याच्या खटपटींत पडणाऱ्या लोकांना देखील ही प्रत्यक्ष अनुभवाची कसोटी मान्य होती. अत्यंत अडचणीच्या प्रसंगींहि ते धाडसानें उडी घेण्यास तयार असत; आपण पवित्र कामांत आहों त्याअर्थीं त्यांत यश मिळालेंच पाहिजे; आणि कदाचित प्राणास मुकावें लागलें तरी देह सत्कारणीं लागला अशी त्यांची भावना होती. यामुळें शिवाजी महाराजांच्या सहवासांत असलेल्या या लोकांना अत्यंत मोठें संकट ह्मणजे आपल्या अंतःकरणांतील कार्यश्रद्धा व्यक्त करण्याची अपूर्व पर्वणी आहे असें वाटे. ज्या प्रसंगाच्या नुसत्या विचारानें इतर लोकांची गाळण उडावी तेथें त्यांनीं सहज लीलेनें यश मिळवून दाखवावें असें घडू लागलें. यामुळें हळुहळु

'या कामास परमेश्वर सहाय आहे व यांत पुढाकार घेणारे शिवाजी महाराज अवतारी पुरुष आहेत' ही कल्पना अधिकाधिक लोकांना पटू लागली. व त्यांचीहि श्रद्धा महाराजांच्या ठिकाणीं बसून महाराष्ट्र राज्याप्रीत्यर्थ सर्वस्व अर्पण करण्याची स्फुर्ती त्यांना होऊं लागली. मात्र प्रारंभीं ही विचारसरणी मान्य करणाऱ्या लोकांची संख्या थोडी असून पुढें यश मिळत गेलें त्या मानानें ती वाढत गेली असावी; आणि ती आणखी वाढविण्यासाठीं महाराजांच्या पदरच्या कवींनीं ही अवतार कल्पना विस्तृत रीतीनें आपल्या ग्रंथांतून ग्रथित करून ठेविली.

महाराजांच्या निधनोत्तर त्यांचें चरित्र लिहिणाऱ्या बखरकारांना महाराजांच्या अवतारीपणाचें वर्णन करून लोकमत त्यांच्या कार्यास अनुकूल करून घेण्याची अवश्यकता नव्हती. त्यांच्या विषयींचा आदरभाव व पुण्यस्मृति जागृत रहावी एवढाच त्यांचा हेतु होता. तो साधण्यास त्यांची गणना त्यांनाहि अवतारी पुरुषांत करावी लागली. पण शिवाजी या नांवावरून हा अवतार 'शिवाचा' होता ही साधी कल्पना सांगण्यानें त्यांचें काम भागण्यासारखें होतें. शिवाजी हें नांव असलें तरी हा विष्णूचा अवतार आहे हें मुद्दाम खोल पाण्यांत शिरून सांगत बसण्याचें त्यांना मुळींच प्रयोजन नव्हतें. सारांश महाराजांच्या लहानपणीं त्यांच्या संबंधीच्या अवताराची कल्पना अस्तित्वांत नसावी; ते कामास लागल्यानंतर कांहीं लोकांनीं ती अस्तित्वांत आणली; तिला व्यवस्थित स्वरूप देऊन महाराज हे विष्णूचे अवतार असें त्यांच्या हयातींत अनेक ग्रंथकारानीं प्रतिपादन केलें आणि त्यांच्या निधनोत्तर शिवचरित्र लिहिणाऱ्या बखरकारांनीं त्यांना शिवाचा अवतार म्हणून वर्णन केलें असा या अवतारकल्पनेचा सामान्य इतिहास दिसतो.

३ शिक्षण—शिवाजीच्या बालपणच्या लीला आजपर्यंत उपलब्ध असलेल्या एकाहि ग्रंथांत सांगितलेल्या नाहींत. शिवभारतांत सातव्या अध्यायांत त्या २५।३० श्लोकांत मार्मिक रीतीनें सांगितल्या आहेत. शिवाजी हा साक्षात् विष्णु असून त्याची जाणीव आईबापांना नव्हती किंवा लहानपणच्या त्याच्या वागणुकी वरूनहि ती गोष्ट कोणाच्याहि लक्षांत येण्याजोगी नव्हती. इतर मुलांप्रमाणें हाहि अगदीं लहानपणापणीं दूध पिण्यासाठीं रडणें, प्रतिबिंब धरूं पाहणें, धुळीनें अंग भरून घेणें, माती

खाणें वगैरे प्रकार करी. नंतर उंबरठा चढता न येणें, पुढें दाईचें बोट धरून उभें राहणें, भिंतीवरील कवडासा हातांत धरून आणून दे म्हणून रडणें, डोक्यावर धुरळा उडवून घेणें वगैरे प्रकार यथाकाल त्यानें केले. त्यानंतर मातीचे हत्ती, व घोडे घेऊन खेळणें आणि पक्ष्याप्रमाणें हुबेहुब आवाजाची नकल करणें, घोड्याप्रमाणें खेंकाळणें, हत्तीप्रमाणें चीत्कार करणें, नगाऱ्याप्रमाणें आवाज करणें आणि मातीचे गड करून इतर मुलांशीं गडांचा खेळ खेळणें, चेंडू खेळणें व भोंवरा फिरविणें वगैरे वर्णन आहे. त्यांवरून सात आठ वर्षांचें वय होईपर्यंत बाळ शिवाजी कोणत्या परिस्थितींत वाढला याचें दिग्दर्शन कवीनें केलें आहे. गड, किल्ले, हत्ती घोडे वगैरेंचा परिचय शिवाजीला जन्मापासून होता, त्यांच्याच वातावरणांत तो वाढला हें कवीनें सुचवून ठेवलें आहे. त्यानंतर शिवाजी सात वर्षांचा झाला तेव्हां हा ‘ लिपिग्रहणयोग्य ’ म्हणजे अक्षर ओळख करून देण्याच्या वयाचा झाला असें पाहून शहाजीनें त्याला इतर समवयस्क पुत्रासह गुरूच्या हातीं दिलें. याचाच अर्थ त्याला धुळपाटीवर बसविलें असा होईल. तेथें बालशिवाजी सर्व मुळाक्षरें फार लौकर शिकला एवढेंच कवीनें सांगितलें आहे. मुळाक्षरें लिहितां वाचतां येणें म्हणजे सर्व विद्या हस्तगत करून घेण्याच्या दाराशीं पोंचण्यासारखें आहे; सारांश साक्षरता हा सर्व विद्यांचा पाया आहे असें कवीनें आपलें मत नमूद केलें आहे तें आजहि सर्वांना मान्य होण्याजोगें आहे ( अ. ९ श्लो. ७३ ). सातव्या वर्षी अक्षरओळख झाल्यानंतर बाराव्या वर्षांपर्यंत बालशिवाजीनें अभ्यासाच्या बाबतींत काय प्रगति केली तें कवीनें सांगितलें नाहीं. तथापि शिक्षणाचें काम चालू असलें पाहिजे यांत शंका नाहीं. कारण बाराव्या वर्षी कर्नाटकांतून महाराष्ट्रांत आल्यानंतर शिवाजीनें आपल्या गुरूंना शिक्षणांतील उत्तम प्रगतीनें कृतार्थ केलें असें कवीनें सांगितलें आहे. त्यांत हत्ती, घोडे फिरविणें, तरवार, धनुष्य, भाला, बर्ची इत्यादि आयुधें वापरणें, नेम मारणें यांत शिवाजी प्रवीण होता हें कवीचें मत आजहि सर्वांना पटण्याजोगें आहे. त्याचप्रमाणें पुराणें, भारत, दंडनीति काव्य, रामायण व इतर शास्त्रें यांचेंहि रहस्य शिवाजीला अवगत होतें हाहि मुद्दा वादग्रस्त नाहीं. तथापि ‘काव्य’ शब्दानें कांहीं लोक बिचकण्याचा संभव आहे. याचें कारण ग्रँडफ यानें आपल्या इतिहासांत ‘मराठे

लोकांना लिहिणें वाचणें येत नाहीं, ही विद्या कारकुनीबाण्याच्या लोकांनीं शिकावी, आमच्या सारख्यांनीं तिच्यांत लक्ष घालण्याचें कारण नाहीं असें ते समजतात. शिवाजीला आपली सहीसुद्धां करतां येत नव्हती. पण तो धनुर्विद्या, नेम मारणें, भाला, बोथाटी, बर्ची वगैरे आयुधें वापरण्याची जी कला दक्षिणेंत सर्वांना अवगत होती ती त्यालाही होती * असें लिहून ठेवलें आहे. आणि प्रो. सरकार यांनीं डफच्या मतास दुजोरा दिला आहे. यामुळें या दोन ग्रंथकारांवर विश्वासण्याची प्रवृत्ति असलेल्या कित्येकांना 'शिवाजी महाराजांना सही देखील करतां येत नव्हती तर काव्यांत त्यांची गति होती या म्हणण्यांत जीव नाहीं.' अशी शंका येण्याचा संभव आहे. याकरितां या मुद्याचा विचार केला पाहिजे. डफनें शिवशाहीचा इतिहास लिहिला तो अस्सल पत्रें, मराठी बखरी व मुसलमानी ग्रंथ यांच्या आधारावर व ठिकठिकाणीं स्वतःची कल्पना लढवून लिहिला आहे. आधारांची प्रथम तपासणी करून त्यांत विश्वसनीय आधार असतील तेवढ्यांच्याचवर अवलंबून ऐतिहासिक विधान केलें पाहिजे ही आजची इतिहास शास्त्रांची कसोटी त्याला माहीत नव्हती. यामुळें त्यानें विश्वसनीय व अविश्वसनीय आधारांवर विसंबून शिवशाहीतले पुष्कळसे प्रसंग सांगण्यावरच कटाक्ष ठेवला आहे. आणि त्यांतहि कांहीं गोष्टी तर केवळ आपल्या कल्पनेच्या जोरावर मांडल्या आहेत; अर्थात् त्या अगदीं निराधार आहेत. 'महाराजांना सही देखील करतां येत नव्हती' हें डफचें विधान या शेवटल्या वर्गांतलें आहे. या विधानाच्या मागलीं व पुढलीं विधानें बखरींच्या आधारावर केलेलीं आहेत हें आज आपणांस तपासून पाहतां येण्याजोगें आहे. पण मध्येंच एक वाक्य आपल्या कल्पनेचें लिहिणें त्याला इष्ट दिसलें. याचें कारण त्याला प्रत्यक्ष शिव-

---

*Mahrattas seldon can write or read; they consider all such learning the business of a Carcoon and if not degrading at-least undignified Shivaji could never write his name, but he was a good. archer and marks-man skilled in the use of the spear and of the various swords and daggers common in the Deccan (Fourth Edition p. 107. Grant Duff's History of the Mahrattas).

कालीन माहिती सांगणारा आधार त्याच्यापुढें नव्हता व बखरींतील कांहीं विधानें चुकीचीं आहेत असें त्याच्या अनुभवास आलें होतें. यामुळें कांहीं ठिकाणीं बखरी सोडून तर्काच्या आश्रयानें विधानें करण्याची पद्धति त्यानें ठिकठिकाणीं अवलंबिली आहे, त्यातलाच हा एक मासला आहे. परंतु आपणास या बाबतींत तर्काचा आश्रय करण्यानें कारण राहिलें नाहीं. महाराजांच्या पदरच्या कवीनें 'लिपिग्रहणाचा' प्रश्न स्पष्टपणें घेऊन त्यांना सातव्या वर्षीं अक्षरओळख करून देण्यांत आली वगैरे माहिती विस्तारपूर्वक सांगितली आहे; त्या अर्थीं तीच खरी मानणें प्राप्त आहे. त्याचप्रमाणें काव्यांतहि गति होती हें विधान आतां सहज पटण्याजोगें आहे. कारण शहाजीच्या भेटीस जयराम कवी गेला तेव्हां शहाजीनें त्याला 'शतचन्द्रं नभस्तलम्' ही समस्या घातली असें सांगून त्याच्या दरबारांतील इतर विद्वानांनीं व संभाजीनें कोणती समस्या घातली याचेंहि वर्णन जयरामानें आहे. केलें त्याचप्रमाणें शिवाजी महाराजांचा मुलगा संभाजी यानें रचलेला 'बुधभूषण' नांवाचा संस्कृत ग्रंथ आज आपणापुढें आहे. सारांश बाप, भाऊ व मुलगा संस्कृत जाणणारे होते आणि शिवाजी महाराजांचीदेखील काव्यांत गति होती हीं विधानें समकालीन व माहितगार ग्रंथकारांच्या लिहिण्यांत आलीं असल्यामुळें सुसंगत व विश्वसनीय आहेत. यावर ते काव्यांत निपूण होते या विधानांत अतिशयोक्तीचा कांहीं भाग असेल अशी कोणी शंका घेतल्यास ती मान्य करतां येईल. त्यांची गणना उत्तम संस्कृतज्ञ पंडितांत करण्याचें कारण नाहीं हें खरें. पण अतिशयोक्तीला देखील कांहीं तरी मूळचा आधार लागतो हें विसरतां कामा नये. एकादा थोर मनुष्य एका डोळयानें अंधळा असला तर चित्र काढतांना त्याचे भक्त ती बाजू मुळींच न दिसतां दुसरीकडचेंच चित्र काढण्याची खबरदारी घेतील. पण सबंध चित्र काढून दोनही डोळे पाणीदार आहेत असें त्यांना रंगवितां येणार नाहीं; कारण हें चित्र पाहून त्या थोर गृहस्थालाहि आपल्या उणेपणाचें स्मरण होऊन चित्रकाराच्या फाजीलपणाबद्दल संताप येईल. त्याप्रमाणें शिवाजी महाराज अक्षरशत्रु असते तर परमानन्दानें तो विषय फार तर गाळला असता. पण त्यानें तसें केलें नाहीं. उलट त्याचें वर्णन तपशीलवार केलें आहे; त्या अर्थीं त्यांची संस्कृत काव्यांतहि गति होती

हें सांगतांना कवीनें फार तर, थोडीशी अतिशयोक्ति करून ' निपुण ' शब्दाची योजना केली असें ह्मणतां येईल.

४ बारा मावळें काबीज केलीं—शिवाजी महाराज बंगळुराहून पुण्यास " येतांच बारा मावळें काबीज केलीं " असें सभासद म्हणतो. आणि इतर बखरकार सातव्या वर्षापासून त्यांच्या पराक्रमास प्रारंभ झाला असें सांगतात. परंतु भारतकार या वेळीं महाराजांनीं अद्भुत कामगिरी केल्याचें मुळींच सांगत नाहींत. उलट ते या प्रांतास आले तेव्हां त्यांचें थोरपण त्यावेळीं लोकांनीं जाणलें नाहीं असें तो स्पष्टपणें सांगतो. (अ. १०श्लो. ३० ) पुढें देखील अनुकूल मंत्र्यांच्या सहाय्यानें प्रजेला आनंद देत तो पराक्रमी शिवाजी राजा वाढूं लागला, लोकही समृद्ध झाले, महाराजांचे गुण लोकांच्या लक्षांत येऊं लागले आणि त्यांच्या गुरूंनाहि त्यांची विद्याग्रहणशक्ती पाहून आनंद झाला. पुढें पवार कुळांतील मुलीशीं त्यांचें लग्न झालें त्या वेळीं ते ' यौवनारंभी ' होते असें कवी सांगतो त्यावरून त्यांचें या वेळचें वय अंदाजें १९ वर्षांचें असावें असें म्हणतां येईल. या वेळीं मावळें काबीज करण्याची जी खटपट झाली ती दादाजी कोंडदेवाच्या हयातींत त्याच्याच पुढारपणाखालीं करण्यांत आली असली पाहिजे. याची हकीकत खं. १५ ले. ३०२ मध्यें आली आहे ती अशी:—" आपले आजे कान्होजी जेधे स्वारानसी महाराज (=शहाजी ) साहेबापासी चाकरी करीत होते. ते समई राजश्री छत्रपती कैलासवासी स्वामीस [ =शिवाजीस ] माहाराजानीं पुण्यास ठेविलें. त्या जवळीं आपले आजे कान्होजी नाईक स्वारानसी राहिले. त्यावरी राजश्री दादाजी कोंडदेऊ सिवापुरास आले. ते समई बारा मावळामधें कृष्णाजी नाईक बांदल देसमुख ता॥ हिरडस मावळ दाइत घेत होते. त्यास कर आपले वडील देत होते त्याणी दाइत दिलें नाहीं. दादाजी कोंडदेव कृष्णाजी बांदल यावरी गेले ते समई कृष्णाजी बांदलानें स्वारावरी चालोन घेतले. स्वार पिटून काढले. घोडियाच्या दांड्या [=शेपट्या ] तोडिल्या. दादाजी कोंडदेऊ नामोहरम होऊन सिवापुरास आलियावरी कान्होजी नाइकास बोलिले कीं " तुम्ही कृष्णाजी नाइकास भेटीस घेऊन येणें. तुम्ही ही गोष्ट मनावर धरिता तेव्हां कृष्णाजी नाईकहि आणिता; आणि बारा मावळचे देसमुख कांहीं आले आहेत; कांहीं राहिले आहेत तेहि भेटीस येतात " म्हणोन कित्येक गोष्टी बोलिले. त्यावरी कान्होजी

नाईक कारीस आले. तेथून कृष्णाजी बांदल यास च्यार गोष्टी सांगोन पाठविल्या. त्यावरून कृष्णाजी नाईक भेटीस सिवापुरावरी आले. त्यावरी अगदी देसमुख भेटले." यावरून बारा मावळें काबीज झाल्याची हकीकत अशी दिसते. [१] शिवाजी महाराज यास पुण्यास ठेवण्यांत आले. [२] त्यानंतर कृष्णाजी बांदल बारा मावळांत शिरजोरीनें वागत होता त्याच्या-वर दादाजी कोंडदेवानें चाल केली. परंतु दादाजीचा पराभव झाला. [३] नंतर कान्होजी जेध्याच्या मध्यस्तीनें बांदल दादाजीच्या भेटीस आला. [४] हें पाहून इतर मावळांतील देशमुखहि दादाजीला भेटले. अर्थात् माव-ळांत स्थिरस्थावर करण्याच्या कामगिरीवर दादाजी कोंडदेवाची योजना करण्यांत आलेली होती ती त्यानें अशा रीतीनें पार पाडली हें या हकीकतीचें तात्पर्य आहे.

सभासदी बखरींतील हकीकतीचें तात्पर्य देखील असेंच आहे. "शाहाजी राजे यांसि दौलतमध्यें पुणे परगणा होता. तेथें दादाजी कोंड-देव शाहाणा चौकस ठेविला होता. तो बेंगरूळास महाराजांचे भेटीस गेला. त्याबरोबर राजेश्री शिवाजी राजे व जिजाबाईआऊ ऐशीं गेलीं. ते समयीं राजियास वर्षे बारा होतीं. बराबर शामराव नीलकंठ म्हणून पेशवे करून दिले व बाळकृष्णपंत मुजुमदार दिले व सोनापंत डबीर व रघुनाथ बल्लाळ सबनीस*ऐसे देऊन दादाजीपंतास व राजेयांसि पुण्यास रवाना केलें. ते पुण्यास आले. येतांच बारा मावळें काबीज केलीं. मावळे देशमूख बांधून, दस्त करून पुंड होते त्यांस मारिलें. त्याजवर, कालवशात्, दादाजी कोंडदेव मृत्यु पावले. पुढें शिवाजी राजे आपणच कारभार करीत चालले."

सभासदी बखरींतील हा भाग दादाजी कोंडदेवाची हकीकत सांगण्यासाठीं लिहिलेला आहे. दादाजी कोंडदेव बंगळुरास गेला, तेथून शिवाजी महा-राज व पेशवे वगैरे मंडळी यांसह परत पुण्याकडे आला. आल्यानंतर बारा मावळें काबिज केलीं. त्यांत जे देशमुख पुंड होते त्यांना दस्त केलें

---

* शिवाजी महाराजांच्याबरोबर जी मंडळी देण्यांत आली त्यांचीं नांवें शामरावपंत पेशवे, माणकोजी दहातोंडे सरनोबत व बाळाजी हरी मजालसी व कारकून अशीं जेधे करीन्यांत दिलीं आहेत. तीं जमेस धरलीं असता महा-राजांच्याबरोबर आलेल्या सहा प्रमुख अधिकाऱ्यांचीं नांवें आपणास समजतात; व अस्सल पत्रावरून हीं नांवें बरोबर आहेत असें ठरतें.

किंवा मारले. नंतर दादाजी मृत्यू पावले; तेव्हांपासून शिवाजी राजे आपणच कारभार पाहूं लागले. अशी हकीकत या सभासदाच्या लिहिण्यावरून निघते. बखर छापतांना "येतांच बारा मावळें काबीज केलीं" हें वाक्य नव्या परिच्छेदाच्या प्रारंभीं छापण्यांत आलें आहे, यामुळें त्याचें मागल्या वाक्याशीं अनुसंधान तुटतें; आणि 'शिवाजी महाराजांनीं बारा मावळें काबीज केलीं' असा अर्थ करण्याकडे मनाची प्रवृत्ति होते. परंतु एकंदर संदर्भ लक्षांत घेतला असतां व दादाजी कोंडदेव मृत्यु पावल्यावर पुढें शिवाजी राजे आपणच कारभार करूं लागले हें सभासदाचें स्पष्ट विधान जमेस धरलें असतां मावळें काबिज करण्याचें काम दादाजी व इतर मोठी मंडळी यांनीं केलें असा इत्यर्थ सभासदाच्या लिहिण्यांतून निघतो. बालशिवाजीनें बाराव्या वर्षापासून या गोष्टी केल्या, त्यास दादाजीची संमति नव्हती वगैरे चिटणीसादिकांच्या बखरींत जो मजकूर आहे व ज्यामुळें महाराज अगदीं लहान वयांत अद्भुत कर्मे करूं लागले असें समजावें लागतें त्यास सभासदाच्या बखरींत आधार नाहीं.

मावळांतील बंडाळी मोडीत असतां दादाजी कोंडदेवास अनेक लोकांच्या समजुती घालाव्या लागल्या; कडक उपाय योजून दरारा वाढवावा लागला आणि सामोपचाराचे उपाय निष्फळ ठरल्यावर न्यायनिष्ठुरता हि स्वीकारावी लागली. बंडाळी व भांडणतंटे यांचा मनु संपवून राज्यव्यवस्थेचें नवें युग दादाजीला मावळांत सुरू करावयाचें होतें. त्याच्यापूर्वी मावळांत बेबंदशाही होती. निजामशाही अस्तित्वांत होती तेव्हां मलिकंबराची कारकीर्द अंतर्गत व्यवस्थेसाठीं गाजलेली असे. पण त्याहि वेळीं मावळांत बेसुमार दंगेधोपे होते. मलिकाच्या कारकीर्दींतली हकीकत सांगणारे अनेक महजर व पत्रें उपलब्ध आहेत. त्यावरून मावळांत सरकारी अंमलदारांची सत्ता न मानण्याकडेच पुष्कळशा देशमुखांची प्रवृत्ती होती असें दिसतें; कृष्णाजी बांदल तर इतर देशमुखापासून प्रत्यक्ष कर वसूल करीत असे व त्याच्या संबंधीं मलिकापर्यंत तक्रार नेण्यांत आली असून त्याचा बंदोबस्त होऊ शकला नाहीं. यामुळें ज्याला त्याला बेबंदशाहीच्या काळांत कसें जगावयाचें हा प्रश्न सोडवावा लागला. त्यांत स्थानिक पुंड लोकांत जो जबरदस्त असेल त्याचा अंमल मानणें व त्याच्याविरुद्ध असलेल्या शेजारच्या देशमुखाशीं लढणें हीं रोजच्या परिचयांतलीं कामें होऊन बसलीं. मलिकाच्या मागून

निजामशाही बुडेपर्यंत तर मावळांतील भांडणतंट्यांना ऊत आला होता. त्यांतून दुष्काळ व मुरारजगदेवानें पुणें जाळणें वगैरे आपत्तीमुळें पुष्कळशी वस्ती कमी होऊन जमीनीच्या व वतनाच्या मालकीसंबंधींचे प्रश्न फारच गुंतागुंतीचे झाले. तात्पर्य शके १५५९ मध्यें दादाजी कोंडदेवाचा अम्मल सुरू झाला तेव्हां मावळप्रांतांत शुद्ध अराजक माजलें होतें. कोणतेही उपाय योजून राजकीय व्यवस्था मानण्याची प्रवृत्ती कशी उत्पन्न करावयाची हा प्रश्न त्याला सोडवावा लागला. तो सोडविण्यासाठीं लागणारा अधिकार त्याला मिळालेला होता. "मसुरुल हजरती राजश्री दादाजी कोंडदेऊ सुभेदार व नामजाद किले कोंढाणा व माहालानिहाय" अशा शब्दांत त्याच्या नांवाचा उल्लेख त्यावेळच्या अस्सल महजरांतून केलेला आहे. त्या अर्थी तो कोंढाणा किल्ल्याचा व इतर महालांचा सुभेदार व नामजाद [=खास अधिकारी Special officer] होता यांत शंका नाहीं. परंतु ही सुभेदारी शहाजी राजांनीं दिली होती किंवा विजापूरकरांनीं दिली होती हा प्रश्न वादग्रस्त आहे. त्याचप्रमाणें शहाजीच्या जहागिरींत पुणें, सुपें, शिरवळ यांचा अंतर्भाव होत असला तरी तेथील दिवाणी व फौजदारी सर्व अधिकार त्याला देण्यांत आले होते असें दिसत नाहीं. जहागिरदार या नात्यानें त्याला कांहीं अधिकार असतील. पण त्याखेरीज मोकासेदार नेमून त्यांच्या हातून सरकारी कामें करविण्याचा हक्क विजापूरच्या बादशहाचा असे. तो मोकासाहि शहाजीला कांहीं भागापुरता व कांहीं काळपर्यंत देण्यांत आला होता. यामुळें मोकासेदार या नात्यानें तेथील वसूलाची व्यवस्था लाऊन कांहीं रकम विजापुरास पोचविणें शहाजीला भाग होतें. तें काम शहाजीतर्फे दादाजी करीत असे. यामुळें त्याला विजापुरास व बंगळुरास जावें लागे. परंतु कोंढाणा किल्ला शहाजीच्या ताब्यांत देण्यांत आला होता किंवा नाहीं व तेथें सुभेदार नेमण्याचा अधिकार शहाजीला होता किंवा विजापूरकरांना होता तें निश्चित करण्यास आज आपणाजवळ साधन नाहीं. परंतु कोंढाणा शहाजीच्या ताब्यांत नसावा व दादाजी कोंडदेव हा विजापूरकरांनीं नेमलेला सुभेदार असून तो शहाजीच्या जहागिरीची व मोकाशीचीहि व्यवस्था करीत असावा असा संभव अधिक दिसतो.

९ **परगण्याची व्यवस्था**—या ठिकाणीं जहागीर व मोकासा यांमधील

भेद लक्षांत घेण्यासाठीं आदिलशाही राज्यांतील घडी कोणत्या पद्धतीची होती व त्या संबंधीचे उपलब्ध कागद कोणत्या नात्यानें लिहिले गेले याचा विचार केला पाहिजे. डफनें या संबंधीं बराच शोध केला होता. त्यावरून असें दिसतें कीं, मोकासेदार हा आदिलशाही राज्यांत वसूली कामासाठीं नेमण्यांत आलेला महत्त्वाचा अधिकारी होता व त्याचा अंमल गांगोगांवच्या अधिकाऱ्यांवर चालत असे. त्याला वसूलापैकीं कांहीं भाग मिळे. परंतु हें प्रमाण शेंकडा किती होतें तें निश्चित करतां येत नाहीं. मोकासेदाराची नेमणूक किती वर्षें चालावी यासंबंधीं कांहीं निर्बंध नव्हता. ही गोष्ट मध्यवर्ती सत्तेच्या इच्छेवर अवलंबून असे. कित्येक मोकासेदार एकाच वर्षांत बदलले गेले; आणि कित्येकांकडे वीस वीस वर्षें मोकाशाचें काम अव्याहतपणें चाललें असें अनेक अस्सल कागदपत्र पाहून आपण विधान करतों असें डफनें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें मोकासेदार मुसलमानच असला पाहिजे असा परिपाठ नसून हिंदूमोकासेदारहि नेमले गेल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. किल्ल्याच्या बाबतींत मात्र आदिलशाहींत विशेष खबरदारी घेत. किल्लेदार बहुतकरून मुसलमान असे; व त्याची नेमणूक सरकारकडून होई व त्याला पगारहि तेथूनच पोचे. तेथें ठेवण्यांत आलेली शिबंदी किल्लेकऱ्याच्या दिमतींत असे. आणि कांहीं महत्त्वाचे किल्ले खास सरकारी अमलांतले म्हणून राखून ठेवण्यांत येत. उलटपक्षीं कित्येक डोंगरी किल्ल्यांवर राहण्याची दगदग मुसलमानी अधिकाऱ्यांना असह्य वाटत असे, यामुळें असे किल्ले जहागीरदारांच्या व देशमुखांच्या ताब्यांत दिले जात. उदाहरणार्थ पुरंदर किल्ला शहाजीच्या जहागिरींत मोडत होता व पुरंदरचा किल्लेदार महादाजी नीळकंठ याला शहाजीच्या तंत्रानें वागावें लागे. पुढें महादाजी मरण पावला तेव्हां त्याच्या मुलांना पुरंदरचा सरंजाम चालावा किंवा नाहीं याविषयीं निर्णय देतांना बापाप्रमाणें तुम्हीहि ‘ समाधाने व स्नेहेकरून चालाल ’ तर तुमचें उत्तरोत्तर ऊर्जित आहे असें शहाजी म्हणतो आणि या म्हणण्याला दुजोरा देतांना ‘ तुम्ही आम्हासी इमाने वर्ताल तोपर्यंत आम्हीहि तुम्हासी इमाने वर्तोन तुम्हापासून इमानांत अंतर पडिलिया आमचाहि इमान नाहीं ’ अशी सोडवणूक शिवाजी राजे करून घेतात ( शि. च. सा. पृ. १०७). त्या अर्थी पुरंदरच्या किल्लेदारावर शहाजीची सत्ता कांहीं तरी प्रमाणांत

होती यांत शंका नाहीं. परंतु कोंढाण्याच्या बाबतींत शहाजीची सत्ता इतकीहि चालत नसावी.

जहागीरदार, मोकासेदार व किल्लेदार यांची कल्पना आल्यानंतर शहाजी व शिवाजी यांच्या नांवचीं जीं अस्सल पत्रें उपलब्ध आहेत त्यांतून काय निष्कर्ष निघतो तें पाहूं. शहाजीला पुणें व सुपे हे परगणे जहागिरीदाखल देण्यांत आले ते शके १५५७।५८ मध्यें ठरलेल्या तहा-अन्वयें देण्यांत आले. पण जहागीर मिळाली ह्मणून शहाजी या प्रांताचा सर्वाधिकारी बनला असा अर्थ नव्हता. परगण्यांचा मोकासा मिळाला तर मात्र त्याला या परगण्यावर बरीच हुकमत चालविण्याचें साधन मिळालें असें ह्मणतां येण्याजोगें होतें. यासाठीं त्यानें या परगण्यांचा व शिरवळ परगण्याचा मोकासा विजापूरदरबाराकडून आपल्या नांवें करून घेतला. यामुळें कोणाचें इनाम अगर वतन चालविणें अगर प्रसंगोपात जप्त करणें इत्यादि गोष्टींचा अधिकार शहाजीला प्राप्त झाला; आणि हा अधिकार ओळखून या परगण्यांतले इनामदार व वतनदार शहाजीकडे अर्ज करून आपलीं इनामें कायम करून घेऊं लागले. हें सर्व काम चालविण्यास पोक्त व अनुभवशीर कारभाऱ्याची आवश्यकता होती. हा कारभारी दादाजी कोंडदेव हा असून त्यालाच कोंढाण्याचा सुभेदार नेमण्यांत आलें होतें. यामुळें इनामदाराकडे इनाम चालण्यास [ १ ] बादशाही फर्मान, [ २ ] वजीराचीं व मोकासेदाराचीं खुर्दखतें व [ ३ ] सुभेदाराची सनद अशा तीन पत्रांची जरूर असे. यापैकीं कोणीहि बदलला अगर मरण पावला म्हणजे इनामदाराला नवीन सनद मिळविण्याचा खटाटोप करावा लागे.

मोकासेदाराला आपल्या प्रदेशांत पोट मोकासेदार निर्माण करण्यास अधिकार होता. शहाजीला पुणे परगण्याचा मोकासा मिळाला; तेव्हां त्यानें या परगण्यांतील २९० गांवांपैकीं कर्यात मावळच्या ३६ गांवाचा मोकासा शिवाजीच्या नांवे केला व मंबाजी राजे भोसले यास सांडस खुर्दच्या वीस गांवचा मोकासा दिला. तेव्हां 'साहेबाच्या [ शिवाजीच्या ] तर्फेनें कर्यात मावळास हवालदार व कारकून अलाहिदा गेले' (खं. १८ ले.२२). यावरून मोकासेदार व पोट मोकासेदार आपल्या तर्फे हवालदार व कारकून यांच्या नेमणुकी करीत. शिवाजी महाराजांना कर्यात मावळाचा

मोकासा बापाकडून मिळाला होता त्याखेरीज इंदापूरचा मोकासा त्यांनीं १५६८ मध्यें मिळविला [ चतुर्थ सं. वृ पृ. ६८ ]. याप्रमाणें शिवाजी महाराजांनीं आपल्या नांवें मोकासा मिळविल्याचीं आणखी कांहीं उदाहरणें सांगतां येण्याजोगी आहेत. तेव्हां मोकासेदाराची नेमणूक जर मध्यवर्ती सत्तेकडून होत होती व मोकासा मिळणें म्हणजे ठोकळ मानानें सरकारी वसूल करण्याची जिम्मा मिळणें असा आहे तर शिवाजी महाराज यावेळीं तात्त्विक दृष्टया विजापूरकरांचे अंकित होते असें वाटण्याचा संभव आहे. परंतु असेंच निश्चयानें म्हणवत नाहीं. उपलब्ध कागदांतून ठिकठिकाणीं आढळणारे हे शब्द बापाच्या छायेखालीं राहून व त्याच्याच मोकाशांत पोटमोकासा मिळवून वसूलीचें काम चालविणारा या अर्थानें घेतले पाहिजेत व 'प्रतिपच्चंद्ररेखेव' या मुद्रेंत शिवाजी शहाजीचेंच अंकितत्व मान्य करतो, साक्षात् विजापूरकरांचें अंकितत्व मान्य करीत नाहीं, असें समजणें सयुक्तिकच नव्हे तर अपरिहार्य आहे. कारण शहाजीला ज्या भागांत मोकासा मिळाला नव्हता अशा ठिकाणचें मोकासेपण शिवाजी महाराजांनीं केल्याचा दाखला अद्याप मिळालेला नाहीं.

६ **स्वातंत्र्याचा प्रारंभः**—मोकासा मिळविण्याखेरीज आपल्या अंमलाखालचा प्रदेश वाढविण्यास दुसरा एक मार्ग या प्रदेशांत मोकळा होता. शहाजीला जहागीर मिळालेला प्रदेश मूळ निजामशाहींतला असून तहाअन्वयें तो विजापूरकराकडे आला, तेव्हां तेथें सर्वत्र विजापूरकरांचें राज्य एकदम मान्य झालें असा अर्थ नव्हता. तेथें बेबंदशाही माजली असल्यामुळें सरकारी अंमल मुळींच न मानणारीं कांहीं ठिकाणें होतीं व शहाजीच्या जहागिरीच्या उत्तरेस तर अराजक प्रदेश होता. तेव्हां अशा ठिकाणीं आपल्या अंगच्या बळावर सत्ता प्रस्थापित करणें व तेथें सुव्यवस्था लावण्याची महत्वाकांक्षा बाळगणें या गोष्टीस मध्यवर्ती सत्तेकडून हरकत येण्याजोगी नव्हती; आणि अशा रीतीनें स्वतंत्रपणें संपादन केलेल्या प्रांतांत शिवाजी महाराजांची सत्ता मोकासेदार या नात्याची नसून जेता या नात्याची होती. 'मोकासा अर्जानी होणें' व मोघम 'अर्जानीं होणें' [ = प्राप्त होणें ] असे जे निरनिराळे शब्दप्रयोग त्यावेळच्या कागदपत्रांतून आढळून येतात त्यांच्या अर्थांत वर सांगितल्याप्रमाणें महत्त्वाचा फरक आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. 'अर्जानी होणें'

हा मोघम प्रयोग सन सीत आर्बैन अलफ म्हणजे शके १५६७ सालापासून केलेला आढळतो [ खं. २० ले. १० ]. यावरून त्या सालापासून शिवाजी महाराजांची स्वतंत्र हालचाल सुरू झाली असें दिसतें. बंगळुराहून शिवाजी महाराजांना पुणें प्रांताकडे रवाना केलें तेव्हां ( म्हणजे श. १५६३ मध्यें ) शहाजीन त्यांना 'पुण्यदेशेश्वर' केलें; म्हणजे जहागीरदार या नात्यानें आपलें सर्व अधिकार दिले व मोकासेदार या नात्यानें असलेल्या अधिकारांपैकीं कर्यातमावळचा अधिकार शिवाजी महाराजांच्या नांवें केला. परंतु बापाचा प्रतिनिधी ह्मणून सर्व व्यवहारांत लक्ष घालण्यास महाराजांना कोणताच प्रतिबंध येण्याजोगा नव्हता; किंबहुना जिजाबाई व दादाजी यानीं या कामीं त्यांना हरएक प्रकारें उत्तेजनच दिलें असलें पाहिजे.

पुढें दादाजीच्या हयातींतच शिरवळ व पुणे परगण्यांत दंगाधोपा सुरू झाला [ शि. च. सा. पृ. ९५ व पृ. ५१ ]. आणि दादाजी मरण पावतांच बरीच चलबिचल झाली असली पाहिजे. परंतु ती जेथल्या तेथें शमवून सर्वत्र शांतता राखण्याचें काम शिवाजी महाराजांनीं त्यावेळीं करून दाखविलें. दादाजी मरण पावला तेव्हां कारकून नवीं खुर्दखतें मागू लागले; हें पाहून महाराजांनीं आपल्या नांवचीं पत्रें करून दिलीं. याचा नमुना खं. २० ले. २३७ मध्यें पाहण्यास मिळण्याजोगा आहे. हें पत्र श. १५६९ च्या आश्विनांत म्हणजे दादाजीच्या मृत्यूनंतर चार महिन्यानीं लिहिलेलें आहे. त्यांत अर्जदार गणेशभट लिहितो कीं मजकडे मोरगांवांतील इनाम जमीन चालत आहे; त्याबद्दल मजजवळ फर्मान हुमायून [ =बादशाही फर्मान ], खुर्दखत वजीरानी कारकीर्दी दर कारकीर्दी [ =अनेक वजीरांचीं पत्रें ], शहाजी महाराज यांचे खुर्दखत आणि सुभेदारांची [ =दादाजीची ] सनद अशीं पत्रें आहेत व त्याप्रमाणें मी या जमिनी उपभोगींत आलों आहें. परंतु "सालमजकुराकारणें मा॥ दादाजी कोंडदेऊ सुभेदार यासी देवाज्ञा जाली म्हणउनु माहालीं कारकून ताज्या खुर्दखताचा उजूर [ =तगादा ] करतात." या अर्जावरून 'वहिवाट चालली असेल तीच पुढें चालवावी' असा महाराजांनीं शेवटीं हुकूम दिला आहे. पुणें परगण्यांतील देशकुलकर्णासंबंधीं अशीच भानगड या-

वेळीं झाली असून महाराजाकडे विरुद्ध पक्ष फिर्याद नेणार असें ऐकतांच एका पक्षानें नमतें घेतल्याचा दाखला सापडतो ( शिवच. सा पृ. ५१ ). यावरून दादाजी कोंडदेव मरण पावतांच इकडील व्यवस्थेची घडी त्यांनीं यत्किंचितहि बिघडूं दिली नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तथापि ही व्यवस्था पचणें कठिण होतें. दादाजीच्या हयातींत पुणें व सुपें प्रांतांत दंगा सुरू झाला होता तरी त्याविषयीं विजापूरकरांना फारशी फिकीर वाटण्याचें कारण नव्हतें. सिंहगडचें ठाणें विजापूरकरांच्या ताब्यांत होतें व तेथें दादाजी कोंडदेव, सुभेदार या नात्यानें वागत होता. तेव्हां किरकोळ स्वरूपाचा दंगाधोपा या अधिकाऱ्यांना शमवितां येईल असें विजापूरच्या मुत्सद्यांना म्हणतां येण्याजोगें होतें. गेल्या वर्ष दोन वर्षांत राजगड किल्ला बांधून व हजार बाराशे लोक जमवून शिवाजीनें पुंडावा माजविला असल्याची बातमी शिरवळच्या ठाणेदारांनीं विजापूर दरबाराकडे पोंचविली व दरबाराकडून जरबेचीं पत्रेंहि पाठविण्यांत आलीं. परंतु शेवटीं हें प्रकरण विकोपास न जातां माफी देऊन मिटविण्यांत आलें अशा अर्थाचीं माहिती देणारीं तीन पत्रें खं. १९ ( ले. २६७—२६९ ) मध्यें छापलीं आहेत. अंतर्गत पुराव्या वरून हीं पत्रें भाषेच्या दृष्टीनें तरी विश्वसनीय नाहींत असें निश्चयानें म्हणता येतें. तथापि त्यांतला मतलब खरा असेल असें कै. राजवाडे यांचे म्हणणें होतें. त्याप्रमाणें वरील हकीकत खरी असल्यास दादाजीच्या मागून त्याचें काम करण्याचा अधिकार शिवाजी महाराजांना विजापूरकर देतील असें समजण्याचें मुळींच कारण नव्हतें. किंबहुना शिवाजीच्या हालचालीवर सक्त नजर ठेवणाऱ्या एखाद्या जबरदस्त इसमाची नेमणूक सुभेदारीवर होण्याचाच संभव अधिक होता. या विचारानें असो किंवा दुसऱ्या कोणत्याहि कारणामुळें असो एवढें मात्र निश्चित आहे कीं शिवाजी महाराजांनीं शिवापूर येथें राहून खेडेबारे येथें बांधकाम सुरू केलें आणि दादोजीच्या मरणानंतर ५।७ महिन्यांनीं कोंढाणा किल्ला ताब्यांत घेतला. ' कसबे खेडेबारे येथेंहि वाडे बांधले. तेथून बापूजी मुद्गल नऱ्हेकर देशपांडे ता। खेडेबारे यांच्या हातें राजकारण करून दग्यानें किल्ला कोंढाणा घेतला ' असें जेधे करीना सांगतो ( शि. च. प्र. पृ. ४१ ). त्यावरून सिंहगड हस्तगत करतांना प्राणहानी करण्याचा प्रसंग आला नाहीं असें दिसतें. अशा रीतीनें सिंह-

गड ताब्यांत घेणें म्हणजे विजापूरकरांचा अंमल उघडपणें झुगारून देण्यासारखें होतें; व त्यापासून आपणावर फार मोठें संकट ओढवेल याची जाणीव महाराजांना असली पाहिजे. आणि ही जाणीव असून त्यानीं किल्ला ताब्यांत घेण्याचें साहस केलें त्या अर्थी हा साहसाचा मार्ग ध्येय-सिद्धी प्रीत्यर्थ त्यांना अधिक जरूरीचा दिसला असें समजणें प्राप्त आहे. मावळाच्या दृष्टीनें सिंहगडचा किल्ला हें नाक्याचें ठिकाण होतें. तें शत्रूच्या ताब्यांत जाऊं देणें ह्मणजे आपली शेंडी दुसऱ्याच्या हातीं जाऊ देण्यासारखें वेडेपणाचें झालें असतें. तेव्हां तो मार्ग पत्करण्यापेक्षां सिंहगड हस्तगत करून त्याच्या संरक्षणार्थ येईल त्या संकटाशीं तोंड देण्याचाच विचार विजिगीषु शिवाजीला पटला असें दिसतें* यानंतर विजापूरकरांनीं मोठें सैन्य रवाना करून शिवाजीला जेरीस आणण्याचा जोराचा प्रयत्न केला. त्यांतही त्यांना यश आलें नाहीं. परंतु शहाजीला कैदेतून सोडविण्यासाठीं एवढ्या शिताफीनें मिळविलेला किल्ला विजापूरकरांच्या ताब्यांत देणें शिवाजीला भाग पडलें. तो प्रसंग वर्णन करण्यापूर्वी शहाजीस कोणी व केव्हां कैद केलें याचा वृत्तांत नमूद केला पाहिजे.

७ **शहाजीची कैद**—शहाजीच्या कैदेची हकीकत समजून घेण्यास बरींच महत्वाचीं साधनें उपलब्ध आहेत. शिवभारत, जेधेशकावली, जेधे करीना, बुसातिने सलातिन, महमूद नामा व शिवचरित्रसाहित्यांतील ( पृ. ५४ मधील ) पत्रें यांत या संबंधीची हकीकत आली आहे. पैकी मुसलमानी ग्रंथांतून शहाजीला कसें पकडलें याची माहिती दिलेली आहे-परंतु त्याच्या सुटकेची हकीकत त्यांत मुळींच सांगितली नाहीं. जेधे शकावलींत शहाजीला कैदेंत घातल्याची व कैदेंतून सोडल्याची अशा दोनही वेळच्या मित्या सांगितल्या असून जेध्यांच्या संबंधीं माहिती बरीच विस्तारानें दिली आहे. शिवभारतांत मात्र या प्रसंगाप्रीत्यर्थ ( ११–१५ ) पांच अध्याय खर्चीं घातले आहेत; आणि इत्थंभूत माहिती दिली आहे. तथापि त्यांत देखील शहाजी व शिवाजी यांची माहिती देण्यावरच परमानन्दानें लक्ष ठेवलें आहे; व मुस्तफाच्या कर्नाटकांतील कामगिरीचा उल्लेख त्यांत

---

* कोंढाण्याच्या मुसलमान किल्लेदारानें लाच खाऊन किल्ला शिवाजी महाराजांना दिला असें डफ ह्मणतो. ( पृ. ११२ ).

अगदि ओझरता आला आहे. त्याचप्रमाणें जेधेकरीना व जेधे शकावली यांतील एतद्विषयक वृत्तान्तांत कांहींसा फरक असल्यामुळें या दोहींची सापेक्ष ग्राह्याग्राह्यता प्रथम ठरवून ठेवणें अवश्यक आहे. त्यासंबंधीं विशेष चिकित्सा करण्याचें हें स्थळ नव्हें. परंतु येथें एवढें नमूद केलें पाहिजे कीं शिव-चरित्राच्या दृष्टीनें जेधेकरीन्यापेक्षां जेधेशकावलीमधली हकीकत जास्त व्यवस्थित स्वरूपाची आहे. करीना राजारामाच्या कारकीर्दींत लिहिला असल्यामुळें त्यांत चाळीस वर्षांपूर्वींचे प्रसंग वर्णन करतांना तपशिलांचा कांहीं ठिकाणीं गोंधळ व पौर्वापर्याचा विपर्यास झालेला आहे. परंतु जेधे शकावलींत हे दोष नाहींत. त्यांतहि हस्तलिखित प्रत बारकाईनें तपासून पाहिली असतां तिच्यांत चार निरनिराळीं वळणें आढळतात तीं अशीं (१) श. १५४०–९०; (२) श. १५९१–१६०५; (३) श. १६०५–१० आणि (४) श. १६१०–१९. पैकीं पहिल्या भागाचें वळण जुनें व लिहिणें व्यवस्थित आहे. त्या मानानें दुसऱ्या भागाचा लेखक पुष्कळ काने, मात्रा व अक्षरें गाळणारा आणि उत्तरकालीन आहे. तात्पर्य प्रस्तुत ज्या प्रसं-गाचा ऊहापोह आपणास करावयाचा आहे. तो प्रसंग जेधे शकावलीं-तल्या व्यवस्थित व जुन्या भागांपैकीं आहे. यामुळें त्यांतील विधानांना जेधे करीन्यापेक्षा जास्त प्रामाण्य दिलें पाहिजे.

महमूद आदिलशाहाच्या हुकुमावरून तयार झालेल्या महमदनाम्याची गणना अर्थातच अव्वल दर्जाच्या साधनांत केली पाहिजे. यद्यपि त्यांत पक्षपातानें वृत्तांतकथन केलें असलें, व मुस्तफाचें करणें न्यायाचें आणि शहाजीची वागणूक उद्दामपणाची होती असें ह्मटलें असलें तरी इतिहासाचें साधन या दृष्टीनें या समकालीन ग्रंथाचें महत्त्व कमी होत नाहीं. शिव-भारतांतून शहाजीची बाजू व महमदनाम्यांतून मुस्तफाची बाजू आपणास समजते आणि त्यावेळीं घडलेला वृत्तान्त निश्चित होतो. सध्यां आपणास शिवचरित्रातील माहितीचा तपशील जितका सापडेल तितका पाहिजे आहे. मग तो हिंदुलेखकाच्या इतिहासांत सांपडो किंवा मुसलमानी इतिहासांत सांपडो. आणि हा तपशील समकालीन लेखांतूनच जास्तींतजास्त सांपड-ण्याजोगा असल्यामुळें ग्रंथकाराच्या पक्षपातीपणानें बिचकून न जातां आपणास माहितीचा संग्रह केला पाहिजे. माहिती भरपूर जमली ह्मणजे नंतर कोणता पक्ष न्यायाचा होता व कोणता अन्यायाचा होता याची

चिकित्सा करतां येईल, आणि यासाठींच महमदनामा मराठी वाचकांना सविस्तर रीतीनें भाषांतरासह मिळणें अवश्यक आहे.

या महंमदनाम्यांत शहाजीच्या कैदेचा प्रसंग असा सांगितला आहे. " जिंजीचा वेढा बरेच दिवस रेंगाळत चालला असतां व युद्धाचें काम चालू असतां त्या कपटी शहाजीनें नबाब मुस्तफाखान यांजकडे निरोप पाठवून ' माझ्या सैन्यास विश्रांतीची जरूरी असल्यामुळें मला सैन्यासह जहागिरीकडे जाण्याची परवानगी मिळावी ' अशी विनंति केली." यावर नबाबानें उत्तर पाठविलें कीं " या वेळीं तुह्मीं निघून जाल तर वेढ्याच्या कामास व्यत्यय येईल. करितां तुह्मीं जाऊं नये." शहाजीनें पुनः दुसऱ्यांदा निरोप पाठविला कीं " लष्करांत धान्याची अतिशय महागाई झाली आहे; यामुळें शिपायांना यापुढें उपासमार सहन होणार नाहीं व त्यांच्याकडून कामहि होणार नाहीं. त्या अर्थीं तुमच्या परवानगीची वाट न पहातां मी आमच्या प्रांताकडे निघून जातों." यावरून शहाजी उद्दाम बनला आहे व त्याच्या मनांतून आपल्याशीं कुरापत काढण्याची इच्छा आहे अशी नबाबाची खात्री झाली आणि त्यानें त्याला इतक्या हुषारीनें व व्यवस्थितपणें कैद करविलें कीं त्याच्या मालाची यत्किंचित लुटालूट न होतां सुतळीच्या तोड्यासुद्धां सर्व माल सरकारांत जप्त झाला " ( सरकारकृत शि. च. पृ. ३८).

बुसातीने सलातीन नांवाचा विजापूरचा इतिहास अवल इंग्रजींत लिहिला गेला. तथापि त्याच्या लेखकाला कांहीं अस्सल कागद पहाण्यास मिळालें होते. यामुळें त्याची हकीकत बऱ्याच ठिकाणीं विश्वसनीय स्वरूपाची आहे असें मानण्यांत येते. त्या ग्रंथांत शहाजीची कैद अशी वर्णन केली आहे. " चंदीकडे मुस्तफाखान गेल्यावर सिदी रयहान व मुस्तफाखान यांचें लष्कर एकेजागीं झालें. तेव्हां मुस्तफा व शहाजी यांचा बेबनाव होऊन शहाजी मुस्तफाची गोष्ट ऐकेनासा झाला. तेव्हां शहाजीला पकडण्याकरितां हिजरी १०५८ रजब १५ रोजीं सकाळीं बाजी घोरपडे व यशवंतराव आसदखानी यांना मुस्तफानें पाठविलें. शहाजीनें गेली रात्र नाचरंगांत घालविली असल्यामुळें तो पहाटेच्या वेळीं निजला होता. घोरपडे वगैरे सरदारांची फौज आपल्यावर चालून आली असें समजतांच तो बेभान होऊन घोड्यावर बसून एकटाच निघाला. इतक्यांत बाजी घोरपडे

यानें त्याचा पाठलाग करून त्याला पकडलें आणि नबाबापाशीं आणलें. शहाजीचे ३००० स्वार होते ते सर्व पळून गेले व शहाजीचें सर्व लष्कर लुटलें गेलें. शहाजी कैद झाल्याची बातमी ऐकून अदिलशहानें दरबारांतून अफजलखानाची रवानगी केली व शहाजीला बंदोबस्तानें आणण्याचें काम त्यांजकडे सोंपविलें ( १५७० कार्तिक, मार्गशीर्ष )"

वर दिलेल्या मुसलमानी ग्रंथकारांनीं शहाजी मुस्तफाखानाचें ऐकेनासा झाला असें मोघम सांगितलें आहे. पण मुस्तफाखानाचें या वेळचें धोरण काय होतें व शहाजीशीं त्याचा कोणत्या मुद्यावर मतभेद झाला याचें विवेचन त्यांनीं मुळींच केलेलें नाहीं. हें विवेचन करण्यास उपयुक्त अशी माहिती शके १५८१ ( इ. स. १६५९ ) मध्यें प्रोएंझा नांवाच्या मिशनऱ्यानें त्रिचनापल्ली येथून लिहिलेल्या एका पत्रांत आली आहे. हें पत्र Nayaks of Madura नांवाच्या पुस्तकांत पुरवणी रूपानें छापलेलें असून त्यांत त्या वेळच्या दक्षिण हिंदुस्थानांतील घडामोडींचें समालोचन चांगल्या प्रकारें आलेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं विजयनगरच्या राजवंशांतील श्रीरंगराज हा महत्त्वाकांक्षी राजा होता व त्याच्या मनांतून राक्षसतागडीच्या युद्धानंतर आपल्या घराण्याचें नष्ट होत चाललेलें आधिराज्य पुनः प्रस्थापित करावें असें होतें. याकरितां त्यानें जिंजी, तंजावर व मदुरा येथील संस्थानिकांवर स्वारी करून त्यांना वठणीवर आणण्याचा प्रयत्न केला. परंतु यापैकीं जिंजी व मदुरा येथील संस्थानिकांना श्रीरंगाचें आधिपत्य मान्य करण्याची इच्छा नसल्यामुळें मदुरेच्या त्रिमलनायकानें गोवळकोंडे येथील कुतुबशहाची मदत मागितली. त्याप्रमाणें कुतुबशाही सैन्यानें श्रीरंगराजाच्या ताब्यांतील पेनुकोंडा वगैरे प्रदेश हस्तगत केला; तेव्हां श्रीरंग फजीत पावून आपल्या मांडलीकांकडे आश्रयार्थ गेला. कुतुबशहाच्या सैन्यानें (पेनुकोंडा घेतल्यानंतर ) श्रीरंगाच्या मांडलीकांवर चालून जाण्याच्या विचारानें प्रथम जिंजी किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां मदुरेचा त्रिमल नायक पंचाइतींत पडला. कारण श्रीरंगाचें राज्य बुडविण्यासाठीं त्यानें गोवळकोंड्याचें सैन्य बोलावलें खरें. परंतु तें आतां जिंजी हस्तगत केल्यानंतर आपल्या राज्यावर ह्मणजे मदुरेवर चाल करून येणार हें स्पष्ट दिसूं लागलें. त्यांतून तंजावरच्या वेंकटनायकानें घाबरून गोवळकोंडेकराशीं तह केला. यामुळें त्रिमलनायकाचें काम फारच कठिण झालें. हें पाहून

त्यानें विजापूर दरबाराकडे धांव घेतली. त्याप्रमाणें मुस्तफाखान गोवळकोंडे-करांविरुद्ध लढून जिंजीचा वेढा उठविण्यासाठीं ह्मणून आला. पण तेथें आल्यानंतर गोवळकोंडेकरांशीं लढण्याचें सोडून उलट त्यांच्याशीं त्यानें तह केला! आणि गोवळकोंडेकरांनीं श्रीरंगाच्या राज्यांतील उत्तरेकडचा मुलुख पादाक्रांत करावा व विजापूरकरांनीं जिंजीपासून दक्षिणेकडील संस्थानें गिळंकृत करावीं असा आपसांत करार ठरविला. या वेळीं गोवळकोंड्याचीं सूत्रें मीरजुमल्याच्या हातीं असून तो स्वतंत्र होऊं पहात होता. यामुळें त्यानें स्वार्थावर दृष्टी देऊन विजापूरकराशीं तह केला. विजापूरकरांच्या कर्नाटकांतील सुभेदारानें देखील असाच (स्वतंत्र नबाव बनण्याचा विचार) केला असल्यामुळें त्यानेंहि मीरजुमल्याचा स्नेह संपादन केला. मिळून या घडामोडींतून शेवटीं असें निष्पन्न झालें कीं मदुरेच्या त्रिमलनायकानें आपल्यावरचें संकट टाळण्यासाठीं ह्मणून प्रथम गोवळकोंडेकरांना व नंतर विजापूरकरांना बोलावून दक्षिणेंत आणलें. आणि अखेरीस हीं दोनही मुसलमानी सैन्यें आपसांत न भांडतां हिंदूंचीं सर्व लहान मोठीं राज्यें मात्र धुळीस मिळविण्याचा उद्योग ते संगनमतानें करूं लागलीं! मीरजुमला व विजापूरकरांचा सुभेदार हे आपापल्या बादशहांची सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र होण्यासाठीं या गोष्टी करीत होते हें खरें. पण त्यांच्या बंडखोरीचा फायदा हिंदू संस्थानिकांना मिळण्याऐवजीं हिंदू संस्थानिकांचा सत्यानाश होण्यासच या बंडखोरांचें अंतस्थ संगनमत कारणीभूत होत होतें. मिळून मुसलमानामधील दुहीचा फायदा हिंदू राजांना मिळू शकला नाहीं. दिल्लीकर व विजापूरकर यांच्या मधील बेबनाव आपल्या पथ्यावर पडेल असा अंदाज पूर्वीं शहाजीनें केला होता तो सपशेल फसून पेमगिरीच्या प्रसंगीं त्याला हार खावी लागली व तो विजापूरकरांचा नोकर बनला. तोच अनुभव आतां मदुरेच्या त्रिमलनायकाला आला. श्रीरंगाच्या आधिराज्यांतून सुटण्यासाठीं त्रिमलानें गोवळकोंडेकरांना निमंत्रण दिलें; आणि गोवळकोंडेकर शिरजोर झाले ह्मणून त्यानें विजापूरकरांना बोलावलें. आणि शेवटीं विजापूरकर व गोवळकोंडेकर एक होऊन त्यांनीं श्रीरंग व त्याचे सर्व मांडलीक धुळीस मिळविले. ही सर्व उलथापालथ चालली असतां शहाजीनें काय केलें व मुस्तफाखानाशीं त्याचा विरोध कोणत्या मुद्यावर आला हें समजण्यास आपणाजवळ साधन नाहीं. तथापि भारतकार असें स्पष्ट सांगतो कीं

दुर्धर्षोऽपि विधेयोऽस्य बभूव मधुराधिपः ॥ [११/५]

म्हणजे मदुरेचा त्रिमलनायक मोठा लढवय्या म्हणून नांवाजलेला होता तरी तो शहाजीच्या तंत्रानें वागू लागला. सारांश गोवळकोंडेकराविरुद्ध म्हणजे मीरजुमल्याविरुद्ध लढण्यासाठीं विजापूरकरांचें सैन्य आणविलें असून त्यानें एकदम पगडी फिरवून मीरजुमल्याशी स्नेह केला हें पाहून त्रिमलनायकाच्या तळव्याची आग ज्याप्रमाणें मस्तकास पोचली असेल त्याचप्रमाणें त्रिमलाविषयीं आपलेपणाची भावना वागविण्याऱ्या शहाजीलाहि मुस्तफानें केलेलें विश्वासघातकीपणाचें वर्तन पटणें शक्य नव्हतें. त्यानें जिंजीच्या वेढयांत सामील होण्याचें साफ नाकारलें. तो अनेक सबबी पुढें करून निघून जाणार असें दिसूं लागलें. इतकेंच नव्हे तर तो विरुद्ध पक्षांत सामील होईल किंवा काय अशीहि शंका मुस्तफास येणें स्वाभाविक होतें. कावेरी पट्टणचा जगद्देव, मदुरेचा त्रिमलनायक, म्हैसूरचा चामराज वोडियार आणि बेदनूरचा वीरभद्र वगैरेंनीं 'जहुर्यवनजं भयम्' म्हणजे मुसलमानांचें भय टाकलें. आणि

वशीचकार सकलं शाहः कर्णाटमंडलम् ॥ [१९/४]

शहाजीनें कर्नाटक हस्तगतकेल्यासारखें झालें होतें. तेव्हां ही हिंदूंची जूट फोडण्यासाठीं शहाजीला कैद करणें मुस्तफास अत्यवश्यक दिसलें असेल यांत शंका नाहीं.

वरील हकीकतीवरून हें स्पष्ट आहे कीं शहाजीवर कैदेचा प्रसंग आला तो कर्नाटकांतील गुंतागुंतीच्या परिस्थितीमुळें आला. त्यांत शिवाजीनें केलेल्या भानगडीचा फारसा संबंध नव्हता. शिवाजीनें घेतलेला सिंहगड परत हिसकून घेण्यासाठीं त्याच्यावर स्वतंत्र रीतीनें सैन्य रवाना केलें होतें. त्याचप्रमाणें शहाजीच्या बेगुमानपणाबद्दल त्याला कैद करण्याविषयीं महमूदशहाची संमति मुस्तफानें घेऊन ठेवली होती. शिवाजीनें दांडगाईचें वर्तन आरंभलें म्हणून शहाजीवर कैदेचा प्रसंग आला असें समकालीन मुसलमानी इतिहासकार अगर शिवभारतकार यांपैकीं कोणीहि सांगत नाहीं. कर्नाटकांत शहाजीचें प्रस्थ बेसुमार वाढलेलें पाहून त्याला कैद करण्यासाठींच मुस्तफाची सैन्यासह कर्नाटकांत रवानगी करण्यांत आली असावी असा भारतकाराच्या लिहिण्याचा आशय दिसतो. शहाजी व

मुस्तफाखान एकमेकास ओळखून होते; तथापि प्रथम कांहीं दिवसपर्यंत दोघांनींहि सामोपचारानें वागून मित्रत्वाचा डौल घातला होता. वस्त्रें, अलंकार देऊन, भेट प्रतिभेट यांचा देखावा निर्माण करून व वारंवार सल्ला मसलत विचारण्याचा घाट घालून मुस्तफानें शहाजीला हळुहळु गाफील बनविलें. आणि नंतर एके दिवशीं रात्रीं आपल्या सेनानायकांना बोलावून 'शहाजीस कैद करा असा मजकडे महमूदशाहाचा निरोप आला आहे, करितां आज पहाटे सैन्यासह जाऊन शहाजीस पकडण्याचें काम पार पाडा' असें मुस्तफानें सांगितलें. त्याप्रमाणें पहाटे मुस्तफाखान आपल्या सैन्यासह शहाजीच्या तळाभोंवतीं वेढा देण्यासाठीं निघाला. मुस्तफाबरोबरच्या या सैन्यांतील—१२ मुसलमान, ३ ब्राह्मण आणि ३ मराठे सरदार मिळून—१८ सरदारांची नांवें कवीनें प्रारंभीं दिलीं आहेत. त्यानंतर शहाजीच्या बेसावध सैन्याभोंवतीं गराडा दिल्यावर त्यांतून बाजी घोरपडे खास शहाजीच्या शिबिरावर चालून जाण्यासाठीं निघाला. तेव्हां त्याच्या बरोबर जे सरदार गेले त्यांत बाजीसुद्धां सात सरदारांचीं नांवें आहेत तीं सर्व मराठ्यांचीं आहेत. त्यांत शहाजीचा चुलत भाऊ मंबाजी भोसले याचें नांव आहे आणि जसवंतराव (आसदखानी) असें जें मोघम नांव बुसातिनें सलातीनमध्यें आहे त्याचें आडनांव 'वाडवे' असें भारतांत दिलें आहे. हें सैन्य आलें तेव्हां शहाजीकडील मंडळी अर्धवट झोंपेंत होती. यामुळें त्यांना युद्धाची तयारी करण्यास सवड मिळाली नाहीं. तथापि खंडोजी पाटील मात्र तावडतोब युद्धाची तयारी करून बाजी घोरपड्याच्या अंगावर एकटाच चालून गेला. त्यानें प्रथम बाजी घोरपड्यावर प्रहार केला. परंतु इतर सरदारांनीं गराडा घालून पाटलास ठार केलें. नंतर शहाजी घोड्यावर बसून लढण्यासाठीं निघाला, त्यावेळीं त्याच्याबरोबर निघालेल्या ६ सरदारांचीं नांवें परमानंदानें दिलीं आहेत. त्यांत शहाजीचा चुलतभाऊ त्र्यंबकराज याचें नांव आहे. हे सरदार चालून गेले तेव्हां शहाजीच्या सरदारांची बाजीच्या सरदारांशीं कांहींवेळ चकमक झडली. तिच्यांत बाजीच्या बाजूचे लोक विजयी झाले. शेवटीं शहाजीहि लढून दमला आणि जखमी होऊन पडला. तेव्हां बाजी घोरपड्यानें त्याला स्वतः कैद केलें. त्याबरोबर शहाजीचें सैन्य पळून गेलें आणि त्याच्या तळावरील

सर्व सामान शत्रूच्या हातीं लागलें. अशा रीतीनें कपटाचा आश्रय करून मुस्तफानें शहाजीला कैद करण्याच्या कामीं यश मिळविलें. ही बातमी ऐकून महमूदाला अर्थातच मोठा आनंद झाला.

बापाला कैद केल्याची बातमी ऐकतांच संभाजीनें बंगळुरास व शिवाजीनें पुरंदराकडे राहून आपापल्या प्रांताचें संरक्षण करण्याचें ठरविलें. पैकीं संभाजीवर मुस्तफानें तानाजी डुरे, विठ्ठल गोपाळ आणि फरादखान हे तीन सरदार पाठविले; आणि शिवाजीवर महमूदशहानें सैन्य रवाना केलें; त्याचा सेनाधिपती फत्तेखान हा असून त्याच्या हाताखालीं मिनादशेख, रतनशेख, फत्तेखान, अशरफशहा, मताजी घाटगे व बाजी नाईक फलटणकर हे सरदार देण्यांत आले होते. या सैन्यानें शिवाजीच्या प्रदेशांत प्रवेश करून बेलसर येथें तळ दिला आणि बाळाजी हैबतराव नांवाच्या सरदारानें शिरवळ गांठलें.

अशा रीतीनें बापास कैद करून आपल्यावर महमूदशहानें सैन्य रवाना केलें आहे व तें शिरवळ व बेलसर येथें येऊन ठेपलें ही बातमी ऐकून शिवाजी महाराजांनीं कोणत्या धोरणानें वागावें याचा आपल्या मनाशीं विचार केला. तेव्हां लढणें हेंच श्रेयस्कर असें त्यांच्या लक्षांत आलें. यापूर्वी चंद्रराजास जावळी येथें प्रस्थापित करण्याच्या कामीं त्यानीं मदत केली होती व फलटणच्या राजाशीं लढण्याचा प्रसंग आला तेव्हांहि त्यांनीं त्याचा पराभव केला होता. शिवाय बंगळुरास संभाजी लढल्यावांचून राहणार नाहीं हेंहि त्यांना माहीत होतें. यामुळें त्यांनीं युद्धाचाच निश्चय करून शिरवळ येथें आलेल्या बाळाजी हैबतरावावर कावजीच्या हाताखालीं सैन्य देऊन पाठविलें. या सैन्यांत गोदाजी जगथाप, भीमाजी वाघ, संभाजी काटे, शिवाजी इंगळे, भिकाजी चोर व पुंज भैरव हे सरदार होते. ही सैन्याची तुकडी शिरवळास गेली तेव्हां बल्लाळाचें सैन्य तटाच्या आश्रयानें राहिलें होतें. परंतु त्या तटाला बुरूज नाहींत व खंदकही नाहीं हें कावजीस माहीत होतें. तेव्हां त्यानें बेधडकपणें चालून जाऊन शिरवळच्या तटावर मारा केला व त्यास ठिकठिकाणीं खिंडारें पाडून आंत प्रवेश केला. तेथें कावजीच्या सैन्यानें बाळाजी हैबतरावाच्या सैन्यास गांठून त्याचे १०९ लोक पाडाव केले व बाळाजीस ठार केलें. तेव्हां बाळाजीचें सैन्य वाट फुटेल तिकडे पळून गेलें. अशा रीतीनें शत्रूचा धुव्वा उडवून

कावजी ही आनंदाची बातमी सांगण्यासाठीं पुरंदर गडावर शिवाजी-कडे गेला.

फत्तेखानानें बेलसर गांठलें होतें तेथें देखील थोडीबहुत चकमक झडली. परंतु तिच्यांत मराठ्यांना माघार खावी लागली असें दिसतें. या प्रसंगाचें वर्णन परमानन्दानें दिलेलें नसून जेधे करीन्यांत आलेलें आहे. तें असें:– "फत्तेखानाची फौज विजापुरीहून पुणें देशांत आली तेव्हां राजश्री शिवाजी राजे यानीं कान्होजी नाइकास (नाइकाचा?) व मावळचा जमाव आणून पुरंदरास आले. ते समई लोकांची निवड करून बरोबर स्वार व निशाणें देऊन फत्तेखानावरी रवाना केलें, युद्ध जालें, तेव्हां स्वाराचा जमाव फुटला. मावळचे लोक जुझत जुझत बेलसर पावेतों आले. युद्धाची शर्त करून बेलसरी खस्त जाले. स्वार जागा जागा फुटोन पळोन गेले. निशाणाबरोबर चाळीस पन्नास स्वार राहिले. ते समई कान्होजी नाईक याचे पुत्र बाजी नाईक जेधे बापास (?) न पुसतां घोडियावरी बैसोन स्वाराबरोबर गेले होते. तेव्हां गनीमानें निशाणावरी बहुत दाटी केली. तेव्हां बाजी नाईक जेधे यानीं फिरोन गनीमाच्या स्वारासी युद्ध केलें. गनीमाचे पांच सात स्वार ठार केले. गनीमाची फौज थोपवून निघाले. तों ज्या फर्जंदाजवळ निशाण होतें तो घोड्याखाले आला. त्यास बैसऊन निशाणाचा भाला आपणाजवळ घेऊन पुरंदरास आले. हें वर्तमान स्वारांनीं राजश्री स्वामींस (=शिवाजी महाराजांना) सांगितलें. तेव्हां बाजी नाईक जेधे याजवरी संतोशी जाले. निशाण संभाळून आणिलें म्हणून सर्जाराईचा किताब दिल्हा. वस्त्रें दिल्हीं. तेजी तुरकी दोनी घोडे पागेचे बारगीर देऊन आपणाजवळ हुजूर ठेविले" (शि. च. प्र. पृ. ४२).

बेलसर येथील ही झटपट सांगतांना जेधे करीन्यांत 'कान्होजी नाइकास व मावळचा जमाव आणून शिवाजी राजे पुरंदरास आले' असें म्हटलें आहे. शकावलींत या वेळीं कान्होजी कैदेंत असल्याचें वर्णन केलें आहे. तेव्हां करीन्यांतील हकीकत लिहिणाऱ्यानें ही बारकाई लक्षांत न घेतां स्मरणानें ही माहिती लिहिली असावी असें दिसतें.

कावजीनें शिरवळ येथें बाळाजी हैबतरावाचा फन्ना उडविला हें ऐकून फत्तेखान संतापला व त्यानें थेट पुरंदरावर जाऊन शिवाजी महाराजाशीं गांठ घालण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें मुसेखान प्रभृती ब-

लाढ्य सरदारांसह फत्तेखान पुरंदरगडापर्यंत गेला; आणि त्यानें एकदम गड चढण्यास सुरवात केली. यावेळीं फलटणचा राजा व घाटगे हे यावनी सैन्यांत दोनही बाजू संभाळण्याच्या कामावर होते. या सैन्यावर गडावरून अनेक अस्त्रांचा वर्षाव करण्यांत आला. त्यांत तोफांचे व बंदुकांचे गोळे, मोठ्या शिळा, दारूचे बाण, गोफणींतून भिरकावलेले दगड हे मराठ्यांनीं फत्तेखानाच्या सैन्यावर मारले असें सांगितलें आहे. शत्रुसैन्य कांहींसें चढून आल्यावर गडावरून मराठ्यांचें सैन्य त्यांच्यावर चालून गेलें. तेव्हां मोठें हातघाईचें युद्ध होऊन मुसेखान ठार झाला; व अनेक लोक जखमी झाले. शेवटीं फत्तेखान पराभूत होऊन रणांगणांतून पळून गेला, तेव्हां त्याचें सर्व सैन्य उधळून गेलें.

शहाजी कैद झाल्यावेळीं संभाजीनें बंगळुराकडे फरादखानाचा व शिवाजीनें पुरंदराकडे फत्तेखानाचा पराभव केल्यामुळें त्याला शहाजीची सुटका करून सामोपचारानें हें प्रकरण मिटवावें लागलें अशी हकीकत शिवभारतांत दिलेली आहे. या झटापटींची वार्ता एकाहि बखरकारास नाहीं. मुसलमानी इतिहासकारांनीं देखील शिवचरित्रांतील हा प्रारंभीचा बहारीचा प्रसंग अजीबात गाळला आहे. यामुळें हा अगदींच अज्ञात असा भाग कवीनें कल्पनेनें तर घुसडून दिला नसेलना अशी कोणास शंका येण्याचा संभव आहे; परंतु शिरवळ देशपांडे यांच्या दप्तरांतील अस्सल पत्रें एक वर्षापूर्वीं प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत. त्यांत शके १५७१च्या श्रावणांत लिहीलेल्या पत्रांत या विषयीं स्पष्ट उल्लेख आहे. तो असा, " शहाजी राजे धरिली. त्याचा लेक शिवाजी, पुरंधरीं बैसोनु दिवाण नामजादीसी झगडो लागले. सरसुभेदार फत्याखान तीहि शिरवलास फाजिलशहा व आशाफशा पाठविले. तीहि कोट पाा माा बळाविला,त्यावरी पुरंदरीहून सिवाजी राजे धाविनले. झगडा जाला, ते वख्तीं कोटकरी यानीं रामाजी विठलाची कौलारी घरें जाळलीं " इत्यादि (शि.च. सा. पृ.५४).

शिवचरित्रांतील या प्रारंभींच्या पराक्रमप्रसंगाची माहिती भारतांतून प्रथमच प्रसिद्ध होत आहे. त्यावरून शिवकालीन संशोधन अद्याप किती अपुरें आहे याची कल्पना येते. भारतकारानें या प्रसंगाची हकीकत देतांना ४० व्यक्तींचीं नांवें दिलीं असून त्यांपैकीं फार तर चार पांच नांवें आपल्या परिचयाचीं आहेत! इतर सर्व व्यक्तींचा परिचय आपणास भारतांतून

प्रथमच होत आहे ! हकीकतीच्या दृष्टीनें देखील अपुरीं स्थळें पुष्कळ आहेत. संभाजीवर फरादखान चालून गेला एवढा मोघम उल्लेख भारतकारानें केला आहे; परंतु संभाजीच्या बाजूस कोणते सरदार होते व त्यांनीं बंगळूर कसें लढविलें याची माहिती भारतांत दिलेली नाहीं. त्याचप्रमाणें बेलसर व पुरंदर येथील युद्धप्रसंग कधीं झाले याची मिती निश्चित करतां येत नाहीं. शके १५७० च्या श्रावण वद्य प्रतिपदेस शहाजी कैद झाला आणि शके १५७१च्या ज्येष्ठी पौर्णिमेस त्याची सुटका झाली. त्याअर्थी शहाजी १० महिने कैदेत होता असें जेधे शकावलीवरून ठरतें.* त्यांत प्रथम शहाजीस कैद करण्यासाठीं जें सैन्य गेलें त्यांत बाळाजी हैबतराव हा होता ( १२।६ ). व त्यानें शहाजीचा स्वामिनिष्ठ सरदार खंडोजी पाटील याच्याशीं झालेल्या झटापटींत भाग घेतला होता ( १२।४७ ). शहाजी कैद झाल्यानंतर मुस्तफाखान हि. १०५८ जिलकाद ३, गुरुवार रोजीं ( = श. १५७० मार्ग शु. ५ = ९ नोवें. १६४८ ) चंदीस मरण पावला (बु. स.). त्यानंतर अफजलखान व मलिक अबदारखान यांनीं कैद केलल्या शहाजीस विजापुराकडे नेण्यासाठीं प्रयाण केलें. तेव्हां कर्नाटकांतील कांहीं सैन्य अफजलाबरोबर विजापुरास गेलें, त्यांत बाळाजी हैबतराव असावा असें दिसतें. कारण महमूदशहानें फत्तेखानास शिवाजीवर रवाना केलें, तेव्हां त्याच्याबरोबर दिलेल्या सरदारांत बाळाजी हैबतरावाचें नांव आहे. शिरवळ येथें चालून आलेल्या आदिलशाही तुकडीचें आधिपत्य त्याच्याकडे होतें ( १३।७६ ); आणि कावजीनें त्याच्यावर हल्ला केला तेव्हां इतर सैनिक पळाले तरी त्यानें लोकांना थोंपवून धरण्याचा प्रयत्न केला (१३।१७) आणि शेवटीं तो कावजीच्या हातून मारला गेला(१३।१२१). यावरून बाळाजी हैबतराव चंदीहून मार्गशीर्षांत निघाला व तेथून विजा-

---

* मुसलमानी ग्रंथाकारांनीं शहाजीच्या सुटकेची मिती दिली नाहीं, यामुळें प्रो. सरकारांनीं अंदाजानें ही मिती ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. आदिलशाही सैन्यानें १७ दिसेंबर १६४९ (श. १५७१ मार्ग. व ८) रोजीं जिंजीचा किल्ला हस्तगत केला, त्यानंतर शहाजीची सुटका झाली असावी असा त्यांनीं तर्क केला आहे ( स. शि. च. पृ. ४१ ). परंतु मार्गशीर्षापूर्वीचें शहाजीचें पत्र उपलब्ध असल्यामुळें हा तर्क खरा ठरत नाहीं. (भा. इ. सं. त्रै.व.२)

पुरास पोंचल्यानंतर शिरवळास आला. त्याअर्थीं ही शिरवळची चकमक श. १५७१ च्या वैशाखाच्या सुमारास झाली असावी व नंतर लौकरच ज्येष्ठांत शहाजीची सुटका झाली असें दिसतें.

शहाजीची सुटका होण्यास शिवाजी व संभाजी यांचा पराक्रम कारणीभूत झाला असें भारतकार ह्मणतो. तें ठोकळमानानें खरें धरतां येईल. परंतु महमूदशहानें आपली सर्व शक्ति एकवटून या दोघांचा नाश करण्याचा आग्रह धरला असता तर तें काम त्याच्या आटोक्याबाहेरचें होतें असें समजण्याचें कारण नाहीं. तथापि शहाजीला कैद करण्याच्या कामीं मुस्तफाखानाचा आग्रहच मुख्यतः कारण होता; आणि मुस्तफा मरण पावला तेव्हां महमूदशहाला मुस्तफाच्या विरुद्ध पक्षानें शहाजीला मोकळें करण्याचीच सल्ला दिली असावी. महमूदशहा स्वतः लढवय्या नव्हता किंवा मनाचा खंबीर नव्हता. त्याचें मुख्य लक्ष विजापुरांत मोठमोठ्या इमारती बांधणें व ख्यालीखुशालींत दिवस घालविणें यांकडे होतें. यामुळें धार्मिक व राजकीय बाबतींत त्याचें धोरण सौम्य अगर उग्र राहणें सल्लागारांच्या मतांवर अवलंबून राही.

शहाजीची सुटका करावी किंवा नाहीं याविषयीं महमूदशहा मनांत विचार करूं लागला तेव्हां शिवाजीच्या ताब्यांत पुरंदर व सिंहगड हे दोन किल्ले होते ( १५।१७ ) आणि संभाजीच्या ताब्यांत बंगळूर होतें. पैकीं बंगळूर शहर व सिंहगड किल्ला शहाजीनें आपल्या ताब्यांत द्यावे म्हणजे त्याची सुटका होईल अशी अट महमूदशहानें घातली; आणि त्याबरोबर पुरंदर शिवाजीकडे राहूं देण्यास आपण तयार आहों असेंहि त्यानें सांगितलें.

न हि मां मुञ्चतितमां सिंहशैलग्रहाग्रहः ।
मदीयेन नियोगेन शिवायास्तु पुरंदरः ॥ $\frac{१५}{३८}$

हे शब्द महमूदशहाच्या तोंडीं भारतकारानें घातले आहेत. त्यावरून सिंहगड शिवाजीनें घेतला ही गोष्ट महमूदशहाच्या मनाला फार झोंबली होती असें दिसतें; कदाचित् शिवाजीच्या कृत्यास शहाजीची अंतस्थ संमती आहे, असें वाटल्यामुळें सिंहगड परत घेतला म्हणजे बापलेकांनीं मिळून केलेली दांडगाई आपण पचूं दिली नाहीं असें जगाच्या निदर्शनास आणल्यासारखें होईल असाहि विचार महमूदशहाचा असेल. उलटपक्षीं

सिंहगड परत द्यावयाचा म्हणजे आपल्या हातानें आपल्या पायांत बेडी अडकवून घेण्यासारखें आहे असें शहाजीला वाटलें ( १५।४६ ); आणि शिवाजीनें तर केवळ बापाच्या सुटकेसाठीं म्हणूनच व मोठ्या कष्टानें सिंहगड आदिलशहाच्या ताब्यांत दिला ( १५।५२ ).

तथापि सिंहगड व बंगळूर परत मिळाल्यानंतर शिवाजीस पुणें प्रांताकडे व शहाजीस बंगळूर प्रांताकडे पूर्ववत् राहूं देण्यास महमूदशहाची हरकत नव्हती. मुख्य किल्ले सरकारी ताब्यांत असल्यानंतर त्याच्या सभोंवारचा प्रदेश शहाजीकडे जहागीर अगर मोकासा ह्मणून चालविण्यांत आपणावर कांहीं संकट ओढवेल असें महमूदास वाटलें नाहीं. कारण किल्ल्यावरील सैन्याच्या जोरावर शिवाजी व शहाजी यांना केव्हांहि चिरडून टाकतां येईल असें त्यास म्हणतां येत होतें. अशा रीतीनें मनांत दंश धरून केव्हां तरी शिवाजीचा सूड महमूदशहा घेतल्यावांचून राहणार नाहीं अशी शंका शहाजीला वाटल्यामुळें त्यानें आपल्या विश्वासांतला कान्होजी जेधे शिवाजीकडे राहण्यासाठीं पाठविला आणि शिवाजीवर आणिबाणीचा प्रसंग आल्यास जिवाची तमा न धरतां तो अडचणीच्या ठिकाणीं आधीं उडी घेईल अशी त्याच्याबद्दल शहाजीला खात्री होती. कान्होजीला निरोप देतांना शहाजी म्हणाला " तुम्ही आम्हांमुळें बंदखानी श्रमी जालेस याउपरी आह्मी पादशहासी तह केला कीं बारा गांवांतून (=४८ कोसांवरून) मजुरा करून हुकूम प्रमाणें कर्नाटक प्रांतें मसलत करावी. त्यावरून बेंगरूळ प्रांत पांचालक्ष होनांचा जहागीर दिल्हा आहे. याकरितां आपणास कर्नाटकाची मसलत करावी लागली. तुमचें वतन मावळांत आहे. चिरंजीव राजश्री सिउबा खेडेबारियांत व पुणा आहेत. त्याजवळ तुम्ही जमावानसी रहावें. तुमची जबरदस्ती त्या प्रांतें आहे. अवघे मावळचे देशमुख देखील त्यासी रुजु होऊन त्याचे आज्ञेंत वर्तेंत यैसा विचार करून जबरदस्तीनें राहावें. येखादी मोगलाकडील इदलशाहीकडील फौज आली तरी आपण इमान राखाव, त्यांसी लढाई करावी. यैसी शफत इमानपुरस्कर बेल रोटीवर हात ठेऊन घेतली. तैसीच त्याणींहि कान्होजी नाइकास शेपत दिल्ही आणि कान्होजी नाईक यास व दादाजी कृष्ण यास वस्त्रें देऊन, बरोबर हुजऱ्या व पत्रें देऊन, राजश्री सिवाजी राजे याजकडे पाठविलें—" ( शि. च. प्र. पृ. १७ ).

दादाजी कोंडदेवानें बारा मावळांची व्यवस्था लावण्याच्या कामीं कान्होजी जेध्याचा उपयोग करून घेतला होता. त्याचप्रमाणें आतां दादाजीनंतर यावेळचे देशमुख शिवाजीवर उलटू नयेत या हेतूनें शहाजीनें कान्होजीस आपलें वजन खर्ची घालण्यास सांगितलें. मिळून बापाला सोडविण्यासाठीं मुलानें तरवार उचलली आणि मुलाच्या सुरक्षितपणाची व्यवस्था करण्यासाठी शहाजीनें आपल्या जवळील अत्यंत विश्वासूक माणसांची योजना केली हें लक्षांत ठेवलें असतां बापलेकांत या वेळीं म्हणण्यासारखा मतभेद नव्हता असें दिसतें. मात्र यानंतर मतभेदास लौकरच सुरुवात झाली.

**८ सोनोपंताची राजनीति**—हा मतभेद सोनोपंत व शिवाजी यांच्यामधील संभाषणाच्या रूपानें सोळाव्या अध्यायांत मांडला आहे. बापाच्या सुटकेसाठीं आपणास सिंहगड द्यावा लागला ही गोष्ट मनांत डाचत असल्यामुळें शिवाजीनें या वेळीं सोनोपंताजवळ चार मुद्दे मांडले ते असे:(१) वडीलांना माझी किंमत अद्याप समजली नाहीं; यामुळें त्यानीं सिंहगड द्यावयास लाऊन आपली सुटका करून घेतली. पण मी पराक्रमाच्या जोरावर महमूदशाहास वडिलांची सुटका करण्यास भाग पाडलें असतें. ( २ ) मुस्तफा हा आपला वैरी आहे हें माहीत असून गाफीलपणानें आपणास कैद करून घेतलें यावरून वडिलांचा गैरसावधपणा दिसून येतो. ( ३ ) वडिलांना कैदेंत पुष्कळ त्रास झाला त्याचा सूड घेण्यासाठीं मी विजापूरकरांशीं युद्ध करणार आहे.

या मुद्यांस उत्तरें देतांना प्रथम सोनाजीपंतानें वडील माणसांची निंदा करणें हें पाप आहे या गोष्टीची शिवाजीला आठवण दिली; आणि नंतर शहाजीच्या वर्तनाची व राजनीतीची त्यानें मीमांसा केली. शहाजीवर कैदेचा प्रसंग आला तो त्याच्या गैरसावधणाचा परिणाम हें तर खरेंच; पण त्या बरोबर आपणापेक्षा बलिष्ट असा जो मुस्तफाखान त्याच्याशीं त्यानें जें उघड वैर आरंभलें होतें तें राजनीतिदृष्ट्या चुकीचें होतें. मुळांत ही चूक झाली असल्यामुळें व व्यसनासक्ततेमुळें शहाजीवर कैदेचा प्रसंग आला. हें ओळखून तीच चूक न होऊं देण्याविषयीं शिवाजीनें जपलें पाहिजे असें सोनाजीपंतानें बजाऊन ठेवलें. सिंहगड किल्ला देऊन बापाची सुटका करतां आली या गोष्टीबद्दल शिवाजीनें खिन्न न होतां आनंद मानला पाहिजे, कारण गडापेक्षा बापाची किंमत अधिक आहे.

शिवाय या गोष्टीनें चिडून विजापूरकरांशीं उघड मारामारी करण्याचें धोरण पत्करल्यास तें नीतिदृष्टया चुकीचें ठरेल; कारण शत्रू आपल्यापेक्षां कम-कुवत आहे अशी खात्री असल्यावांचून त्याच्याशीं उघड युद्ध करण्याचा प्रसंग आणू नये. उलट अशा वेळीं पड खाऊन भेदनीतीनें शत्रूंत फूट पाडावी हेंच श्रेयस्कर असतें. तसेंच शिवाजीच्या मुलुखाभोंवतीं एका बाजूनें विजापूरकर व दुसऱ्या बाजूनें दिल्लीकर यांचा प्रदेश असल्या-मुळें दोघांशींहि युद्ध करण्याचा प्रसंग आला असतां आपला बचाव कसा करतां येईल याचा दूर दृष्टीनें आधीं विचार करून ठेवला पाहिजे. सारांश सूड घेण्याच्या इच्छेनें किंवा चिडून गेल्यामुळें विजापूरकरांसा-रख्या प्रबळ शत्रूशीं उघड वैर मांडणें शहाणपणाचें नसून शत्रूंत फूट पाडणें व अनुकूल संधी येईपर्यंत गम खाणें हेंच श्रेयस्कर आहे असें सोनोपंतानें सांगितलें व ती गोष्ट शिवाजीनेंहि मान्य केली. राजकारणी पुरुषानें भेदनीतीचें महत्त्व ओळखणें, व्यसनापासून अलिप्त राहणें आणि शत्रुमित्र भाव व बलाबल बारकाईनें लक्षांत घेणें किती जरूर आहे याची मीमांसा सोनोपंतांच्या तोंडून भारतकारानें उत्तम रीतीनें केली आहे व ती मुळांतच वाचकांनीं वाचून मनन करण्यासारखी आहे. कारण शिवाजीच्या पुढील आयुष्यक्रमांत सोनोपंतानें सांगितलेलीं नीतितत्त्वें पाळलीं गेलीं असें दिसतें.

हा सोनोपंत म्हणजे कोण हें पहाणें अगत्याचें आहे. रामचंद्र नीळकंठ याचा बाप निळो सोनदेव शिवाजी महाराजांच्या नोकरींत होता. पण निळोपंताचा बाप सोनोपंत हा शिवाजी महाराजांच्या नोकरींत होता असें दिसत नाहीं (खं. ८ पृ. ३३). निळो सोनदेव यास श. १५८४ मध्यें मजमू देण्यांत आली (शि. च. प्र. पृ. ५९); त्या पूर्वी तो हुद्दा वासुदेव बाळकृष्ण याजकडे होता. हा वासुदेव बाळकृष्ण, शहाजीनें बंग-ळूराहून शिवाजीबरोबर पाठविलेल्या (सभासद पृ. ३।४) बाळकृष्ण-पंत मजमूदाराचा मुलगा. त्याअर्थी निळोपंताचा बाप सोनोपंत मजमूदार नव्हता हें ठरतें. तेव्हां हा सोनोपंत 'सोनाजी विश्वनाथ डबीर' असला पाहिजे. शिवाजीबरोबर शहाजीनें पेशवे वगैरे जे अधिकारी दिले त्यांत सोनोपंत डबीराचें नांव सभासदी बखरींत आहे (पृ. ४). आणि हा

सोनाजी विश्वनाथ डबीर शके १५७९ पर्यंत डबीर या नात्यानें शिवाजी महाराजांच्या पदरीं वागत होता असें म्हणण्यास अस्सल पत्राचा आधार आहे ( खं. १७, पृ. १८ ). डबीर याचा अर्थ राजव्यवहारकोशांत ' युक्तयभिज्ञो डबीरः स्यात् ' असा दिला आहे. त्याप्रमाणें शिवाजी महाराजांनीं त्याला सल्ला विचारला व त्यानें तो देऊन ' शहाजी महाराजांना दोष देणे ' योग्य नाहीं असें बजावलें हेंही सरळच झालें. शके १५७९ अखेर औरंगजेबाकडे तहाचें बोलणें करण्यासाठीं सोनोपंत वकील गेला होता. हें, औरंगजेबाचें अस्सल पत्र साताऱ्यास पारसनीसांच्या संग्रहांत आहे त्यावरून व जेधे शकावलीवरून, निश्चित ठरतें ( खं. ८ पृ. ६ ) त्याअर्थी राजनीति सांगणारा सोनोपंत म्हणजे सोनाजी विश्वनाथ डबीर हा होता, व त्याचा सल्ला महाराजांना पसंत पडत होता असें शिवभारतावरून दिसतें.

९ **दहा वर्षांचा ओझरता उल्लेख**—शहाजीची कैदेतून सुटका झाल्यानंतर अफजलखानाची स्वारी येईपर्यंत जवळ जवळ १० वर्षें लोटलीं. पण या दहा वर्षांतील माहिती विस्तारानें न सांगता कवीनें १७ व्या अध्यायांत एकदम अफजल प्रसंगास सुरुवात केली आहे व मधल्या दहा वर्षांतील अनेक प्रसंगांचा त्यानें ओझरता उल्लेख केला आहे. परमानन्द हा दिनचर्या देणारा चरित्रकार नव्हे व प्रत्येक प्रसंग सांगण्यास तो बांधला गेलेला नाहीं हें लक्षांत ठेवलें असतां या मधल्या इतिहासाविषयीं कवीनें पत्करलेल्या मुग्धपणाच्या धोरणाबद्दल दोष देण्याचा अधिकार आपणांस पोंचत नाहीं. तथापि मधल्या काळासंबंधी जे ओझरते उल्लेख आले आहेत ते महत्त्वाचे असल्यामुळें त्यांचें संकलन करून ठेवणें जरूर आहे.

शहाजीच्या पूर्वचरित्राच्या दृष्टीनें पंधराव्या अध्यायांत कांहीं महत्त्वाचे उल्लेख आहेत. ते कालानुक्रमानें दिले आहेत असें गृहीत धरल्यास

( १ ) शहाजीनें मलिकंबराच्या अमदानींत रणदुल्लाखानाचा पंढरपुराजवळ युद्धांत पराभव केला.

(२) मलिकंबराला शहाजीचा सल्ला पसंत पडत होता.

(३) शहाजीनें अर्गळच्या ( ? ) राजाचा पराभव केला. आणि

(४) निजामशहाशीं शहाजीनें कपटाचें वर्तन केलें.

या गोष्टी शहाजी विजापूरकराकडे येण्यापूर्वी घडल्या असें ठरतें.

विजापूरकरांच्या पदरीं राहिल्यानंतर शहाजीनें रणदुल्लाबरोबर कर्नाटकची मोहीम केली आणि पुढें मुस्तफानें त्याला कैद केलें व त्यांतून त्याची शके १५७१ च्या ज्येष्ठांत सुटका झाली हा वृत्तान्त मागें आलाच आहे. त्यानंतर चार वर्षेंपर्यंत तो नजर कैदेंत होता व त्या अवधींत शिवाजीनें कांहीं आगळीक करतां कामा नये अशी अट घातली होती असें क्वचित लिहिलेलें आढळतें. त्यांत तथ्य असो किंवा नसो शिवाजी महाराजांच्या हालचाली या अवधींत शकावलींत नमूद केलेल्या आढळत नाहींत हें खरें आहे. त्यानंतर कर्नाटकांत बरेंच दंगेधोपे वाढले त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं शहाजीची रवानगी कर्नाटकाकडे करण्यांत आली, तेव्हां त्यानें इकडील जहागिरीची व्यवस्था पहाण्याचें काम शिवाजी महाराजाकडे सोंपविलें. हा प्रकार शके १५७५ च्या सुमारास झाला असावा. श. १५७४ च्या फाल्गुनांत महाबळेश्वरच्या गोपाळभटास सूर्यानुष्ठान व मंत्रोपदेश करण्यासाठीं नेमणूक करून दिल्याची सनद उपलब्ध आहे. तिच्यावरून या वेळीं महाराजांचें मन चिंताग्रस्त होतें व त्यानीं अडचणींतून मुक्त होण्यासाठीं अनुष्ठानें वगैरे करविलीं असें दिसतें. ही चिंता शहाजीच्या पूर्ण सुटकेविषयींची असण्याचा संभव आहे. त्यानंतर शके १५७५च्या श्रावण शु. ३ रोजीं चाकणच्या ब्रह्मास वर्षासन करून देतांना "स्वामींच्या अनुष्ठान बळें आपण राज्यास अधिकारी जालों व सकळ मनोरथ चिंतिले पावलों" असे शब्द महाराजानीं वापरले आहेत. त्याचा अर्थ शहाजीची पूर्ण सुटका होऊन त्याची रवानगी कर्नाटकच्या स्वारीवर झाली व शिवाजी महाराज इकडील 'राज्याचे अधिकारी झाले' असा दिसतो. दादाजी कोंडदेवाच्या मृत्यूनंतर या जहागिरीची व मोकाशाची व्यवस्था शिवाजी महाराज पहातच होते; व गुंजणमावळच्या सिलिमकर देशमुखांना त्यानीं शके १५७२ त 'गलबल्यामध्यें आपल्या जमतेनसी साहेबाचे मसलतेस येऊन एकतारी केली' याबद्दल एक गांव इनाम दिला (खं. १७ पृ. १७), तो गलबला शहाजीच्या कैदेच्या वेळचाच असावा असें दिसतें. यानंतर १५७३ मध्यें शिवाजी राजे यानीं पुणें परगण्यांतील इनामें जप्त करण्याचा हुकूम सोडला (भा. त्रै. १८४२ अं. २।३ पृ. ३७). मोकासेदाराला अशा रीतीनें इनामें देण्याचा व तीं जप्त करण्याचा अधिकार होता हें खं. २० मधील अफजलखानाच्या

पत्रांवरून व शि. च. सा. ले. ४० वरूनहि ठरतें. एकंदरींत शके १५७० ते १५७५पर्यंत महाराजांना बापाच्या सुटकेसाठीं केवळ जहागिरीची व्यवस्था लावण्यांत लक्ष घालावें लागलें; इतर उलाढाली करतां आल्या नाहींत. त्यानंतर शहाजीची कर्नाटकांत रवानगी झाली त्यावेळीं महमूदशहाचा त्याच्यावर चांगला विश्वास होता. ( १६ एप्रील १६५४ ) श. १६७६च्या वैशाख शु. १०स गोव्याहून लिहिलेल्या एका सरकारी पत्रांत विजापूर दरबारांतील बारीक माहिती दिली आहे. त्यांत 'The persons acceptable to the king Idalxa and according to his belief loyal to him are Fatecan ( Fatekhan ), Xagi ( Shahji ) and Melique Acute ( Malik Yakula )' ( Portuguese E Marathas I Shivaji by P. Pissurlenkar p. 3 note 2. ) असे शब्द आहेत. त्यावरून शहाजीची गणना या वेळीं विजापूर दरबारांतील वजनदार लोकांत होती हें स्पष्ट आहे. यानंतर महमद अदिलशहा आणखी दोन वर्षें हयात होता, तेवढ्या अवधींत शहाजी कर्नाटकाच्या स्वारींत गुंतला होता. एकंदरींत शके १५७५ मध्यें शहाजी कर्नाटकांत गेला तेव्हां त्यानें पुण्याकडल्या जहागिरीची व्यवस्था पहाण्याचें काम शिवाजी महाराजांकडे सोंपविलें व आपण कर्नाटकांतील गुंतागुंतीच्या राजकारणांत गढून गेला.

इकडे शिवाजी महाराजांना जहागिरीची व्यवस्था लावतांना पुरंदर, सुपे व जावळी येथील तीन प्रकरणें निकालांत काढावी लागलीं. श. १५७६ मध्यें महादाजी नीळकंठराव मरण पावला (शि. च.सा. पृ. १०६); आणि त्याचे मुलगे आपसांत भांडूं लागले. यामुळें त्यांनी बाजूस सारून पुरंदर किल्ला महाराजांनीं हातीं घेतला. सुपे श. १५७८च्या अश्विनांत घेऊन संभाजी मोहित्यास त्यांनीं कैद केलें. जावळीहि याच सुमारास घ्यावी लागली. श. १५७०च्या पूर्वी जावळी येथें चंद्रराव मोरे स्थानापन्न झाला तेव्हां त्याला शिवाजी महाराजांनीं मदत केली होती ( १३।४३ ). परंतु दोघांतील सलोखा पुढें टिकला नाही. श. १५७३च्या सुमारास बीरवाडीच्या पाटलाचें चंद्ररावाशीं वांकडें आलें तेव्हां तो शिवाजी महाराजांकडे आला व त्याला त्यांनीं आश्रय दिला आणि मिरासीहि दिली ( तृ. सं वृ. पृ. १६७।८ ). उलटपक्षीं मुसेखोऱ्यांतील शिवाजी महाराजांच्या मुलखांतला एक आरोपी पळून गेला त्याला चंद्ररायानें आश्रय दिला

(खं. १५ पृ. २७४). अशा रीतीनें त्यांच्यांत वितुष्ट वाढूं लागलें व मोऱ्यांचा बंदोबस्त करणें अवश्यक झालें. यावेळीं जावळीचा कांहीं भाग जेध्यांनीं आपल्या ताब्यांत घेतला होता. परंतु जोहरखोऱ्यांत हणमंतराव व खुद्द जावळीस चंद्रराव नांदत होते. पैकीं हणमंतरावावर स्वारी करून जोरखोरें ताब्यांत घेण्याची परवानगी श. १५७१मध्यें अफजलखानानें जेध्यांना दिली होती. (खं. १५ पृ. ३६५). परंतु तें काम त्यांच्या हातून झालें नाहीं. यामुळें हणमंतराव तेथें कायम होता. त्याच्यावर महाराजांनीं रघुनाथ बल्लाळ यास सैन्यासुद्धां पाठविलें. त्यानें हणमंतरावास मारून जोरखोरें घेतलें. त्यानंतर खुद्द जावळी हस्तगत करण्यासाठीं महाराजांनीं शके १५७७ च्या पौष शु. १४ रोजीं स्वारी केली. तेव्हां चंद्रराव पळून रायरीस गेला. यामुळें रायरीस (=नंतरचा रायगड) वेढा घावा लागला. तेथें सिलिमकरांनीं मध्यस्ती करून चंद्रावास महाराजांना भेटविलें (शि. च. प्र. पृ. ४२.). तेव्हां चंद्रराव व त्याचे मुलगे बाजीराव व कृष्णराव महाराजांच्या ताब्यांत आले (१७।१६). परंतु ताब्यांत आल्यानंतर बापलेकांच्या हातून कांहीं तरी अक्षम्य अपराध घडल्यामुळें चंद्रराजाच्या घराण्यांतील कित्येक कर्त्या पुरुषांना महाराजांनीं कापून काढलें असें भारतकार सांगतो (१८।७). तथापि या गडबडींत प्रतापराव नांवाचा चंद्ररावाचा भाऊ जावळी प्रांतांतून विजापुराकडे पळून गेला. 'चंद्रराज' पदवी मिळविण्याची महत्त्वाकांक्षा त्याला होती. (१८।९). परंतु महमूदशहाच्या हयातींत त्याची दाद विजापूर दरबारांत लागलेली दिसत नाहीं.

या वेळीं विजापूर दरबारांत मोऱ्यांची दाद लागली नाहीं याचें कारण महमूद आदिलशहा आसन्नमरण झाल्यामुळें विजापुरांतील मुत्सदी पुढें गादी कोणास द्यावी हें ठरविण्यांत गुंतले होते. त्यांना किरकोळ अवांतर गोष्टींत लक्ष घालण्यास बिलकुल फुरसत नव्हती. एक बादशहा मरून दुसरा गादीवर यावयाचा म्हणजे मोठाच घालमेलीचा प्रसंग असे. त्यांत किती तरी लोक प्राणास मुकत. आणि मुत्सद्दीमंडळांत केवढी तरी उलथापालथ होई. यामुळें नवीन अमदानींत आपल्यावर कसा प्रसंग येईल कोण जाणें या विचारानें जो तो आपली व्यवस्था करून बंदोबस्तानें राही. त्यांतून तळकोंकणचा व्यवस्थापक मुल्ला अहमद यास महमूदशहानें मुद्दाम बोलाऊन विजापुरास नेलें व तेव्हांपासून त्याच्या सल्लामसलतीस बादशहा

विशेष मान देऊं लागला. यामुळें खानमहमद, फत्तेखान वगैरे प्रधानमंडळांतील चालू मुत्सद्यांच्या मनाची चलबिचल उडाली. शहाजीलाहि याच कारणामुळें यावेळीं विशेष सावधपणें वागावें लागलें.

शिवाजी महाराजांना तर फारच जागरूक राहणें प्राप्त झालें. त्यांच्या जहागिरीच्या उत्तरेस मोंगलाचा मुलूख असून त्याची व्यवस्था पहाण्याचें काम शके १५७५ पासून औरंगजेबाकडे आलें होतें व त्याचा मुक्काम औरंगाबादेस होता. त्याच्या मनांतून गोवळकोंडें व विजापूर येथील शाह्यांशीं कोणत्या ना कोणत्या सबबीवर भांडण उकरून काढावें आणि त्यांचा मुलूख जप्त करावा असें होतें व त्याप्रमाणें त्यानें गोवळकोंडेकराशीं कुरापत काढून शके १५७८मध्यें त्यांच्याशीं युद्धहि केलें व त्यांना मांडलिक बनविलें. शिवाय गोवळकोंडेकरांचा मुत्सद्दी मीर जुमला यास औरंगजेबानें फितूर करून आपल्या बाजूस बोलवून घेतलें व त्याच्या तंत्रानें तो चालू लागला. यामुळें एक नवीनच काळजीचें कारण उपस्थित झालें. शहाजी व मीरजुमला यांच्यांत हर्षामर्षाचे प्रसंग कर्नाटकांत अनेक वेळा झालेले होते. तेव्हां ते लक्षांत वागवून शहाजी व शिवाजी यांच्याविषयीं तो आतां विरोधाचें धोरण स्वीकारील किंवा काय असा संशय येण्याजोगा होता. अशा स्थितींत विजापूरचा महमूदशहा अत्यवस्थ झाला व औरंगजेबानें त्यांत ढवळाढवळ करण्यास सुरुवात केली. तेव्हां शिवाजी महाराजांना आपल्या मुलखाचा बंदोबस्त करणें व औरंगजेबाशीं पत्रव्यवहार करून त्याच्या मनाचा ठाव घेणें भाग पडलें. त्याप्रमाणें अहमदनगर येथील मोंगली अधिकारी मुल्तफतखान याजकडे प्रथम त्यांनीं पत्र पाठविलें. त्यास अनुकूल उत्तर आल्यावर महाराजांच्या तर्फे औरंगजेबाशीं प्रत्यक्ष बोलणें करण्यासाठीं वकील पाठविण्यांत आला. त्याच्याशीं बोलतांना देखील औरंगजेबानें 'महाराज आपल्या मसलतींत सामील होतील तर त्यांचें कल्याण होईल' असें उद्गार काढलें. यामुळें व प्रसंगास पाठ दिली पाहिजे हें ओळखून महाराजांनीं मोगलाशीं वेळोवेळीं पत्रद्वारें व वकीलामार्फत दळणवळण कायम ठेवलें.

एकंदरींत प्रत्यक्ष आदिलशाही मुलखावर उघडपणें हल्ला न करतां आपल्या जहागिरीच्या व्यवस्थेसाठीं शेजारचे जावळी व सुपे प्रांत ताब्यांत घेण्याचें काम महाराजांनीं केलें व औरंगजेब आणि विजापूरकर यांच्यांत

सुरू होणाऱ्या खडाजंगींत आपणास कोणत्याहि पक्षास मिळता येईल अशा बेतानें दोनहि दरबारांशीं पत्रद्वारें संबंध कायम ठेवला.

पुढें महमूदशहा श. १५७८ कार्तिक व. १३ रोजीं मरण पावला. आणि त्याच्या मागून अली नांवाचा १८ वर्षांचा मुलगा विजापूरच्या गादीवर बसला व राज्यव्यवस्थेचें काम बडेसाहेबिणीच्या हातीं आलें. अशा रीतीनें अदिलशाहींत बालनायकी व स्त्रीनायकी झाल्यामुळें त्या राज्यांत सगळीकडे बेबंदशाही मातली. या बेबंदशाहीचा उपशम विजापूरच्या मुत्सद्यांनीं केला असता. परंतु त्यांच्या दुर्दैवानें या वेळीं मागें सांगितल्याप्रमाणें औरंगजेब विजापुरांतील बेबंदशाहीला फुंकर घालून चांगला भडका उडविण्यासाठीं टपून बसला होता. ‘ अली हा महमूदशहाचा खरा मुलगा व वारस नव्हे आणि त्यानें गादीवर बसण्यापूर्वी दिल्ली दरबाराची परवानगी घेतली नाहीं’ अशीं दोन कारणें पुढें करून त्यानें विजापुरावर मोहीम करण्याचें ठरविलें आणि बापाकडे याविषयीं परवानगी मागितली. त्याप्रमाणें शहाजहानानेंहि परवानगी दिलीं. पण परवानगी येण्यापूर्वींच औरंगजेबानें सैन्याची जमवाजमव करण्यास सुरुवात केली होती व जमवाजमव होईपर्यंतच्याहि अवधींत तो स्वस्थ बसला नाहीं. पैसे पेरून, फितूर करून व जहागिरी देण्याचें आमिष दाखवून त्यानें विजापूर दरबारांतले सरदार आपणास अनुकूल करून घेतले. तेव्हां दरबारांत दुफळी पडून मुख्य वजीर खानमहमद याच्याशीं स्पर्धा करणारा एक जोरदार पक्ष निर्माण झाला. रणदुल्लाचा मुलगा व आणखी कित्येक सरदार यानीं तर मोंगलांशीं फितूरीचा पत्रव्यवहार देखील सुरू केला. अहमदनगर येथील मोगली अधिकारी मुलतफतखान याजकडे औरंगजेबानें पैसे पाठविले आणि विजापूरकरांची नोकरी सोडून मोगलाकडे येणाऱ्या प्रत्येक लहान मोठ्या सरदाराला त्यांतली रकम देण्यास सांगितलें. अशा रीतीनें एकीकडून सैन्याची दहशत आणि दुसरीकडून पैशाचें आमिष दाखवून औरंगजेबानें विजापूर दरबारांत गोंधळ माजवून दिला. तेव्हां मुत्सद्यांत लाथाळी झाल्यामुळें कर्नाटकांत ठिकठिकाणीं दंगेधोपे सुरू झाले; व ते मोडून स्थिरस्थावर करण्यासाठीं शहाजी झटत होता तरी त्याचा पाठपुरावा दरबाराकडून होण्याऐवजीं त्याच्या जहागिरींत ढवळाढवळ करण्याचा उपक्रम दरबारांतील कित्येक मुत्सद्यांनीं केला. तेव्हां शहाजीनें दरबाराकडे पत्र पाठवून ‘ आमच्या कामांत ढवळाढवळ केलेले

मला खपणार नाहीं; आमचा मान ठेऊन नोकरी घ्यावयाची असेल तर ती आम्ही करूं, नाहीं तर आम्हांस रजा द्या, आम्हीं कोठेंहि दुसरीकडे नोकरी करून पोट भरूं ' असें बजावून ठेवलें; ' कम इज्जतीन व गैर-मेहरवानीन पेशजीहि खिदमत ( = नोकरी ) केली नाहीं व पुढेंहि न करूं ' असें शहाजी या पत्रांत स्पष्टपणें दरबारास लिहितो ( रामदास रामदासी मासिकांतील शहाजीचें पत्र. )

शहाजीप्रमाणेंच शिवाजी राजे यांच्यावरहि विजापूर दरबारांतील राजकारणाविरुद्ध तक्रार करण्याचा प्रसंग आला; त्याची हकीकत अशी आहे. औरंगजेबानें शहाजहानाकडे पत्र पाठवून विजापूरकरावर स्वारी करण्याची परवानगी मागितली होती. ती देतांना शहाजहानानें ( १५७८ च्या मार्गशीर्षांत ) औरंगजेबास असें कळविलें होतें कीं " तुम्ही विजापूरकरांच्या राज्यावर चालून जाऊन शक्य असल्यास त्यांचे सर्वच राज्य खालसा करावें; पण तें जमण्याजोगें नसल्यास इ. स. १६३६(=श१५५८) मध्यें ठरलेल्या तहांत जो निजामशाही मुलूख विजापूरकरांना देण्यांत आला होता तो तरी जिंकून मोगली साम्राज्यास जोडा, आणि दीड कोटी रुपये खंडणी देऊन विजापूरकर मांडलीक म्हणविण्यास तयार झाले तर त्यांच्याशीं तह करा; आणि नंतर गोवळकोंड्याची कुतुबशाही खालसा करण्यासाठीं तिकडे सैन्य घेऊन जा." (स. औ. च.पृ २३६.)

वीस वर्षांपूर्वी शहाजहानानें निजामशाही बुडविली तेव्हां भीमेच्या उत्तरेचा मुलूख मोगलांना, तळकोकण विजारपूरकरांना आणि भीमा व नीरा यांमधील प्रदेश ( पुणें व सुपे ) शहाजीला मिळाला. यामुळें सर्व निजामशाही मुलूख आपणास त्या वेळीं ताब्यांत आणतां आली नाहीं अशी हुरहुर शहाजहानाच्या मनाला लागलेली होती. ती घालविण्यासाठीं शहाजहानानें वर सांगितल्याप्रमाणें हुकूम दिला. यामुळें इतर कांहींहि न जमलें तरी निदान शहाजीची जहागीर व कल्याण भिंवडी वगैरे तळकोकणातले प्रांत मोंगलाच्या ताब्यांत आणण्याचा मोंगलांचा निश्चय ठरला आहे असा निष्कर्ष शहाजानाच्या हुकुमावरून निघत होता. अर्थात विजापूरकर याप्रमाणें तह करण्यास कबूल असतील तर भीमा व नीरा यामधील प्रदेश मोंगलांचा होणार व त्यांतील जहागीरदारांचे व मोकासदारांचे मालक मोंगल होणार; असा रंग दिसू लागल्यामुळें शिवाजी राजे

यानीं विजापूरकर व मोंगल या दोघांकडेहि पत्रें पाठवून आपल्या ताब्यांतील जहागिरीविषयीं दोनहि दरबारांतील मुत्सद्यांच्या कल्पना काय आहेत तें समजून घेण्याचा प्रयत्न केला. दोघांनींहि अनुकूल उत्तरें पाठवून 'शिवाजी राजे यानीं आपल्या बाजूस यावें' अशी इच्छा प्रदर्शित केली. विजापूरकरावर तर मोंगलांची स्वारी आली तेव्हांपासून आकाश कोसळल्यासारखेंच झालें होतें. यामुळें त्यानीं शिवाजी राजांना आपल्या बाजूस राहण्याविषयीं आग्रहानें विनाविलें यांत कांहीं नवल नाहीं. पण औरंगजेबानें देखील त्यांना आपल्या बाजूस ओढण्याचा कसून प्रयत्न केला. याचें कारण असें होतें कीं या वेळीं औरंगजेबाचें मुख्य लक्ष विजापूरचें राज्य बुडविण्याकडे होतें; व त्या दृष्टीनें शिवाजी सारख्या उदयेच्छु व महत्त्वाकांक्षी सरदाराचा आपणास चांगला उपयोग करून घेतां येईल असें त्यास वाटे. पुढें कल्याणी व बेदर हे विजापूरकरांचे किल्ले घेण्यांत औरंगजेब पांच सात महिने गुंतला होता. त्या वेळीं शिवाजी राजे व औरंगजेब यांच्यांत पत्रद्वारें व वकीलामार्फत तहाच्या अटींसंबंधीं वाटाघाट सुरुच होती. त्यापैकीं औरंगजेबाकडून आलेलीं कांहीं फारशी पत्रें साताऱ्यांत सध्यां पहाण्यास मिळतात. त्यांतील कांहीं पत्रांचीं मराठी भाषांतरें प्रभात मासिकांत 'शिवछत्रपतींची बखर' या मथळ्याखालीं प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांतल्या एका पत्रांत पुढें दिल्याप्रमाणें मजकूर आहे. "तुमची अर्जदास्त, इकडील पंजाचे निशाणाचा फर्मान पोंचल्यानंतरची, पावली. हरएक गोष्टीविषयीं जें सांगणें तें तुम्हाकडील वकील सोनाजी याजपासी सांगितलें होतें; त्यानें तुम्हांपासी बोलून खातर जमा केलीच असेल. सांप्रत, जो मुलूक विजापूरकराकडील तुमचे हातीं होता तो पेशेजीप्रमाणें ठेऊन तुमचे मनोगता अन्वये बंदर दाभोळ व त्याजखालील मुलूख तुम्हास दिला असे. ऐशियास इकडील दौलतीची किफायत मदत जी करणें असेल त्याचा समय हाच आहे जाणोन करण्यांत आणावें. आणि हुजूर भेटीस यावें.........इकडील दौलतीचे लहान मोठे कामकाजाची कुमक—आपले ऊर्जिताचे कारण समजोन—करीत जावी.....सांप्रत ईश्वरकृपा व आमचें दैवशालित्व व फौजेचें शौर्य याचें बळानें इकडे जय येत चालला. तो असा कीं किल्ले बेदर हा मोठा मज-

बूत. आजपावेतों त्यास कोणीच सर केलें नव्हतें....तो येकंदर दक्षण व कर्नाटक देशाचा दरवाजा एका दिवसांत हस्तगत जाहाला.... आमचा लोभ पूर्ण आहे असें मानीत जाणें " इत्यादि. हें पत्र श. १५७९ वैशाख व. ६ रोजीं लिहिलेलें असून त्यांत औरंगजेबानें शिवाजी महाराजांना आपल्या बाजूस ओढण्यासाठीं मोठाच गळ टाकला होता हें स्पष्ट दिसत आहे. याचें कारण यावेळीं विजापूरकरांनीं वीस हजार फौज जमविली असून खान महमद, अफजलखान, रणदुल्लाचा मुलगा व सिद्दी रेहान हे विजापुरी सरदार मोंगलांना अडविण्यासाठीं चालून येत होते. त्यांची व मोंगली सैन्याची गांठ वैशाख शुद्ध ९ स बेदरनजीक पडली. त्यांत मोंगलांना जय मिळाला; पण प्राणहानी बरीच झाली. यानंतर औरंगजेब वैशाख व. १० रोजीं बेदराहून कल्याणीच्या किल्ल्यास वेढा देण्यासाठीं निघाला. आणि निघण्यापूर्वीं चार दिवस त्यानें वर सांगितलेलें पत्र शिवाजी महाराजांना पाठविलें. पण तें पोंचण्यापूर्वीं शिवाजी महाराजांनीं विजापूरकरांचा पक्ष उचलण्याचें ठरविलें होतें. महाराजांना यावेळीं आपल्याकडे वळविण्यासाठीं औरंगजेब उत्सुक होता हें वर सांगितलेंच आहे. त्यावरून विजापूरकरांनीं त्यांना आपल्या पक्षास ओढण्यासाठीं किती विनवण्या केल्या असतील व भीड घातली असेल याची कल्पना सहज करतां येईल. त्या भिडेमुळें व एकंदर परिस्थिती लक्षांत घेऊन महाराजांनीं औरंगजेबाशीं लढण्याचेंच ठरविलें. औरंगजेब आज अडचणींत सांपडल्यामुळें वाटेल तें अभिवचन देईल पण त्यांतून पार पडल्यानंतर तो आपलें वचन पाळणार नाही असें त्यांना वाटलें असावें. ते एकदम मोंगलांच्या मुलुखावर चालून गेले. मोंगलांचें सैन्य बेदरच्या बाजूस गेलें असल्यामुळें अहमदनगर ते जुन्नर बाजू मोकळी पडली होती. त्यांत प्रवेश करून विजापूरकराकडील मीनाजी (=मंबाजी) व काशी हे दोन सरदार आणि शिवाजी महाराज यांनीं मोंगलाईत धुमाकूळ माजविला. त्याचें वर्णन सभासदानें असें केलें आहे. " जुन्नरशहर मारिलें. घोडे दोनशे पाडाव केले. तीन लक्ष होनाची मत्ता, खेरीज कापडजिन्नस, जडजवाहीर, हस्तगत करून पुण्यास आले. मग अमदानगर शहर मारलें, मोंगलाशीं मोठें युद्ध केलें. सातशे घोडे पाडाव केले. हत्तीहि पाडाव केले. द्रव्य बहुत सांप-

डलें. ते समयीं पागा बाराशे व शिलेदार दोन हजार जाहाले. अशी तीन हजार स्वारांची बेरीज जाली " ( पृ. ९ ).

ही बातमी ऐकतांच औरंगजेब संतापानें बेभान झाला. आपल्या गोड शब्दास भुलून विजापूरकराविरुद्ध लढण्यासाठीं शिवाजी मोठ्या उत्सुकतेनें मोंगलांच्या बाजूस धावत येईल अशी अपेक्षा औरंगजेबानें केली होती. तों शिवाजी विजापूरकरांच्या सरदारांशीं सहकार्य करून उलट मोंगलांच्या मुलुखावर चालून आला ! हें समजतांच आतां या शिवाजीला खाऊं कीं गिळूं असें औरंगजेबाला होऊन गेलें. त्यानें अहमदनगराकडील अधिकाऱ्यांना पत्रद्वारें जळजळीत मर्मभेदक शब्दानीं भाजून काढलें. त्यांतील मजकुराचा इत्यर्थ असा आहे " तुम्हीं आतां शिवाजीची अहमदनगराकडून हकालपट्टी तर तावडतोबच केली पाहिजे. पण एवढ्यानें काम भागणार नाहीं. शिवाजीच्या मुलखांत शिरून तुम्ही तो बेचिराख करा; लोकांची कत्तल करतांना व त्यांना लुटतांना यत्किंचित दयामाया दाखवूं नका. पुणें व चाकण प्रांत यांची राखरांगोळी झाली पाहिजे. तेथील लोक हातांत सापडतील त्यांना गुलाम बनवा. आणि मोंगली मुलुखांतील जे पाटील किंवा रयत शिवाजीला गुप्तपणें मदत करीत असतील त्यांचा नायनाट करा " ( स. औ. च. पृ. २५५ )

औरंगजेबाच्या या पत्रानें मोंगली अधिकारी खडबडून जागे झाले व त्यांनीं सैन्याची जमवाजमव केली. तेव्हां शिवाजी महाराज मोंगलाईतून निघून परत पुण्याकडे आले. तेथेंहि त्यांचा पाठलाग करण्यासाठीं मोंगली सैन्य जाणार होतें; पण महाराजांना दैवच अनुकूल; तेथें मोंगलाच्या हातून हें कसें होणार ? हा ज्येष्ट महिना असल्यामुळें पावसाळा सुरू झाला व नद्या भरल्यामुळें वाटाहि बंद पडल्या. पावसाच्या झोडींतून मावळी मुलखांत सैन्यांच्या हालचाली करण्याची धमक कारतलबखान व नासिरीखान या मोंगली सेनापतींच्या अंगीं नव्हती. तेव्हां ' पावसाळा संपतांच शिवाजीच्या मुलखावर स्वारी करून त्याला धुळीस मिळवितां येईल ' असें मनाचें समाधान करीत हे खान आपल्या सरहद्दीवर लष्करासह तळ देऊन माशा मारीत बसले.

महाराजांनीं मोंगलांची कुरापत काढली असून त्यांचें तावडतोब शासन करण्याचें काम वर सांगितल्याप्रमाणें मोंगली खानांच्या हातून झालें नाहीं.

एवढेंच नव्हे, तर या खानांचा अधिपति औरंगजेब याचा हिरमोड होण्याजोगा योगहि याच सुमारास जुळून आला. औरंगजेबानें बेदरचा किल्ला हस्तगत केल्यानंतर कल्याणी किल्ल्यास त्यानें वेढा दिला व तोहि त्यानें जेरीस आणला. त्यानंतर थेट विजापुरावर चाल करण्याचा व तें सबंध राज्य बुडविण्याचा निश्चय त्यानें केला होता. पण या त्याच्या कल्पना म्हणजे शेख महंमदाचें मनोराज्यच ठरलें. कारण विजापूरच्या मुत्सद्यांनीं थेट दिल्ली दरबारांत वकील पाठवून औरंगजेबाच्या बापाला वश करून घेतलें. तेथें बहुतेक राजकारणाचीं सूत्रें औरंगजेबाचा वडील भाऊ दारा याच्या हातीं असल्यामुळें व दारा आणि औरंगजेब यांच्यांत भाऊबंदकी असल्यामुळें विजापूरकरांना औरंगजेबाचा पाणउतार होईल असा शहाजहानाकडून हुकूम मिळविण्यास मुळींच अडचण पडली नाहीं. ‘देखत हुकूम विजापूरकराशीं चाललेलें युद्ध बंद करा’ असें शहाजहानानें औरंगजेबास कळविलें; व त्याच्या हाताखालच्या सरदारांनाहि एकदम माळव्यांत हजर होण्याविषयीं फर्माविण्यांत आलें. यामुळें औरंगजेबाची मोठी निराशा झाली. तरीहि त्यानें चेंगटापणा करून महिनाभर सैन्य थोपवून धरलें आणि कल्याणीचा किल्ला आषाढअखेर ताब्यांत घेतला. मात्र त्यानंतर त्याला विजापूरकरांशीं तह करून लढाई संपविणें भाग पडलें. “विजापूरकरांनीं दीड कोटी रुपये खंडणी भरावी; बेदर, कल्याणी व परांडा हे किल्ले व निजामशाही कोकणांतील किल्ले व शिवाजीच्या ताब्यांतील पुणें सुपे प्रांत हें मोगलांनीं घ्यावे” अशा तहांतील मुख्य अटी होत्या (स. औ. च. पृ. २५१, २५६). पण तहांत ठरल्याप्रमाणें प्रत्यक्ष मुलूख व किल्ले ताब्यांत घेण्याचें काम अमलांत आलें नाहीं. शहाजहानाच्या हुकुमाप्रमाणें औरंगजेबाजवळचे सरदार सैन्यासह उत्तरेकडे गेले. आणि ते गेल्यानंतर विजापूरकरांनीं आपला मुलूख मोंगलांच्या घशांत ओतण्याची घाई काय म्हणून करावी? प्रत्यक्ष मोंगली घोडेस्वारच त्यांच्या उरावर नाचण्यास सज्ज असते तर त्यांनीं तहाच्या अटी प्रामाणिकपणें पाळल्याहि असत्या. पण ते घोडे निघून गेल्यानंतर कागदी घोड्यांना विजापूरकरांनीं भीक घातली नाहीं. याबद्दल कोणत्याहि राजकारणी माणसानें त्यांना त्यावेळीं दोष दिला नसेल किंवा आजहि तो देतां येणार नाहीं.

अशा रीतीनें विजापूरकरांचें सर्व राज्य जिंकून घेण्याच्या बाबतींत औरंगजेबाची पूर्ण निराशा झाली व तो परत बेदर येथें आला. तेव्हां शिवाजी महाराजांनीं केलेल्या आगळिकीबद्दल भरपूर प्रायश्चित्त देण्याचें काम करण्यास औरंगजेब पूर्णपणें मोकळा होता. पावसाळा संपतांच पुणें सुपें प्रांतावर मोंगलांची मोहीम होणार हें ठरून गेलें. यावेळीं शिवाजी महाराजांवर आलेला पेंच फार भयंकर स्वरूपाचा होता. विजापूरकरांना मदत करण्यासाठीं म्हणून त्यांनीं औरंगजेबावर हात टाकला. पण शेवटीं विजापूरकरांनीं परस्पर तह करून महाराजांना तोंडघशीं पाडलें व त्यांच्या जहागिरीचा प्रदेश मोंगलांना देऊन टाकण्याचें ठरविलें! यामुळें आगळिक केल्याबद्दल औरंगजेब चिडला आणि तहा-मुळें विजापूरकर स्वस्थ बसण्यास बांधले गेले अशी परिस्थिती उत्पन्न झाली. तेव्हां मोंगलांशीं तडजोड करून तंटा मिटवावा किंवा त्यांच्याशीं स्वतःच्या बळावर लढण्यास उभें रहावें यांवाचून तिसरा मार्ग महाराजांना राहिला नाहीं. आणि तडजोड करूं जावें तर औरंगजेबाला दुसरा शह नसल्यामुळें तो कडक अटी घालील व युद्धास उभे रहावें तर मोंगलापुढें आपला निभाव लागणें कठिण हें उघड दिसत होतें. पण महाराज अशा चिंताजनक परिस्थितींत असतां शहाजहान आजारी पड-ल्यामुळें सर्व पारडें एका दिवसांत उलटलें!

शहाजहानाच्या आजारामुळें विजापूरकर व शिवाजी या दोघांवरील औरंगजेबाचा शह एकदम नाहींसा झाला. शहाजहान मेला किंवा मृत्यु-पंथास लागला अशा दाट बातम्या दक्षिणेंत येऊं लागल्यामुळें मोंग-लांशीं केलेले करारमदार बंधनकारक नाहींत असें आदिलशाही मुत्सद्यांना वाटूं लागलें व औरंगजेबाला उत्तरेकडे जाण्याचा वेध लागला असल्यामुळें त्यालाहि हें बंधन उत्पन्न करतां येईना. अशा संधींत शिवाजी महाराजांनीं आपणहून औरंगजेबाकडे वकील पाठऊन नरमाईचें बोलणें लावलें आणि त्याच संधींत विजापूरकरांच्या तळकोंकण प्रांतांपैकीं कल्याण भिवंडी-पासून चौलपर्यंतचा मुलूख हस्तगत केला. तळकोंकण प्रांताची व्यवस्था करण्याचें काम मुल्ला अहमद याजकडे असून तो यावेळीं विजापुरास गेला होता. त्याच्यामागें या भागांत गडबड सुरू झाली व नुकत्याच झालेल्या तहाअन्वयें हा भाग विजापूरकरांनीं मोंगलांना देण्याचें कबूल

केलें असल्यामुळें त्याची त्यांना विशेष आस्थाहि राहिली नव्हती. त्याप्रमाणें तो मुलूख मोंगलांनीं ताब्यांत घेण्यापूर्वी शिवाजी महाराजांनीं त्यावर झडप घातली. यामुळें एका अर्थी हा प्रांत बेवारशी स्थितींत असतां महाराजांनीं घेतला असें म्हणण्यास हरकत नव्हती. तो घेतल्याबद्दल विजापूरकरांना विशेष वैषम्य वाटण्याजोगें नव्हतें. कारण त्या मुलुखावर त्यांनीं तहाच्या वेळींच पाणी सोडलें होतें. त्याचप्रमाणें औरंगजेबालाहि चिडून बोलण्याची सोय नव्हती. एकतर त्याला उत्तरेकडे जाण्याचा वेध लागला होता आणि दुसरें असें कीं कल्याण भिवंडी घेतल्यानंतर इतर तळकोंकण प्रांत हस्तगत करीत असतां महाराजांनीं औरंगजेबाशीं तहाची वाटाघाट चालूच ठेविली होती. सैन्याच्या जोरावर मुलूख ताब्यांत घेतल्यावांचून विजापूरकर तो देणार नाहींत हें औरंगजेबहि जाणत असून तें काम आपण मोगलातर्फेच करीत आहों असा आभास महाराजांच्या कृतीनें उत्पन्न होण्याजोगा होता. महाराजांचें या वेळचें वागणें उघडपणें दुरकाशिहाप्रमाणें होतें. औरंगजेबानें जुळतें घेतलें तर आपलें करणें पचून मोंगलाकडूनहि नवा मुलूख मिळविण्यास हरकत नाहीं; आणि त्यानें जुळतें न घेतलें तरी आपण विजापूरकरांचा मुलूख घेऊनच बसलों आहों. त्यांत ढवळाढवळ करण्याचें सामर्थ्य औरंगजेबांत नाहीं. अशा रीतीनें औरंगजेब अडला नारायण आहे हें ओळखून महाराजांनीं त्याच्याकडे वकील पाठविला व तहाची बोलाचाली सुरू ठेवली. औरंगजेबाला देखील तें पाहिजेच होतें. त्यानें मराठ्यांच्या वकीलाशीं गोडीगुलाबीनें वागण्यास पुनः सुरुवात केली. आपण उत्तरेस गेलों तर इकडील मोंगली प्रांतावर शिवाजी महाराज हात टाकल्यावांचून रहाणार नाहींत असें दिसत असल्यामुळें त्याच्याशीं तह करण्यास तो एका पायावर तयार झाला. त्याचप्रमाणें त्यांच्याकडे असलेला जहागिरीचा प्रांत व त्यांनीं जिंकून घेतलेला कल्याण भिवंडी प्रांत त्यांजकडे राहूं देण्यासहि तो कबूल होता. पण महाराजांचें एवढ्यानें समाधान होण्याजोगें नव्हतें. तळकोंकणाचा जो भाग हस्तगत करावयाचा राहिला होता तो मोंगली सैन्यानें हस्तगत केला तरी तो आपणांस दिला पाहिजे असें त्यांचें म्हणणें होतें. त्या म्हणण्यास उत्तरादाखल औरंगजेबानें पाठविलेलें पत्र वाचण्याजोगें आहे. त्यांतला महत्त्वाचा भाग आहे तो असा.

तुमची अर्जदास्त कृष्णाजी भास्कर पंडित यांचे पत्रासुद्धा रघुनाथपंत वकीलाबरोबर पाऊन मजकूर ध्यानांत आला. यद्यपि तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसरावयाजोग्या नाहींत; तथापि तुम्हीं आपल्या कृत्याचा पश्चात्ताप केला व हा दरबार उपेक्षेचा नाहीं हें जाणलें. तुमचें लक्ष निभ्रांत इकडे आहे असें समजोन तुमचें पूर्वकृत्य मनास आणीत नाहीं. येविषयींचा संतोष मानून इकडील दौलतीविसी कोसीस करीत जावी. " आपले वतनी महाल, किल्ले व कोकण-देश सुद्धां नगरवाले निजामाखेरीज, विजापूरकर आदिल-खानाचे इलाख्यांत जे आहेत ते याजकडील मुलुख हस्तगत जाल्यानंतर दरोबस्त देण्याविसी वचन असावें म्हणजे सोनोपंत यास हुजूर पाठवितों आणि त्याजबरोबर हें बोलणें कबूल जाले म्हणोन फरमान आल्यास त्यांतील मजकूर पाहून पांचशें स्वार निवडक व येक सरदार इकडील फौजेबरोबर पाठवितों आणि इकडील लक्षांत वागून सरकारी मुलकाची सरहद्द रक्षण करून कामदारासी शरीक होतों कीं ज्यायोगें बंड वगैरे बखेडे न होईत "* म्हणोन लिहिलें. त्यास तुम्ही लिहिल्या अन्वयें वर्तून हा फर्मान पावतांच आपले मजकुराची अर्जी लिहून सोनोपंता-समागमें पाठऊन देणें म्हणजे त्याप्रमाणें केलें जाईल.

शिवाजी महाराजांना पाठविलेल्या पत्रांत वर दिलेली तडजोडीची भाषा लिहिणारा औरंगजेब त्याच वेळीं विजापूरकरांना लिहितो " या प्रांताचें संरक्षण करा. तेथील कांहीं किल्ल्यांत शिवाजीनें गुप्तपणें प्रवेश केला आहे त्याची तेथून हकालपट्टी करा. त्याला आपल्या पदरीं ठेवावे अशी तुमची इच्छा असेल तर त्याला मोंगली मुलखापासून दूर अशा कर्नाटकांत एखादी जहागीर द्या; म्हणजे त्याचा उपद्रव आमच्या मुलखास लागणार नाहीं " ( स. शि. च. पृ. ६२ ). एकूण दक्षिणेंतून औरंगजेब उत्तरेस जाण्यासाठीं निघाला तेव्हां त्यानें शिवाजी महाराजांशीं तह केला नाहीं

---

* येथपर्यंत अवतरणांतर्गत मजकूर शिवाजी महाराजांनीं पाठविलेल्या पत्राचा गोषवारा आहे.

किंवा उघड भांडणही कायम ठेवलें नाहीं. तो पानावर पान ठेऊन चालता झाला. पुढें सोईल जमेल त्याप्रमाणें मराठ्यांशीं तह करतां येईल किंवा त्यांच्याशीं युद्ध करतां येईल; तोंपर्यंत विजापूरकर व शिवाजी महाराज यांच्यामध्यें बेबनाव राहिला तरी आपल्या मागला शिवाजीचा भुंगा सुटेल व मोंगली मुलूख निर्वेध राहील असा विचार औरंगजेबानें केलेला दिसतो.

औरंगजेब गेल्यानंतर शिवाजी महाराजांनीं विजापूरकराशीं उघडपणें बेबनाव पत्करला. वीस वर्षांपूर्वीं विजापूरकरांच्या शब्दावर विश्वास ठेवून शहाजीनें मोंगलाशीं उघड वैर मांडलें व पेमगिरी येथें नवीन राज्याची मांडणी केली. परंतु थोडासा नेट लागतांच विजापूरकरांनीं मोंगलांशीं तह केला आणि शहाजीला तोंडघशीं पाडलें. तरीहि अपमान गिळून शहाजीनें विजापूरकरांची नोकरी पत्करली. शिवाजी महाराजांच्यावर असाच प्रसंग आला. त्यानींहि विजापूर दरबाराच्या मदतीसाठीं व त्यांच्या शब्दावर विश्वासून औरंगजेबाशीं वैर मांडले होतें. पण परीक्षेचा प्रसंग येतांच विजापूरकरांनीं शिवाजी महाराजांचा बळी देऊन आपला बचाव करण्याचा प्रयत्न केला. यामुळें शिवाजी महाराजांची स्थिती इतो भ्रष्ट–स्ततो भ्रष्टः अशी झाली होती व त्यांतून निभाऊन निघण्यास कोणत्या तरी दरबारीं, नोकरी पत्करण्यावांचून गत्यंतर नव्हतें. परंतु योगायोग निराळा होता म्हणूनच यावेळीं औरंगजेब यादवी युद्धांत गुंतला व मोंगली संकट आपोआप नाहींसें झालें. तेव्हां विजापूरकरांशीं लढून आपलें स्वातंत्र्य प्रस्थापित करावें किंवा अपमान सोसून त्यांची नोकरी करावी, असा पेंच निर्माण झाला. तेव्हां स्वातंत्र्याचाच मार्ग त्यानीं पत्करला. या प्रसंगीं बापलेकांच्या मनोरचनेंतील सूक्ष्म भेद स्पष्टपणें निदर्शनास आला. शहाजीहि मानी स्वभावाचा होता. त्याचा अपमान झाला तरी तो त्याला असह्य वाटत नसे. रागाच्या भरांत नोकरी सोडण्याची भाषाहि तो क्वचित वापरी. पण त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृती त्यानें केव्हांहि केली नाहीं. मधून मधून त्यानें दांडगाई केली असेल. पण त्याचें पर्यवसान स्वातंत्र्य पुकारण्यांत केव्हांहि झालें नाहीं. परंतु शिवाजी महाराज पहिल्यापासून निराळ्या परिस्थितीत वाढले. 'शहाजीचा मुलगा' असें म्हणण्यापलीकडे त्यांना साक्षात नोकरी किंवा ताबेदारी माहीत नव्हती. यामुळें विजापूरकरांनीं विश्वासघात केला असें दिसतांच अरे तर तुरे या न्यायानें त्यांच्यावर हात टाकण्याचें

त्यांना बिलकुल संकट वाटलें नाहीं. ते स्वतंत्रपणें वागतच आले होते. यामुळें पारतंत्र्य मान्य करण्याचा मोह त्यांना किंचितहि पडला नाहीं.

मनाशीं हा निर्णय केल्यानंतर शिवाजी महाराजांना स्वस्थ बसण्याची सोय नव्हती. दिल्लीकर भाऊबंदीच्या युद्धांत गुंतले होते व विजापूर दरबारांतील मुत्सद्दी आपसांत लाथाळी करीत होते; तेवढ्यांत शिवाजी महाराजांना आसपासचा मुलूख ताब्यांत आणून माऱ्याच्या जागा धरून बसावयाचें होतें. त्यानीं यावेळीं सिंहगड किल्ला व खेडेबारें प्रांत हस्तगत केला ( सनदापत्रें पृ. ११४ व सभासद पृ. ५ ). राजगड किल्याच्या माच्या व शिवापट्टण वसवून त्या गडास राजधानीसारखें स्वरूप आणलें. आणि तेथून प्रबळगड वगैरे किल्ले घेऊन उत्तर कोकणांतून विजापूरकरांचा अंमल उठवून लावला.

श. १५७९ व १५८० या दोन वर्षांत विजापुरांतील मुत्सद्दी एकमेकांच्या उरावर बसण्याची कसरत करण्यांत गुंतले होते. या वर्ष दीड वर्षांत 'खान महमद बडेसाहेबिणीनें मारला' 'फत्तेखानास विजापुरीं वीश देऊन मारिले' आणि 'श्रावण मासी (१५८०) बहलोलखान मारिला' असें जेधे शकावली सांगते. यांपैकीं 'खान महमद' मोंगलांशीं कसून लढत नाहीं अशी तक्रार अफजलखानानें विजापुरास केल्यामुळें त्याला जिवास मुकावें लागलें असें विजापूरच्या इतिहासकारानें म्हटलें आहे व फत्तेखान व बहलोलखान हे शहाजीच्या बाजूचे असावेत असें त्यावेळच्या इंग्रजी व पोर्तुगीज पत्रांतील संदर्भावरून वाटतें. सारांश यावेळीं मुल्ला अहमद हा विजापूर येथें सूत्रचालक बनला व अफजलखान हाहि त्याच्याच मताचा असल्यामुळें त्यालाहि महत्त्व प्राप्त झालें. यामुळें शिवाजी महाराजांनीं खानाचें वजन कमी करण्यासाठीं श. १५८० मध्यें कर्नाटक प्रांतीं स्वारी केली (च. सं. वृ. पृ. ७९ व शि. च. प्र. पृ. ८२) व कृष्णाकांठापर्यंत लुटालूट केली. तेव्हां मराठ्यांची ही वाढती सत्ता वेळींच नामशेष झाली पाहिजे असा विचार ठरून विजापुराहून अफजलखानाची रवानगी करण्यांत आली.

शिवाजी महाराजांनीं विजापूरकरांच्या मुलखावर चढाईचें धोरण केव्हां-

पासून पत्करलें याची हकीकत बुसातिने सलातीनमध्यें दिली आहे तिचा सारांश असा आहे.

महमूदशहाचा शहाजहानाशीं तह होऊन [श. १५५८ मध्यें] निजामशाही मुलुखाची वाटणी झाली तेव्हां कोंकणचा बहुतेक प्रांत आदिलशहाच्या वाट्यास आला होता तो त्यानें मुल्ला अहमद याजकडे व्यवस्थेसाठीं सोंपविला व पुणे आणि सुपे हे दोन परगणे शहाजीस जहागीर दिले. शहाजी जमेदाराच्या चालीप्रमाणें वतन संभाळून व आदिलशहाची चाकरी करून त्याच्या आज्ञेंत वागत होता. पुढें कर्नाट-काच्या मोहिमेवर महमूदशहानें सर्व अमीरांना रवाना केलें त्यांत शहाजी-लाहि पाठविलें. तेव्हां तिकडे जातांना शहाजीनें आपले दोन महाल आपला मुलगा शिवाजी याजकडे सोंपविले. पुढें महमूदशहा आजारी पडून मृत्युपंथास लागला; तेव्हां आदिलशाही राज्यांत चोंहीकडे फंदफितूर होऊन अव्यवस्था माजली; आणि कोंकणचा व्यवस्थापक मुल्ला अहमद यास बादशहानें तांबडतोब विजापुरास निघून येण्याचा हुकूम पाठविला. त्याप्रमाणें मुल्ला अहमद गेल्यामुळें कोकणांत अव्यवस्था माजली. ही संधी साधून शिवाजीनें बंडाळी आरंभली व किल्ले घेतले. इतक्यांत महमूदशहा मरण पावल्याची बातमी आली. तेव्हां शिवाजीला नवा दम येऊन त्यानें आपला उद्योग फारच जारीनें चालू ठेवला आणि चाळीस किल्ले ताब्यांत घेतले. शिवाजी भोसल्याची अशी दंगल वाढत चाललेली ऐकून त्याच्यावर स्वारी करण्यासाठीं अफजलखानाची रवानगी झाली.*

---

* पोवाड्यांत जवळ जवळ हाच अनुक्रम सांगितला आहे.

देशदुनिया काबिज केली। बारा माउलें घेतलीं ॥
चंद्रराव कैद केला । त्याची गडजाउली घेतली ॥
चेत पाउली काबिज केली । ठाणीं राजाचीं बैसलीं ॥
घेतली जाउलिन् माहुली। कल्याण भिवंडी काबिज केली।
सोडविलें तळकोंकण । चेउली ठाणीं बैसाविलीं ॥
कुबल, बांकी घरें । शिवराजाच्या हातीं आलीं ॥
मुलाना हामाद । फिर्याद बाच्छायाप गेली ॥
बाच्छायजादी क्रोधा आली। जैशी अग्न परजळली ॥
जित धरावा राजाला । कुल वजिरांला खबर दिली ॥५॥

१० अफजलप्रसंग-अफजलखान हा विजापूर दरबारांतील अनुभविक व माहितगार मुत्सद्दी होता. शके १५५९ मध्यें रणदुल्लाखानानें कर्नाटकांत स्वारी केली तेव्हां तो त्यांत होता. रणदुल्ला मरण पावल्यावर महमूदशहानें अफजलखानाची नेमणूक कर्नाटकांत केली होती. त्यावेळीं शहाजीची चहाडी अफजलानें विजापूरदरबाराकडे केली असें जेधे करीना म्हणतो. पुढें मुस्तफानें शहाजीला कैद केलें तेव्हां जिंजीहून त्याला विजापुराकडे आणण्याची कामगिरी महमूदशहानें अफजलखानाकडे सोंपविली होती. त्यानंतर शके १५७१ पासून १५८० पर्यंत वाई परगण्याचा मोकासा खानाकडे होता. याचा अर्थ तो या अवधींत एकसारखा वाईंत होता असें समजण्याचें कारण नाहीं. शहाजी कर्नाटकांत असून त्याच्यातर्फे पुणें परगण्याचें काम ज्याप्रमाणें शिवाजी पहात असे त्याप्रमाणें खानाचे मुतालिक वाईकडील व्यवस्था पहात असतील. महमूदशहा व शहाजहान यांच्यांत मानापमानाचे प्रश्न उपस्थित होऊन बेबनाव होण्याचा समय आला होता; तेव्हां अफजलखानानें मोंगलाशीं तंटा वाढविण्यापासून फायदा नाहीं असा सल्ला दिल्यावरून महमूदशहानें नमतें घेतलें व युद्धाचा प्रसंग टळला असें विजापूरचा इतिहास सांगतो. कर्नाटकांत शहाजीचा पुत्र संभाजी कनकगिरीच्या संस्थानिकाची बंडाळी मोडण्यास शके १५७७ त गेला. त्याच कामगिरीवर अफजलखानहि होता. अफजलखानाचें व शहाजी—संभाजींचें फार दिवसांचें वाकडें होतें. त्यानें उचल खाऊन संभाजींचें व अफजलखानाचें कनकगिरीस भांडण झालें. त्यांत गोळा लागून संभाजी मरण पावला. त्यामुळें सहजच शहाजीचा राग अफजलखानावर झाला. (राधा. चं. प्र. पृ. ९३ ).

महमूदशहा मेल्यानंतर औरंगजेबानें विजापूरकरावर स्वारी केली तेव्हां विजापूरकरातर्फे खान महमदाच्या हाताखालीं सैन्य रवाना झालें त्यांत अफजलखान होता. पण आपला सेनापती खान महंमद औरंगजेबाशीं लढण्याच्या कामीं कसूर करतो असें खानास आढळून येतांच तो विजापुरास निघून गेला आणि त्यानें सर्व हकीकत बडे साहेबिणीस सांगितली. त्यामुळें खान महमदास परत बोलावण्यांत आलें व येतांच त्याला ठार मारलें. यावरून अफजलखान विजापूरदरबारांतील उलाढाली, वजनदार व कर्त्या मुत्सद्यांपैकीं होता असें म्हणतां येतें. शिवभारतांतील माहिती-

वरून श्रीरंगराजा, कर्णूलचा राजा, बेदनूरचा वीरभद्र व मथुरेचा त्रिमलनायक वगैरे कर्नाटकांतील राजांवर अफजलखानानें विजय मिळविले होते असें दिसतें. शिवाजीवर स्वारी करण्याची कल्पना त्याच्याजवळ अली अदिलशहानें काढली तेव्हां 'शिवाजीला पक्षेपर्णी बांधून तुमच्या-पुढें आणतों' अशी त्यानें प्रतिज्ञा केली.

त्याप्रमाणें खान शिवाजीवर पुणें प्रांतीच चालून जावयाचा. परंतु जावळीचा प्रतापराव मोरे विजापुरास दोन तीन वर्षांपूर्वी येऊन राहिला होता. त्याच्या मनांतून चंद्रराव हें पद आपणास मिळावें व शिवाजी-कडून जावळी परत घ्यावी असें होतें. शिवाय जावळीचें ठाणें अशा नाक्याच्या जागीं आहे कीं तो किल्ला हातीं असला म्हणजे सह्याद्री पर्वत व वाईप्रांत यांवर तेथून हुकमत चालविण्यास अडचण पडत नाहीं. हें लक्षांत घेऊन प्रतापरावाची इच्छा पुरविण्यासाठीं खान वाई प्रांताकडे आला. त्यानें पंढरपूर व तुळजापूर येथील देवस्थानांना उपद्रव दिला (१८।१९) हें शिवभारतांतील विधान शिवकालीन अस्सल पत्रावरून विश्वसनीय ठरतें. खंड २० ले. २१७ मध्यें "क्षेत्रास (पंढरपुरास) खाने अजम अफजलखानाची तसवीस लागली" असे शब्द स्पष्ट आहेत. या लेखांकावर शके १६१९ अशी मिति पडली आहे; ती चुकीची असून त्या ऐवजीं श. १५८९ माघ व॥१ अशी पाहिजे. म्हणजे हा महजर अफजल प्रसंगानंतर आठच वर्षांनीं खुद्द क्षेत्रांतील जबाबदार अधि-काऱ्यांनीं लिहविला व त्यांत हें विधान आहे त्याअर्थीं तें विश्वसनीय समजलें पाहिजे.

अफजलप्रसंगाचें भारतांतील वर्णन सारांश रूपानें मागें (पृ. २१–२६) सांगितलें आहे. त्याची पुनरावृत्ति येथें करण्याचें कारण नाहीं. तथापि अफजल प्रकरण क्रमाक्रमानें कसें रंगत गेलें हें पहाण्याजोगें आहे. अली अदिलशहानें खानास रवाना केलें तें शिवाजीस जिंकून त्याला जिवंत पकडून आणण्याच्या हेतूनें केलें (१७।३१) आणि अफजलानें केलेली प्रतिज्ञा याच प्रकारची होती (१७।३७). मावळच्या देशमुखांना उद्देशून बादशहानें काढलेलीं अस्सल फर्मानें आतां उपलब्ध झाल्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें, या स्वारीचा हेतु शिवाजीचा निःपात करावा हाच होता हें निर्विवाद आहे.

खान वाईस आला तो (१) महाराजांना जिंकण्याच्या व पकडण्याच्या हेतूनें, (२) देवस्थानें भ्रष्ट करणारा असा लौकिक मिळवून (३) जावळी घेण्यासाठीं आला. हें ऐकून महाराज जावळीस आले. यामुळे जावळी सहजासहजीं हातीं घेण्याची कल्पना खानास सोडावी लागली. त्यानंतर एकदम जावळीवर चालून जाणें किंवा जावळी देण्याविषयीं महाराजांशीं बोलणें करणें हे दोन मार्ग त्याला मोकळे होते. पैकीं दुसऱ्या मार्गाचें अवलंबन करून त्यानें कांहीं अंशीं जरबेचा व कांहीं अंशीं तडजोडीचा निरोप पाठविला. या निरोपांत महाराजांनीं केलेल्या अनेक लहान मोठ्या कृत्यांचें परिगणन केलेलें असून मोरे, मोंगल, अदिलशहा, दंडाराजपूरचा शिद्दी, मुसेखान इत्यादि अनेक शत्रु शिवाजी महाराजांच्या वागणुकीमुळें एकवटत आहेत असें दाखवून त्यांना भिवविण्याचा खानानें प्रयत्न केला आहे. अर्थात या निरोपांतली भाषा स्वाभाविकपणेंच एकतर्फी व अतिशयोक्तीनें भरलेली अशी आहे. उदाहरणार्थ आदिलशहानें तह करण्याच्या इच्छेनें जो मुलूख मोंगलांना दिला होता तो शिवाजीनें मधल्यामध्यें लाटला (१८।४८, ४९) हे अफजलखानाचे शब्द खुद्द औरंगजेबाच्या पत्रांत आले आहेत हें खरें; परंतु औरंगजेबानें हा मुलूख महाराजांना देऊन टाकण्याचीहि वाटाघाट चालू ठेवली होती. एवढेंच नव्हे तर खान चालून आला तेव्हां औरंगजेबाकडे महाराजांचा वकील गेलेला होता व मराठे आणि मोंगल यांच्यांत अद्याप सलोखा कायम होता. त्याअर्थी खानानें दाखविलेलें मोंगलांचें भय अतिशयोक्तीनें भरलेलें आहे. खानानें केलेलीं इतर विधानें देखील अशाच स्वरूपाचीं आहेत. उदाहरणार्थ कल्याणभिवडी येथील यवनांच्या मशीदी महाराजांनीं पाडल्या; (१८।५२) व काजीमुल्लांना महाराजांनीं कैद केलें (१८।५३) वगैरे आरोप करतांना खानानें राईचा कावळा केला असला पाहिजे. कारण महाराजांच्या उपलब्ध चरित्राचा विचार केला असतां मुसलमानांच्या धार्मिक कल्पना दुखविणें हें त्यांच्या राजनीतीचें धोरण होतें असें दिसत नाहीं. तथापि कोणत्याहि नियमास अपवाद असतात या न्यायानें महाराजांच्या हातून विशिष्ट प्रसंगीं मशीदीस धक्का पोचला असण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ कल्याण अगर भिवंडी येथें प्रथम हिंदूंचें देवालय असून त्याची जर मुसलमानांनीं मशीद बनविण्याची खटपट केली असली

व इतक्यांत मराठ्यांची स्वारी तेथें गेल्यामुळें मशीदीचा प्रयत्न बंद पडून देवळाचें मूळ स्वरूप कायम राहिलें असेल; किंवा युद्धाच्या वेळीं मुसलमानांनीं मशीदीचा आश्रय केला असल्यास त्यांना तेथून हुसकण्यासाठीं मशीदीस धक्का पोचवावा लागला असेल. तात्पर्य खानाचे आरोप शब्दशः खरे मानतां येणार नाहींत, कारण त्यांचा हेतु महाराजांच्या हातून फार मोठे अपराध झालेले आहेत असें, अतिशयोक्ती करूनहि, भासविण्याचा आहे.

खानाच्या निरोपाचें तात्पर्य असें होतें कीं, "शिवाजी राजे यांनीं सर्व मुलूख व किल्ले देऊन टाकावे व तह करावा ( १८।६० )."

खान विजापुराहून निघाला होता तो महाराजांना पकडून आणण्याच्या निश्चयानें निघाला होता; असें असून आयत्या वेळीं त्यानें तहाचें बोलणें सुरू केलें. पण हें बोलणें खरोखर तहाच्याच इच्छेनें सुरू केलें होतें किंवा महाराजांना पकडण्याच्या मार्गांतला हा एक टप्पा होता; याचा निर्णय करणें फार कठीण होतें. पण महाराजांनीं यावेळीं खानाच्या अंतःकरणाचा ठाव घेण्यासाठीं एक खडा टाकून पाहण्याची युक्ति लढविली. ती अशीः—

मुलूख हिसकाऊन घेणें व तह करणें हेंच त्याचें ध्येय असल्यास खानाला भेटीची तादृश उत्सुकता वाटणार नाहीं; आणि पकडून नेण्याचेंच त्याचें ध्येय असेल तर भेटीची कल्पना तो मोठ्या आनंदानें स्वीकारील; हें उघड दिसत असल्यामुळें महाराजांनीं खानाकडे पाठविलेल्या निरोपांत " जावळीस याल तर बरें होईल; आपण मागत आहां ते किल्ले आणि जावळी मी देतों; आपण येथें याल तर माझी तरवार मी आपणापुढें ठेवीन " ( १९।४–९ ) असे शब्द योजले आहेत. यांत खानानें कळविल्याप्रमाणें तहाची इच्छा महाराजांनींहि व्यक्त केली असून तिला भेटीच्या कल्पनेची त्यांनीं जोड दिली आहे. खानाच्या अंतःकरणांत भेटीची उत्सुकता असल्यास तो ही कल्पना बिनतक्रार मान्य करील; आणि उत्सुकता नसल्यास 'तहाच्या वाटाघाटीसाठीं समक्ष येण्याचें कारण नाहीं' वगैरे खुसपट काढण्यास खानास पूर्ण मुभा होती. पण खानानें भेटीची कल्पना एकदम मान्य केली यावरून त्याला ही संधि पाहिजेच होती हें सहजच दिसून आलें. त्याच्या हाताखालच्या सल्लागारांना मात्र ही कल्पना पटली नाही. " शिवाजीला जर शरण

येण्याची खरोखरच इच्छा असेल तर तुमच्याकडे त्यानें येऊन आपली मान वांकवावी हा सरळ मार्ग असतां तुम्ही त्याच्याकडे जावें हा कोठला न्याय ? " असें त्यांनीं खानास विचारलें. पण खान भेटीच्या कल्पनेनें हुरळून गेला होता. त्यानें आपल्या सल्लागारांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां " मला जवळ आलेला पाहून प्रत्यक्ष यमसुद्धां भीतीनें माझ्याशीं आज तह करील; मग शिवाजीची ती कथा काय ! " ( १९।४३ ) असें तिरस्काराचे उद्गार काढले आणि तो झपाट्यानें प्रतापगडच्या वाटेनें निघाला देखील !

पुढें कोयनेच्या तीरावर शत्रु सैन्याचा तळ पडला व दोघांनींहि कुशल विचारण्याकरितां एकमेकाकडे वकील पाठविले. तेव्हां गोडीगुलाबीची भाषा सुरू असली तरी शिवाजी आपल्याविषयीं साशंक असला पाहिजे याची जाणीव खानास होती व खानाचेंहि मन आपणाविषयीं शुद्ध नाहीं हें शिवाजी ओळखून होता. अशा स्थितींत खरोखर तह घडून येईल किंवा नाहीं हें विधात्याखेरीज इतर कोणास समजण्याजोगें नव्हतें हे कवीचे उद्गार समर्पक आहेत. इतर लोकांना मात्र हा सर्व देखावा पाहून हा तह घडून येणार असें वाटत होतें ( २०।५७ ).* कारण खानाबरोबर आलेले अनेक सरदार व मंबाजी वगैरे आप्त मंडळी यांना भेटीच्या वेळीं देण्यासाठीं महाराजांनीं मोठमोठ्या किमतीचीं रत्नें खरेदी केलीं. तथापि हा बाह्य देखावा होता. कारण " शिवाजी राजानें माझ्यावर विश्वास ठेवला आहे म्हणून मी त्याच्याजवळ जाऊन सांप्रत सख्य करण्याचें कपट करतों व आपली गुप्त कट्यार त्याच्या पोटांत खुपसतों आणि तेथील देवस्थानांत भय उत्पन्न करतों " (२०।६४) असें कपट खानानें योजलें; आणि महाराजांनींहि हें कपट ओळखलें असल्यामुळें या त्याच्या कपटाचें फळ त्याला भोगण्यास लावण्याचा निश्चय त्यांनीं केला होता (२०।६९).

यानंतर प्रत्यक्ष भेटीसंबंधीं करार ठरला त्यांत ( १ ) दोघांनींहि सशस्त्र ( २१।३ ) यावें; ( २ ) खानानें पालखींतून येतांना बरोबर दोन तीनच सेवक आणावेत; ( ३ ) दोघांच्याहि रक्षणासाठीं दाहा दाहा सैनिकांनीं

---

* यावेळीं चाललेल्या वाटाघाटीचें पर्यवसान तहांत होईल असें लोकांना वाटत होतें या भारतकाराच्या म्हणण्यास अस्सल पत्राचें प्रत्यंतर उपलब्ध आहे ( शि. च. सा. ले. ४६ पृ. ६७ ).

बाणाच्या टप्यावर मागें उभें रहावें; आणि ( ४ ) अशा स्थितींत दोघांनीं भेटून गुप्त खलबत करावें अशीं कलमें होतीं.

खानानें वाईस येतांच महाराजांना भिववून टाकण्याचा प्रयत्न केला आणि ते भिऊन गेले आहेत अशीच त्याची समजूत होती. यामुळें प्रत्यक्ष भेटीच्या वेळीं आपल्या जवळचें हत्यार खानानें शेजारच्या नोकराजवळ दिलें व आपण निःशस्त्र आहों असा देखावा त्यानें उत्पन्न केला. या देखाव्यामुळें शिवाजी निःशंकमनानें कराराप्रमाणें आपल्याजवळ येऊन भेटेल आणि आपणासहि गुप्त कट्यार खुपसण्यास चांगली संधि सांपडेल असा खानाचा अंदाज होता. घाबरलेला शिवाजी आपल्याजवळ येऊन अंगाशीं अंग कसें भिडवील याचीच त्याला विवंचना पडली होती. तो आपल्या हातांत सापडल्यावर त्याला जखमी करतां येईल याविषयीं त्याला शंका नव्हती. खान स्वभावतः घमेंडखोर असल्यामुळें आपलें कपट शिवाजी ओळखूं शकेल आणि आपल्या कट्यारीचा वार तो निष्फळ करील अगर डाव आपल्या अंगावर उलटेल याची शंकाहि त्याच्या मनास शिवली नाहीं. परंतु महाराजांच्या अंगांत चिलखत असल्यामुळें खानाचा कटयारीचा वार फुकट गेला आणि प्रत्याघात न्यायानें महाराजांनीं खानाच्या पोटांत तरवार खुपसली ती मात्र नेमकी लागू पडून खानाचीं आंतडीं बाहेर पडलीं.

या वेळीं महाराजांनीं तरवारीचा उपयोग केला व ही तरवार म्हणजे भवानी तरवार ( २०।१६,२२ ) असें परमानन्दानें सांगितले आहे. वाघनखाचें नांव त्यानें कोठेंहि घेतलेलें नाहीं. सभासदानें ‘ बिचवा व वाघनख ’ असे शब्द योजिले आहेत ( पृ. १६ ) त्या अर्थी बिचवा व वाघनख हे शब्द समानार्थक नाहींत हें स्पष्ट आहे; व कै. साने यांनीं बिचवा याचा अर्थ ‘ एक वाकडी कटयार ’ असा दिला आहे. खाफीखानानें नुसता बिचवा होता असें म्हटलें असून बिचवा याचा अर्थ वाघनख अशी इलियटच्या सातव्या खंडाच्या संपादकानें टीप दिली आहे [ पृ. २५९ ]; आणि भेटीच्या ठरावांत निःशस्त्र येण्याचा करार होता व हा करार लबाड ( deceitful ) ब्राह्मणांनीं केला असें खाफीखान म्हणतो. खानातर्फे कृष्णाजी भास्कर व महाराजातर्फे पंताजी गोपिनाथ हे दोघेहि वकील ब्राह्मण होते हें खरें दिसतें; परंतु खानाचा वकील

कृष्णाजी भास्कर हा शेवटपर्यंत खानाच्या बाजूनें लढला, त्यानें महाराजांच्या अंगावर तरवार मारण्याचाहि प्रयत्न केला पण तो वार लागू झाला नाहीं असें भारतकार म्हणतो. 'खानानें कट्यारीचा मारा केला' व 'महाराजांनीं वाघनख खुपसलें' या दोन तपशीलाबद्दल ग्रंथकारांत मतभेद आहे. जेधेशकावलींत ' प्रतापगडचे माचीस अफजलखान बरोबर पालखी व हेजीब [=वकील] घेऊन हुदेकरासमवेत भेटीस आले. राजश्री स्वामी किलियावरून उतरून भेटीस आले. भेटीसमई एकांगी करून अफजलखान जिवें मारिला ' असें म्हटलें आहे. यांत कट्यार, वाघनख अगर खानानें महाराजांना बगलेंत दाबून धरणें वगैरे कशाचाच उल्लेख नाहीं.

जेधे करीन्यांत पुष्कळ बारीक तपशील दिला आहे. परंतु हा करीना अफजलप्रसंगानंतर ३० वर्षांनीं लिहिलेला असून त्यांत कांहीं चुका आहेत हें मागें सांगितलेंच आहे. अफजलवधाचा काळ मार्गशीर्ष शु. ७ देण्याऐवजीं करीन्यांत कार्तिक महिना सांगितला आहे तो चूक आहे. "भेटीचे समई अफजलखानानें राजश्री स्वामीची मान बगलेस धरिली तेव्हां राजश्रींनीं पंज्यास पोलादी नखें घातलीं होतीं. त्याचा मारा करून आंतडीं बाहेर काढिली. तेव्हां मान असडून पटा राजश्रींनीं हातीं घेतला" असें करीना म्हणतो व सभासदाची बखर तेंच सांगते.

भवानी तरवार व वाघनखें हीं दोन शस्त्रें अफजलप्रसंगासंबंधीं महाराष्ट्रांत गाजत आलीं आहेत. पैकीं तरवारीच्या हकीकतीस भारतकाराचा आधार आहे व वाघनखाचा वृत्तांत सर्व बखरींत दिलेला आहे. इतर तपशीलांत फारसा भेद नसून भारतकार, जेधे [ शकावली व करीना ], सभासद आणि खाफीखान यांच्या लेखावरून या प्रसंगाची बरीच विस्तृत माहिती मिळते. बऱ्याच ठिकाणीं ही माहिती एकमेकांस पोषक व पूरक अशा स्वरूपाची आहे. भारतांत अफजलखान व महाराज यांच्या मधील करारमदार व भेट यांचें वर्णन मुख्यत्वेंकरून केलें आहे; आणि खानाचा बढाईखोर स्वभाव विस्तारानें सांगून महाराजांच्या सावधान वृत्तीचा व मितभाषणाचा अर्थ 'ते भ्याले' असा खानानें केला असें ध्वनित केलें आहे. जेधे शकावलींत कान्होजी जेध्याशीं झालेलें महाराजांचें संभाषण व त्याचा इमानीपणा वर्णन केला आहे. करीन्यांत कान्होजी जेध्यानें इतर देशमुखांना

उत्तेजित करण्यासाठीं केलेलें भाषण, अफजलानें महाराजांना पकडल्यास त्यांना सोडविण्यासाठीं कसा प्रयत्न करावयाचा ठरलें होतें त्याचा वृत्तांत; आणि खंडोजी खोपड्यास देण्यांत आलेल्या शिक्षेची हकीकत विस्तारपूर्वक दिलेली आहे.

सभासदी बखरींत पंताजी गोपिनाथ याच्या वकीलीचें वर्णन बरेंच विस्तृत आहे. खानास हरप्रकारें जावळीस घेऊन येण्याची कामगिरी महाराजांनीं पंताकडे सोंपविली होती; त्याचप्रमाणें महाराज भ्याले आहेत या सबबीवर भेटीच्या वेळीं फार लोक बरोबर घेऊन न जाण्याची सल्ला खानास पंताजीनें दिली व खानाचा हेतु महाराजांना धरून नेण्याचाच आहे अशी बातमीहि त्यानेंच आणली; एकंदरींत या प्रसंगाचा सूत्रधार पंताजी होता असें सभासदाच्या लिहिण्याचें तात्पर्य आहे.

या सर्व हकीकतीवरून (१) महाराजांना जिवंत धरून नेण्याचें ध्येय खानाच्या मनांत प्रथमपासून शेवटपर्यंत कायम होते.

( २ ) वाईस आल्यानंतर खानानें तहाची वाटाघाट सुरू केली.

( ३ ) या वाटाघाटीस महाराजांनीं भेटीच्या कल्पनेची जोड दिली.

( ४ ) खानानें भेटीची कल्पना मान्य केली व भेटीच्या प्रसंगी त्यानें महाराजांची मुंडी बगलेंत दाबून धरली. आणि

( ५ ) महाराजांना खानाचा हेतु माहीत असल्यामुळें त्यांना सावधगिरीनें स्वसंरक्षण करून खानास चीत करतां आलें.

या पांच गोष्टींबद्दल महाराष्ट्रीय लेखकांत एकवाक्यता आहे. मुसलमानी लेखकांना मात्र अर्थातच त्या मान्य नाहींत. खाफीखानाच्या मतें भेटीच्या करारांत दोघांनींहि निःशस्त्र यावें, खानास शिवाजीनें खंडणी व नजर द्यावी आणि खानाबरोबर शिवाजीनें, जमल्यास, विजापुरास जावें असें ठरलें होतें. त्याप्रमाणें खान निःशस्त्र आला; पण शिवाजी घाबरल्याचा आव आणून खानाच्या पाया पडला; तेव्हां खान शिवाजीच्या पाठीवर हात ठेऊन त्याला उठण्यास सांगणार होता. इतक्यांत शिवाजीनें त्याच्या पोटांत आपल्या हत्याराचा इतक्या जोरानें वार केला कीं खान तत्काळ मरण पावला.

तथापि खाफीखानाचा ग्रंथ अफजलप्रसंगानंतर ७५ वर्षांनीं लिहिलेला असून त्याला विजापुराकडील विश्वसनीय माहिती होती असें दिसत

नाहीं. मात्र खान पालखींतून आला, त्याच्या बरोबर तीन चारच माणसें होती आणि या शिवाय भेटीच्या वेळीं त्यानें आपले लोक एका बाणाच्या टप्प्यावर ठेवले होते ही माहिती सभासदाशी जुळती अशी त्यानें दिली आहे.

बुसातिने सलातीन या ग्रंथातील या प्रसंगाची हकीगत अगदीच अविश्वसनीय दिसते. त्याचें तात्पर्य असें आहे. अफजलखान दहा हजार सैन्यासह आला व त्यानें शिवाजीचा कांहीं मुलुख हस्तगत केला तेव्हां शिवाजीनें लीनताप्रदर्शक पत्र पाठवून माफी मागितली. तेव्हां खानानें त्याच्याशीं सख्य केलें. नंतर शिवाजीनें खानास मेजवानीनिमित्त प्रतापगड किल्ल्यावर बोलावलें; त्याप्रमाणें खान फक्त बारा लोकांसह किल्ल्यांत येत असतां शिवाजीच्या हत्यारबंद लोकांनीं त्याच्यावर गर्दी करून त्याला ठार मारलें. तेव्हां आपल्यास कोणी आंवरता नाहीं असें समजून खानाची फौज सुसाट पळून गेली.

अशा रीतीनें तडजोडीचें बोलणें लाऊन कपटानें घात करण्याची कल्पना शिवाजी महाराजांनीं योजली असें मुसलमानी लेखकांचें म्हणणें दिसतें. पण ही कल्पना अफजलखानानीच होती हें या प्रसंगानंतर एकच महिन्यानें [ १० डिसेंबर ] लिहिलेल्या अस्सल पत्रांत नमूद आहे. राजापूर येथील इंग्रजी व्यापारी सुरतेंतील आपल्या अधिकाऱ्याला लिहि-तांना म्हणतातः—

The person that is called king of this country is known to be the bastard of this Queen's husband; and she notwithstanding that, would have the crown settled on him. But some of the Umrawes of this country, knowing him to be spuriously begotten will not give him homage and refuse to go to court: and these are Rustum Jomah, Bull Ckaune, Shawjee ( Shahji Bhonsla ) and Sevagy; which latter lyes with an army to the northward and commands all along the coast from the upper chowl unto Daboll; against whom the Queen this year sent Abdoolah khan with an army of 10,0,00 horse and foot, and because she knew, with that

strength, he was not able to resist Shivaji she counsell-ed him to pretent friendship with his army which he did. And the other [ i. e. Shivaji ] whether through intelligence or suspicion, it is not known, dissembled his love towards him."

यावरून युद्धास एकदम प्रारंभ न करतां तह्याचें बोलणें अफजलखानानेंच प्रथम सुरू केलें असें म्हणणें भाग आहे.

खुद्द अफजलखानाची विल्हेवाट लागल्यानंतर खानाचे पृष्ठरक्षक महाराजांच्या अंगावर धाऊन आले आणि संभाजी कावजी वगैरे महाराजांच्या बाजूचे दहा वीर त्यांना अडविण्यास पुढें सरसावले. या धूमश्चक्रींत खानाकडील सरदाराचें नांव सय्यद बंडा असें बखरींतून आहे तें 'बडा सय्यद' असें पाहिजे. जिवा महाला याचा पराक्रम भारतकारानें व बखरकारांनीं एकसारखाच सांगितला आहे. दहा पृष्ठरक्षकांचीं नांवें भारतांत आहेत तीं एकाहि बखरकारानें दिलेलीं नाहींत आणि या आणीबाणीच्या वेळीं महाराजांच्या विश्वासास पात्र झालेल्या लोकांत 'इब्राहिम शिद्दी' नांवाचा यवन होता याची कल्पनाहि बखरकारांना असल्याचें दिसत नाहीं. त्याचप्रमाणें अफजलाच्या मृत्यूची वार्ता समजल्यावर देखील मराठ्यांशीं लढूं इच्छिणाऱ्या मुसेखानाची माहिती त्यांना नाहीं. पाडाव झालेल्या लोकांत 'लांबाजी भोसले' याचें नांव सभासदी बखरींत छापलें आहे. ती मोडी वाचनाची चूक आहे. लांबाजीच्या ऐवजीं मंबाजी असें पाहिजे हें भारतावरून ठरतें ( २२।४६ ). अफजलखानाचा मुलगा मोठ्या कष्टानें रणांगणांतून जीव घेऊन पळाला हें बहुतेक लेखक सांगतात. पण त्याचे दोन लहान भाऊ मराठ्यांच्या हातीं सापडले; रणदुल्लाचा मुलगा रणदुल्ला हा या वेळीं कैद झाला, खेळोजीचा 'क्रीतपुत्र' शिद्दी हिलाल शरण येऊन महाराजांचा नोकर बनला आणि प्रतापराव मोरे यानें मुसेखान वगैरे लोकांना वाट दाखवून रानांतून सुखरूपपणें नेलें ही माहिती भारतांत विशेष आहे. त्याचप्रमाणें संकेताचा नगारा होतांच जे पांच मराठे सरदार यावनी सैन्यावर चालून गेले ते कमळोजी, येसाजी, तानाजी, कोंडाजी वगैरे खं. ८ ले. १२ मध्यें नांवानें तरी माहीत होते; पण पांच हजार पायदळाचा सरदार 'नारायण' नांवाचा ब्राह्मण वीर भारतांत प्रथमच

ऐकूं येत आहे. एकंदरींत अफजलप्रसंगासंबंधीं बरीच विस्तृत माहिती उपलब्ध आहे असा जो आजपर्यंत समज होता तो निराधार ठरतो.

अफजल प्रथम चालून आला तेव्हां जाधवानें सुपें, पांढऱ्यानें शिरवळ, खराटयानें सासवड, हिलालानें पुणें आणि सैफखानानें तळकोंकण असे शिवाजीचे प्रांत घेतले. तेव्हां नेताजी त्यांच्या अंगावर चालून जाणार होता (२३।११–२८). परंतु तहाची वाटाघाट चालू असल्यामुळें महाराजांनीं नेताजीस त्यावेळीं न लढतां भेटीनंतर दुसऱ्या दिवशीं वाई प्रांतावर चालून जाण्याचा हुकूम सोडला होता. त्याप्रमाणें नेताजी मार्गशीर्ष शु. ८ रोजीं वाईस गेला. आणि वाई प्रांतांतील किल्ले हस्तगत करणें व गांव ताब्यांत घेणें हीं कामें त्यानें केलीं. नंतर खटावपासून कोल्हापुरापर्यंत स्वारी करून मराठयांच्या सैन्यानें पन्हाळ्यास वेढा दिला व तो किल्ला हस्तगत केला.

**११ अफजलप्रसंगाचा परिणाम**—अफजलप्रसंगांत विजापूरकरांच्या सैन्यांतील अंदाजें तीन हजार लोक ठार झाले असावे असें इंग्रज व्यापारी रेव्हिंग्टन म्हणतो. आणि बरेच लोक पळून, जीव बचाऊन गेले, ही गोष्ट भारतकारानेंहि सांगितली आहे. पण मनुष्यहानी मोठी झाली नसली तरी यावेळेपासून मराठयांची जरब विजापूरकरांवर बसली ही गोष्ट निर्विवाद आहे. भारतकाराच्या लिहिण्यावरून तरी खानाच्या मनांत प्रतापगडावर जाऊन तेथील देऊळ उध्वस्त करावें असें होतें; आणि पंढरपूर येथें त्यानें प्रत्यक्ष या जातीची कृती केली असल्यामुळें खानाचें नांव ऐकतांच तो प्रतापगडावर देखील असेंच करील असें हिंदु लोकांना वाटलें हें खरें आहे आणि याचमुळें प्रतापगडच्या भेटींत खान ठार झाला हें ऐकतांच आसपासच्या हिंदु लोकांना* धर्मावरचें मोठें संकट नाहींसें झालें व याचें श्रेय शिवाजी महाराजांना आहे हा विचार प्रामुख्यानें मनापुढें आला. या नंतर विजापूरकराकडून शिवाजी महाराजाविरुद्ध अनेक सरदार आले; त्यांनीं आपापल्या मगदुराप्रमाणें महाराजाशीं सामनेहि दिले. परंतु त्यांपैकीं एकानेंहि हिंदूंच्या धर्मभावना दुखाविण्याचा केव्हांहि प्रयत्न केला नाहीं. सारांश हिंदू देवळें भ्रष्ट करूं पाहणाऱ्या खानास देहान्त प्रायश्चित्त मिळालेलें पाहून विजापूर दरबारांतील मुसलमानी सरदारावर जो एकदां वचक

---

* शि. च. सा. खं. १ पृ. ६८.

बसला तो कायमचा बसला. तेव्हांपासून विजापूरचें राज्य बुडेपर्यंत या राज्यांतील कोणाहि सरदारानें मराठ्यांवर स्वारी करतांना देवळें भ्रष्ट करण्याचा खटाटोप केल्याचा दाखला सांपडत नाहीं. यापुढें विजापूरकरांशीं चाललेल्या मराठ्यांच्या झगड्याचें स्वरूप धार्मिक नव्हतें, राजकीय होतें. यामुळें अनेक मुसलमानी सरदार अंतस्थपणें शिवाजी महाराजांना मदत करण्यासहि तयार असत.

१२ **रुस्तुमजमा व फाजलखान**–प्रतापगडच्या युद्धांतून विजापुरास पळून गेलेल्या बऱ्याच सरदारांना अल्ली अदिलशहानें धीर देऊन पुनः रुस्तुमजमाच्या हाताखालीं मराठ्यांच्या सैन्यावर रवाना केलें. मराठ्यांनीं वाईप्रांत घेऊन पन्हाळ्याकडे चाल केल्याचें वर्तमान विजापुरास आलें असल्यामुळें या सैन्याची रवानगी पन्हाळ्याच्या रोखानें करण्यांत आली. इतक्यांत पन्हाळा मराठ्यांनीं घेतल्याचें वृत्त समजलें. तेव्हां अदिलशहाचा धीर सुटला आणि शिवाजीच्या निग्रहाचें काम दिल्लीकरांची मदत घेतल्यावांचून आपल्या एकट्याच्या हातून पार पडणार नाहीं अशी खुणगांठ त्यानें मनाशीं बांधली ( २४।२४ ). तथापि दिल्लीकराकडून मदत येऊन पोंचण्यास कांहीं काल लागणें स्वाभाविक होतें. तोंपर्यंत अल्लीनें आपल्याच सैन्याच्या हातून मराठ्यांना अडविण्याचा प्रयत्न करण्याचें ठरविलें. यावेळीं आदिलशाही सैन्याचें आधिपत्य ज्या रुस्तुमजमाकडे देण्यांत आलें होतें तो प्रख्यात रणदुल्लाचा मुलगा होता.

**फरादसूनुसूनुर्हि नाम्ना यो रुस्तुमेजमः ॥ २४/१८**

हें भारतकाराचें वाक्य ' अमल इ साली ' या फारशी ग्रंथांतील ( इ. व्हा. ७ पृ. १२७ ) माहितीवरून विश्वसनीय ठरतें. हा रुस्तुम श. १५७९ मध्यें मोंगलांविरुद्ध कसून लढला होता. तळकोंकणांतील कांहीं भाग व राजापूर बंदर त्याच्या ताब्यांत असे; आणि इंग्रजी व्यापाऱ्यांचा त्याच्याशीं स्नेह होता. हा चांगला लढवय्या होता हें भारकारानें 'सुदुर्धर' असें विशेषण लाऊन ( २४।२८ ) सुचविलें आहे. तो व अफजलाचा मुलगा फाजल यांनीं विजापूरकरांच्या सैन्यानिशीं मराठ्यांवर कोल्हापुरानजीक हल्ला केला. त्याचें इत्थंभूत वर्णन भारतांत २४ व्या अध्यायांत आहे. या युद्धाच्या वेळीं कोणता मराठा सरदार कोणत्या मुसलमानी सरदारासमोर उभा होता वगैरे बारकाईची माहिती भारतकारानें दिली आहे.

फत्तेखान व मुल्लाय [ पिछाडी ]

| आदिलशाही सैन्य | | | मराठ्यांचें सैन्य |
|---|---|---|---|
| | | | खराटे व पांढरे |
| फाजलखान | .... | .... | नेताजी पालकर |
| ( डावी बाजू ) | | | ( उजवी बाजू ) |
| रुस्तुमजमा | .... | .... | शिवाजी महाराज |
| ( मध्यभाग ) | | | |
| { मलीक इतबार | .... | .... | इंगळे |
| { सादात | | | सिदोजी पवार |
| | | | हिलाल व जाधव |
| ( उजवी बाजू ) | | | ( डावी बाजू ) |

याखेरीज विजापूरकरांच्या बाजूस संताजी घोरपडे व सर्जेराव घाटगे यांची योजना चोंहीकडून हिंडून सैन्याचें रक्षण करण्याकडे झालेली होती. युद्धास प्रारंभ झाल्यानंतर प्रथम नेताजीच्या माऱ्यापुढें फाजलखानानें कच खाऊन पळण्याचा धडा घालून दिला; आणि त्यानंतर रुस्तुमानें शस्त्र टाकून जीव बचावण्यासाठीं पांच सहा घोडेस्वारांसह पळ काढल्यामुळें आदिलशाही सैन्याचा धीर खचला व तें सैरावैरा पळत सुटलें. या वेळीं रुस्तुम, महाराजांच्या जवळून पळून गेला तरी त्याच्यावर त्यांनीं हात टाकला नाहीं याचें कारण

न हि विदधाति भीरौ शूरतां सूर्यवंश्याः ॥ [२४/७४]

शिवाजी महाराजांसारखे सूर्यवंशी राजे भित्र्यावर शस्त्र चालवून आपलें शौर्य प्रगट करीत नाहींत असें परमानन्द सांगतो. समकालीन अस्सल पत्रांत देखील या युद्धाचें वर्णन असेंच केलेलें आढळतें. ता. ४ फेब्रुवारी १६६० [ =श. १५८१ फाल्गुन शु. ४ ] रोजीं सुरतेस पाठविलेल्या एका पत्रांत इंग्रजी व्यापारी लिहितात:–

They marched towards Sevage's forces, then lying at Panella and in the way encounters with each other in which encounter Fozell Ckaune being in the front, was first routed and many of his men killed and after-

wards persued; while Rustum Jemeah had only some of his men slaine and himself suffered to retreat back unto Hookery.

या युद्धांत विजापूरकरांचे कितीएक हत्ती मराठ्यांच्या ताब्यांत आले या भारतकाराच्या विधानास [ २४।७५ ] शकावलीचें प्रत्यंतर उपलब्ध आहे. " श. १५८१ पौष वा॥१० बुधवार रुस्तुमजमा व फाजलखान यासी युद्ध कोल्हापुराजवळ जाहालें. बारा हत्ती व दोन हजार घोडीं राजे याणीं पाडाव केलीं. रुस्तुमजान पळोन गेला [ शि. च.प्र.पृ. ५७।९८]." हा तपशील सदर शकावलींत दिला आहे व तो महत्त्वाचा आहे.

१३ **पन्हाळ्याचा वेढा**–रुस्तुम व फाजल यांच्यावर जय मिळविल्या-नंतर महाराज पन्हाळ्यास आले; आणि नेताजीनें कोल्हापूर, रायबाग, अथणी, तेलसंग तिकोटें इत्यादि विजापूरकरांच्या ताब्यांतील गांव व मुलूख लुटले व कांहीं हस्तगतहि केले. अशा प्रकारें अफजल ठार झाला, रुस्तुम पराभूत झाला आणि नेताजीनें विजापूरकरांचा मुलूख व्यापण्याचा सपाटा चालविला तेव्हां विजापूरकरांचें धाबें दणाणून गेलें. मराठ्यांना आवरण्याचें काम आपल्या हातून होत नाहीं असें विजापूरकरांच्या मनानें पक्केंपणीं घेतलें आणि त्यानीं दिल्लीकराकडे पूर्वीं मदतीची याचना केली होती तिची पुनरुक्ती केली. पण दिल्लीकराकडे हांक पोंचून त्यांची मदत विजापुरास येऊन पोंचणें दिनावधीचें काम होतें. तोंपर्यंत त्यांना मराठ्यांच्या सैन्यास थोपवून धरण्यासाठीं कांहींना कांहीं व्यवस्था केल्यावाचून गत्यंतर राहिलें नाहीं. तथापि विजापूर दरबारांतील कोणीहि वजीर हें काम पत्करण्यास पुढें येईना. अशा वेळीं कर्नूळाचा जहागीरदार शिद्दी जोहार यानें हें काम करून दाखविण्याची हिंमत बांधली. हा शिद्दी स्वतः बंडखोरच होता. तो विजापूरकराविरुद्ध कारस्थानें करून शिरजोर बनला होता. यामुळें दरबारांतील मुत्सद्यांची त्याच्यावर मर्जी नव्हती. पण मुत्सद्यांची मति कुंठित झाल्यामुळें जोहाराचें म्हणणें गोड मानून वेळ मारून नेण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला होता. त्यांनीं जोहाराचे सर्व अपराध माफ करून त्याला ' सलाबतखान ' हा किताब दिला आणि त्याची रवानगी शिवाजी महाराजांचा बंदोबस्त करण्याच्या कामीं केली आणि त्यानें आपल्या मोठ्या सैन्यासह पन्हाळ्यास वेढा दिला.

जोहाराबरोबर रुस्तुम, फाजल व सादात हे खान या मोहिमेंत पुन: सामील झाले होते आणि बाजराज घोरपडेहि आला होता. पैकीं जोहार, फाजल व रुस्तुम यांनीं पन्हाळ्याची पूर्व बाजू वेढली आणि सादात, मसूद, घोरपडे, भाईखान वगैरेंनीं पश्चिम बाजूचा बंदोबस्त ठेवला; दक्षिण व उत्तर बाजूच्या सरदारांचीं नांवें भारतकारानें दिलीं नाहींत, या दिशांनीं दुसऱ्या सैन्यानीं वेढा दिला असें मोघम सांगितलें आहे. वेढ्याचें काम चैत्रापासून सुरु झालें व महाराज तेथून आषाढांत निघून गेले असें जेधे शकावलींत म्हटलें आहे. मध्यंतरीं ज्येष्ठ अधिक होता हें लक्षांत घेतलें असतां वेढ्याचें काम चार महिने चाललें होतें व पांचव्या महिन्यांत आषाढ वद्य १ रोजीं महाराज पन्हाळ्याहून निघून खेळण्यास गेले असें ठरतें.

पण या चार पांच महिन्यांत एक फार मोठी महत्त्वाची गोष्ट घडली ती ही कीं विजापूरकरांनीं केलेल्या विनंतीला अनुसरून दिल्लीकरांनीं शिवाजीमहाराजांविरुद्ध सैन्य रवाना करण्याचें ठरविलें आणि त्यांचें सैन्य पुणें प्रांतांत दाखलहि झालें. यावेळीं शाइस्तेखानाच्या हाताखालीं सत्याहत्तर ७७ हजार घोडेस्वार असून त्यावरील अदमासें ६० सरदारांचीं नांवें भारतकारानें दिलीं आहेत. या सैन्यानें देवळांचा विध्वंस करणें, मठ मोडणें व गांव उध्वस्त करणें वगैरे अत्याचार केले [ २५।६०–६२ ]. आणि चाकणच्या किल्ल्यास वेढा दिला. अशा रीतीनें शिवाजीमहाराज पन्हाळ्याच्या वेढ्यांत अडकून पडले असतां शास्ताखानानें पुणें, सुपें, इंदापूर व चाकण हे परगणे ताब्यांत घेतले. या वेळीं राजमाता जिजाबाई राजगड येथें होती. चोंहोंकडून उठलेल्या या वावटळीचें स्वरूप पाहून महाराजांना हरप्रयत्नानें पन्हाळ्याच्या वेढ्यांतून सोडविलें पाहिजे असें या राजमातेनें ठरविलें. इतक्यांत नेताजी पालकर व सिद्दी हिलाल विजापुरापर्यंत स्वारी करून परत आलेले दिसले. तेव्हां पन्हाळ्याचा वेढा उठविण्याचें काम या दोघांकडे सोंपविण्यांत आलें. त्याप्रमाणें त्यांनीं पन्हाळ्याजवळ जाऊन जोहाराच्या सैन्यावर जोराचा हल्ला केला. परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. उलट शिद्दी हिलालाचा मुलगा वाहवाह हा मात्र लढत असतां घोड्यावरून खालीं पडला आणि त्याला शत्रुसैन्यानें उचलून नेलें. तेव्हां शत्रूस अडविण्याचें काम हिलालास करतां आलें नाहीं. एकं-

दरींत वेढा फोडून पन्हाळ्यांत मदत पोंचविण्याचें काम यावेळीं नेताजी पाळकराच्या हातून तडीस न जातां त्याला परतावें लागलें. नेताजी पाळकराचा पन्हाळ्यांत मदत पोचविण्याचा प्रयत्न फसल्यानंतर कांहीं दिवसांनीं शिवाजीमहाराज पन्हाळ्यावरून निघाले; पण त्यांना कसें निघतां आलें या गोष्टीचा समाधानकारक खुलासा आढळत नाहीं. त्र्यंबक भास्कर याजकडे किल्ला लढविण्याची जबाबदारी सोंपवून महाराज रात्रीच्या पहिल्या प्रहरीं पालखींतून गेले, व त्यांच्या मागून सहाशें पदाती गेले; पण मेघगर्जनेच्या गडगडाटामुळें व भवानीनें मोहित केल्यामुळें शत्रुसैन्यास ही हालचाल समजली नाहीं असें भारतकार सांगतो. अशा रीतीनें निघून जाण्यापूर्वी महाराजांनीं जोहारास त्याबद्दल इषारा देऊन त्याला द्वंद्व युद्धाचें आव्हान दिलें होतें पण तें त्यानें स्वीकारलें नाहीं; त्यानंतर स्वशौर्यानें शत्रूचा वेढा फोडून महाराज निघून विशाळगडास गेले असें परमानन्द सांगतो. पण त्यांत अतिशयोक्ती असावी असें वाटते. त्यांतल्या त्यांत भवानीनें मोहित केल्यामुळें शत्रुसैन्यास महाराजांची हालचाल कळली नाहीं हा कार्यकारणभाव तरी पटण्याजोगा नाहीं.

उलटपक्षीं विजापूरच्या इतिहासकारानें महाराजांची सुटका जोहाराच्या-राजद्रोही स्वभावामुळें झाली असें प्रतिपादन केलें आहे. प्रथम जोहारानें पन्हाळ्यास वेढा देण्याचें काम प्रामाणिकपणें चालविलें; त्यामुळें शिवाजी खरोखरच पेचांत सापडला. पण त्यानें लीनताप्रदर्शक पत्र पाठवून माफी मागितली व 'आपणाखेरीज मला दुसरा आसरा नाहीं आणि हुकूम होईल तर मी स्वतः येऊन माझा अर्ज करण्यास तयार आहे' असें कळविलें. जोहारानें या निरोपामुळें संतुष्ट होऊन शिवाजीस असें लिहिलें कीं, "माझें आगमन जाहीर रीतीनें जरी तुमच्या नाशासाठीं आहे तरी पण तुम्ही जर माझ्याशीं खऱ्या स्नेहानें वागण्यास तयार असाल व त्याप्रमाणें करार कराल तर बादशहाच्या दरबारांत हरएकप्रसंगीं मी तुमचा मदतगार होण्यास तयार आहे." हें ऐकून शिवाजी फार खुष झाला आणि मध्यरात्रीं दोन माणसें बरोबर घेऊन जोहाराकडे गेला व त्याची भेट घेतली. आणि दोघांनीं एकमेकाशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागावें असा करार करून तो रात्रींच परत किल्यावर गेला. आणि वेढा चालू आहे असा देखावा कायम ठेवण्यांत आला. पुढें जोहाराच्या फितूरीची ही बातमी बादशहास विजापूर

येथें समजली तेव्हां तो रागावला आणि 'दोघांही बंडखोरांना शासन केलें पाहिजे' असें योजून विजापुराहून सैन्यासह निघण्याचें ठरलें. जोहारानें हुजूरच्या भेटीस यावें असें सांगण्यासाठीं एक वकील पाठविण्यांत आला पण जोहार आला नाहीं. तेव्हां बादशाहा सैन्य घेऊन मिरजेपर्यंत आला आणि आघाडी त्याच्याही पुढें पन्हाळयाच्या दिशेनें चालू झाली. तेव्हां रात्रीं शिवाजी तेथून पांच सहा हजार सैन्यासह निसटला आणि पन्हाळा किल्ला बादशहाच्या ताब्यांत आला; त्यावेळीं युद्ध देखील करावें लागलें नाहीं असें विजापूरचा इतिहासकार सांगतो.

परंतु ही हकीकत विश्वसनीय दिसत नाहीं. शिवाजी महाराज पन्हाळयाहून जातांच किल्ला विजापूरकरांच्या ताब्यांत आला नाहीं. जेधे शकावलीप्रमाणें श. १५८२च्या आषाढ वद्य १ रोजीं महाराज पन्हाळयाहून खेळणा उर्फ विशाळगड येथें गेले; तेव्हां जोहाराच्या लोकांनीं (मसूद नांवाच्या सरदारानें) त्यांचा पाठलाग केला. 'तेसमई बांदलाचा जमाव व बाजी प्रभु देशपांडे गजापूरचे घाटीं ठेऊन राजश्री खेळण्यास गेले. बाजी परभु यानी व लोकांनीं युद्धाची शर्त केली. बाजी परभु व कांहीं लोक पडिले. गनीम चढो दिल्हा नाहीं. सिदी जोहार माघारा गेला' जेधे करीना शि-- च. प्र. पृ.४६.

मुसलमानी लेखकांनीं बाजीच्या या पराक्रमाचा किंवा त्या प्रसंगाचा नामनिर्देशहि केला नाहीं. भारतकारानें या प्रसंगाची विस्तृत माहिती दिली आहे. महाराज पन्हाळयाहून निसटून गेल्याची बातमी ऐकतांच जोहारास फार वाईट वाटलें आणि त्यांचा पाठलाग करण्याच्या कामावर त्यानें मसूदाची योजना केली. या खेरीज पालीचा राजा जसवंतराव व शृंगारपूरचा सूर्यराव यांना विशाळगडास वेढा देण्यासाठीं पाठविलें. या सर्वांनीं मिळून महाराजांना अडविण्यासाठीं पराकाष्ठेची मेहेनत केली परंतु ते अडवूं शकले नाहींत. महाराज गडावर जाऊन पोंचले. तेव्हां जसवंतराव, सूर्यराव व मसूद यांनीं गडासच वेढा घालण्याचा प्रयत्न केला. परंतु मराठ्यांच्या सैन्यानें त्यांच्यावर फारच जोराचा हल्ला केल्यामुळें त्यांना त्यावेळीं वेढा उठविणें भाग पडलें; आणि मसूद मोठ्या कष्टानें जीव घेऊन कसाबसा परत पन्हाळयास पोंचला. नंतर महाराज सरहद्दीवर आणून ठेवलेलें सैन्य घेऊन विशाळगडाहून राजगडास गेले. हा सर्व

प्रकार चालला असतां पन्हाळा मराठ्यांच्याच ताब्यांत होता; व तेथें त्रिंबक भास्कर सैन्यासह किल्ला लढवीतहि होता. परंतु महाराजांनीं राजगडास गेल्यावर असा विचार केला कीं एकीकडून शिद्दी जोहार व दुसरीकडून शास्ताखान असे सरदार चालून आले असतां दोनहि सैन्यांशीं एकदम युद्ध चालू ठेवल्यानें फार प्राणहानी होईल. सबब तो प्रसंग टाळण्यासाठीं पन्हाळा किल्ला शत्रूस देऊन जोहाराशीं चाललेलें युद्ध थांबविण्याचें त्यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें निरोप जातांच त्र्यंबक भास्करानें किल्ला अली अदिलशहास देऊन टाकला; व तो सैन्यासह राजगडास निघून आला. त्र्यंबक भास्करानें पन्हाळ्याहून निघतांना जोहाराची भेट घेतली तेव्हां जोहाराच्या मनांत शिवाजी महाराजांचा स्नेह ठेवण्याची इच्छा आहे असें त्यास दिसून आलें असें भारतकार म्हणतो (२८।७). जेधे शकावलींत तर 'श. १५८२ भाद्रपद वद्य त्रयोदशी, पनाळा सलाबतखानासी (जोहारास) दिल्हा सला केला' असें म्हटलें आहे. यावरून या वेळेपर्यंत जोहार व अली यांच्यांत उघडपणें बेबनाव आला नव्हता असें दिसतें. यानंतर लौकरच अली व जोहार यांच्यांत वितुष्ट आलें. महाराज पन्हाळ्याहून निसटले व ते विशाळगडास गेल्याचें समजल्यावर देखील त्यांना तेथें वेढण्याचें काम जितक्या कसोशीनें व्हावयास पाहिजे होतें तितक्या कसोशीनें जोहारानें केलें नाहीं असा संशय बादशहाला येणें स्वाभाविक होतें. आणि हा संशय वाढविण्यास त्र्यंबक भास्कर व जोहार यांच्यामधील गोडीगुलाबीचा सामोपचारहि कारणीभूत झाला असेल असें दिसतें. किंबहुना 'पन्हाळा किल्ला आम्ही जोहाराच्याच ताब्यांत दिला आहे' असें सांगून मराठ्यांनीं जोहार हा आपला मित्र आहे असें भासविलें असावें. कसेंहि असो. एवढें निश्चित आहे कीं जोहार व अली यांच्यांत वितुष्ट येऊन जोहारानें कार्तिकामध्यें उघडपणें बंड पुकारलें व आपण मोंगली सरदार आहों असें त्यानें जाहीर केलें [डाग रजिस्टर १६६१ पृ.९६-९७]. अलीनें पुढें त्याच्यावर स्वारी केली आणि शेवटीं त्यास वीष देऊन मारविलें. जोहार श. १५८३ मध्यें मरण पावला असें जेधे शकावलीवरून ठरतें. एकंदरींत पन्हाळ्यावरून महाराज निघून गेले ते जोहाराच्या फितूरीमुळें गेले हा अलीचा समज चुकीचा होता व

"मन्यामहे वयं तर्हि नापराधी स जोहरः ॥" २८।२४

'जोहार अपराधी नव्हता असें आम्हांस वाटतें' हा परमानन्दाचा अभिप्राय एकंदरींत ग्राह्य दिसतो. परंतु "देवीच्या प्रसादानें" महाराज पन्हाळ्यांतून निसटूं शकले हें परमानन्दाचें म्हणणें मात्र तितकें पटत नाहीं. महाराजांच्या कार्यास दैवी सहाय आहे हें लोकांच्या मनावर बिंबविण्याची संधि भारतकारानें या ठिकाणीं साधली आहे; पण या प्रसंगाची उपपत्ति मानवी व्यवहाराच्या दृष्टीनें लावतां आली पाहिजे; व अद्भुत चमत्कार हा पुरावा म्हणून इतिहासांत ग्राह्य धरतां येणार नाहीं असें प्रस्तुत लेखकास वाटतें.

समकालीन इंग्रजी पत्रावरून असें दिसतें कीं रुस्तुमजमा हा शिवाजी महाराजांचा स्नेही आहे असें इंग्रजी व्यापाऱ्यांना पक्केपणीं वाटत होतें. या समजावर (अफजल प्रसंगानंतर मराठ्यांनीं दाभोळपर्यंत चाल केली तेव्हां) इंग्रजी व्यापाऱ्यांनीं रुस्तुमच्या ताब्यांतल्या राजापूर बंदराचा आश्रय केला. इतर ठिकाणीं लुटालूट झाली तरी मराठ्यांचें सैन्य राजापूर लुटण्यास येणार नाहीं असा इंग्रजी व्यापाऱ्यांचा अंदाज होता. पण पुढें शिवाजी महाराज पन्हाळ्यास वेढले गेले व वेढ्याच्या कामासाठीं कांहीं कुलपी गोळे इंग्रजांनीं तयार करून द्यावे असें बोलणें शिद्दी जोहारानें लावलें आणि इंग्रजांनीं तें कबूल केलें. अर्थात हे गोळे जोहाराकडे न पोंचतां मधल्या मधें आपण लाटावे अशी खटपट रुस्तुमानें केली. त्या अर्थी रुस्तुम, वरून विजापूरकरांचा सरदार म्हणून वावरत असला तरी, अंतस्थ रीतीनें महाराजांना मदत पोंचवीत होता असें दिसतें. पन्हाळ्याच्या वेढ्यांत रुस्तुमाचें सैन्य होतें असें परमानन्द सांगतो [२५।१९]. तेव्हां तो महाराजांना अनुकूल असण्याचा व मराठ्यांचें सैन्य पन्हाळ्यावरून निघून जातांना त्याची मदत झाली असण्याचा संभव आहे. परंतु प्रत्यक्ष कागदोपत्रीं पुराव्यावांचून नुसत्या तर्कास ऐतिहासिक चर्चेत महत्त्व नसल्यामुळें हा संभव सुचविण्यापलीकडे त्याचें विवेचन करणें योग्य होणार नाहीं. संशोधनाअंतीं हा संभव खरा ठरेल किंवा दुसरें कांहीं कारण सांपडेल; तोंपर्यंत पन्हाळ्यांतून महाराज कसे निघून गेले हें गूढ चांगलेसें उकललें नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे.

आजपर्यंत या प्रसंगाची हकीकत माहित होती ती फार अपुरी होती; बाजी प्रभूनें या वेळीं पराक्रम गाजविला एवढेंच मुख्यतः माहीत होतें;

पण महाराज पन्हाळ्याहून गेले तरी किल्ल्यावर मराठ्यांचें सैन्य कायम होतें हा महत्त्वाचा तपशील माहीत नव्हता; किंवा महाराज विशाळगडावर आल्यावर देखील त्यांना तेथें वेढण्याचा प्रयत्न आदिलशाही सैन्यानें केला पण तो सिद्धीस गेला नाहीं हेंहि आपणास माहीत नव्हतें. त्याचप्रमाणें इंग्रजी व्यापाऱ्यांच्या पत्रांवरून महाराज पन्हाळ्याहून आषाढांत गेले हें लक्षांत येत नाहीं; पन्हाळ्याचा वेढा श्रावणांतहि चालू आहे त्या अर्थी महाराज अद्याप तेथेंच असावे असें सकृद्दर्शनीं वाटतें; आणि याच कारणामुळें प्रो. सरकार यांनीं या प्रसंगाचा काळ 'आगष्ट' म्हणजे 'श्रावण' असा दिला आहे (स. शि. च. पृ. ८४). इंग्रजी पत्रांवरच विशेष भिस्त ठेऊन तारखा ठरविण्याचा प्रयत्न प्रो. सरकार यांनीं असा आणखी बऱ्याच ठिकाणीं केला आहे. अफजलवधासारख्या महत्त्वाच्या प्रसंगाचा काल मराठींत अनेक ठिकाणीं बरोबर दिलेला असून तो प्रो. सरकार यांच्या नजरेंत भरला नाहीं व त्यांनीं 'सपटंबर' महिना देऊन ठेवला याचें कारण देखील इंग्रजी पत्राप्रमाणें मराठींतहि विश्वसनीय मित्या देणारी सामुग्री आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत नीटशी आली नाहीं हें आहे. या मुद्याची विशेष चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. शिवाय शिवचरित्रास उपयोगी पडणारा इंग्रजी व्यापाऱ्यांचा अस्सल निवडक पत्रव्यवहार स्वतंत्रपणें ग्रंथरूपानें रा. वासुदेवराव बेंद्रे यांनीं तयार केला आहे. तो इतिहासवाचकांपुढें मांडतांना हा मित्यांचा उहापोह ते करणार आहेत.

१४ **पुढील धोरणाचा उहापोह**—विशाळगडाहून महाराज राजगडास येऊन पोंहोचले तेव्हां पुढें कोणतें धोरण स्वीकारावें हें ठरविणें अगत्याचें होतें. अफजलखानानें काढलेल्या कुरापतीस उत्तर म्हणून मराठ्यांनीं गदग लक्ष्मेश्वरापर्यंत व विजापुरापर्यंत स्वाऱ्या केल्या. परंतु या स्वाऱ्या हुल्लडीच्या स्वरूपाच्या होत्या. यांत मराठ्यांना धांवपळ पुष्कळ करावी लागली व विजापूरकरांचें नुकसानहि बरेंच झालें; पण या हुल्लडींत व्यापलेला प्रदेश मराठ्यांकडे कायमचा टिकणें शक्य नव्हतें. विजापूरकरांतर्फे शिद्दीजोहार व मोंगलांतर्फे शास्ताखान यांनीं आपलीं प्रचंड सैन्यें आणून मराठ्यांच्या ताब्यांत गेलेल्या मुलखावर हल्ला केला तेव्हां त्यांच्या पुढें मराठ्यांना मुळींच टिकाव धरतां येईना. संख्येच्या दृष्टीनें मराठ्यांचें सैन्य बादशाही सैन्यापुढें क्षुद्र स्वरूपाचें होतें; आणि तेंहि गेल्या सात आठ महिन्यांतील धावपळीनें थकलें

भागलेलें असें होतें. यामुळें कांहीं दिवस विसावा मिळाल्यावांचून त्याच्या हातून मोठी कामगिरी पार पडण्याजोगी नव्हती. हें ओळखून महाराजांनीं पन्हाळा देऊन विजापूरकरांशीं समेट केला आणि शास्ताखानाशीं देखील तडजोडीचें बोलणें चालूं ठेवलें. शास्ताखानानें चाकण शहर, व तेथला संग्रामदुर्ग किल्ला हस्तगत करून पुणें, सुपें, इंदापूर या परगण्यांत धुमाकूळ मांडला; आणि आपला मुक्काम पुण्यास कायम केला. सुपें परगणा अफजलखानातर्फे सिद्दी बिलाल व पांढरे यानीं व्यापला होता, त्यांना घालविण्याचें काम मराठ्यांनीं केलें असेल नसेल इतक्यांत शास्ताखानाच्या फौजांनीं तो मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. त्याचें वर्णन खं. २० पृ. ७१ वर छापलेल्या एका टिपणांत असें आहे. "मोंगलाईच्या नामजादी दिल्लीहून आल्या. अमीरुलउमराऊ शास्ताखान आला, ते समई मुलूक तमाम वोस जाला. सुभा जेजुरीस आला. तेथून चाकणेचा किल्ला सर केला. त्यावरी सिद्धी बिलाल सुभा करून आपले तरफेनें ठाणियास पाठविला. त्यानें कौल देऊन कोट सुपियांत मुस्तेद केला. मग आपण इंदापुरास गेला." अशा रीतीनें शास्ताखानानें दंगल उडवून सोडली असतां महाराजांनीं शास्ताखानाकडे वकील पाठवून तडजोड करण्याची व इनामदारांना आश्वासन देऊन त्यांचें मन आपणाकडे कायम ठेवण्याची खटपट केली. पण दोहींचाहि उपयोग झाला नाहीं असें दिसतें. "कार्तिक मासीं राजश्री सोनाजी पंडित शास्ताखानाचा निरोप घेऊन राजगडास राजियापासी आले." असें जेधे शकावली सांगते. पण हा उल्लेख फार मोघम आहे. त्यावरून बोलाचालींत काय निष्पन्न झालें त्याचा अंदाज करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें मराठ्यांच्या सरंजामी खात्यांतर्फे एक हुकूम यावेळीं जाहीर करण्यांत आला तो खं. ८ ले. ११ रूपानें आपणापुढें आहे. त्यांत "सरंजामी छ २४ रबिलाखर सन इहिदे सितैन अलफ (=श. १५८२ मार्ग. व. ११). पुणें, व इंदापूर व चाकण, सुपें बारामती ऐसे इनाम आहेत. त्यास पेशजी आपणास मुकासा असतां अफजलखाना आधीं जेणें प्रमाणें तसलमती ज्यास जें पावत असेल त्यास तेणेंप्रमाणें देणें ऐसा तह (=ठराव] केला असे" असे शब्द आहेत. यावरून पुणें, सुपें वगैरे परगणे महाराजाकडे मोकाशाच्या नात्यानें होते तेव्हां इनामदारांना कांहीं रकमा पोचत असत. अफजलप्रसंगानंतर त्यांचें मोकासेदाराचें

नातें राहिलें नाहीं तरी इनामदारांनीं आपल्या उत्पन्नाविषयीं फिकीर बाळगण्याचें कारण नाहीं; त्या रकमा त्यांना देण्यांत येतील असें आश्वासन देण्यासाठीं हा जाहीरनामा काढलेला आहे. वर सांगितलेले परगणे पूर्वी विजापूरकरांच्या ताब्यांतले होते. पण श. १५७९ च्या तहानें ते विजापूरकरांनीं मोगलांना देऊन टाकले असून ते आजपर्यंत मोगलांनीं ताब्यांत घेण्याचेंच काम काय तें राहिलें होतें. तें शास्ताखानानें बजावलें. अशा रीतीनें हा मुलूख शास्ताखानाच्या ताब्यांत आल्यानंतर त्याचा मोकासा शिवाजी महाराजांना देणें अगर न देणें मोंगलांच्या मर्जीवर अवलंबून होतें. मागें औरंगजेब भावाशीं भांडण्याकरितां उत्तरेकडे जाण्यास निघाला तेव्हां हे परगणे शिवाजी महाराजांकडे राहूं देण्यास औरंगजेबानें मान्यता दिली होती. तीच त्यानें आतां हि द्यावी असें बोलणें यावेळीं शास्ताखानाकडे सोनाजीपंतानें लावलें असावें असें दिसतें. तथापि हें बोलणें मान्य करण्याचा अगर अमान्य करण्याचा हक्क मोंगलाचा होता व त्यांनीं तो अमान्य केल्यास त्या मुद्यावर त्यांच्याशीं भांडण करण्याचा इरादा महाराजांचा नव्हता. मोंगलांनीं विजापूरकराकडून तहानें मिळालेला मुलूख खुशाल ताब्यांत घ्यावा. पण या पलीकडे विजापूरकर व शिवाजी यांच्यामधील भांडणांत त्यांनीं लक्ष घालूं नयें अशी महाराजांची इच्छा होती. मोंगल व विजापूरकर यांचीं सैन्यें एकमेकांस मिळून त्यानीं मराठ्यांचें राज्य बुडविण्याचा प्रयत्न केल्यास मराठ्यांचा टिकाव लागण्याजोगा नव्हता. त्या अर्थीं शास्ताखानास विजापूरकराशीं ऐक्य करण्याची बुद्धी न होईल अशी व्यवस्था करणें सर्वांत महत्त्वाचें होतें.

सारांश शास्ताखानानें व्यापलेला मुलूख तहाअन्वयें व कायदेशीर रीतीनें मोंगलांचाच झालेला होता; तो त्यांनीं ताब्यांत घेतला याबद्दल तक्रार करण्यापासून कांहींच फायदा नव्हता. आणि महाराजांनीं अशी तक्रार केल्याचेंहि दिसत नाहीं. पुणें, चाकण वगैरे परगणे यावेळीं जे एकदां मोंगलांच्या ताब्यांत गेले ते कित्येक वर्षें त्यांच्याच ताब्यांत होते. महाराज आग्र्याहून परत आल्यानंतर तीन वर्षांनीं श. १५९१ मध्यें मोंगलांशीं जेव्हां उघड युद्ध सुरु झालें तेव्हां हा मुलूख महाराजांनीं जिंकून परत घेतला. तोंपर्यंत सिंहगड व पुरंदर हे दोन किल्ले खेरीज करून बाकीचा मुलूख मोंगलांकडे होता. सारांश शास्ताखानानें व्यापलेल्या मुल-

खावर व मिळालेल्या विजयावर संतोष मानून रहावें; त्यानें याच्याहि पुढें पाऊल टाकण्याची खटपट करूं नये अशी महाराजांची इच्छा होती; आणि ती शास्ताखानास शेवटीं मान्यहि झाली. मात्र प्रारंभीं त्यानें चढाईचें धोरण पत्करून सह्याद्रीपलीकडे मराठ्यांनीं घेतलेला मुलूख व्यापण्याची ईर्षा धरली होती. परंतु उंबरखिंडीच्या युद्धांत त्याच्या सरदारांना चांगली अद्दल घडल्यामुळें त्यांनीं " आपली ईर्षा अनाठायीं आहे " असें खानास स्वानुभवानें बजाऊन सांगितलें असें दिसतें.

या दृष्टीनें उंबरखिंडीचा प्रसंग महत्त्वाचा आहे. त्याची चर्चा करण्यापूर्वी प्रथम येथें या युद्धासंबंधींची भारतांतील हकीकत नमूद करूं.

१५. उंबरखिंडीचें युद्ध–महाराज राजगडास परत आले त्यासुमारास शास्ताखानानें चाकण शहर व किल्ला ताब्यांत घेतला (२८।२८) व तो पुण्यास आला. तथापि त्याच्याशीं या वेळीं सामना न देतां भरपूर पैसा मिळवून नंतर हें काम हातीं घ्यावें असें महाराजांनीं ठरविलें. त्यांच्या सचिवांनीं देखील ही योजना मान्य केली; पण शास्ताखान पुण्याहून थेट शिवाजी महाराजांना गांठण्यासाठीं राजगडाच्या रोखानें चालून येईल हें उघड दिसत असल्यामुळें सह्याद्रीवरून मोंगली सैन्य उतरत असतां त्याचा फडशा उडविण्याची व्यवस्था केली पाहिजे असें त्यानीं सांगितलें आणि महाराजांनाहि तें सयुक्तिक वाटलें. त्याप्रमाणें मराठ्यांचें सैन्य त्या धोरणानें रवाना झालें. अंदाजाप्रमाणें शास्ताखानानें कारतलब नांवाच्या सेनापतीकडे सह्याद्री उतरून चौल, कल्याण, भिवंडी, पनवेल हीं ठाणीं हस्तगत करण्याचें काम सोंपविलें; आणि बरोबर अनेक रजपूत सरदार दिले; शिवाय सुप्रसिद्ध 'रायबागीण' इचीहि योजना या मोहिमेंत शास्ताखानानें केली. हें सैन्य लोहगड नजीकच्या दक्षिणोत्तर मार्गानें एका पाउलवाटेनें पर्वतावरून खालीं उतरलें. ही वाट संपताच दाट झाडी असलेलें अरण्य होतें. तेथपर्यंत मोंगलांचें सैन्य येईपावेतों मराठे झाडीच्या आश्रयानें दडून राहिले होते, ते मोंगलांना दिसले नाहींत. नंतर उंबरखिंडीजवळ कारतलब येतांच मराठ्यांनीं रणभेरी वाजवून युद्धास तोंड लावलें. तेव्हां तुंगारण्याचा अधिपति मित्रसेन व अमरसिंह यांनीं हिंमत धरून युद्धास रंग आणला. पण चोंहीकडून मराठ्यांचा वेढा पडला

असल्यामुळें त्यांच्या पराक्रमाचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. मोंगली सैन्यास पाणी न मिळाल्यामुळें त्याचे फार हाल झाले. शेवटीं रायबागिणीच्या सूचनेवरून कारतलबानें महाराजांकडे दूत पाठवून जीवदान मागितलें. त्याप्रमाणें अभिवचन देण्यांत आल्यावर कारतलबानें खंडणी पाठविली व मित्रसेनादि सरदारांनीं देखील याच मार्गाचें अवलंबन केलें. यामुळें त्यांच्याशीं चाललेलें युद्ध बंद करून त्यांना जाऊं देण्याचा हुकूम महाराजांनीं आपल्या सैन्यास दिला. या वेळीं मोंगली सैन्य जीव घेऊन पळालें व मराठ्यांना शत्रूच्या तळावर पुष्कळ किमतीचा माल सांपडला. नंतर मोंगल पुनः परत येतील तर त्यांना अडविण्याचें काम करण्यासाठीं नेताजींची नेमणूक करून महाराज कोंकणच्या स्वारीवर निघाले.

या उंबरखिंडीच्या युद्धाशीं रायबागिणीचा संबंध होता व तिनें शरण जाऊन आपली सुटका करून घेतली ही गोष्ट ठोकळ मानानें बखरकारांना माहीत आहे. परंतु उंबरखिंडीचा ठावठिकाण अगर या प्रसंगाचा काळवेळ याची त्यांना कल्पनाहि नाहीं असें दिसतें. सभासदानें हा प्रसंग सुरतेच्या दुसऱ्या लुटीहून महाराज परत येत असतां वाटेंत घडला असें म्हटलें आहे !

मोंगली इतिहासांत या प्रसंगाचा अर्थातच नामनिर्देश देखील नाहीं. यामुळें त्यावर अवलंबून शिवचरित्र लिहिणाऱ्या प्रो. सरकारांनाहि त्याचा उल्लेख करतां आला नाहीं. जेधे शकावलींत हा प्रसंग श. १५८२ च्या माघांत घडला व " काहारतलबखान यासी लढाई जाली. उंबरखिंडीस जुझ जाले. राजश्री स्वामीची फत्ते जाली. त्यापासून खंडणी घेऊन वाट दिल्ही. " अशी हकीकत दिलेली असून प्रो. सरकार ती लक्षांत न घेतां शास्ताखानानें यावेळीं माशा मारीत बसून कालहरण केलें ( period of inactivity ) असें म्हणून ग्रँटडफचा त्यानीं अनुवाद केला आहे. प्रो. सरकार यांच्या शिवाजी चरित्रांतील शास्ताखानाच्या आगमनाची हकीकत अलमगीर–नाम्याच्या आधारें देण्यांत आली आहे ती महत्त्वाची आहे यांत शंका नाहीं. पण ती एकांगी असल्यामुळें, सर्वस्वी तिच्यावर विसंबणें योग्य नाही. तिची पूर्तता करण्यास मराठी उपलब्ध हकीकत जमेस धरलीच पाहिजे.

उंबरखिंडीच्या युद्धानंतर मराठ्यांशीं वागतांना चढाईचें धोरण न

स्वीकारतां बचावाचेंच स्वीकारलें पाहिजे हें शास्ताखानाच्या लक्षांत आलें असावें असें दिसतें. आणि महाराजांनीं देखील यानंतर विजापूरकरांच्या ताब्यांतील कोंकणचा भाग लुटणें व हस्तगत करणें यांवरच लक्ष ठेवलें. यावेळीं विजापूरचें सैन्य जोहाराशीं लढण्यांत गुंतलें होतें. यामुळें कोंकण हस्तगत करण्यास अनुकूल अशी संधी निर्माण झाली. शिवाय याहि- पेक्षां महत्त्वाचें असें एक कारण उपस्थित झालें होतें तें कोकणांतील किरकोळ सरदारांच्या वर्तनासंबंधींचें होतें. उदाहरणार्थ पालीचा राजा जसवंत व शृंगारपूरचा सूर्यराव हे मराठी राज्याविषयीं आपल्या मनांत आस्था आहे असें भासवीत आणि मी तुमचा 'क्रीतपुत्र' आहे असा निरोपहि सूर्यरावानें जावळीप्रसंगानंतर महाराजांकडे पाठविला होता. पण विजापूरकराचा जोर दिसतांच मराठ्यांशीं लढण्यासहि ते दोघे कमी करीत नसत. या सरदारांच्या जहागिरी कोंकणांत होत्या व कोंकण आदिलशाहाच्या ताब्यांत होतें त्या अर्थी त्यांनीं महाराजांच्या सैन्याशीं प्रसंगोपात लढण्याचा डौल घातला तर तो त्यांचा गुन्हा आहे असें महाराज केव्हांहि समजले नाहींत; कारण ते दोघेहि पराधीन होते [ २९।७२ ]. पण यापलीकडे जाऊन मनापासून मराठ्यांचा पाडाव करण्यासाठीं ते झटतात कीं काय याची परीक्षा पहावयाची होती. आणि या कसोटीनें ते शत्रु आहेत किंवा मित्र आहेत हें ठरावयाचें होतें. हें ठरण्याचा योग आला तो असा.

१६. **राजापूरची लूटः**—कोंकणांत गेल्यानंतर प्रथम महाराज दाभोळास गेले. दाभोळ मराठ्यांच्या ताब्यांत एका वर्षापूर्वींच आलें होतें. राजापूर ताब्यांत घेण्याचें काम मात्र त्यावेळीं झालें नव्हतें तें आतां करण्याचें निश्चित झालें. तेव्हां प्रथम संगमेश्वर व देवरुख येथील अदिलशाही ठाणीं उठवून पिलाजी नीळकंठ व तानाजी मालुसरे यांना सैन्यासह संगमेश्वर येथें महाराजांनीं ठेवलें व ते राजापुरास गेले. तिकडे जाण्यापूर्वीं त्यांनीं शृंगारपूरच्या सूर्यरावास मुद्दाम निरोप पाठवून असें कळविलें कीं "संगमेश्वर येथें आमचें सैन्य ठेवलेलें आहे. मी परत येईपर्यंत या सैन्यास तुम्हीं हरएकप्रकारें मदत करावी. आमच्याशीं यापुढें तुम्हीं वैरभाव धरूं नये."

हा निरोप पाठवून महाराज राजापुरास गेले व तेथें त्यांनीं मोठी लूट मिळविली.

या राजापूरच्या लुटीच्या वेळीं मराठ्यांचें मुख्य लक्ष इंग्रजी व्यापाऱ्यांवर होतें; त्याचें अनुसंधान लक्षांत येण्यासाठी थोडा पूर्ववृत्तांत सांगितला पाहिजे. कोंकणप्रांतांत दंडाराजपुरी येथील शिद्दी हा मराठ्यांचा शत्रु व राजापूरचा अधिकारी रुस्तुमजमान हा मराठ्यांचा मित्र होता. हें ओळखून शिद्यावर हल्ला करण्याच्या कामीं आम्ही मराठ्यांना मदत करूं असें बोलणें चालू ठेऊन व रुस्तुमजमानचा आश्रय करून प्रथम इंग्रजांनीं मराठ्यांचा स्नेह संपादन केला होता. अफजलखान मारला गेल्यावर मराठ्यांचें कांहीं सैन्य कोकणांत शिरलें व त्यानें रत्नागिरीकडील कांहीं प्रदेश हस्तगत केला; तेव्हां तेथील आदिलशाही अधिकारी आश्रयार्थ राजापुरास गेले. याचें कारण राजापूर रुस्तुमजमाकडे असून हा रुस्तुम शिवाजी महाराजांचा स्नेही आहे हें त्यांना माहीत होतें. पुढें मराठ्यांनीं दाभोळ बंदरावर चाल केली तेव्हां तेथील अधिकारीहि राजापुरास गेला. त्यानें बरोबर माल भरलेले तीन मचवे घेतले होते. या मचव्यांना व दाभोळच्या अधिकाऱ्याला राजापुरास आश्रयार्थ येऊं द्यावें असें रुस्तुमजमानानें आपल्या राजापूर येथील प्रतिनिधीला कळविलें होतें. त्यामुळें त्यानें या अधिकाऱ्याला बंदरांत येण्यास प्रतिबंध केला नाहीं.

पुढें कोल्हापुरानजीक रुस्तुम व शिवाजी यांच्या दरम्यान युद्धाची चकमक झडून रुस्तुमाचा पराभव झाला व तो हुकेरीकडे पळून गेला अशी बातमी आली; तेव्हां राजापुरास आश्रयार्थ आलेल्या लोकांची व खुद्द रुस्तुमाच्या प्रतिनिधींची पांचावर धारण बसली. त्यांनीं असा विचार केला कीं दाभोळाहून आलेले मचवे आयतेच आपल्या बंदरांत आहेत, तेव्हां त्यांतून आपण पसार होऊन दूरच्या बंदरांत उतरावें. पण राजापुरांतील इंग्रजी व्यापारी रेव्हिंग्टन हा त्यांना तसें करूं देईना ! इंग्रजांच्या एका दलालानें रुस्तुमजमानला कांहीं कर्ज दिलें होतें; तेव्हां त्या कर्जाची फेड झाल्यावांचून राजापूर येथील रुस्तुमाच्या प्रतिनिधीला आपण जाऊं देणार नाहीं असा इंग्रजी व्यापाऱ्यांनीं आग्रह धरला; व त्यांनीं आपलें जहाज पाठवून मुसलमान अधिकारी ज्या मचव्यांत बसले होते तो मचवाच अडवून धरला. त्यांतले अधिकारी घाबरून गेले असल्यामुळें वाटेल तो माल देऊन आपली सुटका करून घेण्यास ते एका पायावर तयार झाले होते. इतक्यांत मराठे घोडेस्वार बंदरांत येऊन पोंचले. 'अफजलखानाचे तीन मचवे येथें असून;

त्यापैकीं एकांत राजापूरचे अधिकारी जाऊन बसले आहेत; तो मचवा इंग्रजांनीं आम्हांस दिला पाहिजे' असें मराठ्यांनीं सांगितलें. पण इंग्रजांनीं तो ताब्यांत देण्याचें नाकारलें; इतकेंच नव्हे तर बाकीच्या दोन मचव्यां-पैकीं आणखी एक त्यांनीं ताब्यांत घेतला. आपल्या दलालाचे पैसे रुस्तु-मजमानकडून आल्यावांचून आपण मचवे ताब्यांत देणार नाहीं अशी सबब त्यांनीं सांगितली. तेव्हां मराठ्यांनीं इंग्रजांच्या या दलालानांच कैद केलें. त्याबरोबर फिलिफ गेफर्ड हा दलालास सोडविण्यासाठीं शिष्टाई करण्यास मराठ्यांकडे गेला. तेव्हां त्यालाहि मराठ्यांनीं अडकाऊन ठेवलें.

यानंतर रेव्हिंग्टननें शिवाजी महाराजांकडे पत्र पाठवून दंडाराजपुरी हस्तगत करण्याच्या कामीं आम्ही मदत करूं वगैरे बोलणें लावलें व दलालांची सुटका व्हावी अशी मागणी केली. त्याप्रमाणें शेवटीं या दला-लांची व गेफर्डची सुटका झाली. इतकेंच नव्हे तर राजापुरावर हल्ला करणाऱ्या सरदारांस महाराजांनीं दोष देऊन राजापूर येथें घेतलेला माल परत देण्याचाहि हुकूम केला.

पुढें पन्हाळ्याच्या वेढ्यांत शिद्दी जोहाराला कांहीं कुलपी गोळे इंग्रजांनीं पुरविले व इतर मार्गांनींहि विजापूरकरांना मराठ्यांविरुद्ध मदत पोंचविली. यामुळें इंग्रज व मराठे यांच्यांत चांगलाच बेबनाव आला. त्याचें प्रायश्चित्त महाराजांनीं राजापूर लुटलें त्यावेळीं तेथील इंग्रजी वखारवाल्यांना दिलें. या लुटीची हकीकत ' डाग रजिस्टर ' या डच भाषेतील साधन ग्रंथांत सविस्तर रीतीनें आली आहे. त्यांवरून असें दिसतें कीं महाराज चार हजार सैन्यासह इ. स. १६६१ च्या मार्च १५ च्या सुमारास राजापुरास गेले; व त्यांनीं गांवांतील प्रमुख लोकांना बोलाऊं पाठविलें; त्याप्रमाणें शिष्ट लोक भेटीस गेले, तेथील इंग्रज वखारवाला रेव्हिंग्टन हाहि आणखी दोन तीन लोकांसह इतर शिष्टांबरोबर महाराजांच्या भेटीस गेला. पण त्याचा पूर्वेतिहास मराठ्यांच्या लक्षांत होता. त्यांनीं त्या इंग्रज वखारवा-ल्यांना तावडतोब कैद केलें आणि त्यांचा माल ताब्यांत घेतला. या वेळीं इंग्रजी वखारींतील सर्व माल मराठ्यांनीं ताब्यांत घेतला एवढेंच नव्हे तर भूमिगत द्रव्याच्या संशयावरून त्यांनीं वखारीची जमीन देखील खणून

पाहिली. *इतर परदेशी व्यापारी राजापुरास होते त्यांच्याजवळचा माल हि मराठयांनीं असाच ताब्यांत घेतला.

या लुटीच्या वेळीं राजापुरांत असलेले युरोपियन व्यापारी " अग्नियंत्र-संधानांत म्हणजे तोफांच्या गोलंदाजींत विशेष नांवाजलेले होते; त्यांची संपत्ति कुबेरापेक्षां अधिक होती, ते समुद्रसंचारांत फार तरबेज असून शिल्पकलानिष्णात होते" असें भारतकारानें वर्णन केलेंले आहे तें अत्यंत मार्मिक आहे (३०।१,२). या फिरंग्यांकडून महाराजांनीं राजापुरास भरपूर खंडणी वसूल केली; आणि इतर आसपासच्या गांवांतूनहि अशीच खंडणी मराठयांना मिळाली. तेव्हां ती घेऊन महाराज तेथून परतले.

याप्रमाणें मराठयांनीं कोंकणप्रांत हस्तगत करण्याचें धोरण स्वीकारलेलें पाहून त्याच्या प्रतीकारार्थ अली अदिलशहाला कांहींतरी करणें प्राप्त झालें. परंतु रुस्तुमजमा हा या भागाचा अधिकारी असून तो (शिवाजी महाराजांना सामील असल्यामुळें असो किंवा भीतीमुळें असो) मराठयांवर हात टाकण्यास तयार नव्हता. हें ओळखून आदिलशहानें शिवाजी महाराजांचा बंदोबस्त करण्याचें काम शृंगारपूरच्या सूर्यरावाकडे सोंपविलें. तेव्हां हा आपला मोठा सन्मान करण्यांत आला असें समजून सूर्यरावानें मराठयांच्या सैन्यावर हात टाकण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृती करण्यास त्याला अनुकूल संधीहि मिळाली. मागें सांगितल्याप्रमाणें संगमेश्वर येथें मराठ्यांचें सैन्य होतें तें सूर्यरावाच्या आटोक्यांतलें होतें. तेव्हां त्यावर अचानकपणें हल्ला करून आपल्या राजनिष्ठेचें प्रदर्शन करण्याचें त्यानें ठरविलें. अर्थात असें करण्यानें शिवाजी महाराजांनीं आपणावर टाकलेल्या विश्वासाचा आपण घात करीत आहों व त्याबद्दल ते आपणावर राग धरतील हें सूर्यरावाच्या लक्षांत आलें असलेंच पाहिजे. पण बादशाही इभ्रतीचा दरारा सूर्यरावाच्या अंतःकरणांत अद्याप कायम होता. त्या दराऱ्याच्या मानानें शिवाजी महाराजांच्या रागामुळें ओढवणारें संकट पुरवेल असा त्याचा अंदाज असावा. शिवाय कित्येक पिढया बादशाही छत्राखालीं गेल्या असल्यामुळें नुकतेंच डोकें वर करूं पाहणाऱ्या शिवशाहीवर शस्त्र धरण्यास हरकत नाहीं असें सूर्यरावास वाटणें स्वाभाविक होतें. त्यानें आपलें सैन्य जम-

---

* Dagh Register 1661 p. 215-6.

वून मध्यरात्रीच्या वेळीं संगमेश्वर येथील मराठ्यांच्या तुकडीस वेढा दिला. जेव्हां सूर्यरावाचे सैनिक चालून आले तेव्हां तानाजी मालुसऱ्यानें मोठ्या शौर्यानें लढून शत्रूस पळवून लावलें. अशा रीतीनें अपराध केल्यानंतर देखील महाराज त्याला माफी देण्यास तयार होते. परंतु तो भेटीस गेला नाहीं व शेवटीं त्याला शृंगारपुराहून पळून जावें लागलें वगैरे भागाचा सारांश मागें पृ. ३२।३३ वर आला आहे. शृंगारपूर शके १५८३ च्या वैशाखांत मराठ्यांच्या ताब्यांत आलें व सूर्यराव पळून गेला असा शकावलींत उल्लेख आहे त्या अर्थी त्र्यंबक भास्कराचा अंमल त्या भागांत ज्येष्ठापासून सुरू झाला व तेव्हां ग्रीष्मऋतु होता हें शिवभारतांतील वर्णन सुसंगतच आहे. या त्रिंबक भास्कराचें नांव सभासदास माहीत आहे (पृ. १२). त्यानें तें अफजलप्रसंगांत सांगितलें आहे. पण पन्हाळयाचा वेढा व शृंगारपुरावरील स्वारी यांत त्यानें जी महत्त्वाची कामगिरी केली त्याचा नामनिर्देशहि सभासदास करतां आला नाहीं. याचें कारण अफजलप्रसंगानंतर शास्ताखान आला व तो आल्यानंतर तीन वर्षांनीं त्याचीं बोटें तुटलीं ही कल्पना सभासदाला नाहीं. शास्ताखान दक्षिणेंत आल्यावर लौकरच त्याचें शासन महाराजांनीं केलें अशी सभासदाची समजूत असल्यामुळें मधल्या तीन वर्षांतील गोष्टी दुसरीकडे कोठें तरी सांगणें त्याला भाग पडलें. शृंगारपूरची हकीकत त्यानें जावळीच्या हकीकतीस जोडून दिली आहे. यामुळें आधुनिक इतिहासकारांनाहि त्याचेंच अनुकरण करण्याचा मोह पडला आणि त्यांनीं दिलेली शृंगारपूरच्या विजयाची मिती पांच वर्षांनीं चुकली. खं. २१ पृ. ५ वर छापलेल्या शिवाजी महाराजांच्या अस्सल पत्रावरून शृंगारपूरची स्वारी जेधे शकावलींत सांगितल्याप्रमाणें शके १५८३ मध्यें झाली या विषयीं संशयास जागा नाहीं.

अफजल प्रसंगापासून शृंगारपूरची स्वारी संपेपर्यंत आतां आपणांस बरीच व्यवस्थित माहिती मिळाली आहे. तिची कालदृष्ट्या मांडणी अशी करतां येईल—

१५८१ वैशाख—अफजलखानास सामील होण्याविषयीं बादशाही फर्मान सुटलें.

आषाढ—( अफजलखान वांईकडे आला. )

श्रावण शु. २—शिवाजी राजे जावळीस आले.

कार्तिक—अफजलखानानें कृष्णाजी भास्कर यास वकिलीस शिवाजीराजे यांजकडे पाठविलें. भेटीचा करार झाला.

मार्गशीर्ष शु. ७—अफजलवध.

मार्गशीर्ष व ९—पन्हाळा मराठ्यांनीं घेतला.

मार्गशीर्ष व. १३—शिवाजीराजे पन्हाळ्यास गेले.

मार्गशीर्ष—मराठ्यांचा दाभोळवर हल्ला.

पौष व. १०—रुस्तुमजमा व फाजलखान यांचा मराठ्यांकडून कोल्हापुरानजीक पराभव.

माघ शु.—गदगलक्ष्मेश्वरापर्यंत खंडण्या घेतल्या. विजापूरप्रांतावर स्वारी.

फाल्गुन—मराठ्यांची दाभोळ ते राजापूर प्रांतावर स्वारी. इंग्रज व मराठे यांचा खटका.

१५८२ चैत्र—शिवाजीराजे पन्हाळ्यास गेले. शिद्दीजोहारानें पन्हाळ्यास वेढा दिला.

चैत्र—शास्ताखान भीमा उतरून पुणें प्रांतीं आला.

ज्येष्ठ शु ८—मराठ्यांनीं वासोटागड घेतला.

अ. ज्येष्ठ शु. ९—शास्ताखानानें पुणें घेतलें.

आषाढ व. १—शिवाजीराजे पन्हाळ्यावरून खेळण्यास ऊर्फ विशाळगडास गेले. बाजीप्रभूचा पराक्रम.

आषाढ—शिवाजीराजे खेळण्याहून राजगडास गेले.

श्रावण—मोंगलांनीं चाकण घेतलें.

भाद्रपद व. १३—पन्हाळा देऊन मराठ्यांनीं विजापूरकरांशीं तह केला.

अश्वीन—शास्ताखान पुण्यास आला.

कार्तिक—सोनोपंत शास्ताखानाचा निरोप घेऊन राजगडास शिवाजीराजे याजपाशीं परत आला.

माघ शु. ४—उंबरखिंडीच्या युद्धांत मराठ्यांनीं कारतलबखानाचा पराभव केला.

माघ—निजामपूर लुटलें. दाभोळ व प्रभानवल्ली घेतली.

फाल्गुन—राजापूर लुटलें.

फाल्गुन—संगमेश्वर येथील शिवाजी—सैन्याचा सूर्यरावाशीं संग्राम.

१६८३ वैशाख शु. ११ शृंगारपूर घेतलें. सूर्यराव पळून गेला.

ज्येष्ठ—त्र्यंबक भास्कराची प्रभानवल्ली प्रांतावर नेमणूक केली.

१७ **समालोचन**—आतापर्यंतच्या या प्रास्ताविक विवेचनावरून शिवाजी-चरित्रविषयक सामुग्रीचें व माहितीचें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येईलच. आजपर्यंत उपलब्ध असलेल्या सामुग्रीच्या दृष्टीनें आठवणी लिहून ठेवण्याचें काम प्रथम सभासदानें केलें; त्यानंतर सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत बऱ्याच दंतकथा एकत्र करून एक दोन बखरी लिहिल्या गेल्या. त्यांत एक दोन ठिकाणीं अस्सल पत्रें जमेस धरून व बाकीच्या भागांत अधिक दंतकथांचा संग्रह करून चिटणीसांची बखर लिहिली गेली. ग्रँड-फनें चिटणीसापेक्षां कांहीं बाबतींत अधिक यश मिळविलें याचें कारण त्यानें खाफीखान व विजापूरचा इतिहास वगैरे फारशी साधनें आणि इंग्रजी पत्रव्यवहार शिवचरित्राच्या कामीं उपयोगांत आणण्याचा पायंडा पाडला. पुढें राजवाडे यांचें खंड व भा. इ. सं. मंडळाचे ग्रंथ यांतून बरीच महत्त्वाची सामुग्री प्रसिद्ध झाली. तिचा क्वचित उपयोग करून व मुख्यतः फारशी तवारिखा व इंग्रजी पत्रें बारकाईनें वाचून प्रो. सरकार यांनीं शहाजी व शिवाजी यांच्या चरित्रांतील कांहीं प्रसंगांना निश्चितपणा आणला. परंतु त्यांनीं देखील मुख्य भिस्त बखरीवर ठेवली. मराठींतील महत्त्वाची माहिती भाषानभिज्ञत्वामुळें त्यांना जमेस धरतां आली नाहीं; आणि डच व पोर्तुगीज भाषांतून उपलब्ध असलेली माहिती त्यांनीं फारशी लक्षांतच घेतली नाहीं. त्यानंतर राधामाधवविलासचंपू व तंजावरचा शिलालेख यांचें अध्ययन करून कै. राजवाडे यांनी शहाजी चरित्राचें स्वरूप विशद करून सांगितलें. आणि आज तंजावरच्या शिलालेखकारालाहि आधारभूत असा ‘ शिवभारत ’ हा ग्रंथ श्रीयुत सदाशिवराव दिवेकर यांच्या परिश्रमामुळें प्रसिद्ध होत आहे. तो शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून तयार झालेला असल्यामुळें अस्सल शिवकालीन असून मराठ्यांची बाजू समजून घेण्याच्या कामीं अत्यंत महत्त्वाचा आहे.

तथापि शिवाजीचरित्राचा विचार आणखी सर्व बाजूंनीं झाला पाहिजे. मुसलमान, इंग्रज, पोर्तुगीज, डच, फ्रेंच वगैरे लोकांशीं महाराजांचा संबंध

आला व त्यांच्याहि लिहिण्यांत शिवचरित्रोपयोगी मजकूर ठिकठिकाणीं आलेला आहे. उत्तरकालीन व भाषांतरित लिखाण आजपर्यंत आधारास घेतलें गेलें; आतां अगदीं मुळाशीं जाण्याचा म्हणजे शिवकालीन सामुग्री मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. उ. 'शहाजीची कैफियत' हें काव्येतिहास संग्रहांत प्रसिद्ध झालेलें प्रकरण बुसातिने सलातीन या फारशी ग्रंथांतील कांहीं भागाचा त्रोटक गोषवारा आहे. पण बु. स. हा ग्रंथ अव्वल इंग्रजींत लिहिला गेला. तेव्हां त्यांतील शिवकालीन माहिती पूर्णपणें विश्वसनीय मानतां येत नाहीं. याकरितां या ग्रंथकारानें ज्या महमदनामा व तरीख-इ-अल्ली या ग्रंथांच्या आधारें शिवकालीन हकीकत तयार केली ते अस्सल ग्रंथ मराठींत भाषांतरासुद्धां प्रसिद्ध झाले पाहिजेत.

युरोपियन भाषांतील सामग्रीपैकीं डच भाषेतील 'डाग रजिस्टर' हें अव्वल प्रतीचें साधन आहे. तेव्हां या २९ खंडांतील शिवाजी व शहाजी चरित्रांस उपयोगी पडणारे निवडक वेचे मराठी भाषांतरासह प्रसिद्ध केले पाहिजेत. हें अत्यंत परिश्रमाचें आणि कष्टाचें कार्य श्रीयुत सदाशिवराव दिवेकर यांनीं योजलें असून या डच रोजनिशीचें इंग्रजींत भाषांतर फ्रान्स मधून करवून आणण्यांत येत आहे. या डच रोजनिशींतील माहितीवरून पन्हाळगडचा वेढा, शिद्दी जोहाराचें बंड व मृत्यु, राजापूरची लूट वगैरे संबंधानें विश्वसनीय माहिती मिळाली असून तीवरून शिवकालीन साधन सामुग्रीवर चांगलाच प्रकाश पडत आहे. शिवचरित्र अव्वल दर्जाच्या साधनाधारें लिहिलें गेलें पाहिजे ही गोष्ट महाराष्ट्रास मान्य होण्याजोगी असल्यामुळें साधन सामुग्रीच्या प्रकाशनाचें काम लौकर तडीस नेण्यासाठीं नेटानें प्रयत्न होईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

शिवभारताच्या उपलब्ध प्रतींत राजकीय घडामोडीच्या दृष्टीनें जो मजकूर आला आहे त्याचें स्थूलमानानें येथवर विवेचन केलें. त्यावरून शहाजीच्या चरित्रांतील २८ वर्षांतला व शिवाजीच्या चरित्रांतील श. १५८१-८३ पर्यंतच्या दोन वर्षांतला वृत्तांत लक्षांत येण्याजोगा आहे. पण या वृत्तान्ताखेरीज शिवकालीन कल्पना व भावना यांचेंहि विवेचन

या ग्रन्थावरून करतां येण्याजोगें आहे. उदाहरणार्थ, स्वराज्य शब्दा विषयींची भावना पहा. मुसलमानी अंमल दक्षिणेंत सुरू झाल्यापासून हिंदु लोकांच्या आकांक्षा अनेक दिशांनीं संकुचित व नष्ट होत चालल्या होत्या. यादवांचें राज्य नष्ट होऊन सत्तेचें केंद्र यवनांच्या हातीं गेलें तेंव्हांपासून राजपुरुष बादशहा म्हणजे यवन असावयाचा हें जणूं काय ठरून गेल्यासारखें झालें! दिल्ली, दौलताबाद, विजापूर, गोवळकोंडा वगैरे सर्व राजधान्यांत मुसलमान बादशहा नांदूं लागले व विजयनगरचें साम्राज्य बुडाल्या-पासून तर हिंदु साम्राज्याचें नांवहि ऐकूं येईनासें होऊन धर्म, राजकारण व कलाकौशल्य या तीनहि बाबतींतल्या हिंदूंच्या भावना राजाश्रयाच्या अभावीं मृतप्राय बनल्या व निराशावादाची छाया सर्वत्र पसरली. धर्माच्या विचारांत कलियुगाच्या कल्पनेनें, राजकारणांत वतनाच्या व सरदारीच्या आकांक्षेनें आणि कौशल्यांत यावनी वळणानें जें एकदा ठाणें दिलें तें जितांच्या अंतःकरणांत बद्धमूल झालें होतें. तथापि याहि परिस्थितींत हिंदूंच्या भावना संपूर्ण नष्ट झाल्या नव्हत्या. यद्यपि त्या कोमेजल्या होत्या तरी त्यांना आशेचें जलसिंचन केलें असतां त्यांचें पुनरुज्जीवन होणें शक्य होतें. आणि शिवाजी महाराजांनीं स्वराज्याच्या कल्पनेनें जें महत्कार्य घडवून आणलें तें, हिंदूंच्या आशा व आकांक्षा यांचें पुनरुज्जीवन होण्यास अवकाश दिला, हें आहे. पुरुषोत्तम कवीनें म्हटल्याप्रमाणें

यवनैरवनीशपालकैर्निखिलैराकलिता धरा यदा।
सुकला विकलाः कलावतां शिवभूपः शिवकृत्तदाजनि ॥ ९ ॥

सर्व हिंदुस्थान यवनाक्रांत होऊन हिंदूंच्या कला व गुण कोमेजून गेल्या वेळीं शिवरायांचा जन्म झाला, त्यांनीं स्थापिलेल्या स्वराज्यानें सर्व हिंदूंची, राजकीय, धार्मिक व कलाविषयक आकांक्षा पुरी केली असा अर्थ नसला तरी त्या आकांक्षा वाढविणारी ठिणगी स्वराज्यानें उत्पन्न झाली. ही स्वराज्याची कल्पना म्हणजे अग्नीच्या ठिणगीप्रमाणें अत्यंत तेजस्वी होती. मोठमोठे बादशहा व सरदार अफाट सैन्यानिशीं मराठ्यांविरुद्ध झगडत असतां स्वराज्याच्या कल्पनेच्या जोरावर मराठ्यांनीं एका शतकांत यावनी साम्राज्य धुळीस मिळवून त्या जागीं हिंदूंचें राज्य निर्माण केलें. मुसलमानांचें राज्य केवळ दंडेलीच्या जोरावर उभारलेलें होतें यांत शंका नाहीं; अर्थातच त्या राज्यानें लोकांच्या खऱ्या आकांक्षा पुरविण्याकडे लक्ष दिलें असें केंव्हांहि

ह्मणतां येत नव्हतें. पण मराठ्यांच्या स्वराज्याची इमारत पराक्रमाप्रमाणें हिंदु लोकांच्या आपलेपणाच्या भावनेवर उभारलेली होती हें निःसंशय आहे. 'शिवशाहीपूर्वी महाराष्ट्रांत राष्ट्रीयभावना होती व तिचेंच फल स्वराज्य स्थापनेच्या स्वरूपानें दिसलें' असें जें कित्येकांनीं प्रतिपादन केलें आहे तें वस्तुस्थितीदर्शक नाहीं. राज्य हें लोकांचें आणि राजा हा लोकांचा प्रतिनिधि ही कल्पना त्यावेळच्या समाजाला माहीत नसून राज्य हें राजाचें, व तो वागवील त्याप्रमाणें लोकांना वागणें भाग आहे अशी त्या काळांतील समजूत असे. आणि कांहीं बादशहा प्रजेच्या सुखासाठीं झटत व कांहीं त्यांच्यावर जुलूम करीत ही तरी केवळ योगायोगाची गोष्ट असे. बादशहा चाहील ते करूं शकेल अशी त्याची अनिरुद्ध सत्ता मानली गेली असल्यामुळें विशिष्ट बादशहाचा स्वभाव व लहर प्रजेच्या सुखदुःखास कारणीभूत होई. मुसलमानी सत्तेची मांडणी सैन्याच्या, दांडगाईच्या, अमानुष कत्तलीच्या व क्रूरपणाच्या पायावर केलेली होती. या सत्तेचा लोकांच्या संमतीशीं यत्किंचितहि संबंध नव्हता. हिंदुराजांना पराभूत करून त्यांचीं राज्यें पादाक्रांत करावीं व हिंदुधर्माच्या जागीं मुसलमानी धर्माचा फैलाव करावा या दोन कल्पना महत्त्वाकांक्षी बादशाहांच्या डोक्यांत घोळत असत आणि इमारती बांधाव्या व चैन करावी व इतर ऐषआराम उपभोगावे ही इच्छा इतर बऱ्याच बादशहांची असे. मिळून राजकीय, धार्मिक व उपभोगविषयक कोणत्याहि प्रवृत्तीचा बादशहा गादीवर असला तरी लोकांकडून पैसा पिळून काढणें त्याला भाग होतें. राज्यांत बंडखोर निर्माण न होण्यास लोक निःसत्व करणें हा तर राजमार्ग ठरलेला होता. त्याचें अवलंबन करून बादशहा खजीना जमवीत व या खजीन्याचा उपयोग सैन्य ठेवावें, राज्यविस्तार करावा, धर्मप्रसार करावा, किंवा इमारती बांधून चैन करावी या कामांकडें होत असे. त्यांतून दिल्लीपतींनीं दक्षिणेंतील शाह्या बुडवून आपलें साम्राज्य वाढविण्याची महत्त्वाकांक्षा धरल्यापासून तर निजामशाही व आदिलशाही प्रांतांत धामधूम, दंगेधोपे व लढाया यांचा बुचबुचाट होऊन लोकांना त्राहित्राहि होऊन गेलें. अशा गडबडीच्या काळांत फौजबंद व लढाऊ हिंदु सरदारांची चलती होती. त्यांना पराक्रमाच्या जोरावर कधीं दिल्लीकराच्या तर कधीं विजापुरकरांच्या आश्रयास राहून आपलें महत्त्व वाढवून घेण्यास चांगला अवसर सांपडत होता.

अशा संधीचा मालोजी राजे, शहाजी राजे आणि श्रीशिवाजी महाराज

या सर्वांनींच यावच्छक्य फायदा करून घेतला. पण परिस्थितिभिन्नत्वा-मुळें प्रत्येकाच्या विचारसरणींत फरक पडत चालला. मालोजीच्या वेळीं स्वराज्याच्या कल्पनेचा नुसत्या अंतःकरणांत देखील उदय झाला नव्हता. निजामशाहीच्या सत्तेखालीं दहा हजारांची मनसबदारी मिळाली म्हणजे पराक्रमाची व ऐश्वर्याची परमावधि झाली एवढीच भावना त्या वेळीं शक्य व व्यवहार्य होती. शहाजीच्या ऐन उमेदीच्या काळांत निजामशाहीचा डोलारा डळमळूं लागला. तथापि निजामशाही बुडवूं पहाणारे मोंगल किंवा दक्षिणेंतले प्रतिस्पर्धी अदिलशाही सुलतान यांना देखील शहाजी-सारख्या फौजबंद व कर्तबगार सरदारास स्वतःच्या पक्षास वळवून घेतल्या-खेरीज निजामशाही घशांत टाकणें किंवा गिळलेली पचविणें शक्य नाहीं असें कळून चुकलें; आणि शहाजीनें त्या परिस्थितीचा पूर्ण फायदा करून घेतला. कधीं निजामशाहीलाच चिकटून राहून, तर कधीं विजापूरकराकडे अगर मोंगलाकडे संधान बांधून त्यानें आपलें प्रस्थ एवढें वाढविलें कीं ज्या पारड्यांत शहाजीच्या दोस्तीचें वजन पडेल तें पारडें जड व्हावयाचें हें जणूकाय ठरूनच गेलें. यामुळें शहाजीसारख्या मराठे सरदारास आपल्या कर्तृत्वाची जाणीव उत्पन्न झाली; आणि त्याबरोबरच मुसलमानी सत्ता-धीशांच्या विश्वासघातकीपणाची चीड येऊं लागली. 'आपण आपल्या वचनासाठीं जीव गहाण ठेवला तरी या सत्ताधाऱ्यांचा आपल्यावर विश्वास बसत नाहीं; एवढेंच नव्हे तर स्वतःचा स्वार्थ साधण्याकरितां ते आपल्या अब्रूवर किंवा जीवितावर केव्हां निखारे ठेवतील याचा नेम नाहीं' असें त्यास वाटूं लागलें व दोनतीन वेळां त्यास तसा कटु अनु-भवहि आला. जी निजामशाही वांचविण्यासाठीं शहाजीनें स्वतःच्या जिवाचें रान करून घेतलें त्याच निजामशाहीच्या सत्ताधाऱ्यांनीं आपण स्वतः शत्रूस सामील होऊन ऐन वेळीं शहाजीस दगा दिला. मोंगलाकडे जाऊन मिळावें तर परभारें निजामशाहीच्या किंवा अदिलशाहीच्या मुलखा-कडे बोट दाखवून मुलखगिरी करून पोट भरण्यास ते सांगत; मात्र स्वतंत्र सत्ता किंवा सैन्य यांची कांहींच मदत मोंगल देत नाहींत असा प्रकार दिसून येऊं लागला. त्यांतल्यात्यांत अदिलशाहीला पराक्रमी सरदाराची गरज अधिक भासत असल्यानें तेथें थोड्याबहुत अब्रूनिशीं राहतां येणें शक्य वाटत होतें; म्हणून शहाजीनें तोच आश्रय अखेर पत्करला. परंतु

तेथेंहि मुरार जगदेवाचा कसा शोचनीय अंत झाला हें त्यानें पाहिलें होतें व याकरितां होतां होईल तों दरबारापासून दूर राहावें अशी त्याची इच्छा होती व तेवढ्यासाठींच कर्नाटकाची कामगिरी मिळवून तो विजापूरच्या दरबारी वातावरणापासून दूर राहिला असावा. परंतु तेथेंहि मुस्तफाखाना-सारखे खवीस त्याच्या राशीस लागले व त्या प्रसंगांतून जिवानिशी व अब्रूनिशीं बचाव झाला हेंच मोठें सुदैव समजलें पाहिजे.

राजकारणांतले हे सगळे डाव खेळतां खेळतां शहाजी वृद्धावस्थेस पोंचला होता व आतां कोणतेंही स्वतंत्र धाडस करण्याची उमेद बाळ-गण्याचें त्याचें वय नव्हतें. तरी पण कोणत्याना कोणत्यातरी बादशहाला आपली गरज लागणार हें लक्षांत घेऊन तो असें बजावीत असे कीं अब्रूला धक्का लावून घेऊन मीं कोणाचा बंदा नोकर म्हणून काम करणार नाहीं. तथापि प्रत्येक वेळीं त्याला कोणाना कोणाना तरी मुसलमानी सत्ताधीशावर अवलंबून रहावेंच लागलें हा त्याच्या कालाचा व परिस्थितीचा परिणाम होय.

'हिंदू सरदार व मुत्सद्दी यांना आपली कर्तबगारी दाखविण्यास मुसल-मानांच्या सत्तेखालीं पूर्ण वाव मिळूं शकत नाहीं आणि कोणीही हिंदू पुढारी डोईजड होऊं लागल्यास मुसलमान राजे आपापसांत एक होऊन त्यास हाणून पाडण्याला चुकत नाहींत' अशी खूणगांठ शिवाजीनें आरंभा-पासूनच बांधून ठेवली होती व ती त्याच्या अनुयायांच्याही पूर्ण परि-चयाची झाली होती; यामुळें मुसलमान तितका बेइमान अशी भाषा जेधे प्रभृतींच्या पत्रव्यवहारांतूनही आढळून येते. या बेइमानीमुळें तीन वेळां शहाजीच्या जिवावर व अब्रूवर संकट आलें होतें; त्या अनुभवानें सावध होऊन शिवाजीनें प्रारंभापासूनच 'शक्य तोंवर कोणाचीही ताबेदारी टाळावयाची' असेंच धोरण ठरविलें होतें. ज्या पुणें व सुपें प्रांताच्या जहा-गिरीपासून त्यांनीं स्वराज्याचा पाया रचण्यास सुरुवात केली ती जहा-गीर कोणाकडून मिळाली याचा केव्हांहि स्पष्ट उलगडा न होऊं देतां स्वतंत्रपणानें वागण्याचा शिवाजीनें पायंडा घातला. हें स्वातंत्र्य राखणें अर्थातच दुर्घट काम होतें. तथापि 'दुसऱ्याची ताबेदारी मानली तरी देखील प्रसंगीं संकट टळत नाहीं व दुसरा कोणी आपला पाठपुरावा करूं शकत नाहीं आणि स्वतच्या पराक्रमावरच भिस्त ठेवण्याची अखेर पाळी येते; मग स्वातंत्र्य

तरी का घालवा' असा विचार त्याच्या मनांत वारंवार येत असून त्यानें आपलें स्वातंत्र्य राखण्यांतच आपला बचाव आहे हें जाणलें आणि त्या दृष्टीनेंच स्वराज्यस्थापनेची कारवाई चालविली.

आपल्या मनांतील खरा हेतु योग्य वेळेपूर्वी उघडकीस येऊं नये म्हणून शिवाजी शक्य तोंवर विजापूरकराच्या किंवा औरंगजेबाच्या तंत्रानें आपण वागत आहों असा देखावा दाखवी; पण त्यानें केव्हांहि आपला अंतस्थ हेतु सोडला नाहीं किंवा त्यास धक्का लागेल असें वर्तन केलें नाहीं. जोंपर्यंत औरंगजेब दक्षिणेंत होता, तोंपर्यंत त्यानें त्यास प्रत्यक्ष दुखवावयाचें नाहीं असें ठरविलें होतें. परंतु त्यांतही औरंगजेबावर शह ठेवण्याकरितां आपण विजापुरकरांच्या पक्षास जाऊन मिळूं असा धाक तो घालीत असे. औरंगजेबाचा कटाक्ष या वेळीं विजापूरकराविरुद्ध विशेष असल्यामुळें विजापूरकरांना दे माय धरणी ठाय असें होऊन गेलें होतें. अशा स्थितींत शहाजी किंवा शिवाजी यांच्यासारख्या पराक्रमी पुरुषांची मदत हातची घालवून त्यास आपले वैरी बनविण्यास ते तयार नव्हते. आणि यामुळेंच बापास बंधमुक्त करून आपलें राजकारण शिवाजीला उभारतां आलें.

तथापि शिवाजीच्या कारकीर्दीच्या प्रारंभापासूनच राजकारणांत धर्म-कारणाची गुंतागुंत अधिक होऊं लागली होती. विजयनगरच्या राजाविरुद्ध मुसलमानी शाह्यांनीं जी जूट केली ती कांहीं केवळ धर्म प्रसाराकरितां नव्हती. तेव्हां ती मोहीम सोडून दिल्यास त्यानंतर आदिलशाही, निजामशाही व कुतुबशाही यांच्यामध्यें परस्परांत जे झगडे चालत आणि या सर्वांना, संघटित रीतीनें किंवा पृथक्पणें, मोंगलाशीं जी टक्कर द्यावी लागत होती तींतही धर्मकारणाचा संबंध क्वचितच दिसून येत होता. जहांगीर किंवा शहाजहान यांच्या आंगीं औरंगजेबासारखे धर्मवेड नव्हतें. आणि निजाम-शाही तर त्या कामांत अगदींच ढिलेपणानें वागत असे. अदिलशाहींतहि इब्राहिम बादशहाच्या कारकिर्दींत हें धर्मवेड पिकलें नव्हतें. त्यामुळें त्यांचे प्रतिपक्षी जे मराठे त्यांनाहि केवळ धर्मदृष्टीनें मुसलमानांची सत्ता त्याज्य न वाटतां, त्यांच्या राज्यसंपादनाच्या उद्योगांत, राजकीय सत्तेची भावनाच प्रधान होती. पण इकडे इब्राहिमशहाहि गेला आणि शहाजहानहि दक्षिणेंतून जाऊन त्याच्याजागीं औरंगजेबासारखा कडवा मुसलमान सत्ता-धारी झाला. त्यावेळेपासून राजकारणाचें पारडें धर्मवेडाच्या लहरीनें इक-

डचें तिकडे झुकूं लागलें. शहाजीचा कर्नाटकांतला पराक्रम अदिलशाही सरदारांच्या डोळ्यांत खुपण्यास हें नवीन पसरूं लागलेलें धर्मवेडच कारणीभूत झालें. त्यानंतर अफजलखानानानें पंढरपुरादि क्षेत्रांस उपसर्ग पोंचवून हिंदूंच्या धर्मभावना अधिकच दुखविल्या. अर्थातच शिवाजीला धर्मरक्षणाकरितांहि आणि स्वातंत्र्य संपादन केलें पाहिजे अशी आवश्यकता वाटूं लागली. निजामशाहींत राहून अल्पवयी सुलतानाच्या नांवानें राज्यकारभार चालवितांना शहाजीला आपल्या कृतींत विसंगतता किंवा विपरीतपणा वाटत नव्हता. पण शिवाजीच्या उदयाच्या प्रारंभापासूनच हें पारडें फिरल्यानें यवनांची ताबेदारी टाळण्याला धर्माभिमान हें एक प्रभावी कारण होऊं लागलें. सारांश, मालोजीराजापासून तों शिवाजीच्या पराक्रमाच्या अरुणोदयापर्यंत दक्षिणेंतील राजकारणांत व धर्मभावनांत इतकें स्थित्यंतर घडून आलें होतें कीं, शिवाजीच्या मनांत शहाजीच्याप्रमाणें अदिलशाहीशीं किंवा मोंगलांशीं सलोखा राखून आपला प्रताप प्रगट करणें शक्य नव्हतें. शहाजीनें आपल्या कारकीर्दीच्या अखेरी अखेरीस परिस्थितींत होणारी ही उत्क्रान्ति जाणली; पण तिचा उपयोग करून घेण्याची ताकद त्यावेळीं त्याच्याआंगीं फारशी राहिली नव्हती. पण असल्या परवशतेचा पाश शिवाजीभोंवतीं पडूं नये व प्रारंभापासून त्यानें त्यापासून अलग रहावें अशी परिस्थितीच शिवाजी सभोंवती निर्माण झाली होती. आणि शिवाजी हा पराक्रमांत, मुत्सद्देगिरींत आणि धर्मनिष्ठेंत सवाई शहाजी असल्यानें त्यानें परिस्थिति अचूक ओळखून तिचा ज्या ज्या वेळीं जसा फायदा घ्यावयाचा त्याप्रमाणें योग्य फायदा घेतला. कधीं अदिलशाहीशीं सख्य जोडलें तर कधीं औरंगजेबाशीं सलोख्याची शिष्टाई चालविली; परंतु केव्हांहि आपला मुद्दा सोडला नाहीं. आणि स्वतःचें स्वतंत्र अधिष्ठान गमावून तो दुसऱ्याच्या आहारीं गेला नाहीं. या त्याच्या चतुराईच्या राजकारणाचें वर्णन शिवभारतकारानें त्याच्या चरित्रांतले जे प्रसंग या प्रसिद्ध झालेल्या भागांत वर्णिले आहेत त्यावरून दृष्टोत्पत्तीस येतें. आणि त्यामुळें या शिवभारताचा हातीं न आलेला बाकीचा भाग केव्हां कोठें व कसा हस्तगत होईल याविषयीं चटक लागून राहते. तो भाग सुदैवानें उपलब्ध झाल्यास बरें होईल.

दत्तात्रेय विष्णु आपटे.

॥ श्री ॥

# शिवभारत

## अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः । श्रीसांबसदाशिवाय नमः । श्रीमहाकाली-महालक्ष्मी-
महासरस्वती-देवताभ्यो नमः । श्रीरस्तु ।

**वन्दारुविबुधोदारमौलिमन्दारदामभिः ।**
**स्विद्यत्पदारविन्दाय गोविन्दाय नमो नमः ॥ १ ॥**

१ वंदन करणाऱ्या देवश्रेष्ठांच्या मस्तकांवरील मंदारपुष्पांच्या मालांच्या योगें ज्याच्या पदकमलांस घाम सुटला आहे अशा विष्णूस मी पुनः पुनः नमस्कार करतों.

**कदाचित् परमानन्दशर्मा ब्राह्मणसत्तमः ।**
**तीर्थयात्राप्रसङ्गेन पुरीं वाराणसीं ययौ ॥ २ ॥**

२ कोण्या एका काळीं परमानंद नांवाचा एक श्रेष्ठ ब्राह्मण तीर्थयात्रेच्या निमित्तानें काशी क्षेत्रीं गेला.

**मुच्यन्ते यत्र सर्वेऽपि मुक्तिरेव न मुच्यते ।**
**यत्रोपदिशति ब्रह्म तारकं स्वयमीश्वरः ॥ ३ ॥**
**तत्र तीर्थविधिं कृत्वा दृष्ट्वा देवं महेश्वरम् ।**
**पुण्ये भागीरथीतीरे निषसाद स धर्मवित् ॥ ४ ॥**

३-४ जेथें सर्वच लोक मुक्त होतात, पण मुक्ति मात्र मुक्त होत नाहीं (म्हणजे जेथें ती सतत वास करते ), व जेथें स्वतः शंकर तारक ब्रह्माचा उपदेश करतात अशा त्या काशी क्षेत्रामध्यें तीर्थविधि करून आणि महादेवाचें दर्शन घेऊन तो धर्मज्ञ ब्राह्मण भागीरथीच्या पवित्र तीरीं राहिला.

**तं वै पद्मासनासीनं विस्फुरद्ब्रह्मवर्चसम् ।**
**वेत्तारं सर्वशास्त्राणां वित्तमध्यात्मवित्तमम् ॥ ५ ॥**
**पौराणिकानां प्रवरं भट्टगोविन्दनन्दनम् ।**
**एकवीराप्रसादेन लब्धवाक्सिद्धिवैभवम् ॥ ६ ॥**
**कवीन्द्रं परमानन्दं परमानन्दविग्रहम् ।**
**दृष्ट्वा प्रमुदितास्तत्र विप्राः काशीनिवासिनः ॥ ७ ॥**

५-७ तेथें पद्मासन घालून बसलेला, विद्येच्या तेजानें झळकणारा, सर्व शास्त्रांचा ज्ञाता, विख्यात, श्रेष्ठ अध्यात्मवेत्ता, पौराणिकांचा मुकुटमणि, एकवीरा देवीच्या कृपेनें वाक्सिद्धिवैभव प्राप्त झालेला, परमानंदाची मूर्तीच असा जो

गोविंदभट्टाचा पुत्र, कविश्रेष्ठ परमानंद, त्यास पाहून त्या काशीनिवासी पंडितांस मोठा हर्ष झाला.

स तानुदारचरितान् प्रत्युत्थायाभिवाद्य च ।
पूजयामास विधिवत् संप्राप्तानतिथीनिव ॥ ८ ॥

८ त्या उदारचरित पंडितांना त्यानें उत्थापन देऊन अभिवादन केलें व घरीं आलेल्या अतिथींप्रमाणें त्यांचा विधिपूर्वक सत्कार केला.

परिवार्योपविविशुस्ते सर्वे तं द्विजोत्तमाः ।
शुश्रूषमाणाश्चरितं प्रथितं शिवभूपतेः ॥ ९ ॥

९ ते सर्व श्रेष्ठ ब्राह्मण शिवाजी महाराजांचें प्रख्यात चरित्र ऐकण्याच्या इच्छेनें त्याच्या सभोंवतीं बसले.

ततः प्रमनसस्सर्वे तमूचुस्ते मनीषिणः ।
कर्तारं चारुकाव्यानामवतारं बृहस्पतेः ॥ १० ॥

१० नंतर आनंदित झालेले ते सर्व पंडित सुंदर काव्यांचा कर्ता व प्रत्यक्ष बृहस्पतीचा अवतार अशा त्या परमानंदास म्हणाले.

मनीषिण ऊचुः

यः शास्ति वसुधामेतां राजा राजगिरीश्वरः ।
तुलजायाः प्रसादेन लब्धराज्यो महातपाः ॥ ११ ॥
विष्णोरंशो विशेषेण लोकपालांशसंभवः ।
मनस्वी सुप्रसन्नात्मा प्रतापी विजितेंद्रियः ॥ १२ ॥
भीमादपि महाभीमः सीमा सर्वधनुर्भृताम् ।
धीमानुदारचरितः श्रीमानद्भुतविक्रमः ॥ १३ ॥
कृती कृतज्ञः सुकृती कृतात्मा कृतलक्षणः ।
वक्ता वाक्यस्य सत्यस्य श्रोता चातिविचक्षणः ॥ १४ ॥
देवद्विजगवां गोप्ता दुर्दान्तयवनान्तकः ।
प्रपन्नानां परित्राता प्रजानां प्रियकारकः ॥ १५ ॥
तस्यास्य चरितं ब्रह्मन्ननेकाध्यायगर्भितम् ।
भगवत्याः प्रसादेन भवता यत् प्रकाशितम् ॥ १६ ॥
उदारशब्दसन्दर्भं भूरिभावार्थमद्भुतम् ।
माधुर्यादिगुणोपेतमलंकारैरलंकृतम् ॥ १७ ॥
निचितं धर्मशास्त्रार्थैरर्थशास्त्रसमन्वितम् ।
विश्रुतं सर्वलोकेषु पुराणमिव नूतनम् ॥ १८ ॥

**समस्तदोषरहितं सहितं लक्षणैर्निजैः ।**
**तदशेषमशेषज्ञ शंस नः शंसितव्रत ॥ १९ ॥**

पंडित म्हणाले:—

११–१९ जो राजगडचा अधिपति राजा ह्या पृथ्वीवर राज्य करीत आहे, तुळजाभवानीच्या प्रसादानें ज्याला राज्यप्राप्ति झाली आहे, जो महातपस्वी, विशेषेंकरून विष्णूचा अंश व अष्टदिक्पालांचा अंशभूत आहे, जो बुद्धिमान्, प्रसन्नचित्त, प्रतापी, जितेंद्रिय, भीमापेक्षांहि महाभयंकर आणि सर्व धनुर्धरांचा मुकुटमणि आहे, तसेंच जो शहाणा, उदारचरित, वैभवशाली, अद्भुत पराक्रमी, ज्ञानी, कृतज्ञ, पुण्यवान्, आत्मसंयमी व गुणांनीं प्रख्यात आहे, जो सत्यवक्ता, अति चतुर श्रोता, देव ब्राह्मण आणि गाई यांचा त्राता, दुर्दम्य यवनांचा काळ, शरणागतांचा रक्षक, प्रजेचें प्रिय करणारा आहे, अशा त्या शिवाजी राजाचें जें अनेकाध्यायात्मक चरित्र आपण एकवीरा देवीच्या प्रसादानें प्रसिद्ध केलें आहे, ज्यांतील शब्दरचना उत्कृष्ट आहे, जें अद्भुत असून, अर्थगांभीर्यानें भरलेलें आहे, जें माधुर्यादि गुणांनीं युक्त, अलंकारांनीं विभूषित, धर्मशास्त्र आणि राजनीति यांनीं परिपूर्ण आणि ज्याची जणू काय नवें पुराण म्हणून सर्व लोकांत प्रसिद्धि झाली आहे, जें समस्त दोषांपासून मुक्त आणि सर्व निजलक्षणांनीं युक्त आहे असें तें सर्व चरित्र, हे सर्वज्ञ आणि स्तुत्याचरणी ब्राह्मणा आम्हांस सांग.

**इति वाराणसीस्थेन मण्डलेन मनीषिणाम् ।**
**प्रोक्तः प्रोवाच धर्मात्मा कवींद्रो वदतां वरः ॥ २० ॥**

२० काशीच्या पंडित मंडळींनीं अशी विनंती केल्यावर तो धर्मात्मा व वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असा कवींद्र म्हणाला,

**कवींद्र उवाच**

**एकवीरां भगवतीं गणेशं च सरस्वतीं ।**
**सद्गुरुं च महासिद्धं सिद्धानामपि सिद्धिदम् ॥ २१ ॥**
**प्रणिपत्य प्रवक्ष्यामि महाराजस्य धीमतः ।**
**चरितं शिवराजस्य भरतस्येव भारतम् ॥ २२ ॥**

कवींद्र म्हणाला:—

२१–२२ भगवती एकवीरा, गणपति, सरस्वती, आणि सिद्धांना सुद्धां सिद्धिदाता महासिद्ध सद्गुरु यांना प्रणिपात करून, भरतवंशाच्या भारताप्रमाणें असलेलें बुद्धिमान् शिवाजी महाराजांचें चरित्र मी कथन करतों.

**कलिकल्मषहारीणि हारीणि जनचेतसाम् ।**
**यशांसि शिवराजस्य श्रोतव्यानि मनीषिभिः ॥ २३ ॥**

२३ कलियुगांतील पापें नाहींशीं करणारीं आणि लोकांचीं चित्तें हरण करणारीं अशीं शिवरायाचीं यशोगीतें आपण श्रवण करावींत.

योऽयं विजयते वीरः पर्वतानामधीश्वरः ।
दाक्षिणात्यो महाराजः शाहराजात्मजः शिवः ॥ २४ ॥
साक्षान्नारायणस्यांशस्त्रिदशद्वेषिदारणः ।
स एकदात्मनिष्ठं मां प्रसाद्येदमभाषत ॥ २५ ॥
यानि यानि चरित्राणि विहितानि मया भुवि ।
विधीयन्ते च सुमते तानि सर्वाणि वर्णय ॥ २६ ॥
मालभूपमुपक्रम्य प्रथितं मत्पितामहम् ।
कथामेतां महाभाग महनीयां निरूपय ॥ २७ ॥

२४-२७ जो हा वीर, गडांचा अधिपति, दक्षिणेंतील महाराजा, प्रत्यक्ष विष्णूचा अवतार, यवनांचा संहारकर्ता, शहाजी राजाचा पुत्र, शिवाजी विजयशाली झाला आहे, तो एकदां मला ब्रह्मनिष्ठास विनंती करून म्हणाला कीं, हे सुमते, जीं जीं कृत्यें मीं या पृथ्वीवर केलीं आहेत व करीत आहें त्या सर्वांचें तूं वर्णन कर. माझे आजोबा प्रसिद्ध मालोजी राजे यांच्यापासून प्रारंभ करून, हे महाभागा, तूं ही महनीय कथा सांग.

तस्येमां वाचमनघामभिनन्द्य द्विजोत्तमाः ।
प्रतिश्रुत्य गृहानेत्य स्वयमेतदचिन्तयम् ॥ २८ ॥
अहो कथमहं कुर्यां भारतप्रतिमं महत् ।
अमानुषचरित्रस्य शिवस्यैतत् समीहितम् ॥ २९ ॥
इति संचिन्तयन्तं मां चिरसुस्थिरचेतसम् ।
देवी भगवती साक्षात् समेत्येदमवोचत ॥ ३० ॥

२८-३० हे ब्राह्मणश्रेष्ठांनो, त्याच्या ह्या पवित्र भाषणाचें अभिनंदन करून मी तें मान्य केलें, आणि घरीं येऊन स्वतःशीं असा विचार करूं लागलों कीं, भारताप्रमाणें मोठें चरित्र म्यां रचावें अशी ही अलौकिक-चरित्राच्या शिवाजीची इच्छा माझ्या हातून कशी पार पडेल असा दीर्घकाळ एकाग्र चित्तानें विचार करीत असतां भगवती एकवीरा देवी साक्षात् येऊन मला असें म्हणाली:—

देव्युवाच

कवींद्र कुरु मा चिन्तामनुकूलास्म्यहं तव ।
ममादेशादयं राजा त्वामिदं कार्यमादिशत् ॥ ३१ ॥

**एवमाश्वासयन्ती मां कृपालुः कुलदेवता ।**
**चतुर्भुजा भगवती हृदयं मे समाविशत् ॥ ३२ ॥**

देवी म्हणाली:—

३१–३२ हे कविश्रेष्ठा, तूं काळजी करूं नकोस. मी तुला प्रसन्न झाल्यें आहें. माझ्याच आज्ञेनें शिवरायानें हें काम तुला सांगितलें आहे. याप्रमाणें मला धीर देऊन ती कृपाळू कुलदेवता चतुर्भुजा एकवीरा माझ्या हृदयांत प्रवेश करती झाली ( मला काव्यस्फूर्ति झाली ).

**तदाप्रभृति वाग्ब्रह्म समग्रं पश्यतो मम ।**
**जागर्त्यर्थेन सहितं रसनाग्रमधिष्ठितम् ॥ ३३ ॥**

३३ तेव्हांपासून पाहतां पाहतां समग्र वाग्ब्रह्म अर्थासह माझ्या जिव्हाग्रावर अधिष्ठित होऊन जागें आहे.

**अनागतानां भावानामतीतानां च सर्वशः ।**
**साक्षात् सन्दर्शनेनाहममानुष इवाभवम् ॥ ३४ ॥**

३४ गत आणि भावी सर्व गोष्टी मला प्रत्यक्ष दिसूं लागल्यामुळें मी जणूं काय एक अलौकिक पुरुष झालों.

**कृतकृत्यमथात्मानं मन्यमानेन वै मया ।**
**कृतमेतन्महापुण्यमाख्यानमनघव्रताः ॥ ३५ ॥**

३५ मग, हे सच्छील पंडितांनो, मी स्वतःला कृत्यकृत्य मानून हा अतिशय पवित्र इतिहास रचिला.

**यत्रास्ते महिमा शंभोर्महादेवस्य वर्णितः ।**
**दुर्वृत्तासुरमर्दिन्यास्तुलजायास्तथैव च ॥ ३६ ॥**
**धर्मस्यार्थस्य कामस्य मोक्षस्य च यथायथम् ।**
**तीर्थानामपि माहात्म्यं यत्र सम्यङ्निरूपितम् ॥ ३७ ॥**
**यत्र युद्धान्यनेकानि शिवस्य यवनैः सह ।**
**तेषामेव विनाशार्थमवतीर्णस्य भूतले ॥ ३८ ॥**
**देवानां ब्राह्मणानां च गवां च महिमाधिकम् ।**
**पवित्राणि विचित्राणि चरित्राणि च भूभुजाम् ॥ ३९ ॥**
**गजानां तुरगाणां च दुर्गाणां लक्षणानि च ।**
**निरूपितान्यशेषेण राजनीतिश्च शाश्वती ॥ ४० ॥**

तं सूर्यवंशमनघं कथ्यमानं मयादितः ।
सर्वेऽप्यवहितात्मानः शृणुध्वं शृण्वतां वराः ॥ ४१ ॥

३६–४१ ज्यामध्यें शंभूमहादेव आणि दुष्ट असुरांचा निःपात करणारी तुळजा भवानी यांचा महिमा वर्णिला आहे, धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ आणि तीर्थें यांचेंहि माहात्म्य ज्यांत सम्यक्रीतीनें कथिलें आहे, या पृथ्वीवर ज्याचा अवतार यवनांच्या विनाशाकरितांच झाला त्या शिवाजीनें यवनांबरोबर केलेल्या युद्धांचें वर्णन ज्यांत आहे, देव, ब्राह्मण आणि गाई यांचा महिमा, आणि राजांचीं पवित्र व अद्भुत चारित्रेंहि ज्यांत वर्णिलीं आहेत, हत्ती, घोडे आणि दुर्ग यांचीं संपूर्ण लक्षणें, आणि शाश्वत राजनीति ह्यांचेंहि ज्यांत वर्णन आहे, असें त्या पवित्र सूर्यवंशाचें आरंभापासून मी वर्णीत असलेलें चरित्र हे श्रोतृश्रेष्ठानों, आपण सर्वांनींच लक्ष देऊन ऐकावें.

दाक्षिणस्यां दिशि श्रीमान् मालवर्मा नरेश्वरः ।
बभूव वंशे सूर्यस्य स्वयं सूर्य इवौजसा ॥ ४२ ॥
महाराष्ट्रं जनपदं महाराष्ट्रस्स भूमिपः ।
प्रशशास प्रसन्नात्मा निजधर्मधुरंधरः ॥ ४३ ॥

४२–४३ स्वतः सूर्याप्रमाणे तेजस्वी असा श्रीमान् मालोजी राजा दक्षिणेंत, सूर्यवंशांत होऊन गेला. क्षात्रधर्मधुरीण आणि प्रसन्नचित्त असा तो मराठा राजा महाराष्ट्रांत राज्य करीत होता.

कमलायतनेत्रोऽसौ कमलापतिविक्रमः ।
शुशुभे गुणगंभीरः प्रजारंजनमाचरन् ॥ ४४ ॥

४४ विष्णुप्रमाणें पराक्रमी आणि कमलासारखे दीर्घ नेत्र असलेला तो गुण-गंभीर राजा प्रजेस सुख देत असतां त्याची कीर्ति पसरूं लागली.

स पुण्यदेशे धर्मात्मा निवासं स्वमकल्पयत् ।
तन्वन् सौराज्यमधिकं नदीं भीमरथीमनु ॥ ४५ ॥

४५ त्या धर्मात्म्यानें पुणें प्रांतीं आपले वास्तव्य केलें आणि भीमानदीच्या कडेनें राज्य अधिक वाढविलें.

त्वङ्गत्तुरंगमखुरक्षुण्णभीमरथीतटः ।
समुद्यद्दुंदुभिध्वानविभ्रमक्षोभितार्णवः ॥ ४६ ॥
प्रतापतापिताऽरातिधराधिपतिमण्डलः ।
सह्याद्रिखण्डमखिलं बुभुजे स बली बलात् ॥ ४७ ॥

४६–४७ ज्यानें भरधांव जाणाऱ्या आपल्या घोड्यांच्या खुरांनीं भीमा

नदीच्या कांठचा प्रदेश तुडवला, ज्याच्या दुंदुभीपासून उठणाऱ्या ध्वनीच्या लहरींनीं समुद्र खवळून टाकला, ज्यानें आपल्या प्रतापानें शत्रुराजे जर्जर केले असा तो बलाढ्य राजा स्वसामर्थ्यानें सर्व सह्याद्रीच्या प्रदेशाचा स्वामी झाला.

**द्विषद्भिर्दुस्सहः सोऽभूद् धुर्यः सर्वधनुष्मताम् ।**
**नारायणांशसंभूतो धनञ्जय इवापरः ॥ ४८ ॥**

४८ विष्णूच्या अंशापासून झालेला, सर्व धनुर्धाऱ्यांचा म्होरक्या, जणूं दुसरा अर्जुनच असा तो राजा शत्रूंना दुःसह झाला.

**महावंशसमुद्भूतामुमां नाम यशस्विनीम् ।**
**उपयेमे स विधिना सावित्रीं सत्यवानिव ॥ ४९ ॥**

४९ ज्याप्रमाणें सत्यवानानें सावित्रीशीं विवाह केला, त्याप्रमाणें त्या राजानें मोठ्या कुळांत जन्मलेल्या उमा नांवाच्या शुभलक्षणी कन्येशीं लग्न केलें.

**अथासौ बहु मेने तामनुरूपगुणान्विताम् ।**
**अजो रघुसुतश्श्रीमान् साध्वीमिन्दुमतीमिव ॥ ५० ॥**

५० मग रघुराजाचा पुत्र श्रीमान् अज हा जसा साध्वी इंदुमतीला मानी तसा तो मालोजी त्या अनुरूप गुणांनीं मंडित अशा आपल्या पत्नीला फार मानूं लागला.

**प्रसादमिव पार्वत्या दत्तमात्मीयमात्मना ।**
**उमेति भूषयामास नामधेयमुमा सती ॥ ५१ ॥**

५१ पार्वतीनें जणूं काय प्रसाद म्हणून स्वतः दिलेलें आपलें उमा हें नांव ती साध्वी उमा भूषविती झाली.

**अथ श्रीदसमृद्धश्रीः स तया सुदृशान्वितः ।**
**समाचचार मतिमान् कृती धर्माननेकधा ॥ ५२ ॥**

५२ नंतर, कुबेराप्रमाणें संपन्न, बुद्धिमान् आणि ज्ञानवान् अशा त्या राजानें आपल्या लावण्यवती पत्नीसह अनेक प्रकारचीं धर्मकृत्यें केलीं.

**अग्निहोत्राणि सत्राणि यज्ञास्सुबहुदक्षिणाः ।**
**महादानान्यपि तथा राष्ट्रे तस्य सदाऽभवन् ॥ ५३ ॥**

५३ अग्निहोत्रें, सत्रें, बहुदक्षिणात्मक यज्ञ, आणि त्याचप्रमाणें महादानें सुद्धां त्याच्या राज्यांत सदोदित होत असत.

**स शंभुप्रीतये शंभोर्भक्तस्सागरसन्निभम् ।**
**मधुरं खानयामास तडागं शंभुपर्वते ॥ ५४ ॥**

५४ त्या शिवभक्त राजानें शंकराला प्रसन्न करण्यासाठीं सागराप्रमाणें विस्तीर्ण असा गोड पाण्याचा तलाव शंभुपर्वतावर खणविला.

सुवर्णसानुप्रतिमान् प्रासादानुच्चतोरणान् ।
आरामानभिरामांश्च भूरिभूरुहभूषितान् ॥ ५५ ॥
दीर्घाश्च दीर्घिकाः स्वर्णसोपानपथभूषिताः ।
धर्मात्मा कारयामास प्रपाश्शालाश्च भूरिशः ॥ ५६ ॥

५५-५६ उंच बहिर्द्वारें असलेले मेरुपर्वतासारखे राजवाडे, पुष्कळ वृक्षांच्या योगें शोभणारीं रमणीय उद्यानें, सोन्याच्या पायऱ्या असलेल्या मोठमोठ्या विहिरी, पुष्कळ पाणपोया व धर्मशाळा त्या धर्मात्म्यानें बांधविल्या.

तमन्वगात् सुमहती चतुरङ्गा पताकिनी ।
महासत्त्वं महासत्त्वा स्वर्णदीव भगीरथम् ॥ ५७ ॥

५७ भगीरथाच्या पाठीमागून जशी गंगा गेली, तशीच त्या बलाढ्य राजाच्या पाठीमागून अतिशय बलाढ्य आणि अफाट चतुरंग सेना जात असे.

तमुन्नतं नमन्ति स्म सामन्ताः पृथिवीभृतः ।
समीरणसमुद्वेलं वंजुला इव वारिधिम् ॥ ५८ ॥

५८ वाऱ्यामुळें किनाऱ्यावरून उसळणाऱ्या समुद्राला ज्याप्रमाणें वेत नमन करतात ( वांकतात ), त्याप्रमाणें त्या उत्कर्ष पावलेल्या मालोजी राजाला मांडलिक राजे नमूं लागले.

एतस्मिन्नेव समये दुर्गं देवगिरिं श्रयन् ।
निजामशाहो धर्मात्मा पालयामास मेदिनीम् ॥ ५९ ॥
तमसेवन्त सततं यवनानामधीश्वरम् ।
सर्वे यादवराजाद्या दाक्षिणात्याः क्षमाभुजः ॥ ६० ॥

५९-६० याच समयीं देवगिरी (दौलताबाद) येथें राहून धर्मनिष्ठ निजामशहा पृथ्वीवर राज्य करीत होता. जाधवरावादि दक्षिणेंतील सर्व राजे सदोदित त्या यवनाधिपतीच्या सेवेंत होते.

तदा येदिलशाहोऽपि पत्तने विजयाह्वये ।
निवसन् राज्यमकरोद्यवनो यवनैर्वृतः ॥ ६१ ॥

६१ त्यावेळेस यवनांनीं परिवेष्टित आदिलशहाहि विजापूर येथें राज्य करीत होता.

अथ केनाऽपि कालेन निमित्तेन बलीयसा ।
येदिलेन निजामस्य विरोधस्सुमहानभूत् ॥ ६२ ॥

६२ नंतर कांहीं काळानें एका प्रबल कारणामुळें आदिलशहा आणि निजामशहा यांच्यांत मोठा लढा पडला.

तदा तं मालभूपालं कालं प्रतिमहीभृताम् ।
श्रुत्वा निजामो मेधावी साहाय्ये समकल्पयत् ॥ ६३ ॥

६३ तेव्हां त्या बुद्धिमान् निजामशहानें मालोजी राजा हा शत्रूंचा कर्दनकाळ आहे असें ऐकून त्यास आपल्या मदतीस बोलावलें.

ततस्तस्य प्रियं तत्र कर्तुमप्रतिमद्युतिः ।
गत्वा देवगिरिं मालमहीपतिरुवास ह ॥ ६४ ॥

६४ तेव्हां त्याचें प्रिय करण्यासाठीं तो अद्वितीय तेजस्वी मालोजी देवगिरी येथें जाऊन राहिला.

अथ विठ्ठलराजोऽस्य भ्राता भीमपराक्रमः ।
समेतस्स्वपताकिन्या भेजे धारागिरीश्वरम् ॥ ६५ ॥

६५ त्याचा भीमाप्रमाणें पराक्रमी असा विठोजी नांवाचा भाऊ ही आपल्या सैन्यासह निजामशहास येऊन मिळाला.

प्रीतात्मा च निजामोऽपि निजमन्तिकमागतौ ।
तावुभौ पूजयामास सामदानेन भूयसा ॥ ६६ ॥

६६ त्यांच्या आगमनानें संतुष्ट होऊन निजामशहानें सामदान इत्यादिकांनीं त्यांचा गौरव केला.

ये ये निजामशाहस्य प्राभवन् परिपन्थिनः ।
तांस्तानुत्सादयामास मालवर्मा महाभुजः ॥ ६७ ॥

६७ बलाढ्य मालोजी राजानें निजामशहाला जे जे शत्रू उत्पन्न झाले त्यांचा त्यांचा उच्छेद केला.

तथा विठ्ठलराजोऽपि निजामस्य चिकीर्षितम् ।
सहायीभूय सततं चक्रे शक्रपराक्रमः ॥ ६८ ॥

६८ इंद्राप्रमाणें पराक्रमी अशा विठोजीनेंही निजामशहास साहाय्य करून त्याचे मनोरथ पूर्ण केले.

यद्यप्यासन्निजामस्य सहायास्तत्र भूरिशः ।
तथापि मालवर्मैव सर्वेभ्योऽभ्यधिकोऽभवत् ॥ ६९ ॥

६९ तेथें निजामशहाचे साहाय्यकर्ते पुष्कळच होते. परंतु मालोजीच त्या सर्वांत श्रेष्ठ होता.

कुलक्रमागतं राज्यं निधाय निजमन्त्रिषु ।
दत्तं निजामशाहेन देशमन्यं शशास सः ॥ ७० ॥

७० वडिलोपार्जित राज्य आपल्या मंत्र्यांवर सोंपवून निजामशहानें दिलेल्या जहागिरीवर तो राज्य करूं लागला.

**अथ तस्य सभार्यस्य सुतजन्मसमुज्वलाम् ।**
**श्रियं समीहमानस्य दिनानि सुबहून्ययुः ॥ ७१ ॥**

७१ आपल्याला पुत्र होऊन ह्या राजलक्ष्मीला शोभा येईल अशा आशेंत पत्नीसमवेत त्याचे पुष्कळ दिवस लोटले.

**सन्तानार्थी स नृपतिर्धर्मपत्नीसमन्वितः ।**
**देवदेवं महादेवमारराध महाव्रतः ॥ ७२ ॥**

७२ तेव्हां तो पुत्रेच्छु राजा आपल्या धर्मपत्नीसह मोठें व्रत आचरून शंकराची आराधना करूं लागला.

**अथ कालेन महता देवी तस्य महौजसः ।**
**आनन्दयन्ती दयितं ससत्त्वा समजायत ॥ ७३ ॥**

७३ नंतर पुष्कळ दिवस लोटल्यावर त्या महातेजस्वी मालोजीची पत्नी गर्भवती होऊन आपल्या पतीला आनंद देती झाली.

**ततः सा दशमे मासि प्रस्फुरद्राजलक्षणम् ।**
**सुमुखं शुभवेलायां सुषुवे सुतमद्भुतम् ॥ ७४ ॥**

७४ दहाव्या महिन्यांत राजलक्षणांनीं युक्त (झळकणारा), सुंदर व अलौकिक पुत्र तिला शुभ वेळीं झाला.

**सुनसं सुविशालाक्षं सुभालं श्लक्ष्णकुन्तलम् ।**
**विस्तीर्णवक्षसं दीर्घभुजमानद्धकन्धरम् ॥ ७५ ॥**
**सुवर्णवर्णमरुणस्निग्धपाणिपदांबुजम् ।**
**प्रोद्भासयन्तं भवनं प्रभूतेन स्वतेजसा ॥ ७६ ॥**

७५-७६ त्याची नासिका सरळ. डोळे मोठे, कपाळ रुंद, केश तुळतुळीत छाती विशाल, हात लांब, मान भरलेली, वर्ण सुवर्णासारखा व हातपाय आरक्त आणि गोंडस असून त्याच्या विपुल तेजानें गृह प्रकाशमान झालें.

**तं दृष्ट्वा मुदितास्तत्र धात्र्यः संजातसंभ्रमाः ।**
**राज्ञे निवेदयामासुर्जनैश्शुद्धान्तचारिभिः ॥ ७७ ॥**

७७ त्याला पाहून दायांना आनंद झाला आणि त्यांनीं गडबडीनें अंतः-पुरांतल्या सेवकां मार्फत राजाला ती बातमी कळवली.

**ततस्तमुत्सवं श्रुत्वा सुतजन्मसमुद्भवम् ।**
**पीयूषवर्षसंसिक्तप्रतीक इव सोऽभवत् ॥ ७८ ॥**

७८ पुत्रजन्माची ती आनंदाची वार्ता ऐकून त्याच्या सर्व शरीरावर जणूं काय अमृताचाच वर्षाव झाला ( इतका तो हर्षभरित झाला. )

ततः समुत्सुकोऽभ्येत्य नृपतिर्द्रुतमाप्लुतः ।
आननं सुकुमारस्य कुमारस्य व्यलोकत ॥ ७९. ॥

७९ तेव्हां आनंदसागरांत पोहणारा आणि पुत्रमुख पाहाण्यास उतावीळ झालेला तो राजा जलदीनें ( अंतःपुरांत ) गेला: आणि त्याने आपल्या सुकुमार मुलाचें मुखावलोकन केलें.

अथ प्रमुदितस्तत्र समेतः स्वपुरोधसा ।
चकार जातकर्मास्य स्वस्तिवाचनपूर्वकम् ॥ ८० ॥
जाते राजकुमारेऽस्मिन् कुमारसमतेजसि ।
नेदुर्मङ्गलवाद्यानि ननृतुर्वारयोषितः ॥ ८१ ॥
स्वरेण स्निग्धतारेण जगुर्गीतानि गायनाः ।
पेठुश्च प्रथितामुच्चै र्बन्दिनो बिरुदावलिम् ॥ ८२ ॥
अमोघाभिस्तथाशीर्भिरभ्यनन्दन् द्विजोत्तमाः ।
गृहे गृहे विशेषेण ववृधे स महोत्सवः ॥ ८३ ॥

८०–८३ नंतर त्या आनंदित राजानें आपल्या पुरोहितासह स्वस्तिवाचन करून त्या मुलाचें जातकर्म केलें.

कार्तिक 'स्वामी सारख्या तेजस्वी अशा त्या राजपुत्राच्या जन्मप्रसंगीं मंगल वाद्यें वाजावयास लागलीं. वारयोषिता नृत्य करूं लागल्या, गवई मधुर आणि उच्च आलाप काढूं लागले; भाट उच्च स्वरानें प्रसिद्ध बिरुदावळी गाऊं लागले; द्विजश्रेष्ठ फलदायक आशीर्वादांनीं त्याचें अभिनंदन करूं लागले; आणि घरोंघरीं तो महोत्सव विशेष रीतीनें साजरा करण्यांत आला.

महामुक्ताः प्रवालानि रत्नालंकरणानि च ।
स्वर्णानि स्वर्णवासांसि गास्तुरंगान् गजानपि ॥ ८४ ॥
जनाय याचमानाय ददानः स तदा प्रभुः ।
ददृशे मनुजैस्साक्षात् कल्पद्रुम इवापरः ॥ ८५ ॥

८४–८५ त्यानें याचक जनांस अमूल्य मोत्यें, पोंवळीं रत्नजडीत अलंकार व मोहरा आणि जरतारी वस्त्रें, गाई, घोडे व हत्ती हीं दिलीं, तेव्हां हा लोकांना प्रतिकल्पवृक्षच भासला.

अथ मौहूर्तिकादिष्टे विध्युक्तेऽहनि शोभने ।
पिता चक्रे कुमारस्य नाम शाह इति स्वयम् ॥ ८६ ॥

८६ ज्योतिष्यांनीं सांगितलेल्या व धर्माला जुळणाऱ्या अशा शुभ दिवशीं मालोजीनें स्वतः आपल्या मुलाचें शहाजी असें नांव ठेविलें.

**दिने दिने स ववृधे शिशुः सरसिजाननः ।**
**पित्रोस्संवर्धयन् स्वाभिर्लीलाभिर्लोचनोत्सवम् ॥ ८७ ॥**

८७ कमलाप्रमाणें सुंदर मुख असलेला तो बालक दिवसेंदिवस वाढूं लागला आणि त्याबरोबरच आपल्या बाललीलांनीं आपल्या आईबापांच्या दृष्टीस आनंद देऊं लागला.

**अथ वर्षद्वयेऽतीते द्वितीयमपि नन्दनम् ।**
**लेभे महीपतेः पत्नी मूर्तिमन्तमिवोत्सवम् ॥ ८८ ॥**

८८ पुढें दोन वर्षांनीं मूर्तिमंत आनंद असा दुसरा पुत्र तिच्या पोटीं झाला.

**तस्य जातस्य हि विधिं संविधाय बुधैस्सह ।**
**शरीफ इति सिद्धोक्तं नामधेयं व्यधाद्विभुः ॥ ८९ ॥**

८९ त्याचेही पंडितांच्या मदतीनें यथाविधि संस्कार करून सिद्ध पुरुषानें सांगितल्या प्रमाणें शरीफजी हें नांव ठेवलें.

**तौ शाहश्च शरीफश्च सिद्धनामांकितावुभौ ।**
**ववृधाते श्रिया सार्धं कुमारौ कुलदीपकौ ॥ ९० ॥**

९० सिद्धांचीं नांवें धारण करणारे असे ते कुलदीपक पुत्र शहाजी आणि शरीफजी वाढूं लागले. आणि त्याची त्यांच्या बरोबरच संपत्ति वाढत गेली.

**अथ समुदितराजलक्षणाभ्यां**
**मुदितमनाः स्वजनान्वितः स ताभ्याम् ।**
**नृपतिकुलवतंसमात्मवंशं ।**
**भुवमधिपल्लवितं प्रभूयमेने ॥ ९१ ॥**

९१ नंतर त्या राजलक्षणांनीं युक्त असलेल्या पुत्रांमुळें स्वजनांसह आनंदित होत्साता तो राजा आपला वंश पृथ्वीवर वृद्धिंगत झाला आहे असें मानूं लागला.

**कथितमिति मया जगत्प्रतीतं**
**शुभमिहराजकुमारजन्म तावत् ।**
**कलिकलुषहरं निशम्य धीमा-**
**ननुपवात स्वसमीहितानि सद्यः ॥ ९२ ॥**

९२ कलिकल्मषाचा नाश करणारें, शुभदायक आणि जगत्प्रसिद्ध असें मीं केलेलें हें राजपुत्रांचें जन्मवर्णन ऐकून बुद्धिमान् मनुष्यास आपल्या इच्छा प्राप्त झाल्याचा अनुभव होतो.

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां कुमारप्रभवो नाम प्रथमोऽध्यायः**

# अध्याय २ रा.

## अथद्वितीयोऽध्याय आरभ्यते ॥

कवीन्द्र उवाच ॥

प्रपेदे पंचमं वर्षे शरीफस्याग्रजो यदा ।
तदा महोदारवर्मा मालवर्मा महीपतिः ॥ १ ॥
महत्या सेनया सार्धं दधानोभ्यर्हितं धनुः ।
प्रस्थापितो निजामेन समरायेंदिरापुरम् ॥ २ ॥

१ २ शहाजीला पांचवें वर्ष लागलें असतां, मोठें व उत्तम चिलखत चढवून आणि आपलें आवडतें धनुष्य घेऊन मालोजी राजा मोठ्या सैन्यासह निजामशाहाच्या आज्ञेनें इंदापुरच्या स्वारीवर गेला.

तत्रात्यर्थं युध्यमानः सबलैरभियायिभिः ।
प्रभूतैः परिघीभूतैर्हन्यमानस्समंततः ॥ ३ ॥
पदातिमत्तमातंगहयकीलालवाहिनीम् ।
प्रवर्त्यातीव महतीं तीव्रवेगां तरंगिणीम् ॥ ४ ॥
कृतांत इव संक्रुद्धः समृद्धस्स्वेन तेजसा ।
पुरोधाय प्रतिभटान् प्रययावमरावतीम् ॥ ५ ॥

२–५तेथें त्याच्यावर हल्ला करून गराडा घालणाऱ्या पुष्कळ योद्ध्यांचे प्रहार घेत त्यांच्याशीं लढत असतां त्यानें पायदळ, मदोन्मत्त हत्ती व घोडे यांच्या रक्ताची एक मोठी नदी धों धों वहावयास लाविली. व यमाप्रमाणें क्रुद्ध व तेजस्वी, अशा त्या मालोजीनें शत्रुपक्षाच्या योद्धयांस पुढें पाठवून त्यांच्या मागोमाग आपण स्वतःहि स्वर्गाची वाट धरली.

वज्रपातमिवाकर्ण्य तमुदंतमुमा सती ।
पपात वाताभिहता कदलीव महीतले ॥ ६ ॥

६ वज्रपाताप्रमाणें भयंकर अशी ती वार्ता ऐकून ती साध्वी उमा वाऱ्यानें केळ जशी उपटून पडते तशी भूमीवर पडली.

दिनेश्वरेण विधुरा दिनश्रीरिव सा तदा ।
बतावलंबराहिता मज्जति स्म तमोंबुधौ ॥ ७ ॥

७ सूर्याच्या वियोगानें ज्याप्रमाणें दिनश्री अंधारांत बुडते त्याप्रमाणे ती आधार तुटलेली उमा दुःखसागरांत बुडाली.

अथ विट्ठलराजस्तां भ्रातृभार्यां तथाविधाम् ।
भर्तृशोकभराक्रांतां क्रन्दन्तीं कुररीमिव ॥ ८ ॥
समाधातुमनास्तत्र क्षरद्बाष्पेक्षणः स्वयम् ।
निजगाद महाबुध्दिर्गद्गदस्वरया गिरा ॥ ९ ॥
विध्यनित्यमिमं लोकं शोकं त्यज महाशये ।
पतिस्तव गतः स्वर्गं स्ववर्गं परिमुच्य वै ॥ १० ॥
एष वै प्रार्थितः पन्थाः शूराणामनिवर्तिनाम् ।
परशस्त्राभिघाताद्यन्मरणं रणमूर्धनि ॥ ११ ॥
सुधां पिपासतां सद्यः सुरलोकं यियासताम् ।
न नूनमात्मवर्गस्य प्रणयः स्वार्थदर्शिनाम् ॥ १२ ॥
हा विहाय महासाध्वीं भवतीं बालमातरम् ।
प्रस्थितस्य परं लोकं पत्युस्ते परुषं मनः ॥ १३ ॥
असंशयं नश्वराणि शरीराणि शरीरिणाम् ।
रक्षितान्यपि यत्नेन क्षीयन्ते ह्यायुषः क्षये ॥ १४ ॥

८-१४ मग स्वतःचे डोळे अश्रूंनीं भरले असतांहि तो महाबुद्धिमान् विठोजी, पतिशोकानें विव्हळ झालेल्या आणि क्रौंचीप्रमाणें विलाप करणाऱ्या आपल्या-भावजयीचें सांत्वन करण्यासाठीं, गळा दाटून येऊन तिला म्हणाला, " हे थोर मनाच्या स्त्रिये, हा मृत्युलोक अनित्य आहे हें लक्षांत आणून तूं शोक टाकून दे. तुझा पति आपल्या आप्तजनांस सोडून स्वर्गास गेला आहे. शत्रूंच्या शस्त्रप्रहारांनीं मरण यावें असेंच शत्रूस पाठ न दाखविणारे शूर योद्धे इच्छितात. स्वर्गलोकीं शीघ्र जाऊन अमृत प्राशन करूं इच्छिणाऱ्या स्वार्थदृष्टि वरिांस खरोखर आप्तजनांविषयींचें प्रेम अडवूं शकत नाहीं. हाय हाय ! तुझीं मुलें लहान असतांना तुला साध्वीला सोडून तुझा पति परलोकास गेला तेव्हां त्याचें हृदय कठोर असलें पाहिजे. खरोखर मनुष्यांचीं शरीरें नश्वर आहेत आणि तीं महाप्रयासानें रक्षिली असतांहि आयुष्याची दोरी सपली असतां नाश पावतातच !

बतैतदगदंकारैरुपचीर्णमनामयम् ।
मृदुचीनैस्समीचीनैः सिचयैः परिधापितम् ॥ १५ ॥
हृद्यैर्हितावहैर्भृष्यैश्चोष्यादिभिरनेकधा ।
लघुभिस्स्निग्धमधुरैराहारैरुपचायितम् ॥ १६ ॥
कालागुरुक्षोदलिप्तधूपवार्तिसुधूपिते ।
रम्ये हर्म्यतले दीव्यन्मणिदीधितिदीपिते ॥ १७ ॥

**शिरीषपुष्पमृदुले शयनीये सुशोभने ।**
**शायितं नीरशिशिराशीरव्यजनवीजितम् ॥ १८ ॥**
**सुन्दरीभिः शयांभोजसंवाहितपदं पुनः ।**
**बहूपकृतमत्युच्चैर्यत्नेन धृतमात्मना ॥ १९ ॥**
**कृतघ्नतामिव दधद्वपुष्मन्तमये वपुः ।**
**नानुयाति जगत्यस्मिन् तस्मात् कश्चिन्न कस्यचित् ॥ २० ॥**

१५–२० अहो वैद्यांकडून उपचार करवून या शरीरास निरोगी ठेविलें; उत्तम व मृदु रेशमी वस्त्रें आणि रजया यांनीं आच्छादिलें; हलका, स्निग्ध, मधुर, प्रिय, हितावह, पौष्टिक अशा चोष्य, खाद्य, पेय, लेह्य वगैरे नानाप्रकारच्या आहारानें यास पुष्ट केलें; कृष्णचंदनाच्या चूर्णानें बनविलेल्या अगरबत्त्यांच्या सुवासानें दरवळलेल्या आणि दिव्य रत्नांनीं प्रकाशणाऱ्या रम्य महालात शिरीष पुष्पाप्रमाणें मृदु आणि सुंदर बिछाना टाकून त्यावर निजविलें आणि पाणी शिंपडलेल्या थंडगार वाळ्याच्या पंख्यानें वारा घातला; सुंदरींनीं आपल्या करकमलांनीं त्याचे पाय चुरले ( रगडले;) अशा रीतींनें त्याच्यावर पुष्कळ उत्तम उपाय करून त्याला मोठ्या काळजीनें धारण केलें तरी जणूं काय कृतघ्न होऊन हें शरीर कोणाच्याही बरोबर जात नाहीं! म्हणून या लोकांत कोणी कोणाचें नाहीं हेंच खरें.

**कलत्राण्यनुकूलानि पुत्राश्च कृतलक्षणाः ।**
**तौ मातापितरौ तद्वद्भ्रातरः सोदरा अपि ॥ २१ ॥**
**मित्राणि शत्रवश्चापि संपदो विपदोपि च ।**
**भवन्ति तावदेवास्य यावदस्ति कलेवरम् ॥ २२ ॥**

२१–२२ प्रेम करणाऱ्या स्त्रिया, गुणवान् पुत्र, ते प्रेमळ आईबाप, तसेंच सख्ये भाऊ, मित्र, शत्रु, संपत्ति, विपत्ति हीं सर्व देह आहे, तोंपर्यंतच माणसाला असतात.

**एष शाहः शरीफश्च तव देवि सुतावुभौ ।**
**तेजस्विनौ विराजेते पुष्पवन्ताविवोदितौ ॥ २३ ॥**

२३ हे देवी, शहाजी आणि शरीफजी हे तुझे दोन्ही पाणीदार पुत्र उगवलल्या चंद्रसूर्याप्रमाणें शोभत आहेत.

**आभ्यां वंशावतंसाभ्यां भविष्यत्युज्वलं यशः ।**
**सर्वस्मिन्नपि संसारे वीरमातुस्तवाद्भुतम् ॥ २४ ॥**
**क्षीरकण्ठाविमौ वत्सौ बत त्वन्मयजीवितौ ।**
**मनागपि जगत्यत्र त्वां विना स्थास्यतः कथम् ॥ २५ ॥**

**तस्मात्त्वं बिभृहि प्राणांस्त्राणार्थमनयोर्द्वयोः ।**
**दधती धैर्यमधुना वचनेनामुना मम ॥ २६ ॥**

२४–२६ वीरमातेच्या पोटीं जन्मास आलेल्या या तुझ्या दोघां कुलदीपक पुत्रांचें अखिल जगतांत अद्भुत आणि उज्वळ यश पसरेल. हे दोघेहि कोवळ्या वयाचे असून त्यांचे जीवित तुझ्यावरच अवलंबून आहे. या लोकीं तुझ्याशिवाय ते क्षणभरही राहूं शकणार नाहींत. म्हणून तूं आतां माझ्या विनंतीला मान देऊन तरी धैर्य धर व या दोघांच्या रक्षणासाठीं तरी प्राण धारण कर.

**इति विठ्ठलराजस्तां पर्याश्वासयदात्मनः ।**
**स्थित्यर्थमन्ववायस्य राज्यस्य च विशेषतः ॥ २७ ॥**

२७ आपल्या कुलाच्या व विशेषतः राज्याच्या सुस्थितीसाठीं विठोजीनें अशा रीतीनें तिचें सांत्वन केलें.

**दत्तदृष्टिस्तु सा देवी वात्सल्यात्तनयद्वये ।**
**अपास्य शोकमनघा बभार बत जीवितम् ॥ २८ ॥**

२८ त्या सच्छील राणी उमाबाईनें आपल्या दोन्हीं पुत्रांवर नजर देऊन शोक टाकला व जीवित धारण केलें. ( सती जाण्याचा बेत रहित केला. )

**महान्तमपि तं शोकं निगृह्य स महामतिः ।**
**अकारयद्विधिं भ्रातुः सकलं पारलौकिकम् ॥ २९ ॥**

२९ त्या महामति विठोजीस जरी अत्यंत शोक झाला होता तरी तो आवरून त्यानें आपल्या भावाचें और्ध्वदेहिक कर्म केलें.

**ततःशाहं शरीफं च पुरस्कृत्य प्रतापिना ।**
**चक्रे विठ्ठलराजेन राज्यं तदखिलं स्थिरम् ॥ ३० ॥**

३० नंतर प्रतापी विठोजीनें शहाजी आणि शरीफजी यांच्या नांवानें राज्यकारभार चालवून अखिल राज्यास स्थैर्य आणलें.

**निशम्यैतन्निजामोपि निधनं मालवर्मणः ।**
**पक्षहीनामिव निजां बत मेने पताकिनीम् ॥ ३१ ॥**

३१ मालोजीच्या निधनाची ही वार्ता ऐकून निजामशहासुद्धां आपल्या सेनेचे पंख तुटलें असें वाटूं लागलें.

**ततः शाहशरीफाह्वौ मालवर्मसुतावुभौ ।**
**समं विठ्ठलराजेन समनाय्य महामनाः ॥ ३२ ॥**
**सान्त्वयित्वा स्वयं दत्वा ताभ्यां तत् पितृवैभवम् ।**
**सत्कृत्य हेमाभरणैर्वासोभिश्च मनोहरैः ॥ ३३ ॥**

**अनर्घ्यमणिमालाभिस्तथा च गजवाजिभिः ।**
**विसृष्टवान् गृहानेतौ तुष्टो धारागिरीश्वरः ॥ ३४ ॥**

३२–३४ तेव्हां मालोजीच्या शहाजी व शरीफजी या दोन्ही पुत्रांना विठोजी-सह बोलावून आणवून उदारधी निजामशाहानें त्यांचें स्वतः सांत्वन केलें आणि बापाची जहागीरही त्यांच्याकडे चालू केली. तसेंच सुवर्णालंकार, सुंदर वस्त्रें, मौल्यवान् रत्नमाला आणि हत्ती घोडे देऊन त्यांचा सत्कार केला व संतोषानें त्यांस घरीं जाण्यास निरोप दिला.

**अथ तेन पितृव्येण परिपालितयोस्तयोः ।**
**वपुषी बाल्यसंपृक्ते परां पुपुषतुः श्रियम् ॥ ३५ ॥**

३५ त्यांचा चुलता विठोजी यानें त्या दोघांस वाढविलें व तेव्हां त्यांच्या त्या बालशरीरांवर विशेष तेज चमकूं लागलें.

**प्रशस्तलक्षणोपेते निकेते सर्वसंपदाम् ।**
**सोदरेऽथ शरीफस्य राजशब्दो व्यराजत ॥ ३६ ॥**

३६ उत्तम लक्षणांनीं युक्त व सर्व संपत्तीचें आगर असा शरीफजीचा भाऊ जो शहाजी त्यास ‘ राजा ’ शब्द शोभूं लागला. ( तो राजा झाला. )

**तं बालमपि भूपालमणयस्सर्व एव ते ।**
**मानयन्तो नमन्ति स्म महाभुजमुमात्मजम् ॥ ३७ ॥**

३७ तो महाबाहू, उमेचा पुत्र शहाजी लहान असतांही त्यास सर्व सरदार मान देऊन वंदन करूं लागले.

**ततश्शरीरं शाहस्य प्रविष्टे नवयौवने ।**
**ससंबाधेव शिशुता संचुकोच शनैश्शनैः ॥ ३८ ॥**

३८ शहाजीच्या शरीरांत जसजसें यौवन प्रवेश करूं लागलें, तसतशी बाल्यदशेला जणूं काय अडचण होऊन ती हळू हळू संकोच पावूं लागली.

**करिपोतमिवोदंचन्मदराजिविराजितम् ।**
**व्यक्तीभवन्नवश्मश्रुलेखं लेखमनोहरम् ॥ ३९ ॥**

३९ हत्तीचा छावा जसा गंडस्थळाच्या मदस्रावधारांनीं शोभतो तशी नुकत्याच फुटूं लागलेल्या मिसूडीनें देवाप्रमाणें सुंदर अशा शहाजीच्या मुखास शोभा आली.

**सुवर्णविस्फुरद्वर्णमाकर्णायतलोचनम् ।**
**कृतकीरकुलत्रासनासावंशमनोहरम् ॥ ४० ॥**

४० त्याची कांती सुवर्णासारखी असून, त्याचे नेत्र दीर्घ होते आणि त्याची

सुंदर नासिका अतिशय बांकदार असल्यामुळें पोपटांच्या मनांत भीति उत्पन्न करीत होती.

**कलाधरतिरस्कारि मनोहारि मुखं पुनः ।**
**जानुपर्यन्तविश्रान्तभुजमद्भुतविग्रहम् ॥ ४१ ॥**

४१ त्या शहाजीचें मुख चंद्राला सुद्धां मागें सारील असें सुंदर होतें. त्याचे हात गुडघ्यापर्यंत लांब असून त्याचें शरीर ( अलौकिक ) दिव्य होतें.

**दानवीरं दयावीरं युद्धवीरं महौजसम् ।**
**मालभूपसुतं शाहं वरलक्षणलक्षितम् ॥ ४२ ॥**
**दृष्ट्वा यादवराजेन राजराजसमश्रिया ।**
**दिष्टे दैवज्ञसंदिष्टे विशिष्टेभिमतैर्ग्रहैः ॥ ४३ ॥**
**कुलकन्या कुले धन्या कन्या कुवलयेक्षणा ।**
**दत्ता सदक्षिणा तस्मै जिजूर्विजयलक्षणा ॥ ४४ ॥**

४२—४४ उत्तम लक्षणांनीं युक्त, दानशील, दयाशील, युद्धकुशल, महा-तेजस्वी अशा शहाजी नांवाच्या मालोजी राजाच्या पुत्रास पाहून कुबेराप्रमाणें संपत्तिमान् जाधवरावानें, अनुकूलग्रह असलेल्या अशा ज्योतिष्यानें सांगितलेल्या मुहूर्तावर आपली विजयलक्षणा, कमलनेत्रा आणि कुलास शोभा आणणारी, कुळवान मुलगी जिजा हुंड्यासह अर्पण केली.

**सा तं महाशयं प्राप्य बिभ्रती वपुरुज्वलम् ।**
**गंगेव गुणगंभीरा व्यराजत महोदधिम् ॥ ४५ ॥**

४५ ज्याप्रमाणें शुभ्र व खोल गंगा सागरास मिळाली असतां शोभते त्या प्रमाणें तेजःपुंज शरीर धारण करणारी ती गुणवती जिजाबाई गुणगंभीर थोर मनाच्या शहाजी पतीशीं संयोग पावून शोभूं लागली.

**स च तां प्रेयसीं लब्ध्वा पद्महस्तां भुवः श्रियम् ।**
**लावण्यवैभववतीमतीव महितान्वयाम् ॥ ४६ ॥**
**नितंबप्रान्तविश्रान्तस्निग्धश्यामलकुन्तलाम् ।**
**चन्द्रार्धभ्रांतिकृद्भालां शरासनसमभ्रुवम् ॥ ४७ ॥**
**सत्तामिव मनोजस्य लसत्तामरसेक्षणाम् ।**
**सुवर्णशुक्तिप्रतिमश्रुतिं सरलनासिकाम् ॥ ४८ ॥**
**प्रत्यग्रतरकुन्दाग्रदन्तीं शोणरदच्छदाम् ।**
**विकस्वरांभोजमुखीं कंबुकण्ठीं पिकस्वराम् ॥ ४९ ॥**
**मृणालकोमळभुजां नवांकुरितयौवनाम् ।**

व्याकोशांभोरुहशयां लसत्किसलयांगुलिम् ॥ ५० ॥
स्निग्धारुणनखश्रेणिं निम्ननाभिं तनूदरीम् ।
रंभास्तंभाभिरामोरूं गूढगुल्फां यशस्विनीम् ॥ ५१ ॥
राजरेखांकितपदां प्रशस्तिं सर्वसंपदाम् ।
नानालंकारसंभारसंदृब्धस्निग्धवेणिकाम् ॥ ५२ ॥
मुक्तामणिश्रेणिकांतसीमन्तप्रान्तवर्तिना ।
स्फुरितारुणवर्णेन शिरःपुष्पेण शोभिताम् ॥ ५३ ॥
सुवृन्ते स्वर्णताटंके पर्यन्तप्रोतमौक्तिके ।
दधतीं दीधितिमतीं सरत्नां च ललाटिकाम् ॥ ५४ ॥
पृथुमुक्तामणिमयोदारहारमनोहराम् ।
रत्नमुक्तांचितानेकगुच्छगुच्छार्धधारिणीम् ॥ ५५ ॥
केयूरकान्तिकिर्मीरसरत्नकरकंकणाम् ।
कृशावलग्नसंलग्नसप्तकीसंभृतश्रियम् ॥ ५६ ॥
कलहंसगतिं शिंजन्मणिमंजीरशालिनीम् ।
अनर्घ्यरत्नाभरणप्रसाधितपदांगुलिम् ॥ ५७ ॥
सुवर्णतन्तुसंतानविलसद्वसनावृताम् ।
रत्नमुक्तामणिव्रातस्फुरत्कूर्पासकान्विताम् ॥ ५८ ॥
पश्यन् प्रसन्नवदनां प्रसन्नवदनः स्वयम् ।
सूर्यवंशमणिस्तूर्यघोषेण गृहमाविशत् ॥ ५९ ॥

४६–५९ तिचे हात कमलासारखे असून ती जणूं काय पृथ्वीची शोभा होती. ती लावण्यवती असून तिचें कुळ उच्च होते.

तिचा काळा व तुळतुळीत केशकलाप नितंबभागापर्यंत लोळत होता. तिचा भालप्रदेश पाहून जणूं काय हा अर्धचन्द्रच आहे असा भास होत होता, व तिच्या भुंवया धनुष्याप्रमाणें होत्या. ती प्रत्यक्ष मदनाची सत्ताच होती. तिचे डोळे कमलाप्रमाणें पाणीदार, कान सोन्याच्या शिंपल्याप्रमाणे, नासिका सरळ, दांत कुंदाच्या ताज्या फुलांप्रमाणें शुभ्र, ओंठ आरक्त, आणि मुख प्रफुल्लित कमलाप्रमाणें होतें. तिचा कंठ शंखाप्रमाणें होता, आणि स्वर कोकिळेसारखा होता. नुकत्याच यौवनांत प्रवेश करणाऱ्या तिचे भुज कमलांतील कोमल तंतूप्रमाणें नाजूक असून, तिचे हात विकसित कमलाप्रमाणें आरक्त व बोटें पल्लवाप्रमाणें लालसर होतीं. नखें तुळतुळीत व लाल होतीं. तिची नाभि खोल, पोट कृश व मांड्या केळीच्या खांबासारख्या सुंदर होत्या, व घोटे आंत लपून गेले होते. तिच्या पायावर राजलक्ष्मीचे चिन्ह दिसत

होतें. ती सर्व संपत्तीचा कळस होती. तिच्या वेणींत नानाप्रकारच्या अलंकारांची गर्दी झाली होती. मोत्यें व रत्नें यांच्या मालांनीं, रक्तवर्ण, तेजस्वी अशा डोकींतल्या फुलांनीं तिचा शिरोभाग सुशोभित झाला होता. तिच्या ललाटभागावर रत्नें लटकत असून तिच्या कानांत सभोंवती मोत्यें ओंवलेलीं अशीं कुंडलें झळकत होतीं. मोत्यें रत्नें यांचे मोठमोठे हार व गुच्छ तिच्या गळ्यांत घातलेले होते. दंडांत बाजूबंद असून हातांत रत्नजडित बांगड्या होत्या. कृश अशा कटिप्रदेशावर कमरपट्टा, पायांत रुमझुम वाजणारे पैंजण, पायांच्या बोटांत मौल्यवान रत्नाभरणें, आंगावर चकाकणारीं जरतारी वस्त्रें, अंगांत रत्नजडित काठांची जरतारी चोळी धारण करणाऱ्या त्या प्रसन्नवदन हंसगति व प्रेमळ जिजाईस त्या सूर्यवंशदीपक आणि प्रसन्नमनाच्या शहाजीनें वाद्यांच्या घोषांत घरीं आणिलें.

**समागतां समं तेन पत्या प्रश्रयसंश्रयाम् ।**
**श्रियं नारायणेनेव प्रविशंतीं निकेतनम् ॥ ६० ॥**

६० त्या विनयशील जिजाईनें आपल्या पतीसह गृहप्रवेश केला, तेव्हां तीं दोघें लक्ष्मीनारायणाच्या जोड्याप्रमाणें भासलीं.

**संभूयाशु समेताभिः पश्यन्तीभिस्सविभ्रमम् ।**
**सुभगाभिः पुरन्ध्रीभिः कृतनीराजनाविधिम् ॥ ६१ ॥**

६१ शीघ्र जमलेल्या व आश्चर्यानें पाहाणाऱ्या पोक्त सुवासिनींनीं मिळून तिला निरांजनानें ओवाळिलें.

**वन्दमानाममोघाभिराशीर्भिरभिनन्दिताम् ।**
**स्नुषामिमामथ श्वश्रूः सकौतुकमलोकत ॥ ६२ ॥**

६२ तेव्हां तिनें नमस्कार केला असतां तिला फलप्रद होणारे अनेक आशीर्वाद देऊन, त्या आपल्या सुनेस सासूनें अत्यंत कौतुकानें पाहिलें.

**श्वश्रूशुश्रूषणपरां पतिप्रियतरोत्तराम् ।**
**शीलसंरक्षणे सज्जां लज्जां मूर्तिमतीमिव ॥ ६३ ॥**
**साध्वीजनाध्वमर्यादामन्वयद्वयसम्मताम् ।**
**जनीं नन्दत्परिजनामभ्यनन्दन्सतीजनाः ॥ ६४ ॥**

६३ सासूच्या सेवेंत तत्पर, पतीला अत्यंत प्रिय बोलणारी, आपल्या शीलाचें संरक्षण करण्यांत दक्ष, विनयाची मूर्तिमंत देवता, पतिव्रता स्त्रियांस वर्तनाचा मार्ग दाखविणारी, दोन्ही कुलांस मान्य आणि आपल्या परिजनास आनंद देणारी, अशा त्या सुनेचें साध्वी स्त्रियांनीं अतिशय अभिनंदन केलें.

**सुतां विश्वासराजस्य दुर्गां नाम्नाथ सद्गुणाम् ।**
**शरीफोपि महाबाहुर्भव्यां भार्यामविन्दत ॥ ६५ ॥**

६५ विश्वासराजाची दुर्गा नांवाची सुंदर व सद्गुणी मुलगी ही महाबाहु शरीफजीस बायको मिळाली.

**सा तया च तया तन्व्या स्नुषया सेवितान्वहम् ।**
**विनीताभ्यां च पुत्राभ्यामुमा लेभे परां मुदम् ॥ ६६ ॥**

६६ ती व सुंदर जिजाई या दोघी आपली सेवा करणाऱ्या सुना आणि आपले दोघे पुत्र यांच्यायोगें उमेस अतिशय आनंद होत गेला.

**अगणितगुणभाजौ भ्रातरौ तावमूभ्यां ।**
**निरवधिकगुणाभ्यां भ्राजमानौ वधूभ्याम् ॥**
**सपदि निजयशोभिः शोभमानामशेषां ।**
**भुवमपि जनयित्रीं नन्दयामासतुः स्वाम् ॥ ६७ ॥**

६७ अमूल्य गुणांनीं शोभणाऱ्या त्या दोन्ही वधूंच्या योगानें शोभणारे हे दोघेही सद्गुणी पुत्र लागलींच आपल्या यशामुळें सर्व पृथ्वीस आणि आपल्या मातेस आनंद देऊं लागले.

**सार्धं तेनानुजेनाप्रतिहतगतिना मारुतेनेव शुष्मा ।**
**भीष्मादप्युग्रकर्मा युधि युधि विजयी विश्रुतः शाहवर्मा ।**
**कर्तुं नित्यं निजामप्रियमतुलबलः काण्डकोदण्डपाणिः ॥**
**सर्वेषां पार्थिवानां पृथुरिव पृथिवीवासवश्शासकोभूत् ॥ ६८ ॥**

६८ ज्याप्रमाणे अत्यंत वेगवान् वायूनें अग्नि प्रखर होतो, त्याप्रमाणें आपल्या पराक्रमी भावासह तो भीष्मापेक्षांहि उग्र कर्म करणारा, प्रत्येक युद्धांत विजयी होणारा, व धनुष्य बाण घेणारा अतुळ बळवान् शहाजीराजा निजामाचें प्रिय करण्यासाठीं सर्व राजांमध्यें श्रेष्ठ अशा पृथुराजाप्रमाणें (पृथ्वीचा शास्ता झाला. (पृथ्वीवर राज्य करूं लागला.)

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरपरमानंदप्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां शाहशरीफपरिणयो नाम द्वितीयोध्यायः ।**

---

# अध्याय ३ रा.

कवीन्द्र उवाच ॥

**अथ विठ्ठलराजे स्वे पितृव्येपि दिवं गते ।**
**नृपनीतिविधिज्ञेन मातुर्वचनवर्तिना ॥ १ ॥**
**महावीरेण धीरेण शाहराजेन धीमता ।**
**राज्यभारस्स हि महान् दध्रे बत निजे भुजे ॥ २ ॥**

१-२ कवीन्द्र म्हणतातः—नंतर आपला चुलता, विठोजी राजा हाही परलोकवासी झाला असतां राजनीति जाणणाऱ्या, आईच्या आज्ञेंत वागणाऱ्या, महापराक्रमी धैर्यवान् व बुद्धिमान् शहाजी राजानें तो राज्याचा मोठा भार आपल्या शिरावर घेतला.

**संभः खेलश्च मल्लश्च मंबो नागश्च पर्शुकः ।**
**त्र्यंबकश्चापि वक्कश्च भ्रातरस्सोदरा अमी ॥ ३ ॥**
**पुत्रा विठ्ठलराजस्य सुत्रामसमविक्रमाः ।**
**मालभूपात्मजौ शाहशरीफौ च प्रभाविणौ ॥ ४ ॥**

३. ४, विठोजी राजाचे मुलगे संभाजी, खेळाजी, मल्लाजी, मंबाजी, नागोजी. परसोजी, त्र्यंबकजी आणि वक्काजी हे सख्खे भाऊ इंद्राप्रमाणें पराक्रमी होते. आणि मालोजी राजाला शहाजी व शरीफजी असे दोन प्रभावशाली पुत्र होते.

**एते क्षोणिजये सक्ताः शक्तास्समरकर्मणि ।**
**निजामस्य प्रियकराः कराकृष्टशरासनाः ॥ ५ ॥**
**पर्वतप्रांशुवपुषः सहस्त्रांशुसमत्विषः ।**
**भूयसा भुजसारेण भूरिणाभिजनेन च ॥ ६ ॥**
**सैन्येन च गुणैश्चान्यैरनन्यसमतेजसः ।**
**परं न गणयामासुरंबरस्य मते स्थिताः ॥ ७ ॥**

५, ६, ७, मुलुखगिरी करण्यास उत्सुक, युद्धामध्यें पृथ्वी पादाक्रांत करण्यास समर्थ, निजामाचे प्रिय करणारे, हातामध्यें नेहमीं धनुष्य सज्ज ठेवणारे, पर्वताप्रमाणें धिप्पाड, सूर्याप्रमाणें तेजस्वी, आपलें प्रचंड बाहुबळ, मोठा परिवार, सैन्य आणि इतर गुण यांमुळें अद्वितीय पराक्रमी झालेले हे सर्व भाऊ मलिकंबराच्या तंत्रानें चालत आणि शत्रूस जुमानीत नसत.

एकदान्तःपुरादाप्तभृत्यामात्यनिषेवितम् ।
निजामशाहमास्थानीमेत्य सिंहासने स्थितम् ॥ ८ ॥
दृष्ट्वा यादवराजाद्याः प्रणिपत्य यथाक्रमम् ।
प्रचलन्ति स्म तरसा सर्वे स्वं स्वं निवेशनम् ॥ ९ ॥

८, ९, एकदां अंतःपुरांतून आपल्या विश्वासू नोकरांसह व अमात्यासह निजामशहा सभास्थानीं येऊन सिंहासनावर बसला असतां जाधवराव इत्यादि सर्व सरदार त्यास यथानुक्रम भेटून आणि मुजरे करून आपापल्या घरीं जलदीनें जाऊं लागले.

ततः प्रचलतां तेषामन्योन्यस्पार्धिचेतसाम् ।
संमर्दः सुमहानासीदास्यानीतोरणाद्बहिः ॥ १० ॥

१० एकमेकांचीं स्पर्धा करणारे ते राजे जाण्यास निघाले असतां सभागृहाच्या दारासमोर एकच गर्दी झाली.

तत्र वेत्रधरैर्दूरादुत्सारितजनाः पुरः ।
परिपीनोन्नतस्कन्धाः सन्नद्धाः पृथुवक्षसः ॥ ११ ॥
किरीटिनः कुण्डलिनः कवचच्छन्नविग्रहाः ।
मुक्तामणिमयोदारहाराः केयूरधारिणः ॥ १२ ॥
सुलक्षणाः क्षोणिभुजः पद्मपत्रायतेक्षणाः ।
स्वैः स्वैः सैन्यैः परिवृताः पुरः प्रोच्छ्रायितध्वजैः ॥ १३ ॥
हयानन्ये गजानन्ये याप्ययानानि चापरे ।
समारुह्याप्रतिहतप्रभावाः संप्रतस्थिरे ॥ १४ ॥

११-१४ तेथें असलेले भालदार लोकांना बाजूस सारू लागले. आणि अप्रतिहत सामर्थ्य असलेले ते राजे, कोणी घोड्यांवरून, कोणी हत्तींवरून, कोणी पालख्यांत बसून जाऊं लागले. त्या राजांचे खांदे उंच व पुष्ट होते. त्यांचीं वक्षःस्थलें विस्तीर्ण असून ते ( नेहमीं ) सज्ज असत. त्या सुलक्षणी राजांचें नेत्र कमलाप्रमाणें दीर्घ असून त्यांनीं, किरीट कुंडलें, मोत्यांचें मोठमोठे हार व केयूर धारण केलें असून आंगांत चिलखतें घातलीं होतीं; आणि ते आपापल्या सैन्यांनीं वेष्टित असून त्यांच्यापुढें निशाणें उभारलेलीं होतीं.

ततः खण्डागलाख्यस्य नृपस्याग्रेसरः करी ।
मर्दयन्नन्यसैन्यानि प्रचचाल बलाद्बली ॥ १५ ॥

१५ त्या वेळेस खंडागळ नांवाच्या राजाचा अघाडीचा बळवान् हत्ती दुसऱ्यांचीं सैन्यें तुडवीत वेगानें निघाला.

**पदे पदेंकुशाघातैर्निषिद्धोपि निषादिना ।**
**स सिन्धुरः सैनिकानां चकार कदनं महत् ॥ १६ ॥**

१६ माहुतानें अंकुशानें टोंचून पदोंपदीं प्रतिबंध केला असतांही त्या हत्तीनें सैनिकांचें खूब कंदन केलें.

**तं मृन्दन्तमनीकानि गर्जन्तमकुतोभयम् ।**
**प्रलयांभोधरनिभं रोध्दुं शेकुर्न केचन ॥ १७ ॥**

१७ सैन्यांचा चुराडा करणाऱ्या, निर्भयपणें गर्जणाऱ्या व प्रळयकाळच्या मेघाप्रमाणें भासणाऱ्या त्या हत्तीस कोणीही अडवूं शकले नाहींत.

**अथ यादवराजस्य दत्तवर्मादिभिस्सुतैः ।**
**न सेहे गर्जतस्तस्य गर्जः प्रतिगजैरिव ॥ १८ ॥**

१८ एकाद्या हत्तीनें गर्जना केली असतां दुसऱ्या कळपांतल्या हत्तीस ज्याप्रमाणें ती सहन होत नाहीं; त्याप्रमाणें या हत्तीची गर्जना जाधवरावांच्या दत्ताजप्रिभृति पुत्रांस सहन झाली नाहीं.

**ततो दत्तसमादिष्टाः सुभटास्तं मदोत्कटम् ।**
**निजघ्नुश्शरनिस्त्रिंशकुन्ततोमरशक्तिभिः ॥ १९ ॥**

१९ नंतर दत्ताजीच्या आज्ञेनें शूर योद्धे त्या मदोन्मत्त हत्तीस बाण, तरवारी, भाले, तोमर ( रवीसारखें ) आणि शक्ति यांनीं प्रहार करूं लागले.

**स भिन्नवर्मा बहुभिर्घोरकर्मा मदद्विपः ।**
**विकर्षन् पुष्करेणोच्चैः सहसा हयसादिनः ॥ २० ॥**
**करेण कांश्चिदादाय क्षिपन् कांश्चिदपातयत् ।**
**कांश्चिन्निपात्य चरणैस्तत्तलैर्निष्पिपेष च ॥ २१ ॥**

२०-२१ त्या मदोन्मत्त, आणि घोर कर्में करणाऱ्या हत्तीला पुष्कळांनी भोंसकले असतांही, घोडेस्वारांना सोंडेच्या टोंकानें ओढून त्यानें कित्येकांना खालीं आदळलें; व कित्येकांना आपल्या पायांनीं खालीं पाडून त्यांच्या तळव्यांखालीं तुडविलें.

**दत्तवर्माऽथ तं दृष्ट्वा स्वसैन्यस्य पराभवम् ।**
**तं दन्तिनमभीयाय हर्यक्ष इव लक्षयन् ॥ २२ ॥**

२२ अशा रीतीनें आपल्या सैन्याचा पराभव झालेला पाहून दत्ताजी त्या हत्तीवर सिंहाप्रमाणें दृष्टी रोखून चालून गेला.

**तदा तेनातिरभसात्स बतायुधसादितः ।**
**विधुन्वानः स्वमूर्धानं रराण रणमूर्धनि ॥ २३ ॥**

२३ नंतर, त्यानें जोराच्या शस्त्रप्रहारांनीं जेरीस आणलेला तो हत्ती आपलें डोकें हलवीत रणांगणाच्या अघाडीस चीं चीं करूं लागला.

**ततो विठ्ठलराजस्य संभखेलावुभौ सुतौ ।**
**खण्डार्गळस्य साहाय्यं विधातुं समुपास्थितौ ॥ २४ ॥**

२४ तेव्हां विठोजीचे संभाजी व खेळोजी हे दोघे पुत्र खंडागळाच्या मदतीस धांवून आले.

**तौ तं लोहितलिप्ताग धातुमन्तामिवाचलम्**
**पर्यपालयतां तत्र दत्तराजवशं गतम् ॥ २५ ॥**

२५ ते दत्ताजीच्या तावडींत सांपडलेल्या, रक्तबंबाळ झालेल्या आणि गेरूच्या डोंगराप्रमाणें दिसणाऱ्या त्या हत्तीचें रक्षण करूं लागले

**दत्तराजस्तु तं हित्वा विहस्तं मदहास्तिनम् ।**
**अनुजं प्रतिजग्राह संभराजं महाभुजम् ॥ २६ ॥**

२६ तेव्हां दत्ताजीनें त्या सोंड तुटलेल्या मदोन्मत्त हत्तीस सोडून देऊन धाकटा भाऊ जो पराक्रमी संभाजी, त्याच्यावर हल्ला केला.

**तयोः कुपितयोस्तत्र द्वन्द्वयुद्धे समुद्यते ।**
**आवर्तस्सुमहानासीत् योधानामभिधावताम् ॥ २७ ॥**
**हस्ताहस्ति ततो युद्धमुभयोः सेनयोरभूत् ।**
**दत्तवर्माणमभ्येते संभे जंभारितेजासि ॥ २८ ॥**
**यादवानां तदद्धापि सांबंधिकमलक्षयन् ।**
**ररक्ष पक्षं संभस्य भ्राता शाहमहीपतिः ॥ २९ ॥**

२७-२८-२९ क्रोधायमान झालेल्या त्या दोघांमध्यें द्वंद्वयुद्ध चाललें असतां तेंथ खूब योद्धे धांवून आले व त्यांची एकच गर्दी झाली. तेव्हां त्या दोन्ही सैन्यांमध्यें हातघाईची लढाई झाली. इन्द्राप्रमाणें पराक्रमी संभाजी हा दत्ताजी जाधवावर चालून गेला असतां जाधवांच्या संबंधाकडे उघड उघड डोळेझांक करून संभाजीचा भाऊ शहाजी राजा यानें त्याची बाजू संभाळली.

**ततश्चर्मधरस्तत्र दत्तराजः प्रतापवान् ।**
**व्यधत्त मण्डलाग्रेण परिवेषमिवात्मनः ॥ ३० ॥**

३० तेव्हां, हातांत ढाल घेतलेल्या प्रतापी दत्ताजीनें तरवार फिरवून आपल्या भोंवती जणूं काय एक तेजोवलयच बनविलें.

**तस्मिन्नाकस्मिके युद्धे शूराणां सन्निपेतुषाम् ।**
**क्ष्वेडितास्फोटितभरैर्बभूवुर्बधिरा दिशः ॥ ३१ ॥**

३१ त्या आकस्मिक युद्धामध्यें गोळा झालेल्या वीरांच्या गर्जनांनीं आणि दंड थोपटण्याच्या दणक्यानें दिशा बधिर झाल्या.

**तदा स्वमण्डलाग्रेण मण्डलानि वितन्वता ।**
**ननृते तेन वीरेण रणरंगे महीयसि ॥ ३२ ॥**

३२ तेव्हां तो वीर दत्ताजी पट्टा फिरवीत असतां त्या अफाट रणभूमीवर नाचूं लागला.

**लुठत्सु वरवीराणां सकिरीटेषु मूर्धसु ।**
**असिभिः खण्ड्यमानेषु सकोदण्डेषु बाहुषु ॥ ३३ ॥**
**कृपाणबाणपरशुप्रासभिन्नेषु वर्मसु ।**
**शितचक्रनिकृत्तेषु सशरेषु करेषु च ॥ ३४ ॥**
**तुरंगमत्तमातंगपत्रिसंघातजन्मभिः ।**
**स्फुटं रुधिरधाराभिः शान्तेषु रणरेणुषु ॥ ३५ ॥**
**ध्वजांशुकपरीतासु समराजिरभूमिषु ॥**
**शराचितशरीरेषु नरेषु निपतत्सु च ॥ ३६ ॥**
**तेन यादववीरेण धीरेणामित्रघातिना ॥**
**संभराजं समासाद्य विभिदे मित्रमण्डलम् ॥ ३७ ॥**

३३–३७ श्रेष्ठ वीरांचीं किरीट–युक्त डोकीं जमिनविर लोळूं लागलीं; तरवारींनी धनुष्यासहित दंड तोडले जाऊं लागले; तरवारी, बाण, परशु, भाले यांनीं चिलखतें छिन्नभिन्न झालीं; तीव्र चक्रांनीं सशर हस्त तोडले जाऊं लागले; घोडे व मस्त हत्ती यांच्या अंगांत बाण शिरल्यामुळें वाहणाऱ्या रक्ताच्या धारांनीं धुरळा चांगला बसला.

समरांगण निशाणांच्या वस्त्रांनीं आच्छादित झालें; बाणांनीं शरीरें विद्ध होऊन माणसें पडूं लागलीं: अशा वेळीं त्या धैर्यवान व शत्रूचा नाश करणाऱ्या यादव वीराची संभाजीशीं गांठ पडली असतां तो सूर्यलोकीं गेला ( ठार झाला ).

**तमप्रतिमकर्माणं दत्तवर्माणमाहवे ॥**
**शृण्वानस्संभनिहतं यादवेन्द्रस्स्वमात्मजम् ॥ ३८ ॥**
**पुरोगच्छन्नर्धपथादतिरोषारुणेक्षणः ॥**
**परावृत्तो महाराजः संभराजजिघांसया ॥ ३९ ॥**

३८–३९ अद्वितीय कर्में करणारा असा आपला मुलगा दत्ताजी युद्धांत संभाजीकडून मारला गेला ही बातमी पुढें निघून गेलेल्या जाधरावास समजली तेव्हां त्याचे डोळे क्रोधानें तांबडे लाल झाले आणि संभाजीस मारण्याच्या हेतूनें तो अर्ध्या रस्त्यावरूनच परत फिरला.

**तस्मिन् रोषसमाविष्टे यादवानामधीश्वरे ॥**
**सपर्वतवनद्वीपा वसुधा समकंपत ॥ ४० ॥**

४० त्या जाधवाधिपतीस क्रोधाविष्ट झालेला पाहून पृथ्वी, तिच्यावरचे पर्वत, अरण्यें, द्वीपें हीं कापूं लागलीं.

**असुतोऽप्यधिको येन हतो जाल्मेन मे सुतः ॥**
**तमहं निहनिष्यामि करिष्यामि समीहितम् ॥ ४१ ॥**

४१ प्राणापेक्षांहि प्रिय असलेल्या माझ्या पुत्रास ज्या दुष्टानें मारलें त्यास ठार करून माझी इच्छा पूर्ण करीन ( सूड उगवीन ).

**इत्यमर्षवशीभूतं श्वशुरं सुरविक्रमम् ॥**
**स्वपक्षरक्षणाकांक्षी शाहराजोऽभ्ययुध्यत ॥ ४२ ॥**

४२ अशा रीतीनें क्रोधाविष्ट झालेला आणि देवाप्रमाणे पराक्रमी असा जो आपला सासरा जाधवराव त्याच्याशीं शहाजी स्वपक्षाचें रक्षण करण्याच्या हेतूनें युद्ध करूं लागला.

**युध्यमानममुं वीक्ष्य जामातरमरिन्दमः ॥**
**जघान साहसी शाहं भुजगेन्द्रसमे भुजे ॥ ४३ ॥**

४३ आपला जांवई लढत आहे असें पाहून शत्रूंचा निःपात करणाऱ्या त्या धाडसी जाधवरावानें शहाजीच्या, वासुकीप्रमाणें प्रचंड, दंडावर प्रहार केला.

**शाहस्तेनासिपातेन श्रयन् मूर्च्छां महीयसीम् ॥**
**कथंचिदपि धैर्येण धारयामास जीवितम् ॥ ४४ ॥**

४४ त्या तरवारीच्या प्रहारानें शहाजीस जबर मूर्च्छा आली. आणि त्यानें धैर्यानें आपले प्राण कसे तरी वांचवले.

**ततः खेलं पराभूय न्यक्कृत्यान्यांश्च पार्थिवान् ॥**
**निर्जित्य च निजामस्य श्यामाननमयीं चमूम् ॥ ४५ ॥**
**गाढमुष्टिर्गाढमुष्टिं समुद्यम्य स यादवः ॥**
**संरब्धोऽभ्यपतत्तूर्णं संभं समरदुर्जयम् ॥ ४६ ॥**
**ततस्संभः प्रसन्नात्मा परं परिहसन्निव ॥**
**अरं व्यापारयामास करं कौक्षेयके निजे ॥ ४७ ॥**

४५–४७ त्यावेळेस खेळोजी इतर राजे व निजामाची शिद्दी लोकांची फौज यांचा पराभव करून क्रुद्ध झालेल्या त्या गाढमुष्टि जाधवरावानें खड्ग उगारून समरांत अजिंक्य अशा संभाजीवर वेगानें चाल केली.

तेव्हां प्रसन्नचित्त संभाजीनें शत्रूंचा जणूं काय उपहास करीत वेगानें आपल्या तरवारीस हात घातला.

**तयोस्तदाभवद्युद्धं मिथो विस्पर्धमानयोः ॥**
**साध्वसावहमन्येषां मत्तयोर्द्विपयोरिव ॥ ४८ ॥**

४८ दोन मदोन्मत्त हत्तींचें ज्याप्रमाणें एकमेकांशीं भयंकर युद्ध होते त्याप्रमाणें एकमेकांशीं स्पर्धा करणाऱ्या त्या दोघांमध्यें लोकांच्या अन्तःकरणांत धडकी भरविणारें असें युद्ध झालें.

**ततोऽसिपातान् बहुशः सोढ्वा संभस्य यादवः ॥**
**तं जगत्यां जितारातिरसिनैव न्यपातयत् ॥ ४९ ॥**

४९ त्या शत्रुजेत्या जाधवरावानें संभाजीच्या तरवारीचे पुष्कळ आघात सहन केले आणि नंतर त्याला तरवारीनेंच जमिनीवर लोळविलें.

**तं सुतस्य निहंतारं निपात्य वसुधातले ॥**
**तेन यादववीरेण वैरनिर्यातनं कृतम् ॥ ५० ॥**

५० आपल्या पुत्राचा वध करणाऱ्या संभाजीस जमिनीवर लोळवून त्या जाधवरावानें सूड घेतला.

**तदा यादवराजेन महाराजेन संयति ॥**
**सुते विठ्ठलराजस्य बत ज्येष्ठे निपातिते ॥ ५१ ॥**
**तत्र प्रतिक्रियां कांचिदपि कर्तुमशक्नुवत् ।**
**निजामस्याखिलं सैन्यमवसन्नमजायत ॥ ५२ ॥**

५१–५२ हरहर ! जाधवरावानें विठ्ठलराजाच्या ज्येष्ठ पुत्रास युद्धांत ठार केले तेव्हां निजामशहाचें अखिल सैन्य कांहींसुद्धां प्रतिकार करूं शकलें नाहीं, व त्याचें धैर्य खचलें.

**स्वामिनाथ निजामेन सांत्वयित्वा निवारिते ।**
**ते सेने प्रसभोद्वृत्ते निवृत्ते कलहान्मिथः ॥ ५३ ॥**
**रणांगणादुपादाय वर्ष्मणी संभदत्तयोः ।**
**शोचमाने हतोत्साहं स्वं स्वं शिबिरमीयतुः ॥ ५४ ॥**

५३ मग अत्यंत क्षुब्ध अशा त्या दोन्ही सेना, स्वामी निजामशहानें सांत्वन करून निवारिलें असतां, आपआपसांतलि झगड्यापासून परावृत्त झाल्या व रणभूमीवरून संभाजी व दत्ताजी यांचीं प्रेतें घेऊन शोक करीत खिन्नपणे आपआपल्या शिबिरास गेल्या.

**विषण्णमनसस्सर्वे खेलकर्णादयोऽनुजाः ।**
**ततस्तमन्वशोचंत ज्येष्ठं भ्रातरमात्मनः ॥ ५५ ॥**

५५ खेळकर्णप्रभृति संभाजीचे धाकटे भाऊ विषण्णचित्त होऊन आपल्या वडलि भावाबद्दल शोक करूं लागले.

सुतस्य कारयामास यादवः कार्यमुत्तरम् ।
भ्रातुर्ज्येष्ठस्य विधिवत् खेलकर्णस्तदुत्तरम् ॥ ५६ ॥

५६ जाधवरावानें आपल्या मुलाचें उत्तरकार्य केलें आणि खेळकर्णानेंहि आपल्या वडील भावाचें उत्तरकार्य यथाविधि केलें.

सांबंधिकस्य महतः सुतरां विरुद्धं ।
स्पर्धिष्णुभिर्भृशबलै यदभूद्धि युद्धम् ॥
तद्यादवेन सुधिया हृदि सावलेपे ।
जानीमहे किमपि चिन्तयतानुतेपे ॥ ५७ ॥

५७ निकट सोयरीकसंबंधाच्या अगदीं विरुद्ध असें, स्पर्धा (मत्सर) करणाऱ्या भोसल्यांशीं जें युद्ध झालें, त्याचा आपल्या गर्विष्ठ अंतःकरणांत काहींसा विचार केला, त्या वेळेस त्याला पश्चात्ताप झाला असें आम्हांस वाटतें.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरपरमानन्दकवीन्द्र-
प्रकाशितायामाकस्मिकास्कन्दनो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

# अध्याय ४ था



कवीन्द्र उवाच ।

**अथो विट्ठलराजस्य पुत्रेष्वद्भुतकर्मसु ।**
**खेलकर्णप्रभृतिषु प्रभुणा पक्षपातिना ॥ १ ॥**
**प्रभूताभिजनं भूरिबलौघपरिवारितम् ।**
**प्रतिपक्षज्यानिपरं पविपाणिमिवापरम् ॥ २ ॥**
**अतीव दुर्धरतरं जानता यादवेश्वरम् ।**
**निजे हृदि निजामेन न्यधीयत परं छलम् ॥ ३ ॥**

१–३ कवीन्द्र म्हणाले—नंतर विठ्ठलराजाच्या खेलकर्णप्रभृति अद्भुतपराक्रमी पुत्रांचा कैवारी स्वामी निजामशहा यानें मोठा परिवार असलेला, प्रचंड सैन्य बाळगणारा, प्रतिपक्षाचा नाश करणारा, जणूं काय दुसरा इंद्रच असा तो जाधवराव अत्यंत दुर्निवार्य आहे असें जाणून आपल्या मनांत मोठें कपट योजलें.

**तस्य दुर्मन्त्रितं बुध्वा यादवानां धुरंधरः ।**
**प्रस्थाय स महाबाहुर्दिल्लीश्वरमुपाश्रयत् ॥ ४ ॥**

४ त्याची ती दुष्ट मसलत जाणून तो महाबलाढ्य, कुलश्रेष्ठ जाधव दिल्लीच्या बादशहास जाऊन मिळाला.

**निजामविषयं हित्वा गतो यदुपतिर्यदा ।**
**येदिलोंतरमासाद्य तदेव मुमुदे तदा ॥ ५ ॥**

५ निजामशहाचा देश सोडून जाधवराव जेव्हां गेला, तेव्हा हीच संधी प्राप्त झालेली पाहून अदिलशहास आनंद झाला.

**स हि पूर्वं निजामेन परिभूतः पदे पदे ।**
**तदा ताम्राधिपतिना सार्धं संधिं स्वयं व्यधात् ॥ ६ ॥**

६ कारण, पूर्वी निजामशहाकडून त्याचा पदोपदीं पराभव झाला होता, तेव्हां त्यानें स्वतः मोंगलबादशहाशीं तह केला.

**चिरस्पर्धी निजामस्य दिल्लीपतिरुदारधीः ।**
**येदिलस्येहितं सद्यः प्रतिजज्ञे प्रतापवान् ॥ ७ ॥**

७ निजामशहाचा फार काळापासून मत्सर करणारा, उदारधी आणि प्रतापवान, दिल्लीचा बादशहा यानें अदिलशहाची इच्छा पूर्ण करण्याचें एकदम कबूल केलें.

जहानगीरस्ताम्राणामधिपस्तीव्रविक्रमः ।
इभरामहितार्थाय प्रजिघाय पताकिनीम् ॥ ८ ॥

८ अत्यंत पराक्रमी असा जो मोंगल बादशहा जहांगीर त्यानें इब्राहिम अदिलशहाच्या मदतीसाठीं सैन्य पाठविलें.

तां वै ताम्राननमयीं प्रतिपद्य पताकिनीम् ।
येदिलस्तृणयामास निजामं निजवैरिणम् ॥ ९ ॥

९ मोंगलांची सेना येऊन मिळतांच अदिलशहास आपला शत्रु निजामशहा कस्पटाप्रमाणें वाटूं लागला.

ततश्शाहनरेन्द्रेण शर्गिफेण च धन्विना ।
खेलकर्णेन वीरेण वर्णनीयगुणश्रिया ॥ १० ॥
बलिना मल्लराजेन राज्ञा मंबाभिधेन च ।
नागराजाह्वयेनापि नागराजसमौजसा ॥ ११ ॥
तथा परशुरामेण त्र्यंबकेण च भूभृता ।
कक्काख्येनापि संग्रामविख्यातभुजतेजसा ॥ १२ ॥
चाहुबाणेन हम्मीरराजेन विजितद्विषा ।
मुधाभिधेन च फलस्थानाधिपतिना तथा ॥ १३ ॥
नृसिंहराजप्रमुखैर्निषादैस्समरोन्मुखैः ।
तैरेवान्यैश्च बहुभिर्बल्लाळत्रिपदादिभिः ॥ १४ ॥
तथा विठ्ठलराजेन काण्टिकेनानुभाविना ।
दत्ताजीनागनाथेन मंबेन च यशस्विना ॥ १५ ॥
द्विजातिना नृसिंहेन पिंगळोपाभिधाभृता ।
जगद्देवतनूजेन सुन्दरेण च भूभुजा ॥ १६ ॥
तथा सारथिना खानयाकुतनाभिमानिना ।
मनसूरेण शूरेण सुरूपेणोग्रकर्मणा ॥ १७ ॥
तथा जोहरखानेन हमीदेन च दर्पिणा ।
आतसेन च वीरेण हुताशनसमत्विषा ॥ १८ ॥
बर्बरेणांबरमणिप्रतापेनांबरेण च ।
तत्सुतेनोग्रगतिना फत्तेखानेन मानिना ॥ १९ ॥
सुतैरामदखानस्य तथातिगुणविश्रुतैः ।
अन्यैरपि महासैन्यैस्समन्तादभिरक्षितः ॥ २० ॥
विद्विषद्वृन्दविध्वंसी स्वबाहुबलदर्पितः ।
परं न गणयामास निजामो ज्वलनोपमः ॥ २१ ॥

१०-२१ तेव्हां शहाजी राजा, धनुर्धारी शरीफजी, शूर व गुणवान खेळकर्ण, बलवान् मल्लराव, मंबाजी राजा, हत्तीप्रमाणें बलाढ्य असा नागोजीराव, परसोजी, त्र्यंबकराज, आपल्या बाहुबलानें युद्धांत विख्यात असा कक्क, शत्रुजेता हंबीरराव चव्हाण, मुधोजी फलटणकर, नृसिंहराजप्रभृति युद्धोन्मुख, निषाद, दुसरेही बल्लाळ त्रिपदादि पुष्कळ सेनापति, त्याप्रमाणे प्रतापी विठ्ठलराज कांटे दत्ताजी जगन्नाथ, यशस्वी मंबाजी, नृसिंव्ह पिंगळे ब्राम्हण, जगदेवाचा पुत्र सुंदरराज, मानी याकुतखान सारथी, शूर सुंदर व उग्रकर्मा मनसूरखान, जोहरखान, गर्विष्ट हमीदखान, अग्नीसारखा तेजस्वी वीर आतसखान, सूर्याप्रमाणें प्रतापी मलिक अंबरखान वर्बर, त्याचा पुत्र मानी आणि शीघ्रगति फतेखान आदमखानाचे गुणविश्रुत पुत्र, आणि दुसरेहि मोठमोठे सेनापति हे त्या निजामशहाचें सर्वबाजूंनीं रक्षण करीत होते, अशा स्थितींत तो शत्रूसमूहाचा विध्वंस करणारा, आपल्या बाहुबलाविषयीं दर्प बाळगणारा, अग्नीप्रमाणें प्रखर असा निजामशहा आपल्या शत्रूस त्रिजगणतींतही मानीनासा झाला.

**येदिलःस तु दिल्लीन्द्रं सहायं समुपाश्रयन् ।**
**स्वयं निजामशाहेन सार्धं योद्धुमथैहत ॥ २२ ॥**
**जलालश्च जहानश्च खंजीरश्च सिकंदरः ॥**
**करमुल्लाखलेलश्च सुजानश्च हि सामदः ॥ २३ ॥**
**एते बहादुरयुता म्लेच्छास्सर्वे प्रतापिनः ।**
**राजा दुदाभिधानश्च संपरायपरायणः ॥ २४ ॥**
**उदारामश्चाग्रजन्मा ख्यातः क्षात्रेण कर्मणा ।**
**दादाजी विश्वनाथश्च भारद्वाज इवाजिषु ॥ २५ ॥**
**राघवश्चाचलश्चापि जसवंतबहादुरौ ।**
**एते यादवराजस्य सुतास्स च महाभुजः ॥ २६ ॥**
**सर्वे लश्करखानेन सेनाधिपतिना समम् ।**
**दिल्लीन्द्रेणाभ्यनुज्ञाताः संप्राप्ता दक्षिणां दिशम् ॥ २७ ॥**

२२-२७ परंतु अदिलशाह हा दिल्लीच्या बादशहाच्या मदतीस निजामशहाशीं युद्ध करण्याची तयारी करूं लागला. जलालखान जहानखान खंजीरखान, सिकंदरखान करमुल्लाखलेलखान, सुजानखान सामदखान, असे हे सर्व प्रतापी मुसलमान बहादुरखानासह आले. युद्धपरायण दुदराज, क्षात्रकर्मामुळें प्रख्यात असा उदाराम ब्राम्हण, युद्धामध्यें भारद्वजासारखा पराक्रमी दादाजी विश्वनाथ, राघव, अचल, जसवंत आणि बहादुर हे जाधवरावाचे पुत्र आणि स्वतः बलाढ्य जाधवराव हे सर्व लष्करखान सेनापतीसह दिल्लीच्या बादशहाच्या आज्ञेनें दक्षिणेंत प्राप्त झाले.

**अव्याहताशुगमनाः पवना इव पुष्करम् ।**
**आचक्रमुर्निजामस्य नीवृतं कृतविक्रमाः ॥ २८ ॥**

२८ ज्याप्रमाणें अप्रतिहत आणि शीघ्रगति वायु आकाशाचें आक्रमण करतो त्याप्रमाणें त्या पराक्रमी सेनापतींनीं निजामाचा मुलूख पादाक्रांत केला.

**मुस्तफाख्यो मसूदश्च फरादश्च दिलावरः ।**
**सरजायाकुतश्चापि खैरतश्च तथांबरः ॥ २९ ॥**
**अंकुशश्चेति यवना अन्येप्यतुलविक्रमाः ।**
**इभरामस्य बहवः सुहृदश्चानुजीविनः ॥ ३० ॥**
**द्विजन्मा ढुंढिनामा च तज्जातिश्चापि रुस्तुमः ।**
**घाण्टिकाद्याश्च बहवो महाराष्ट्रा महीभुजः ॥ ३१ ॥**
**मुल्लामहंमदं नाम पुरस्कृत्य प्रभाविणम् ।**
**येदिलानीकपतयोप्यथाजग्मुर्यथाक्रमम् ॥ ३२ ॥**

२९–३२ मुस्तफाखान, मसूदखान, फरादखान, दिलावरखान, सर्जास्याकुतखान, खैरतखान, अंबरखान, अंकुशखान हे यवन व इतरही आदिलशहाचे अतुलपराक्रमी पुष्कळ दोस्त व सेवक तसेच ढुंढिराज नांवाचा ब्राम्हण, त्याच्या जातीचा रुस्तुम, घांटगेप्रभृति महाराष्ट्रीय (मराठे) राजे हे आदिलशहाचे सरदार बलाढ्य मुल्लामहंमदाच्या पुढारीपणाखालीं यथाक्रम आले.

**अथ ताम्रानुत्तरतस्तथा दक्षिणतः परान् ।**
**अभियातानभीयाय निजामप्रहितोऽबरः ॥ ३३ ॥**

३३ नंतर उत्तरेकडून मोंगलांचें व दक्षिणेकडून आदिलशहाचें सैन्य चालून आलें असतां, त्यांच्यावर निजामशहानें पाठविलेला अंबर चालून गेला.

**तं पर्यवारयंस्तत्र शाहवर्मादयो नृपाः ।**
**तारकासुरसंग्रामे महासेनमिवामराः ॥ ३४ ॥**

३४ तारकासुराशीं झालेल्या युद्धांत जसे देव कार्तिकेयाच्या सभोंवतीं जमले, त्याप्रमाणें शहाजीप्रभृति राजे मलिकंबरासभोंवतीं जमले.

**ततोऽभूद्भैरवं युद्धमंबरस्य परैस्सह ।**
**पिशाचभूतवेताळनिशाचरसुखावहम् ॥ ३५ ॥**

३५ नंतर मलिकंबराचें शत्रूंशीं घनघोर युद्ध झालें; आणि त्यामुळें पिशाच, भुतें, वेताळ, निशाचर यांची चंगळ उडाली.

**धावद्धयखुरोद्धूतधूलिधूसरमण्डलः ।**
**चण्डांशुरन्वभूद् व्योम्नि तदा घनघटावृतिम् ॥ ३६ ॥**

३६ दौडणाऱ्या घोड्यांच्या खुरांनीं उडालेल्या धुळीनें बिंब मलिन झाल्यानें सूर्य आकाशांत मेघमंडळांनीं झांकला आहे असें त्या वेळीं भासूं लागलें.

**श्रेणी धरणिरेणूनां भृशमभ्रंकषा बभौ ।**
**निश्रेणिरिव वीराणां सद्यो द्यामारुरुक्षताम् ॥ ३७ ॥**

३७ पृथ्वीवरून उडणाऱ्या धुळीचा मेघांना जाऊन भिडणारा असा एक प्रचंड लोळ बनला; आणि तो जणुं काय लगेच स्वर्गारोहण करणाऱ्या वीरांची शिडीच आहे असें भासलें.

**हेषाभिरथवाहनां कुंजराणां च गर्जितैः ।**
**सिंहनादेन वीराणां भेरीणां निनदेन च ॥ ३८ ॥**
**शरासनानां सज्जानां टंकारेण महीयसा ।**
**स्फुरन्तीनां पताकानां मर्मरेण च भूयसा ॥ ३९ ॥**
**घनगंभीरकण्ठानां पाठैश्च जयबन्दिनाम् ।**
**प्रसभं प्रतिदध्वान परिपूरितमंबरम् ॥ ४० ॥**
**प्रधावतामथान्योन्यं शूराणां शस्त्रधारिणाम्**
**पदाघातेन महता शतधा वसुधाभवत् ॥ ४१ ॥**

३८-४१ घोड्यांचें खिंकाळणें, हत्तींचा चीत्कार, वीरांची सिंहगर्जना, दुंदुभीचा ध्वनि, सज्ज धनुष्यांचा प्रचंड टणत्कार, वाऱ्यानें फडफडणाऱ्या पताकांचा जोराचा फडफडाट, मेघाप्रमाणें गंभीर आवाज असलेल्या भाटांचा जयघोष, यांनीं आकाश अगदीं दुमदुमून गेलें; आणि एकमेकांवर धावून जाण्याऱ्या शूर योध्यांच्या जोराच्या पदाघातानें पृथ्वी शतधा विदीर्ण झाली.

**हंतालक्षितसंपातैर्निशातैर्नतपर्वभिः ।**
**शरैः शिरांस्यपात्यन्त योधिभिः प्रतियोधिनाम् ॥ ४२ ॥**

४२ अरेरे! एका पक्षाच्या योध्यांनीं शत्रुपक्षाच्या योध्यांचीं मुंडकीं पेरें साफ केलेल्या आणि अचानक जाऊन पडणाऱ्या तीक्ष्ण बाणांनीं छेदून टाकलीं.

**शोणितक्लिन्नकेशानि तत्र शोणेक्षणानि च ।**
**दष्टाधराणि शूराणां शिरांसि क्षितिमाययुः ॥ ४३ ॥**

४३ ज्यांचे केंस रक्तानें भिजले झाले आहेत, ज्यांचे डोळे तांबडे लाल झाले आहेत आणि जीं दांत ओंठ चावीत आहेत, अशीं शूर योध्यांचीं मुंडकीं जमिनीवर पडूं लागलीं.

**दन्तावलानां दन्तेषु दंभोळिदृढमुर्तिषु ।**
**योधानां गाढमुष्टीनां निपेतुर्गाढमुष्टयः ॥ ४४ ॥**

४४ वज्राप्रमाणें कठीण अशा हत्तींच्या सुळ्यांवर गाढमुष्टि योध्यांच्या तरवारी आदळूं लागल्या.

**असिना प्रतियोद्धारं विधाय सपदि द्विधा ।**
**निपपात क्षणादूर्ध्वमपमूर्धकलेवरम् ॥ ४५ ॥**

४५ विरुद्ध पक्षाच्या योध्याचे तरवारीने एकदम दोन तुकडे करून क्षणानंतरच एकाद्या वीराचें मस्तकरहित शरीर जमिनीवर पडे.

**किरन्तो रुधिरं भूरितरं सह मदांभसा ।**
**बभुश्शरशताविद्धतटाः करटिनां कटाः ॥ ४६ ॥**

४६ शेकडों बाणांनीं विद्ध झालेल्या हत्तींच्या गंडस्थळांतून मदरसासह अतिशय रक्त वाहूं लागल्यामुळें तीं शोभूं लागलीं.

**नराश्वकरिकीलालमयीं वीचिमतींमनु ।**
**महानिद्रां महावीराः श्रान्ता इव सिषेविरे ॥ ४७ ॥**

४७ माणसें, घोडे, हत्ती यांच्या रक्ताच्या नदीच्या कांठीं मोठमोठे वीर, जणूं काय थकल्यामुळें महानिद्रा घेऊं लागले.

**कृतहस्तैः कुन्तहस्तै वीरैर्विध्वस्तसादिनः ।**
**भूरिसंरंभसन्तप्ताः सप्तयः परिबभ्रमुः ॥ ४८ ॥**

४८ नेम मारण्यांत पटाईत असणाऱ्या आणि हातांत भाला धारण करणाऱ्या वीरांकडून स्वार मारले गेल्यामुळें घोडे क्रोधानें अत्यंत खवळून जाऊन इतस्ततः धावूं लागले.

**ततश्शाहशरीफाभ्यां खेलेन च महौजसा ।**
**श्यामाननैश्च यवनैरंबरप्रियकारिभिः ॥ ४९ ॥**
**तथा हम्मीरराजाद्यैर्महावीरैः प्रतापिभिः ।**
**क्षुरप्रचक्रनिस्त्रिंशकुन्तपट्टिशपाणिभिः ॥ ५० ॥**
**हन्यमानमशेषेण ताम्राननबलं महत् ।**
**रयात् भयातुरं भेजे जिजीविषु दिशो दश ॥ ५१ ॥**

४९-५१ नंतर शहाजी व शरीफजी, महाबलवान खेळोजी, मलिकंबराचे प्रिय करणारे कृष्णमुखी यवन (शिद्दी), त्याचप्रमाणें हंबीररावप्रभृति इतर पराक्रमी वीर यांनीं हातांत बाण, चक्रें, तरवारी, भाले, पट्टे घेऊन मोंगलांच्या अफाट सैन्याची खूप कत्तल उडवली. तेव्हां ते भयभीत होऊन जीव बचावण्यासाठीं दाही दिशा पळूं लागले.

**अथापयातामालोक्य तां वै ताम्रपताकिनीम् ।**
**येदिलस्यापि पृतना कान्दिशीकतमाभवत् ॥ ५२ ॥**

५२ ती मोंगलांची सेना पसार झालेली पाहून इब्राहिम अदिलशहाच्या सैन्यासही पळतां भुई थोडी झाली.

**मत्तैर्दन्तावलैर्दृप्तस्ताम्रास्यो मनचेहरः ।**
**द्रवतस्तस्य सैन्यस्य स्वयं पार्ष्णिग्रहोऽभवत् ॥ ५३ ॥**

५३ मस्त हत्तींच्या जोरावर गर्विष्ठ असा मनचेहर नांवाचा मोंगल त्या सैरा-वैरा पळणाऱ्या सैन्याच्या पिछाडीचें रक्षण करूं लागला.

**तमन्तरा स्थिरं दर्पादन्तरायं जयश्रियाम् ।**
**पुरः पन्थानमावृत्य स्थितं विन्ध्यमिवापरम् ॥ ५४ ॥**
**दृष्ट्वा शाहशरीफाद्यास्सर्वे भृशबळान्वयाः ।**
**चक्रिरे विक्रमपराः संप्रहर्तुमुपक्रमम् ॥ ५५ ॥**

५४–५५ गर्वानें मध्यें स्थिर राहिलेला, रस्ता अडवून पुढे जणूं काय दुसरा विंध्यपर्वतच उभा राहिला आहे.अशा त्या, आपल्या जयाच्या आड आलेल्या, मनचेहरास पाहून शहाजी, शरीफजी आदिकरून सर्व पराक्रमी भोंसल्यांनीं कापाकापी करण्यास सुरवात केली.

**महामहीधराकारकरिप्राकारवर्तिना ।**
**तेन ते समयुध्यन्त गुरुगर्वेण वर्मिणः ॥ ५६ ॥**

५६ महापर्वताप्रमाणें भव्य अशा हत्तींच्या भिंतीच्या आश्रयानें उभा राहिलेल्या त्या अत्यंत गर्विष्ठ मनचेहराशीं ते कवचधारी भोंसले वीर लढूं लागले.

**भ्रामयन् भल्लमभ्रान्तस्तीव्रमभ्रांतमानसः ।**
**तज्जघान गजानीकं शरीफस्संगरोद्धतः ॥ ५७ ॥**

५७ तेव्हां न डगमगणाऱ्या व युद्धोन्मत्त शरीफजीनें निश्चल मनानें आपल्या तीव्र भाल्याच्या फेकींनीं तें हत्तींचें सैन्य ठार केलें.

**त्रिशूळकाण्डकोदण्डगदापरिघधारिणः ।**
**तमग्रयायिनं धीरं रुरुधुर्गजयोधिनः ॥ ५८ ॥**

५८ त्रिशूळ, धनुष्य, बाण, गदा, परिघ ( दंड ) हीं शस्त्रें धारण करणाऱ्या गजदळानें पुढें चालून येणाऱ्या त्या शरीफजीस अडविलें.

**तं युध्यमानमभितः क्रुध्यन्तमभिमानिनम् ।**
**शरीफं पातमासुस्ततस्ते निशितैः शरैः ॥ ५९ ॥**

५९ नंतर चौफेर लढणाऱ्या व खवळलेल्या त्या अभिमानी शरीफजीस त्यांनीं आपल्या तीक्ष्ण बाणांनीं खालीं पाडलें.

**तस्मिन्नवरजे वीरे विध्वस्तपरकुंजरे ।**
**सपत्नशरनिर्भिन्ने गते वीरगतिं प्रति ॥ ६० ॥**
**तरसा खेलकर्णाद्यैर्भ्रातृभिः परिवारितः ।**
**शाहः क्रुद्धोऽभिदुद्राव ससैन्यं मनचेहरम् ॥ ६१ ॥**

६०–६१ शत्रूंच्या हत्तींचा सप्पा उडवून, शत्रूच्या बाणांनीं विद्ध झालेला आपला शूर, धाकटा भाऊ धारातीर्थी पडलेला पाहून खवळलेला शहाजा आपल्या खेळकर्णप्रभृति बंधूंसह मनचेहर व त्याचें सैन्य यांच्यावर वेगानें चालून गेला.

**ततः प्रासवरत्रासपराहतमदद्विपः ।**
**प्रतापी ताम्रवदनः स पराचीनतां ययौ ॥ ६२ ॥**

६२ तेव्हां तो प्रतापवान मोंगल शत्रूच्या उत्कृष्ट भाल्यांच्या भीतीनें आपले मदोन्मत्त हत्ती मागें हटलेले पाहून स्वतः माघार घेता झाला.

**अपक्रामति संग्रामात् तस्मिन्नछिन्नकुंजरे ।**
**सैनिकास्तु निजामस्य सिंहनादान् वितेनिरे ॥ ६३ ॥**

६३ सुरक्षित हत्तींसह तो युद्धांतून पळून जाऊं लागला असतां निजामशहाचें सैन्य सिंहगर्जना करूं लागलें

**तदोदीचीमपाचीं च प्राचीमपि च रंहसा ।**
**संश्रित्य विद्रवन्ति स्म ते निजामस्य विद्विषः ॥ ६४ ॥**

६४ तेव्हां कोणी उत्तरेकडे, कोणी पश्चिमेकडे आणि कोणी पूर्वेकडे असे ते मोंगल वेगानें पळूं लागले.

**ततः प्रसन्नमनसः शाहराजादयो नृपाः ।**
**द्रवतस्ताननुद्रुत्य सर्वान्निजगृहुर्बलात् ॥ ६५ ॥**

६५ नंतर हर्षभरित होऊन शहाजीप्रभृति राजांनीं त्या पळणाऱ्या शत्रूंचा पाठलाग केला व त्यांस बळानें कैद केलें.

**रयादथानीय रणप्रचण्डान्। प्रसह्य सन्दानितबाहुदंडान् ॥**
**ताम्राननेकानपरांश्च वीरान्। चक्रुस्समुद्याशु पुरोऽबरस्य ॥६६**

६६ युद्धामध्ये भयंकर अशा पुष्कळ मोंगलांच्या आणि इतर वीरांच्या दंडांत जबरीनें बेड्या अडकवून त्याना मलिकंबराच्या पुढें आणून उभें केलें.

**इति जितरिपुरंबरः प्रतापी भृशबलबाहुबलावलंबनेन ।**
**पटहरवविमिश्रतूर्यघोषैः सपदि जगाम निजामदर्शनार्थम् ॥ ६७ ॥**

६७ याप्रमाणें भोंसल्यांच्या बाहुबलाच्या साह्याय्यानें शत्रूला जिंकून प्रतापी मलिकंबर नगारे व शिंगें यांच्या जयघोषांत निजामशहाच्या भेटीस त्वरित गेला.

**दिल्लींद्रस्य प्रतापादद्भुतविभवभृतः सैन्यमन्यैरजय्यं ।**
**सद्यस्तद्येदिलस्याप्यतुलबलमथोज्ज्वासयित्वा जवेन ॥**
**बंदीकृत्योरुदर्पानपि च युधि चमूनायकानुग्रकर्मा ।**
**सेनानीरंबरोऽसौ भृशबलसहितस्तं निजामं ननाम ॥ ६८ ॥**

६८ प्रतापवान व अद्भुत वैभवशाली अशा दिल्लीपतीचें शत्रूंना अजिंक्य असलेलं सैन्य, तसेंच आदिलशहाचेंहि अतुल सामर्थ्यवान सैन्य यांचा तडाख्यानें पाडाव करून, आणि अत्यंत गर्विष्ठ सेनापतींना युद्धांत कैद करून तो उग्रकर्मा सेनापति मलिकंबर भोसल्यासह निजामशहास मुजरा करता झाला.

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरकवीन्द्रपरमानंद-**
**प्रकाशितायां शतससाहस्र्यां संहितायां निजाम-**
**प्रकर्षो नाम चतुर्थोऽध्यायः**

---

# अध्याय ५ वा



कवीन्द्र उवाच ।

**अथ विठ्ठलराजस्य खेलकर्णादयस्सुताः ।**
**धीरेण धर्मराजेन धृतराष्ट्रात्मजा इव ॥ १ ॥**
**प्रसभं शाहराजेन स्पर्धमानाः पदे पदे ।**
**द्विषन्त इव विद्वेषं दायादत्वाददर्शयन् ॥ २ ॥**

१–२ धृतराष्ट्राचे मुलगे शांतवृत्ति धर्मराजाचा ज्याप्रमाणे मत्सर करीत असत त्याप्रमाणें विठोजी राजाचे खेलकर्णप्रभृति पुत्र हे भाऊबंदकीमुळें शहाजी राजाचा पदोपदीं शत्रूप्रमाणें अतिशय द्वेष करूं लागले.

**ते मन्त्रिणं निजामस्य म्लेच्छमंबरनायकम् ।**
**स्वशेमुषीविशेषेण वशीकृतमहीतलम् ॥ ३ ॥**
**श्रयणीयं संश्रयन्तः स्पृहयन्तः श्रियेऽन्वहम् ।**
**न सेहिरे महाबाहुं शाहं सूर्यसमौजसम् ॥ ४ ॥**

३–४ ज्यानें आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेनें पृथ्वी वश केली आणि आश्रय करण्यास योग्य अशा निजामशहाच्या मलिकंबर प्रधानाचा, आपणास वैभव प्राप्त व्हावें अशी सदोदित इच्छा करणाऱ्या, विठोजीच्या पुत्रांनीं आश्रय केला. सूर्याप्रमाणें तेजस्वी शहाजी त्यांच्या डोळ्यांत सलूं लागला.

**तमन्तर्भेदमुद्भूतमात्मीयकुलसंभवम् ।**
**परिज्ञायेंगितज्ञेन सुधिया शाहवर्मणा ॥ ५ ॥**
**तमंबरं निजामं च दायादांस्तांश्च दुर्मदान् ।**
**पटुनात्मप्रतापेन न्यक्कृत्य निकृतिस्थितान् ॥ ६ ॥**
**स्वीयसैन्यसमेतेन निकेतेन जयश्रियाम् ।**
**महासन्नाहयुक्तेन महोत्साहेन मानिना ॥ ७ ॥**
**स्कन्धविन्यस्तकुन्तेन शकुन्तेशानशक्तिना ।**
**आनीयताचिरेणैव निजदेशस्सदेशाताम् ॥ ८ ॥**

५–८ आपल्या कुलामध्यें फूट उत्पन्न झाली आहे हें त्या मनकवड्या आणि बुद्धिमान शहाजीनें ओळखलें आणि मलिकंबर, निजामशहा व आपल्या विरुद्ध कपट कारस्थान करणारे आपले दुष्ट चुलतभाऊ, यांचा तिरस्कार करून

अत्यंत उत्साही, मानी, गरुडाप्रमाणें पराक्रमी, विजयश्रीचें माहेरघर व खांद्यावर भाला टाकलेल्या शहाजीनें, आपलें सैन्य आणि विपुल युद्धसामग्री यांसह जलदीनें आपल्या जहागिरीस प्रयाण केलें.

**तं प्रस्थितं प्रभावेण स्थितं जनपदे निजे ।**
**नैव मन्त्री निजामस्य वशीकर्तुं शशाक सः ॥ ९ ॥**

९ तेथून निघून जाऊन आपल्या जहागिरींत मोठ्या ऐश्वर्यानें राहिलेल्या त्या शहाजीस निजामशहाचा प्रधान मुळींच वश करूं शकला नाहीं.

**तदा तेन विना तिग्मद्युतिनेव द्युमण्डलम् ।**
**अपि प्राज्यं निजामस्य राज्यं तन्न व्यराजत ॥ १० ॥**

१० सूर्यावांचून आकाश जसें शोभत नाहीं, त्याप्रमाणें शहाजी निघून गेल्यामुळें निजामाचें राज्य समृद्ध असतांही त्याची कळा गेली.

**येदिलस्तमथोद्वीक्ष्य भेदयोग्यमनेहसम् ।**
**अमुं शाहं महाबाहुं महोत्साहं महाशयम् ॥ ११ ॥**
**साहाय्यार्थं समानाय्य महाभृत्यैर्महामतिः ।**
**स्पर्धी निजामशाहस्य स्वं दुर्धर्षममन्यत ॥ १२ ॥**

११–१२ भेद पाडण्याला ही संधि योग्य आहे असें त्या महामति व निजामशहाची स्पर्धा करणाऱ्या अदिलशहानें आपल्या सरदारांकरवीं त्या महाबाहु, अतिशय उत्साही आणि थोर मनाच्या शहाजीस साहाय्यार्थ आणवून तो आपणास अजिंक्य मानूं लागला.

**येदिलस्तमथासाद्य दवानल इवानिलम् ।**
**ववृधे वैरिसैन्यानि विपिनानि विनिर्दहन् ॥ १३ ॥**

१३ ज्याप्रमाणें वाऱ्याच्या मदतीनें वणवा वनेंचीं वनें जाळून वृद्धिंगत होतो, त्याप्रमाणें त्या शहाजीचें साहाय्य मिळाल्यानें अदिलशहा शत्रुसैन्याचा विध्वंस करून उत्कर्ष पावला.

**तपन्नात्मप्रतापेन परितस्तपनोपमः ।**
**स जिगाय महाबाहुरुदारग्रहमंबरम् ॥ १४ ॥**

१४ आपल्या तेजानें सर्वत्र तळपणारा सूर्य ज्याप्रमाणें सुंदर ग्रहांनीं युक्त असलेलें आकाश आक्रमितो, त्याप्रमाणें त्या महाबाहु शहाजीनें आपल्या प्रतापानें त्या थोर मनाच्या मलिकंबरास जिंकलें.

**गतिमुत्कर्षिणीं बिभ्रत् प्रभंजन इव द्रुमम् ।**
**बद्धमूलं निजामस्य भुजदंभं बभंज सः ॥ १५ ॥**

१५ जोरानें वाहणारा तुफानी वारा ज्याप्रमाणें बद्धमूल वृक्षास मोडून पाडतो, त्याप्रमाणें त्या उत्कर्ष पावणाऱ्या शहाजीनें निजामशहाचा स्वबाहुबलाबद्दलचा गर्व जिरवला.

**ततस्तेनेभरामेण तस्मै विध्वस्तविद्विषे ।**
**मन्ये संतुष्य शाहाय निजमर्धपदं ददे ॥ १६ ॥**

१६ नंतर त्या इब्राहिम अदिलशहाने संतुष्ट होऊन आपल्या शत्रूंचा विध्वंस करणाऱ्या शहाजी राजाला आपलें अर्धपद दिलें असें मला वाटतें.

**विरुद्धमिभरामस्य समृद्धजनसेवितम् ।**
**मुधाभिधं फलस्थानपुराधिपतिमुद्धतम् ॥ १७ ॥**
**प्रतिप्रस्थाय सन्नाहशाली शैलमिवोन्नतम् ।**
**स भूपः प्रसभं भूरिप्रभावं पर्यभावयत् ॥ १८ ॥**

१७–१८ मातबर लोकांनीं सेविलेला, पर्वताप्रमाणे उंच, महापराक्रमी आणि गर्विष्ठ असा मुधोजी फलटणकर इब्राहिमशहाच्या विरुद्ध असल्याने, त्याच्यावर शहाजी राजानें युद्धसरंजामासह स्वारी करून त्याचा पूर्ण पराभव केला.

**निर्जित्य केरळान् क्रूरकर्मा कार्णाटकानपि ।**
**स कोषमिभरामस्य पुपोष बहुतोषकृत् ॥ १९ ॥**

१९ कर्नाटक व केरळप्रांत जिकून त्या प्रतापी शहाजीनें इब्राहिमशहाच्या खजिन्यांत भर घालून त्याला फार संतुष्ट केलें.

**सोऽन्यानपि नृपानुग्रान् निगृह्य निजनीतिभिः ।**
**तद्राज्यमिभरामस्य रामराज्यमिवाकरोत ॥ २० ॥**

२० त्यानें दुसऱ्याही बलाढ्य राजांना आपल्या कारस्थानांच्या जोरावर आपल्या कह्यांत आणून तें इब्राहिमशहाचें राज्य रामराज्याप्रमाणें केलें.

**तमिन्दुसुन्दरमुखी सुदती यदुवंशजा ।**
**उपाचरन्ममहाराजं गौरीव वृषभध्वजम् ॥ २१ ॥**

२१ ज्याप्रमाणें पार्वतीनें शंकराची सेवा केली, त्याप्रमाणें जाधव कुलांत उत्पन्न झालेली, चंद्राप्रमाणें सुंदर मुख असलेली व सुंदर दांत असलेली जिजाई शहाजी महाराजाची सेवा करी.

**सा भृशं विभ्रमवती प्रसादाभिमुखी सती ॥**
**देवी सफलयामास पत्युस्तत्तदभीप्सितम् ॥ २२ ॥**

२२ ती अत्यंत विलासवती व प्रसदोन्मुख साध्वी राणी आपल्या पतीची प्रत्येक इच्छा परिपूर्ण करीत असे.

**तस्य तस्यामजायन्त पुत्राष्षट् शुभलक्षणाः ।**
**तेषां मध्ये शंभुशिवौ द्वावेवान्वयवर्धनौ ॥ २३ ॥**

२३ त्याला तिच्यापासून सहा शुभलक्षणी पुत्र झाले. त्यांपैकीं शंभू व शिवाजी हे दोघेच काय ते वंशवर्धक झाले.

**शिवस्तु वैष्णवं तेजोऽवतीर्य क्षोणिमण्डलम् ।**
**समस्तभूभृतां नेता विनेता प्रतिभूभृताम् ॥ २४ ॥**
**तथाहमभिधास्यामि शृणुत द्विजसत्तमाः ॥ २५ ॥**

२४-२५ परंतु शिवाजी हा विष्णूचा अंश पृथ्वीवर अवतरून तो सर्व राजांचा नेता आणि शत्रुपक्षीय राजांचा विनेता कसा झाला हें मी सांगणार आहें; तें, हे द्विजश्रेष्ठांनो, आपण ऐका.

**पुरा पुरारिमाराध्य तीव्रेण तपसान्वहम् ।**
**निषेधाच्छ्रुतिशास्त्राणां कालः कलिरवर्धत ॥ २६ ॥**

२६ पूर्वीं दररोज उग्र तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेऊन वेद-शास्त्रांचा प्रतिबंध केल्यानें कळिकाळ बळावला.

**हितावहमसाधूनां साधूनामहितावहम् ।**
**दैत्यास्ततस्तमासाद्य पापीयांसमनेहसम् ॥ २७ ॥**
**छद्मिनो म्लेच्छरूपेण देवभूदेवविद्विषः ।**
**अवातरन्वसुमतीमधिविप्लावहेतवः ॥ २८ ॥**

२७-२८ नंतर दुष्ट लोकांना अनुकूल व सज्जनांस प्रतिकूल असा तो पापमय काल गांठून कपटी, देवब्राह्मणद्वेष्टे व महाविध्वंसक दैत्य म्लेच्छरूपानें पृथ्वीवर अवतरले.

**प्रतीचीं ककुभं तावदुदीचीं तदनन्तरम् ।**
**जगृहुस्ते बलात् प्राचीमपाचीमपि दुर्ग्रहाम् ॥ २९ ॥**

२९ प्रथम त्यांनीं पश्चिमदिशा, त्यानंतर उत्तर, पूर्व व अजिंक्य दक्षिणही बळानें पादाक्रांत केली.

**तेषां निजनयज्ञानां न यज्ञानां प्रवृत्तयः ।**
**तथापि तिष्यस्य बलात् भृशं ववृधिरे श्रियः ॥ ३० ॥**

३० आपला धर्म जाणणांऱ्यांच्या त्यांच्यामध्यें जरी यज्ञांची प्रवृत्ति नव्हती;तथापि कलियुगाच्या प्रभावामुळें त्यांचें ऐश्वर्य जोरानें वाढलें.

**उत्थाप्य स्थापिताः केचित् केचिद्युद्धे निपातिताः ।**
**बलिभिस्तैस्ततः प्रायः क्षत्रियाः क्षीणतां गताः ॥ ३१ ॥**

३१ त्या बलाढ्य म्लेच्छांनीं कित्येकांस उचलून राज्यावर बसवलें व कित्ये-कांचा युद्धांत निःपात केला. तेव्हांपासून बहुधा सर्व क्षत्रिय नष्ट झाले.

**ततो विश्वंभरा देवी म्लेच्छभारभरार्दिता।**
**प्रत्यपद्यत लोकेशं शरण्यं शरणैषिणी ॥ ३२ ॥**

३२ तेव्हां म्लेच्छांच्या पीडेनें गांजून जाऊन धरित्री देवी आपल्या रक्ष-णार्थ रक्षणकर्त्या ब्रह्मदेवाकडे गेली.

**परितापेन महता मलिना नलिनासनम्।**
**सा ववन्दे त्रयस्त्रिंशत्कोटित्रिदशवन्दितम् ॥ ३३ ॥**

३३ भयंकर पीडेमुळें निस्तेज–दीनवदन झालेल्या त्या पृथ्वीनें, तेहतीस कोटि देवांकडून वंदिला जाणाऱ्या त्या ब्रह्मदेवास वंदन केलें.

**निवेदयित्री निर्वेदवती खेदमनेकधा।**
**सा निबद्धांजलिपुटा प्रोवाच परमेष्ठिनम् ॥ ३४ ॥**

३४ विषण्ण झालेली ती पृथ्वी हात जोडून आपलें अनेक प्रकारचें दुःख निवेदन करण्याच्या हेतूनें ब्रह्मदेवास म्हणाली.

विश्वंभरोवाच।

**त्वं पिता सर्वलोकस्य त्रयीधर्मस्थितिप्रियः।**
**लोकेश मां तमोऽभोधौ मज्जन्तीं किमुपेक्षसे ॥ ३५ ॥**

३५ देवी विश्वंभरा म्हणाली:—" हे ब्रह्मदेवा, तूं तीन्हीं लोकांचा पिता आहेस व वैदिक धर्माचें रक्षण करणें तुला प्रिय आहे असें असून मी या दुःख सागरांत बुडत असतां तूं माझी उपेक्षा कां करतोस ?

**त्वया विरचितं विश्वं विरिंचे यच्चराचरम् ॥**
**दनुजैर्म्लेच्छतनुभिः तदद्य बत सीदति ॥ ३६ ॥**

३६ हे ब्रह्मदेवा, त्वां उत्पन्न केलेलें जें हें चराचार विश्व तें म्लेच्छरूपी दैत्यांमुळें, हाय हाय ! आज बुडत आहे.

**ये हताः प्रथमं देवैर्दुर्मदास्त्रिदशद्विषः ॥**
**ते मां तुदन्ति तिष्येऽस्मिन् उपेत्य म्लेच्छरूपताम् ॥ ३७ ॥**

३७ ज्या दुष्ट दैत्यांचा देवांनीं पूर्वीं संहार केला, तेच ह्या कलियुगामध्यें म्लेच्छरूप धारण करून मला पीडा देत आहेत.

**दुष्टदैत्यान्तके कृष्णे निजं धामाधितिष्ठति ॥**
**बुद्धावतारे भगवत्यपि मौनावलंबिनि ॥ ३८ ॥**

**दुर्जना यवनास्तात वृजितानि वितन्वते ।**
**त्रातारं नाधिगच्छामि नियच्छेयं कथं व्यथाम् ॥ ३९ ॥**

३८–३९ दुष्ट दैत्यांचा नाश करणारा भगवान श्रीकृष्ण निजधामास गेला आहे व भगवान बुद्धानें मौन स्वीकारिलें आहे. अशा वेळेस हे दुष्ट यवन पापें करूं लागले आहेत व मला कोणीही त्राता मिळत नाहीं. मी या दुःखाचें निवारण कसें करूं ?

**नाहूयन्ते दिविषदो न हूयन्ते हुताशनाः ।**
**न वेदा अप्यधीयन्ते नाभ्यर्च्यन्ते द्विजातयः ॥ ४० ॥**
**न सत्राणि प्रवर्तन्ते तथैव च मखक्रियाः ।**
**न दानानि विधीयन्ते विहीयन्ते व्रतानि च ॥ ४१ ॥**
**खिद्यन्ते साधवस्सर्वे भिद्यन्ते धर्मसेतवः ।**
**म्लेच्छधर्माः प्रवर्धन्ते हन्यन्ते धेनवोऽपि च ॥ ४२ ॥**
**सज्जना यान्ति विलयं व्रजन्ति क्षत्रियाः क्षयम् ।**
**प्रादुर्भूतमिदानीं मे यवनेभ्यो महद्भयम् ॥ ४३ ॥**

४०–४३ देवांचें कोणी आवाहन करीत नाहीं; अग्नींत कोणी हवन करीत नाहींत; वेदांचेंहि अध्ययन सुटलें आहे; ब्राह्मणांचा सत्कार बंद झाला आहे. सत्रें आणि यज्ञक्रिया यांना फांटा मिळाला आहे; दानें आणि व्रतें संपुष्टांत आलीं आहेत; सज्जनांस दुःख होत आहे; धर्मनिर्बंध मोडले जात आहेत; म्लेच्छ-धर्म वृद्धि पावत आहे; गाईचीहि हत्या घडत आहे; साधूंचा नाश होत आहे. क्षत्रिय लयास चालले आहेत. अशा प्रकारें हल्लीं यवनांपासून मला मोठें भय उत्पन्न झालें आहे.

**विहसन्ति तथा सर्वे मां म्लेच्छवशवर्तिनीम् ।**
**स्थितां यथागतमुखे श्रुतिं श्रुतिविदो यथा ॥ ४४ ॥**

४४ ज्याप्रमाणें वेदपारंगत लोक मूर्खाच्या तोंडीं असलेल्या वेदाची थट्टा करतात, त्याप्रमाणें मला म्लेच्छांच्या ताब्यांत गेलेली पाहून सर्व लोक माझा उपहास करीत आहेत.

**उदभूत् पूर्वदेवेभ्यो भयं मम यदा यदा ।**
**तदा तदा प्रभवता भवता ह्यवितास्म्यहम् ॥ ४५ ॥**

४५ जेव्हां जेव्हां मला दैत्यांपासून भय उत्पन्न झालें, तेव्हां तेव्हां त्वां शक्ति-मानानें माझें रक्षण केलें आहे.”

**इदं निगद्य जगती जगतीनामधीश्वरम् ।**
**बभूव तूष्णीमित्युष्णं निश्वसन्त्यश्रुलोचना ॥ ४६ ॥**

४६ असें ब्रह्मदेवास बोलून, पृथ्वी डोळ्यांत अश्रू आणून, उष्ण निश्वास टाकीत स्तब्ध राहिली.

**पितामहस्तामालोक्य विह्स्तामस्थिरां स्थिराम्।**
**एवमाश्वासयामास विश्वविश्वासवासभूः ॥ ४७ ॥**

४७ विश्वाच्या विश्वासाचें निवासस्थान अशा ब्रह्मदेवानें त्या पृथ्वीला व्याकुळ व अस्थिर झालेली पाहून तिचें याप्रमाणें सांत्वन केलें:—

पितामह उवाच ॥

**मा भैषीर्भीरु भव्यं ते भविताशु वसुन्धरे ॥**
**स्वस्था स्वं स्थानमास्थाय स्थिरे स्थिरतरा भव ॥ ४८ ॥**

४८ ब्रह्मदेव म्हणाला—हे भित्रे वसुंधरे, तूं घाबरूं नकोस; तुझें लवकरच कल्याण होईल (म्हणजे या दुःस्थितींतून तुझी मुक्तता होईल); स्वस्थानीं राहून, हे पृथ्वी, तूं स्वस्थ व स्थिर ऐस.

**मया पुरा मुरारातिस्त्वन्निमित्तं दयांबुधिः ॥**
**प्रार्थितः परया भक्त्या स्वयमेतदुवाच माम् ॥ ४९ ॥**

४९ दयासागर विष्णूची तुझ्यासाठीं मी पूर्वीं परमभक्तीनें प्रार्थना केली. तेव्हां तो स्वतः मला म्हणाला—

विष्णुरुवाच ॥

**विधे विधेहि मा चिन्तामवधेहि वचो मम ।**
**भवतोऽभिमतं तावदचिरेण भविष्यति ॥ ५० ॥**

५० हे ब्रह्मदेवा, तूं चिंता करूं नकोस, माझें बोलणें ऐक; तुला इष्ट असलेली गोष्ट लवकरच घडून येईल.

**मालवर्मात्मजश्शाहवर्मा यः पार्थिवोत्तमः ।**
**दाक्षिणात्यो महाराजः कृतकर्मा सुलक्षणः ॥ ५१ ॥**
**तरसा मारुतसमस्तेजसा तपनोपमः ।**
**वर्वर्ति विश्वविजयी पुण्यात्मा पृथुविक्रमः ॥ ५२ ॥**
**तस्य भार्या महासाध्वी जिजूर्विजयवर्धिनी ।**
**नन्दिनी यादवेन्द्रस्य जागर्ति जगतीतले ॥ ५३ ॥**

५१-५३ मालोजीचा पुत्र जो भाग्यशाली, सुलक्षणी, वाऱ्याप्रमाणें वेगवान, सूर्याप्रमाणें तेजस्वी, विश्वजेता, पुण्यवान, महापराक्रमी असा शहाजी महाराज दक्षिणेंतील फार प्रख्यात नृपश्रेष्ठ आहे, त्याची भार्या महासाध्वी, यशस्विनी, जाधवरावाची मुलगी जिजाबाई ही पृथ्वीवर जागत (जागरूक) आहे.

**सा मां तेजोमयं देवी स्वोदरे धारयिष्यति ।**
**तत्पुत्रतां प्रपद्याहं करिष्यामि तव प्रियम् ॥ ५४ ॥**

५४ ती राणी तेजोमय अशा मला आपल्या उदरांत धारण करील आणि तिचा पुत्र होऊन मी तुझें प्रिय करीन.

**स्थापयिष्यामि धर्मस्य मर्यादां भुवि शाश्वतीम् ।**
**यवनान् सादयिष्यामि पालयिष्यामि देवताः ॥ ५५ ॥**
**पुनः प्रवर्तयिष्यामि सप्ततन्त्वादिकाः क्रियाः ।**
**क्षेमं गवां विधास्यामि स्थितिं चापि द्विजन्मनाम् ॥ ५६ ॥**
**प्रतिज्ञायेति भगवान् सत्यलोकाय मां विभुः ।**
**समनुज्ञातवान् भद्रे स्वयं भूतभविष्यवित् ॥ ५७ ॥**

५५–५७ मी पृथ्वीवर धर्माची शाश्वत मर्यादा स्थापीन, यवनांचा उच्छेद करीन, देवांचें रक्षण करीन, यज्ञादि क्रिया पुन्हा सुरू करीन, गाई व ब्राह्मण यांचें पालन करीन असें मला वचन देऊन, हे कल्याणि, भूतभविष्य-जाणणाऱ्या भगवानानें मला सत्यलोकास जाण्यास अनुज्ञा दिली.

**अभिधायेति वसुधां समाधाय पितामहः ।**
**विससर्ज स्वयं सापि स्वकं लोकमलोकत ॥ ५८ ॥**

५८ असें बोलून ब्रह्मदेवानें पृथ्वीचें समाधान केलें आणि तिला जाण्यास सांगितलें व तीसुद्धां आपल्या लोकीं आली.

**तां वाचं भूतधात्री त्रिभुवनसुहितां हृत्समाधेर्विधात्रीं**
**वैधात्रीं न्यस्य चित्ते तमभिमतमथानेहसं प्रेक्षमाणा ।**
**म्लेच्छच्छद्मासुरेभ्योऽभ्युदितमतितरामुज्झती भीतिभारं**
**हंत ब्रह्मर्षिदेवद्विजकुलसहिता निर्भरं नन्दति स्म ॥ ५९ ॥**

५९ त्रिभुवनास अत्यंत कल्याणकारक व हृदयास आनंद देणारी अशी ती ब्रह्मदेवाची वाणी ऐकून म्लेच्छरूपी दैत्यांपासून उत्पन्न झालेली भीति टाकून देऊन, ती अनुकूल कालाची वाट पहाणारी पृथ्वी, ब्रह्मर्षि, देव व ब्राह्मण यांच्या कुलांसह अत्यंत आनंद पावली.

**हरिरपि भुवमुच्चैर्भूरिभारायमाण—**
**त्रिदशरिपुसहस्राक्रान्तरूपामजस्रम् ।**
**सपदि सदयचित्तस्त्रातुकामः समग्रां**
**बत निरुपममूर्तिर्मानुषं भावमैच्छत् ॥ ६० ॥**

६० अत्यंत पीडादायक झालेल्या अशा सहस्त्रावधि दैत्यांनीं व्यापून टाकलेल्या अखिल पृथ्वीला लवकर मुक्त करण्याची इच्छा करणाऱ्या कृपाळू आणि निरुपम विष्णूनें सुंदर मनुष्यरूपहि धारण करण्याची इच्छा केली.

इत्यनुपुराणे कवीन्द्रविरचिते पंचमोऽध्यायः
विष्ण्ववतारकथनम्

---

# अध्याय ६ वा



कवीन्द्र उवाच ।

**अथो विविक्षुस्तत्कुक्षिं स्वयं योगेश्वरो हरिः ।**
**शाहपत्न्यै प्रसन्नात्मा स्वमात्मानमदर्शयत् ॥ १ ॥**

१ शहाजीची पत्नी जिजाबाई हिच्या पोटीं जन्म घेऊं इच्छिणाऱ्या योगेश्वर विष्णूनें प्रसन्न होऊन तिला आपलें दर्शन दिलें.

**सैकदा सुतनुः स्वप्ने दिविषद्वृंदवन्दितम् ।**
**शंखचक्रगदापद्मपाणिं श्यामं चतुर्भुजम् ॥ २ ॥**
**श्रीवत्सवक्षसं कण्ठाविनिवेशितकौस्तुभम् ।**
**वैजयन्तीकृतावासं पीतकौशेयवाससम् ॥ ३ ॥**
**विलसद्रत्नमुकुटं स्फुरन्मकरकुण्डलम् ।**
**मन्दस्मितोल्लसद्गण्डं प्रसन्नमुखमण्डलम् ॥ ४ ॥**
**पुण्डरीकायतदृशं सुनसं शुभलक्षणम् ।**
**प्रतिप्रतीकलावण्यलीलानिलयमद्भुतम् ॥ ५ ॥**
**समाश्लिष्टं कमलया शोभितं वनमालया ।**
**सर्वदेवमयं देवं सर्वाभरणभूषितम् ॥ ६ ॥**
**वज्ररेखाध्वजच्छत्रचिह्नितांघ्रिसरोरुहम् ।**
**बाललीलाधरं देवी स्वांकास्थितमलोकत ॥ ७ ॥**

२–७ तें असें:—एकदा त्या सुंदर राणीनें देववृन्दांनीं वंदित व बालरूपधारी श्रीविष्णु आपल्या मांडीवर बसलेला पाहिला. त्याचा वर्ण सांवळा असून त्याच्या चार हातांत शंख, चक्र, गदा आणि पद्म हीं होतीं; वक्षस्थळीं श्रीवत्स नांवाचें चिन्ह होतें; गळ्यांत कौस्तुभमणि घातलेला होता, छातीवर वैजयन्ती माळा पडली होती; तो पीतांबर नेसला होता; मस्तकावर रत्नजडीत मुकुट झळकत होता; कानांत मकरकुंडलें तळपत होतीं; गालावर मंद स्मित चमकत होतें; त्याचें मुख प्रसन्न होतें; डोळे कमळासारखे आरक्त व दीर्घ होते; नाक सुंदर असून तो शुभलक्षणसंपन्न होता; त्याचा प्रत्येक अवयव लावण्याचें क्रीडास्थान होतें; लक्ष्मी त्याच्या संनिध बसली होती; त्याच्या गळ्यांत वनमाळा शोभत होती; तो सर्व अलंकारांनीं विभूषित होता; त्याच्या पदकमळांवर वज्र, रेखा, ध्वज आणि छत्र यांचीं चिन्हें होतीं.

**ततोऽचिरेण सा गर्भं पत्नी शाहमहीपतेः ।**
**प्रभविष्णुं महाविष्णुमंशमूर्तिमदीधरत् ॥ ८ ॥**

८ पुढें थोड्याच दिवसांनीं त्या शहाजीच्या पत्नीनें सामर्थ्यवान् विष्णूचा अंश गर्भांत धारण केला.

**महता महसा तेन निजगर्भगतेन सा ।**
**व्यभाद्विभाकरेणेव शारदंभोदमण्डली ॥ ९ ॥**

९ ज्याप्रमाणें शारदीय मेघमंडळ सूर्याच्या योगानें शोभतें त्याप्रमाणें आपल्या गर्भांतील त्या महातेजामुळें ती शोभूं लागली.

**तं वै तेजोमयं गर्भं तदा बिभ्राणया तया ।**
**यादवेंद्रस्य सुतया भूषितं बत भूतलम् ॥ १० ॥**

१० तो तेजोमय गर्भ धारण करणाऱ्या त्या जाधवरावाच्या कन्येनें त्या समयीं भूतलाला शोभा आणली.

**अथोद्यद्दोहदरसा गर्भभारभरालसा ।**
**अमंस्त पृथुलश्रोणीभारमाभरणानि सा ॥ ११ ॥**

११ पुढें तिला डोहाळे लागले आणि गर्भभारामुळें तिला मंदपणा आला तेव्हां त्या पृथुलश्रोणीला दागिने सुद्धां जड वाटूं लागले.

**तदाननं पाण्डिमानं दधानमतुलं तदा ।**
**उपाहसत् प्रसादेन शारदं शशिमण्डलम् ॥ १२ ॥**

१२ तेव्हां अप्रतिम गौरवर्ण धारण करणाऱ्या तिच्या मुखानें शुभ्रपणांत शारदीय चंद्रास सुद्धां मागें सारलें.

**न तत् चित्रं श्रिता यत्सा सुतनुस्तनुगौरवम् ।**
**देवो जगद्गुरुर्यस्याः साक्षात्कुक्षिमवीविशत् ॥ १३ ॥**

१३ प्रत्यक्ष जगत्प्रभु विष्णूनें जिच्या उदरीं प्रवेश केला त्या सुंदरीच्या शरिरास जडपणा आला यांत नवल काय ?

**परिपाण्डुमुखीं सत्ववतीमथ सखीजनः ।**
**तामज्ञासीत्पार्श्वसेवी देवीमन्यादृशीमिव ॥ १४ ॥**

१४ तिच्या जवळ राहून तिची सेवा करणाऱ्या सखीजनास ती पांडुमुखी गरोदर राणी अगदीं निराळी च भासूं लागली.

**अथाभ्यासनमद्रीणां द्विपानां द्वीपिनां तथा ।**
**स्वर्णसिंहासने स्थैर्ये सितच्छत्रतलेऽपि च ॥ १५ ॥**

केतनोन्नमनंचोच्चैश्चारुचामरवीजनम् ।
श्रुतिर्दुन्दुभिशब्दानां कृतिः सङ्गरकर्मणाम् ॥ १६ ॥
धारणं काण्डकोदण्डशक्तिनिस्त्रिंशवर्मणाम् ।
प्रसाधनं पर्वतानां साधनं विजयश्रियाम् ॥ १७ ॥
महादानेष्वभिरतिर्धर्मस्य स्थापने मतिः ।
समभूवन्नमून्यस्यां दोहदानि दिने दिने ॥ १८ ॥

१५–१८ हत्तींवर, वाघांवर आणि गडांवर आरोहण करावें, शुभ्र छत्राखालीं सुवर्ण–सिंहासनावर स्थिर बसावें, झेंडा उंच उभारावा, सुंदर चौऱ्या ढाळून घ्याव्या, दुंदुभिध्वनि ऐकावा, धनुष्यबाण, भाला, तरवार आणि चिलखत हीं धारण करून लढाया कराव्या, गड हस्तगत करावे, विजयश्री मिळवावी, मोठमोठीं दानें करावीं, धर्मस्थापना करावी, असे अनेक प्रकारचे डोहाळे तिला प्रतिदिनी होऊं लागले.

ततः कुमारभृत्यासु कुशलाभिरहर्निशम् ।
कुलशील समृद्धाभिर्वृद्धाभिः समुपासिते ॥ १९ ॥
चित्तानुसारिभिर्नित्यमत्यर्थं हितकारिभिः ।
जनैः सहचरीणां च लब्धवर्णैर्निषेविते ॥ २० ॥
गर्भिणीपरिचर्यायां प्रौढैः पीयूषपाणिभिः ।
आप्तैर्भिषग्भिरश्रान्तमधिदेहलि संश्रिते ॥ २१ ॥
सुधालेपोल्लसद्भित्तिनिर्मित स्वस्तिकाद्भुते ।
स्फुरद्वितानपर्यन्त लुलन्मौक्तिक जालके ॥ २२ ॥
प्रत्यग्रपल्लवोपेते विकीर्णश्वेतसर्षपे ।
सद्यः सलिलसम्पूर्णसुवर्णकलशान्विते ॥ २३ ॥
द्वारदेशोभयप्रान्तालिखितोचितदैवते ।
परितः स्थापितानेकदीप्तमंगलदीपके ॥ २४ ॥
विहितौपयिकद्रव्यसंग्रहे सूतिकागृहे ।
दिव्य–तेजोमयी देवी दिव्यरूपा व्यराजत ॥ २५ ॥

१९–२५ पुढें ती दिव्यतेजोमय व दिव्यरूप राणी बाळंतघरांत (सूतिकागृहांत) शोभूं लागली. तेथें सुईणपणांत कुशल आणि कुलशीलवान, अशा वृद्ध स्त्रिया रात्रंदिवस बसल्या होत्या, नेहमीं मर्जीप्रमाणें वागणाऱ्या आणि तिला अतिशय जपणाऱ्या अशा प्रख्यात सख्या जवळ होत्या, गर्भिणीला उप-

चार करण्यांत अनुभविक, उत्तम हातगुणाचे आणि विश्वासू असे वैद्य अश्रांतपणें उंबऱ्यांत बसले होते, चुना दिल्यानें लखलखित दिसणाऱ्या भिंतीवर स्वस्तिकें काढलेलीं होतीं, त्याच्या शूभ्र छताच्या कडेला मोत्यांच्या जाळ्या झुलत होत्या, ताज्या पल्लवांनीं तें सुशोभित करण्यांत आलें होतें, पांढऱ्या मोहऱ्या सर्वत्र फेकण्यांत आल्या होत्या, तेथें ताज्या पाण्यानें भरलेले सुवर्ण कलश ठेवलेले होते, दाराच्या दोन्ही बाजूंस योग्य देवता काढलेल्या होत्या, सभोंवती पुष्कळ लखलखित मंगल दीप ठेवले होते, योग्य अशा सर्व वस्तूंचा संग्रह करण्यांत आला होता.

**भूबाणप्राणचन्द्राद्वैः सम्मिते शालिवाहने ।**
**शके संवत्सरे शुक्ले प्रवृत्तेचोत्तरायणे ॥ २६ ॥**
**शिशिरर्तौ वर्तमाने प्रशस्ते मासि फाल्गुने ।**
**कृष्णपक्षे तृतीयायां निशि लग्ने सुशोभने ॥ २७ ॥**
**अनुकूलतरैस्तुंगसंश्रयैः पञ्चभिर्ग्रहैः ।**
**व्यंजिताशेषजगतीस्थिरसाम्राज्यवैभवम् ॥ २८ ॥**
**अपारलावण्यमयं स्वर्णवर्णमनामयं ।**
**कमनीयतमग्रीवमुन्नतस्कन्धमण्डलम् ॥ २९ ॥**
**अलिकान्तमिलत्कान्तकुन्तलाग्रविराजितम् ।**
**सरोजसुन्दरदृशं नवकिंशुकनासिकम् ॥ ३० ॥**
**सहजस्मेरवदनं घनगंभीरनिस्वनम् ।**
**महोरस्कं महाबाहुं सुषुवे साभ्दुतं सुतम् ॥ ३१ ॥**

२६–३१ शालिवाहन शके १५५१ शुक्ल नाम संवत्सरीं उत्तरायणांत शिशिरऋतूमध्यें फाल्गून वद्य तृतीयेला रात्रीं शुभ लग्नावर, अखिलपृथ्वीचे साम्राज्यवैभव व्यक्त करणारे पांच ग्रह अनुकूल व उच्चीचे असतांना तिनें अलौकिक पुत्ररत्नास जन्म दिला. त्याचें लावण्य अपार, वर्ण सुवर्णासारखा, शरीर निरोगी, मान अत्यंत सुंदर व खांदे उंच होते; त्याच्या कपाळावर सुंदर कुंतलाग्रें पडल्यामुळें तें मोहक दिसत होतें; त्याचे नेत्र कमळाप्रमाणें सुंदर, नासिका ताज्या पळसाच्या पुष्पासारखी, मुख स्वभावतःच हसरें, स्वर मेघासारखा गंभीर; छाती विशाल आणि बाहू मोठे होते.

**तदा मुदा मानुषाणां सुराणां च सहस्रशः ॥**
**समं दुन्दुभयस्तस्य नादेन नदतोऽभवन् ॥ ३२ ॥**
**वादित्राण्यप्यवाद्यन्त विविधानि गृहे गृहे ।**
**प्रसीदन्ति स्म हरितः समस्ताः सरितस्तथा ॥ ३३ ॥**

**शनैः शनैस्तथा वाता वाताः सुरभिशीतलाः ।**
**हुतं हविरुपादत्त प्रसन्नश्च हुताशनः ॥ ३४ ॥**

३२–३४ त्यानें टाहो फोडल्याबरोबर ( उपजतांक्षणींच ) देव आणि मानव यांना आनंद होऊन त्यांचे सहस्रशः नगारे झडूं लागले. घरोघरीं नानाप्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. दिशा व नद्या स्वच्छ झाल्या; सुगंधित आणि शीतल असे वारे मंद मंद वाहूं लागले; आणि अग्नि प्रसन्न होऊन आंत टाकलेल्या आहुति स्वीकारूं लागला.

**श्रुतिस्मृतिर्धृतिर्मेधाः कान्तिः शान्तिक्षमादया ।**
**नीतिः प्रीतिः कृतिः कीर्तिः सिद्धिः श्रीश्च सरस्वती ॥ ३५ ॥**
**तुष्टिः पुष्टिश्च शक्तिश्च ह्रीश्च विद्या च सन्नतिः ।**
**तं देवं देवता एताः समेताः पर्यवारयन् ॥ ३६ ॥**

३५–३६ श्रुति, स्मृति, धृति ( धैर्य ), मेधा ( बुद्धि ), कांति, शांति, क्षमा, दया, नीति, प्रीति, कृति, कीर्ति, सिद्धि, लक्ष्मी, सरस्वती, तुष्टि, पुष्टि, शक्ति, लज्जा, विद्या आणि सन्नति ( सद्वंदन ) ह्या सर्व देवता त्या देवाभोंवतीं जमल्या.

**योद्धुमद्धापठानेन दर्याखानेन मानिता ।**
**शाहराजे महाराजे प्रयाते विषयान्तरम् ॥ ३७ ॥**
**अनुग्रहाय देवानां दैत्यानां निग्रहाय च ।**
**प्रभुःस जगतां प्रादुरभूद् भृशबलान्वये ॥ ३८ ॥**

३७–३८ गर्विष्ट दर्याखान पठाणाशीं निकराचें युद्ध करण्यासाठीं शहाजी महाराज दुसऱ्या प्रांतीं ( सह्याद्रीच्या लगत्यास ) गेले असतां, देवावर अनुग्रह आणि दैत्यांचा निग्रह करण्यासाठीं त्या जगत्प्रभूनें भोसल्यांच्या कुळांत अवतार घेतला.

**अतोऽजस्यापि जातस्य जातकर्म तदंजसा ।**
**व्यधीयत विधिज्ञेन यथाविधि पुरोधसा ॥ ३९ ॥**

३९ तेव्हां अज असून जन्मास आलेल्या त्या प्रभूचें जातकर्म लगेच विधिज्ञ पुरोहितानें यथाविधि केलें.

**यः स्वयं सर्वलोकस्य स्थित्यर्थमभवद्विभुः ।**
**सूक्तैः सूक्तविदस्तस्याप्याचरन् स्वस्तिवाचनम् ॥ ४० ॥**

४० जो स्वतः सर्व लोकांच्या रक्षणार्थ समर्थ होता त्याचेंहि स्वस्तिवाचन सूक्तवेत्यांनीं सूक्तांनीं केलें.

तदा तत्रावतीर्णस्य विष्णोर्मानुषवर्ष्मणः ।
तेजोभरेण महता निशापि दिवसायिता ॥ ४१ ॥

४१ मनुष्यदेह धारण करून विष्णु अवतीर्ण झाला असतां त्याच्या तेजोऽतिशयानें रात्रसुद्धां दिवसाप्रमाणें प्रकाशमान झाली.

आदित्या वसवो विश्वे रुद्राश्च समरुद्गणाः ।
यक्षाः साध्याश्च गन्धर्वास्तथा विद्याधरा अपि ॥ ४२ ॥
नन्दिनी प्रमुखा गावो नागाश्चैरावतादयः ।
सुरर्षयो नारदाद्याः संभूयाप्सरसस्तथा ॥ ४३ ॥
इन्द्रोऽग्निर्धर्मराजश्च नैर्ऋतश्चजलेश्वरः ।
पृषदश्वो धनेशश्च महेशश्च दिगीश्वराः ॥ ४४ ॥
अष्टाविमेऽश्विनौ देवौ सूर्याचन्द्रमसौ तथा ।
अन्येऽपि च सनक्षत्रा ग्रहाः सुभगविग्रहाः ॥ ४५ ॥
घटीमुहूर्ताहोरात्रपक्षमासर्तुवत्सराः ।
युगानि दिव्यादिव्यानि तथा मन्वन्तराणि च ॥ ४६ ॥
भुवो भारमपाकर्तुमवतीर्णे जगत्पतौ ।
संनिधाय स्वयं तत्र स्वस्तिवाचनमाचरन् ॥ ४७ ॥

४२--४७ आदित्य, विश्व, वसु, मरुद्गणांसह रुद्र, यक्ष, साध्य, गधर्व, विद्याधर, नंदिनीप्रमुख गाई, ऐरावतादि हत्ती; नारदादि देवर्षि, सर्व अप्सरा, इंद्र, अग्नि, यम, नैर्ऋत, वरुण, वायु, कुबेर, शंकर हे अष्ट दिक्पाल, आश्विनीकुमार, सूर्यचंद्र, तेजःपुंज ग्रह, आणि नक्षत्रें, घटी, मुहूर्त, अहोरात्र, पक्ष, मास, ऋतु, वर्ष, मानवयुगें, देवयुगें आणि मन्वंतरें ह्या सर्वांनीं पृथ्वीचा भार हलका करण्यासाठीं अवतीर्ण झालेल्या त्या जगत्प्रभूच्या संनिध येऊन त्याचें स्वस्तिवाचन केलें.

गणेशं जन्मदां षष्ठीं देवीं जीवन्तिकामपि ।
स्कन्दं नारायणं वंशं बलदेवं च लांगलम् ॥ ४८ ॥
शरासनं शरान् खड्गं विविधान्यायुधानि च ।
तत्तन्मन्त्रैः समभ्यर्च्य सूतिकागृहमन्तरा ॥ ४९ ॥
प्रयतः पंचमे षष्ठेऽप्यष्टमे नवमेऽहनि ।
रक्षन्तु बालमित्युक्त्वा प्रणम्य च पुरोहितः ॥ ५० ॥
क्षेत्रपालाय भूतेभ्यो राक्षसेभ्यो गृहाद्बहिः ।
बलीनदाद्योगिनीभ्यो दिक्पालेभ्योऽप्यनेकधा ॥ ५१ ॥

४८--५१ गणपति, जन्मदात्री षष्ठी देवी ( सटवाई ), जीवंतिका (जिवती) कार्तिकस्वामी, नारायण, मुरली (बांसरी), बळराम, नांगर, धनुष्य, बाण, तरवार, आणि नानाप्रकारचीं आयुधें यांची योग्य मंत्रांनीं पूजा त्या पुरोहितानें पवित्र होऊन, पांचव्या, सहाव्या, आठव्या आणि नवव्या दिवशीं बाळंतघरामध्यें केली; ह्या बाळाचें रक्षण करावें असें म्हणून नमस्कार केला आणि क्षेत्रपाल, भुतें, राक्षस, योगिनी, दिक्पाल यांना घराबाहेर अनेक प्रकारचे बलि दिले.

**त्रिजगज्जागरूकस्य जाते षष्ठी प्रजागरे ।**
**जने जनिविशेषेण दशमेह्नि महात्मनः ॥ ५२ ॥**
**ताम्रपर्ण्यथ कावेरी तुंगभद्रा मलापहा ।**
**कृष्णा ककुद्मती वेणा नीरा भीमरथी तथा ॥ ५३ ॥**
**गोदावरी च गायत्री प्रवरा वंजुला पुनः ।**
**पूर्णा पयोष्णी तापी च नर्मदा च महानदी ॥ ५४ ॥**
**क्षिप्रा चर्मण्वती मद्रा यमुना वेत्रवत्यपि ।**
**भागीरथी चन्द्रभागा गोमती गण्डकी तथा ॥ ५५ ॥**
**इरावती विपाशा च शतद्रुश्च सरस्वती ।**
**वितस्ता सरयूश्चापि तमसाच वधूसरा ॥ ५६ ॥**
**सिन्धघर्घरशोणाद्यैर्नदैर्निश्रेयसःप्रदैः ।**
**पुष्कराद्यैः सरोभिश्च सागरैश्च समन्विताः ॥ ५७ ॥**
**अलक्षितेन रूपेण नद्यः पुण्यतमा इमाः ।**
**तदा तस्या भिषेकाय सोत्सवाः समुपागमन् ॥ ५८ ॥**

५२--५८ तिनहि लोकांत जागरूक असणाऱ्या त्याचा षष्ठीजागर झाल्यावर लोकांमध्यें त्या महात्म्याचा जन्म महत्त्वाचा असल्यामुळें त्याच्या दहाव्या दिवशीं ताम्रपर्णी, कावेरी, तुंगभद्रा, मलप्रभा, कृष्णा, कोयना, वेणा, नीरा, भिमा, गोदावरी, गायत्री, प्रवरा, वंजुळा, पूर्णा, पयोष्णी, तापी, महानदी, क्षिप्रा, चंबळा, मद्रा, यमुना, वेत्रवती, भागीरथी, चंद्रभागा, गोमती, गंडकी, इरावती (रावी) विपाशा (बियास) शत्तद्रु, (सतलज), सरस्वती, वितस्ता ( झेलम ), सरयू, तमसा, वधूसरा ह्या अति पवित्र नद्या सिंधु, घर्घर, शोण इत्यादि मोक्षप्रद नद, पुष्करादि सरोवरें व सागर यांसह अदृश्य रूपानें मोठ्या आनंदानें त्या न्हाण्यासाठीं एकत्र जमल्या.

**देवसेना शची स्वाहा समृद्धिः सर्वे मंगळा ।**
**आदितिर्विनता संज्ञा सावित्री चाप्यरुन्धती ॥ ५९ ॥**

**तां शुक्तां तत्र बालेन तेनाप्रतिममूर्तिना ।**
**प्रसूतिकामस्नपयन् मिलिताः कुलयोषितः ॥ ६० ॥**

५९--६० देवसेना, शची, स्वाहा, समृद्धि, पार्वती (सर्वमंगळा), अदिति, विनता, संज्ञा, सावित्री, अरुंधती, या कुलस्त्रियांनीं जमून त्या अप्रतिम लावण्याच्या बाळासह त्या बाळंतिणीस न्हाऊं घातलें.

**जननीं रजनीरागरंजितांशुकधारिणीम् ।**
**अलंकारवतीमंकविनिवेशितबालकाम् ॥ ६१ ॥**
**दिनश्रियमिवोदारां नवोदितदिवाकराम् ।**
**नीराजनाभिः सुभगाः सुभ्रुवः समभावयन् ॥ ६२ ॥**

६१–६२ पिवळें वस्त्र परिधान केलेल्या अंगावर अलंकार घातलेल्या मांडीवर बालक घेतलेल्या आणि सूर्योदयींच्या दिनश्रीप्रमाणें सुंदर शोभणाऱ्या अशा त्या बालमातेस सुंदर सुवासिनींनीं ओंवाळिलें.

**यतःशिवगिरेर्मूर्ध्नि जातःस पुरुषोत्तमः ।**
**ततः प्रसिद्धा लोकेऽस्य शिव इत्याभिधाऽभवत् ॥ ६३ ॥**

६३ शिवनेरी किल्ल्यावर ह्या पुरुषश्रेष्ठाचा जन्म झाला म्हणून त्याचें " शिव " असें नांव लोकांत प्रसिद्ध झालें.

**करिष्यत्येष बलवानिह कर्मातिमानुषम् ।**
**म्लेच्छान्निहत्य महतीं कीर्तिं विस्तारयिष्यति ॥ ६४ ॥**
**जित्वावाच्यांश्च पाश्चात्यान् प्राच्यांश्च भुजतेजसा ।**
**तथोदीच्यांश्च विजयी स्वराज्यं संविधास्यति ॥ ६५ ॥**
**साहसी सागरमपि वश्यतामानयिष्यति ।**
**बली बलैर्दिगन्तेभ्यो बलीनानाययिष्यति ॥ ६६ ॥**
**प्रभावी गिरिदुर्गाणि वनदुर्गाणिचाप्ययम् ।**
**तथा सलिलदुर्गाणि स्थलदुर्गाणि गोप्स्याति ॥ ६७ ॥**
**बत दिल्लीपतेर्मूर्ध्निप्रतापेन तपन्नयम् ।**
**निजं चरणमाधाय जगदाज्ञापयिष्यति ॥ ६८ ॥**

६४--६८ हा सामर्थ्यवान् मुलगा ह्या लोकीं अलौकिक कर्में करील; म्लेच्छांचा निःपात करून आपली अतुल कीर्ति पसरवील; दक्षिण पश्चिम, पूर्व आणि उत्तर ह्या दिशा आपल्या बाहुबलानें जिंकून हा विजयी पुत्र स्वराज्य स्थापिल. हा धाडशी बालक समुद्रावरसुद्धां आपला अंमल बसवील. आणि आपल्या सैन्याच्या मदतीनें सर्व दिशांकडून खंडणी वसूल करील. हा प्रतापी पुत्र

गिरिदुर्ग, जलदुर्ग, वनदुर्ग, आणि स्थलदुर्ग, यांचें रक्षण करील. आणि विशेष गोष्ट ही कीं, हा आपल्या प्रतापानें दिल्लीपतीच्या मस्तकावर पाय देऊन सर्व जगावर आपली सत्ता स्थापील.

**सुदुर्गमेषु मार्गेषु गहनेषु गिरिष्वपि ।**
**सरित्सु च समुद्रेषु यस्याप्रतिहता गतिः ॥ ६९ ॥**
**स एष पाण्ड्यद्रविड लाटकर्णाटकेरळान् ।**
**करहाटवैराटान्ध्रमालवाभीरगुर्जरान् ॥ ७० ॥**
**आर्यावर्तांश्च दुर्म्लेच्छकृतावर्माननेकशः ।**
**कुरुजांगलसौवीरधन्वसौराष्ट्रकोसलान् ॥ ७१ ॥**
**वाह्लीकमद्रगान्धारत्रिगर्तानर्तसैन्धवान् ।**
**कालिंगकामरूपांगवंगकाम्बोजकेकयान् ॥ ७२ ॥**
**पारसीकान् शिबीन् शाल्वान्पुलिंदारट्टबर्बरान् ।**
**काश्मीरमत्स्यमगधविदेहोत्कलटंकणान् ॥ ७३ ॥**
**किरातकाशिपाञ्चालचेदीनपि च कुन्तलान् ।**
**खशांश्चशूरसेनांश्च हूणान् हैमवतानपि ॥ ७४ ॥**
**उंड्रान्पुंड्रान् ललित्थांश्च महितेन स्वतेजसा ।**
**चिरजीवी विनिर्जित्य महाराजो भविष्यति ॥ ७५ ॥**

६९--७५ दुर्गम मार्ग, गहन गिरि, नद्या आणि समुद्र यांच्यामध्यें ज्याची गति अकुंठित आहे असा हा शूर राजा, पाण्ड्य, द्रविड, लाट, कऱ्हाड, वांई, (वैराट) आंध्र, माळवा, आभीर, गुजराथ, आणि दुष्ट म्लेच्छांनीं धुडगूसलेला आर्यावर्त, कुरुजांगल, हास्तिनापूर, सौवीर (मुलतान), धन्व (मारवाड), सौराष्ट्र (काठेवाड), कोसल (अयोध्या), बाल्हीक, मद्र, कंदाहार, त्रिगर्त, द्वारका, सिंध, कालिंग, कामरूप (आसाम), अंग (बिहार), वंग, बंगाल, कांबोज, केकय, इराण, शिबि, शाल्व, पुळिंद, आरट्ट, बर्बर, काश्मीर, मत्स्य, मगध, विदेह, उत्कल, टंकण, किरात, काशि, पांचाल, चेदि, कुंतल, खश, शूरसेन, हूण, हैमवत, उंड्र, पुंड्र ललित्थ हे सर्व देश आपल्या उज्ज्वल पराक्रमानें जिंकून हा बहुत कालपर्यंत महाराजा होईल.

**यथा पृथुरभूत्पूर्वं यथा राजा पुरूरवाः ।**
**अम्बरीषोऽपि च यथा शिबिश्चौशीनरो यथा ॥ ७६ ॥**
**यथा जनिष्ट मांधाता यथा च निषधाधिपः ।**
**यथा बभूव भरतो यथा भूपो भगीरथः ॥ ७७ ॥**
**हरिश्चन्द्रः स च यथा रामो दाशरथिर्यथा ।**
**यथा च मिथिलाधीशो ययातिर्नहुषो यथा ॥ ७८ ॥**

त्वेपोल्लसाद्गीतिनिमित्तस्वस्तिकाङ्किते ॥ स्फुरद्वितानपर्यंतलुलन्मौक्ति
कजालके ॥२२॥ नवाम्रपल्लवोपेते विकीर्णश्वेतसर्षपे ॥ सद्यः सलिल
संपूर्णसुवर्णकलशान्विते ॥२३॥ द्वारदेशोभयप्रांतलिखितोचितदे
वते ॥ परितः स्थापितानेकदीप्रमंगलदीपके ॥२४॥ विहितोपयिक
द्रव्यसंग्रहे सूतिकागृहे ॥ दिव्यतेजोमयी देवी दिव्यरूपा व्यराजत ॥२५॥
स्वबाणप्राणखंडाद्यैः संमिते शालिवाहने ॥ शाके संवत्सरे शुक्ले प्रवृत्ते राम
चोत्तरायणे ॥२६॥ शिशिरर्तौ वर्तमाने प्रशस्ते मासि फाल्गुने ॥ कृष्णप

शिवभारतांतील शिवजन्माचा काल देणारे श्लोक.

क्षेत्तृतीयायां निशि लग्ने सुशोभने ॥२७॥ अनुकूलतरैस्तुंगसंश्रयैः पं
चभिर्ग्रहैः ॥ व्यंजिताशेषजगतीस्थिरसाम्राज्यवैभवं ॥२८॥ अपारलाव
ण्यमयं स्वर्णवर्णमनामयं ॥ कमनीयतमग्रीवमुन्नतस्कंधमंडलं ॥२९॥
अलिकांतमि[illegible]स्कांतकुंतलाग्रविराजितं ॥ सरोजसुंदरदृशं नवकिंशु
कनासिकं ॥३०॥ सहजस्मेरवदनं घनगंभीरनिस्वनं ॥ महोरस्कं म
हाबाहुं सुषुवे साद्भुतं सुतं ॥३१॥ तदा मुदा मानुषाणां सुराणां च सह
स्वराः ॥ समं दुंदुभयस्तस्य नादेन नदतो भवन् ॥३२॥ वादित्राण्यप्य

राम
३०

शिवभारतांतील शिवजन्माचा काल देणारे श्लोक

यथा धर्मधनोराजा धर्मराजो युधिष्ठिरः ।
भविष्यति तथैवायं शाहराजसुतः शिवः ॥ ७९ ॥
मध्येसभं दैवविदः सर्वसिद्धान्तपारगाः ।
एवमस्य कुमारस्य जन्मवेलामवीविदन् ॥ ८० ॥

७६–८० पृथु, पुरूरवा, अंबरीष, उशीनराचा पुत्र शिबि, मांधाता, नल, भरत, भगीरथ, हरिश्चंद्र, दशरथाचा पुत्र राम, जनक, ययाति, नहुष, धर्मिष्ठ युधिष्ठिर ह्यापूर्वीं होऊन गेलेल्या राजांसारखा च शहाजीचा पुत्र शिवाजी हाहि होईल. असें सर्व सिद्धांत ( ज्योतिषग्रंथ ) पारंगत ज्योतिष्यांनीं त्या मुलाचें जातक सभेमध्यें वर्तविलें.

प्रचीयमानावयवव्यक्तविग्रहभूषणम् ।
स्थितिप्रवीणलावण्यलब्धसौभाग्यवैभवम् ॥ ८१ ॥
विचित्रमणियुक्ताभिर्मुक्ताभिर्मंजुळात्मना ।
विभ्राजमानं हैमेन मुकुटेन शिरःस्पृशा ॥ ८२ ॥
लीलाचलाचलं भाले हैमं चलदलच्छदम् ।
दधानं विस्फुरन्मुक्तामाणिसूत्रान्तलम्बितम् ॥ ८३ ॥
अनर्घ्यहीरकिर्म्मीरपद्मरागमरीचिभिः ।
संभृतश्रीभरोदग्रे बिभ्राणं भुजभूषणे ॥ ८४ ॥
गुरुत्मद्रत्नसंपृक्तसाग्रव्याघ्रनखश्रिया ।
विन्यस्तयाभ्राजमानं कृष्णकाचमणिस्रजा ॥ ८५ ॥
सद्रत्ननिकरोदंचत् कांचनप्रतिमात्मिकाम् ।
देवीं जीवन्तिकानाम्नीमाबिभ्राणं भुजान्तरे ॥ ८६ ॥
प्रवाळनीळसंमिश्रसुवर्णमणिनिर्मिते ।
वलये ललिताकारे कलयन्तं करद्वये ॥ ८७ ॥
वतानन्दमयं दिव्यसूत्रसंबद्धमध्यमम् ।
विस्फुरद्गुल्फवलयं विलसन्मणिनूपुरम् ॥ ८८ ॥
विदग्धाभिःस्वयं स्निग्धलोचककांचितलोचनम् ।
भालान्तराळविन्यस्त चित्रकज्जलचित्रकं ॥ ८९ ॥
कमनीयतमस्वर्णकंचुकावृतविग्रहम् ।
धात्र्यःस्मेरमुखं प्रीतास्तंबालं पर्यपालयन् ॥ ९० ॥

८१–९० पुढें त्यास बाळसे आलें, तेव्हां तो गोंडस दिसूं लागला. कायम टिकणाऱ्या लावण्याच्या योगानें त्याला विलक्षण मोहकपणा आला होता; नानाप्रकारचीं रत्नें आणि मोत्यें यांनीं युक्त असें सोन्याचें सुंदर कुंचडें त्याच्या

डोक्यावर झळकत असे; चमकदार मोत्यांच्या हाराच्या टोकास लोंबणारें सोन्याचें पिंपळपान तो खेळतांना कपाळावर सारखें हलत असे; अमूल्य हिरे आणि चित्रविचित्र माणकें ( लाल ) यांच्या किरणांनीं ( तेजानें ) विलक्षण चकाकणारीं बाहुभूषणें त्याला घातलीं होतीं; पाचेनें जडित अणकुचिदार वाघनख जिच्यामध्यें पटविलें होतें अशी काळी पोत गळ्यांत घातल्यामुळें तो शोभत असे; उत्तम रत्नांच्या समूहामध्यें उठून दिसणारी जीवंतिका देवीची (जिवतीची) सुवर्णप्रतिमा त्याच्या छातीवर पडलेली असे; पोवळीं आणि नीळ यांनीं संमिश्रित सुवर्णमण्यांच्या मनगट्या त्याच्या हातांत घातलेल्या होत्या; अहाहा ! तो आनंदाची मूर्तीच होता ! त्याच्या कमरेत दिव्य करगोटा होता; पायांत लखलखित वाळे व चकाकणारे रत्नजडित चाळ होते; चतुर स्त्रियांनीं स्वतः त्याच्या डोळ्यांत चमकदार काजळ घातलेलें असे; कपाळाच्या मध्यभागीं सुरेख तीट लावलेली असे; अत्यंत सुंदर असें सोन्याचें आंगडें त्याच्या अंगात घातलेलें असे; अशा त्या हसतमुख बाळाला दाया मोठ्या प्रेमानें सांभाळीत असत.

**अन्तर्बहिश्चरोप्येष बहिर्विहितनिष्क्रमः ।**
**व्यधादसूर्ये पश्यायाः शिशुः सूर्यस्य दर्शनम् ॥ ९१ ॥**

९१ राजपत्नीच्या त्या बालकास—तो आंत आणि बाहेर सर्वत्र संचार करणारा- सर्वव्यापी असूनहि बाहेर नेण्यांत येऊन त्याला त्यांनीं सूर्यदर्शन करविलें.

**उपवेशनमप्यन्नप्राशनं च यथाविधि ।**
**अस्य राजकुमारस्य क्रमेण समजायत ॥ ९२ ॥**

९२ त्या राजकुमाराचे उपवेशन आणि अन्नप्राशन हे संस्कार यथाविधि आणि यथाक्रम करण्यांत आले.

**दर्याखानं शरैर्भित्वा नीत्वा निरवलेपताम् ।**
**विजयी शहराजोऽपि शिवगिरिमथाव्रजत् ॥ ९३ ॥**

९३ नंतर दर्याखानास आपल्या बाणांनीं विद्ध करून आणि त्याचा गर्व हरण करून विजयी होत्साता शहाजीराजा सुद्धां शिवनेरीस आला.

**स तत्र सोदरं शंभोरंभोजस्यमलोचनम् ।**
**व्यलोकत मुदोपेतः सदोदितपराक्रमः ॥ ९४ ॥**

९४ नित्य पराक्रम गाजवणारा तो शहाजीराजा, संभाजीचा धाकटा भाऊ जा कमलनेत्र शिवाजी त्यांचें आनंदानें मुखावलोकन करता झाला.

**गाः काञ्चनानिकरिणस्तुरगांश्च राजा ।**
**रत्नानि च प्रमुदितो व्यतरत्तदानीम् ॥**

**सद्यो यथात्र निरमुच्यत भूरि कालम् ।**
**सर्वोऽर्थिनामपि जनोऽन्यजनार्थनाभ्यः ॥ ९५ ॥**

९५ त्यासमयीं त्या राजानें आनंदित होऊन गाई, मोहरा, हत्ती, घोडे आणि रत्नें हीं इतकीं वांटली की लगेच सर्व याचक लोकांना दुसऱ्या कोणाकडे तोंड वेंगाडण्याची पुष्कळ काळपर्यंत आवश्यकता च राहिली नाहीं.

**अथ धराणिमघोनः सूनुरुच्चैर्धरित्रीम् ।**
**अधि सरसिजहस्तः संचरल्लोकबन्धुः ॥**
**निखिलतिमिरहारी बालसूर्योपमानः ।**
**प्रसभमभृतशोभां वर्धमानः क्रमेण ॥ ९६ ॥**

९६ आपलीं किरणें कमलांवर पाडून त्यांस विकसित करीत (लोकांस हर्षभरित करीत) पृथ्वीवर उंच (अतिशय) संचार करणारा प्रत्यक्ष सूर्य (लोकांचा मित्र) असा तो राजपुत्र बालसूर्याप्रमाणें सर्व अंधकार नाहींसा करीत हळु हळु वाढूं लागला तसा तो फारच सुंदर दिसूं लागला.

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरकवीन्द्रपरमानन्द प्रकाशितायां संहितायां शिवराजप्रभवो नाम षष्ठोऽध्यायः ॥**

---

# अध्याय ७ वा

कवीन्द्र उवाच

**अथ तं शिशुरूपेण ललन्तं ललितद्युतिम् ।**
**नजानीतः स्म पितरावमानुषमुरुक्रमम् ॥ १ ॥**

१ बालरूपानें खेळणारा तो सुंदर आणि गोजिरवाणा ( मुलगा ) हा अमानुष ( मनुष्य नव्हे ) विष्णु आहे हे त्या मातापितरांस समजलें नाहीं.

**अवतीर्णःक्षितितलं क्षोणीभारापनुत्तये ।**
**विहरन् बालरूपेण शाहराजनिकेतने ॥ २ ॥**
**जनयित्रीं जनं चापि रंजयन् निजया श्रिया ।**
**अचेष्टत स सर्वात्मा तत्र तत्तद्विचेष्टितम् ॥ ३ ॥**

२–३ पृथ्वीचा भार नाहीसा करण्यासाठीं भूतलावर अवतार घेऊन शहाजी राजाच्या वाड्यांत बालरूपानें विहार करणारा आणि आपल्या सौंदर्यानें जन्म देणारी आई व दुसरे लोक यांचें रंजन करणारा तो सर्वांतरात्मा विष्णु तेथें नानाप्रकारच्या लीला करूं लागला.

**सुत्रामकांक्षितं कर्तुं दितेः पुत्राननेकशः ।**
**संगरे संगरे हत्वा चतुर्बाहुरुदायुधः ॥ ४ ॥**
**यः श्रान्त इव निद्राति मध्ये दुग्धमहोदधेः ।**
**जननीस्तन्यपानाय व्यतानीद्रुदितानि सः ॥ ५ ॥**

४–५ इंद्राचें इष्ट कार्य करण्यासाठीं प्रत्येक युद्धांत दैत्यांस अनेक वेळां मारून जो शस्त्र उपसलेला विष्णु जणूं काय थकून जाऊन क्षीरसागरामध्यें निद्रा घेतो तो आईचें दूध पिण्यासाठीं रडत असे !

**शिशुलीलाधरो रिंगन्स हरिन्माणिभूमिषु ।**
**प्रतिबिंबितमात्मानं बलेनदातुमैहत ॥ ६ ॥**

६ बाललीला करणारा तो ( बालक ) पाचेच्या भूमीवर रांगत असतां तींत आपलें प्रतिबिंब पडलेलें पाहून तें जोरानें पकडूं पाहात असे.

**जानुभ्यां रिंगतस्तस्य पदांबुजतलत्विषा ।**
**पद्मरागश्रियं प्रापुः प्रांगणस्थास्सितोपलाः ॥ ७ ॥**

७ तो गुडघ्यांवर रांगत असतां त्याच्या पायांच्या तळव्याच्या लालीच्या योगानें अंगणांतील स्फटिक माणकांसारखे दिसत.

**धूलिधूसरितांगस्य रिंगतोस्य गृहांगणे ।**
**रंजयामास जननीं मणिमंजीर शिंजितम् ॥ ८ ॥**

८ धुळीनें आंग भरून घेऊन तो वाड्याच्या अंगणांत रांगत असतां पायांतील रत्नांच्या चाळांचा छुमछुम आवाज मातेला रमवीत असे.

**स लीलातरलस्तत्ररिंगन्मणिमयेंगणे ।**
**बतात्मप्रतिबिंबेन प्रास्पर्धत पदे पदे ॥ ९ ॥**

९ रत्नमय अंगणामध्ये खेळतांना तुरतुर रांगणारा तो ( बालक ) आपल्या प्रतिबिंबाशीं स्पर्धा करीत असे.

**अपिबन्यत्प्रसादेन सुधां सर्वे सुधान्धसः ।**
**अहो सोपि मुदं प्रापदास्वाद्य मृदुलां मृदम् ॥ १० ॥**

१० अहो ! ज्याच्या कृपेनें सर्व देवांना अमृतप्राशन करण्यास मिळालें त्याला स्वतःला मऊ माती खाऊन आनंद होत असे, हे आश्चर्य नव्हे काय ?

**छलयन् यो बलिंलोकांस्त्रीन्ललंघे त्रिभिः क्रमैः ।**
**बतालंघत यत्नेन सदेवो गेह देहलीम् ॥ ११ ॥**

११ ज्यानें बलीस फसवून तीनहि लोकांचें तीन पावलांनीं आक्रमण केलें त्या देवाला घरचा उंबरठा ओलांडण्यास प्रयास पडत !

**सप्तानामपि लोकानां योवलंबः स्वयं प्रभुः ।**
**उदतिष्ठदहो धृत्वा सोपि धात्रीकरांगुलिम् ॥ १२ ॥**

१२ जो प्रभु स्वतः सातहि लोकांचा ( भुवनांचा ) आधार आहे तो मुद्दा दाईचें बोट धरून उठत असे !

**धवलोपलबद्धासु भित्तिषु प्रतिबिंबितम् ।**
**बिंबमंशुमतो वीक्ष्य तर्जन्यग्रेणदर्शयन् ॥ १३ ॥**
**आदाय निजहस्तेन मह्यं देहीत्यहोरुदन् ।**
**समुग्ध इव मौग्ध्येन मातरं पर्यहासयत् ॥ १४ ॥**

१३–१४ स्फटिकाच्या भिंतींत पडलेलें सूर्याचें प्रतिबिंब पाहून तें बोटानें दाखवून ' तूं आपल्या हातानें घेऊन मला दे ' असें म्हणून तो रडूं लागे आणि वेडेपणामुळें आईकडून वेड्यासारखें हसें करून घेई.

**स्वहस्तपुष्करोध्दूत धूळिधूसरमस्तकम् ।**
**उद्भिद्यमानदंताग्र कुंदकुड्मळ भूषितम् ॥ १५ ॥**
**ललंतं निलयद्वारि द्विरदस्येव शावकम् ।**
**विनेतुमागताधात्री विलोक्य स्तिमिताभवत् ॥ १६ ॥**

१५-१६ ज्याला नुकतेच सुळे फुटले आहेत, असा हत्तीचा छावा आपल्या शुंडाग्रानें मस्तकावर धूळ उडवून घेतो, त्याप्रमाणें कुंदकळयासारखे शुभ्र दांत ज्याला नुकतेच येऊं लागले आहेत अशा आणि आपल्या हस्तकमलांनीं डोक्यावर धूळ उडवून घेऊन वाड्याच्या दरवाज्यापुढें खेळणाऱ्या त्या बालकास शिक्षा करण्यास( शिस्त लावण्यास ) आलेली दाई त्यास पाहून स्तब्ध होई.

**स धात्री करतालीभिः संवर्धितकुतूहलः ।**
**कुरुतेस्म स्मेरमुखो लास्यलीलामनेकधा ॥ १७ ॥**

१७ दाई टाळ्या वाजवूं लागली की, त्याची गंमत वाटून तो हास्यवदन करून अनेक प्रकारे नाचूं बागडूं लागे.

**अपाठयद्विधातारं निगमान्यः सलक्षणान् ।**
**सोपि धात्रीमुखात्तत्तन्नामधेयमपीपठत् ॥ १८ ॥**

१८ ज्यानें ब्रह्मदेवाला लक्षणांसह वेद पढविले तो स्वतः दाईच्या तोंडून निरनिराळे शब्द शिकत असे.

**उत्तार्योतार्य तरसा स्वरसात्ससमर्धकः ।**
**व्यश्राणयदलंकारान् धात्रीभ्यस्स्वशरीरतः ॥ १९ ॥**

१९ इच्छिलेले पुरविणारा तो ( विष्णु ) खुषीत आला असता आपल्या अंगावरील दागिने भराभर उतरून दायाना देत असे.

**अनादृत्यापितुस्तांस्तान् द्विपान्दसांस्तथाहयान् ।**
**प्रभुर्मंतुममंतुंच वह्वमंस्त स मृन्मयान् ॥ २० ॥**

२० बापाचे मत्त हत्ती आणि घोडे यांपैकीं वाटतील ते पसत वा नापसत करण्यास तो पूर्ण मालक असतां ते टाकून, तो मातीचे हत्ती घोडे च अधिक पसंत करी.

**स्पृहयालुश्शिखंडेभ्यः शोभमानाशिखंडकः ।**
**अन्वधावदहोडिंभः सखंडानिशिखंडिनाम् ॥ २१ ॥**

२१ झुल्पांच्या योगे शोभणारा तो बालक मोरांची पिसे घेणाच्या इच्छेने मोरांच्या कळपामागे धावत असे !

**शिखिनां च शुकानां च पिकानां च रुतान्यसौ ।**
**विकुर्वाणोनुकुर्वाणस्तत्तद्भ्रमकरोभवत् ॥ २२ ॥**

२२ मोर, पोपट आणि कोकिळ यांच्या आवाजांची तो इतकी हुबेहूब नक्कल करीत असे कीं, प्रत्यक्ष तेच पक्षी ओरडत आहेत असे भासवी.

**स एष किल कुर्वाणः शिशुश्शार्दूळ शाब्दितम् ।**
**पार्श्ववर्ती स्नेहपात्रीमपिधात्रीमभीषयत् ॥ २३ ॥**

२३ तो जवळ उभा राहून एकदम वाघासारखी गर्जना करून आपल्या प्रेमळ दाईस मुद्दां भेवडावीत असे.

**अभ्रांतोपिभ्रमरवद् भ्रामिं भ्रांतः कदाचन ।**
**हृष्टो हय इवहेषामहेपत कदाचन ॥ २४ ॥**

२४ तो भ्रमरहित असूनहि कधीं भ्रमराप्रमाणें गरगर फिरत असे; हर्षभरित होत्साता कधीं घोड्याप्रमाणें खिंकाळत असे.

**उच्चैरुद्चेरद्दन्ति बृंहितानि कदाचन ॥ २५ ॥**

२५ कधीं हत्तीप्रमाणें मोठ्यानें चीत्कार करी;

**पूरयद्भिर्धरांद्यां च गभीरमधुरस्वरैः ।**
**सोभिमानपरोभेरीमन्वकार्षीत् कदाचन ॥ २६ ॥**

२६ आपल्या गंभीर आणि मधुर स्वरानें आकाश आणि पृथ्वी दुमदुमवून सोडीत तो कधीं ऐटीनें दुंदुभीसारखा आवाज करी.

**मृत्कूटान्यपि तुंगानि कारयन् स किशोरकैः ।**
**इमानि ममदुर्गाणीत्यवोचत कदाचन ॥ २७ ॥**

२७ कधीं मुलांकडून मातीचीं उंच शिखरे च करवून 'हे माझे गड' असें म्हणे

**निलीनः सद्मनः कोणे दृङ्गनिमीलनकेलिषु ।**
**अन्विष्य सखिभिः स्पृष्टो हसतिस्म कदाचन ॥ २८ ॥**

२८ कधीं ( लपंडाव ) ' आंधळी कोशिंबीर ' खेळतांना वाड्याच्या कोपऱ्यांत लपून बसला असतां सोबती त्यास हुडकून काढून शिवलें कीं तो हसत असे.

**पतितं पाणिना हस्तादुत्पततं मुहुर्मुहुः ।**
**अताडयत् पातयितुं कन्दुकंच कदाचन ॥ २९ ॥**

२९ कधीं हातांतून पडलेल्या चेंडू पुनः पुनः उड्या घेत असतां त्यास खालीं पाडण्यासाठीं हातानें मारीत असे.

**आत्मनोत्पातितंदूरात् पतंतं व्योममंडलात् ।**
**कंदुकं कृष्णसाराक्षः पश्यन्नवहितोन्मुखः ॥ ३० ॥**
**नृत्यन्निव पदद्वंद्व तलताडितभूतलः ।**
**प्रोत्तानिताभ्यां पाणिभ्यामग्रहीत्स कदाचन ॥ ३१ ॥**

३०-३१ कधीं आपण उंच उडविलेला चेंडू आकाशांतून खालीं पडतांना वर तोंड करून त्याकडे लक्षपूर्वक पाहात हात उंच करून भूमिवर जणूं काय नाचत नाचत तो झेलीत असे.

**दृष्टो हरति यस्तूर्णं जन्मिनां जननभ्रमम् ।**
**अभ्रामयद्देहोदारुभ्रमरं स कदाचन ॥ ३२ ॥**

३२ ज्याचें दर्शन झालें कीं, प्राणी जन्ममरणाच्या भोवऱ्यांतून त्वरित मुक्त होतात तो मुद्धां कधीं स्वतः लाकडांचा भोंवरा फिरवी.

**प्रतिषिद्धोऽपिधात्रीभिस्तर्जनी तर्जनादिना ।**
**शाहसिंहशिशुस्तांस्तां शिशुलीलां व्यगाहत ॥ ३३ ॥**

३३ बोटानें दटावणें इत्यादि उपायांनीं दायांनीं त्यास मनाई केली तरी तो शहाजीचा पुत्र त्या त्या बाललीलेंत गर्क होई.

**भुंक्ष्वेत्युक्तोऽपिनाभुंक्त पिबेत्युक्तोऽपिनापिबत् ।**
**अनुनीय स धात्रीभिः शेष्वेत्युक्तोऽपिनास्वपत् ॥ ३४ ॥**

३४ ‘ खा ’ म्हटलें तरी खात नसे, ‘ पी ’ म्हटलें तरी पित नसे, आणि दायांनी त्यास आळवून ‘ नीज ’ म्हटलें तरी निजत नसे.

**तत्तद् खेलावसक्तात्मा स आत्मा जगतः परः ।**
**समाहूतो जनन्यापि व्यधाद्दूरमपाक्रमम् ॥ ३५ ॥**

३५ त्या त्या खेळांत गर्क असलेला तो श्रेष्ठ जगदात्मा प्रत्यक्ष आईनें बोलाविलें तरी दूर पळून जाई.

**यत्रयत्राव्रजद् बाललीला रसवशः शिवः ।**
**तमन्वपालयंस्तत्र तत्रदेवास्सवासवाः ॥ ३६ ॥**

३६ बालपणच्या खेळाच्या नादानें शिवाजी जेथें जेथें जाई तेथें तेथें इंद्रादि सर्व देव त्याचें रक्षण करीत.

**यः श्रीमान् करुणानिधिः सुमनसामाधारभूतः स्वयं**
**संजातः किल शाहभूपभवने हर्तुं धरित्रीभयम् ।**
**वेदांतैः पठितः पुराणपुरुषः ख्यातः पुराणेषु य**
**स्तं प्राप्य श्रियमाबभार महतीं बाल्याभिधानं वयः ॥३७॥**

३७ करुणेचा सागर, देवांचा आधार, वेदांनीं वर्णिलेला, पुराणांमध्यें प्रसिद्ध असलेला, अशा ज्या भागवान विष्णूनें शहाजी राजाच्या घरीं स्वतः अवतार घेतला त्याला बालपण प्राप्त होऊन तें अतिशय शोभूं लागलें.

**इत्यनुपुराणे कवींद्रपरमानंदविरचिते शिशुलीला-**
**वर्णनं नाम सप्तमोऽध्यायः ७**

---

श्रीभवानी.



शिवाइ (शिवनेरी.)



भवानी (प्रतापगड.)

# अध्याय ८ वा

**मनीषिण ऊचुः ।**

**शिवनेरीगिरौ जातः शिवराज इति त्वया ।**
**परमानन्द संप्रोक्तमस्ति नस्तत्र संशयः ॥ १ ॥**

पंडित म्हणाले:—

१ अहो परमानंद, शिवाजी राजा शिवनेरी किल्ल्यावर जन्मला असें आपण सांगितलेत त्याविषयीं आम्हांस शंका आहे.

**स हि शैलो निजामस्य प्रियकारी महायशाः ।**
**प्रतापी प्रथितो लोके धारागिरिरिवापरः ॥ २ ॥**
**अभूदागमनं तत्र यथा शाहमहीपतेः ।**
**तथा कथय नः सर्वं भट्टगोविंदनन्दन ॥ ३ ॥**

२–३ कारण तो किल्ला निजामशाहाचा आवडता, यशस्वी आणि बळकट असून जणूं काय दुसरा देवगिरी ( दौलताबाद ) म्हणून लोकांत विख्यात होता.

**कवीन्द्र उवाच ।**

**सुधामिवातिमाधुर्यवतीं पुण्यवतीमिमाम् ।**
**कथां शाहनरेन्द्रस्य शृणुत द्विजसत्तमाः ॥ ४ ॥**

कवींद्र म्हणाला:—

४ हे द्विजश्रेष्ठांनो, ही अमृताप्रमाणें अत्यंत मधुर आणि पवित्र अशी शहाजी राजाची कथा श्रवण करा—

**अस्तंगतेऽम्बरमणिप्रतापे बर्बरेऽम्बरे ।**
**निर्मन्त्रिणि निजामे च स्थितिसंजातसंशये ॥ ५ ॥**
**दिवंगते दैवयोगादिभरामेऽनुभाविनि ।**
**तत्सुते महमूदे च दृप्ते तत्पदवर्तिनि ॥ ६ ॥**
**सैन्ये साहिजहानस्य दिल्लीन्द्रत्वमुपेयुषः ।**
**दाक्षिणां दिशमादातुमवलेपादुपागते ॥ ७ ॥**
**प्रतनेनानुबंधेन निजामोपचिकीर्षया ।**
**शाहराजो महाबाहुर्विजयाह्वं पुरं जहौ ॥ ८ ॥**

५-८ सूर्याप्रमाणें प्रतापी असा मलिकंबर बर्बर हा अस्तंगत झाला आणि निजामशहाला दुसरा चांगला प्रधान न मिळाल्यानें त्याचें राज्य कसें टिकतें याची शंका उपस्थित झाली. तसेंच दैववशात् चतुर इब्राहिम आदिलशहा दिवंगत होऊन त्याचा उन्मत्त मुलगा महंमदशहा त्याच्या गादीवर आला. इकडे शाहाजहान हा दिल्लीचा बादशहा झाला आणि त्याचें सैन्य दक्षिण जिंकण्यासाठीं मोठ्या घमेंडीनें आलें. अशा वेळीं आपला पुरातन संबंध ओळखून निजामशहाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें बलाढ्य शहाजी राजा विजापूर सोडून त्याच्याकडे आला.

**अथ यादवराजोऽपि हित्वा ताम्रानुयायिताम् ।**
**पक्षपाती निजामस्य धारागिरिमुपागमत् ॥ ९ ॥**

९ पुढें जाधवराव सुद्धां मोंगलांचें अनुयायित्व टाकून दौलताबादेस निजामशहाच्या पक्षास येऊन मिळाला.

**अत्रान्तरे निजामस्य भृशं विश्रंभभाजनम् ।**
**वंश्यो विश्वासराजस्य शिवभक्तो महाव्रतः ॥ १० ॥**
**तनयः सिद्धपालस्य सुप्रसिद्धोऽतिवैभवः ।**
**शिवनेरिगिरिस्थायी नृपतिर्विजयाह्वयः ॥ ११ ॥**
**वराय शम्भुराजाय शाहराजसुताय वै ।**
**जयन्तीमात्मतनयामनुरूपाममन्यत ॥ १२ ॥**

१०-१२ ( याच्या ) दरम्यान विश्वासराजाच्या कुळांतील सिद्धपालाचा मुलगा शंकरभक्त, कर्तृत्ववान, सुप्रसिद्ध व अत्यंत वैभवशाली विजयराज हा निजामशहाचा अत्यंत विश्वासू असून तो शिवनेरी किल्ल्यावर राहात असे. त्यास आपली जयंती नांवाची मुलगी शहाजीचा पुत्र संभाजी यास अनुरूप आहे असें वाटलें.

**शाहराजोऽपि संबंधं तं सुश्लाघ्यतमं भुवि ।**
**संविचिन्त्य स्नुषात्वेन जयन्तीं तमयाचत ॥ १३ ॥**

१३ शहाजी राजास सुद्धां तो संबंध अत्यंत श्लाघ्य वाटून त्यानें आपल्या मुलासाठीं जयंतीची मागणी त्याजपाशीं केली.

**ततो विजयराजस्य शाहराजस्य चोभयोः ।**
**अभूद्यथोक्तसंबंधसुप्रयुक्तो महोत्सवः ॥ १४ ॥**

१४ पुढें विजयराजा आणि शहाजी राजा या दोघांच्या संबंधास साजेसा मोठा समारंभ झाला.

**विश्वासराजवंश्यानां भूपानां भूरितेजसाम् ।**
**तथा भृशबलानां च समवायो महानभूत् ॥ १५ ॥**

१५ विश्वासराजाच्या वंशातील अत्यंत तेजस्वी राजांचें आणि भोंसल्यांचें मोठें वऱ्हाड जमलें.

**स तयोः श्लाघ्यगुणयोर्जयन्तीशंभुराजयोः ।**
**शिवनेरिगिरावासीत्पाणिग्रहमहो महान् ॥ १६ ॥**

१६ जयंती आणि संभाजी ह्या प्रशंसनीय गुणांच्या जोडप्याचा लग्नसमारंभ शिवनेरी किल्ल्यावर मोठ्या थाटानें झाला.

**अथो कतिपयाहोभिस्तं समाप्य महोत्सवम् ।**
**तस्यैवच गिरेर्मूर्ध्नि स्वजनेन समन्विताम् ॥ १७ ॥**
**संबंध्यनुमतः पत्नीमन्तर्वत्नीं निधाय ताम् ।**
**प्रतस्थे शाहनृपतिर्दर्याखानजिगीषया ॥ १८ ॥**

१७–१८ नंतर कांहीं दिवसांनीं तो समारंभ आटोपल्यावर व्याह्याच्या संमतीनें आपल्या गरोदर पत्नीस स्वजनांसह त्याच किल्ल्यावर ठेवून शहाजी राजा दर्याखानास जिंकण्यास निघाला.

**शिवनेरिगिरौ ह्यासीच्छाहस्यागमनं यथा ।**
**तथा कथितवानस्मि किमथ श्रोतुमिच्छथ ॥ १९ ॥**

१९ शिवनेरी किल्ल्यावर शहाजी राजाचें आगमन कसें झालें हें मीं सांगितलें. आणखी काय ऐकण्याची आपली इच्छा आहे ?

**मनीषिण ऊचुः ।**

**सद्यो दिल्लीश्वरं हित्वा पक्षपातिन्युपागते ।**
**महाव्रते महाराजे यदुराजे महाभुजे ॥ २० ॥**
**अभिक्रमपरैस्ताम्रमुखैर्योद्धुं समुद्यते ।**
**अभीप्समानः स्वाभीष्टं निजामः किमचेष्टत ॥ २१ ॥**

पंडित म्हणाले:—

२०–२१ दिल्लीच्या बादशहास एकदम सोडून निजामशहाचा कैवारी, कर्तृत्ववान्, बलाढ्य राजा जाधवराव आला व चाल करून येणाऱ्या मोंगलांशीं युद्ध करण्यास सज्ज झाला असें असतां आपलें अभीष्ट साधण्यासाठीं निजामशहानें काय केलें ?

**कवीन्द्र उवाच ।**

**अथ दैवान्निजामस्य विषयाविष्टचेतसः ।**
**हन्त दुर्मन्त्रिणो योगाज्जज्ञे मतिविपर्ययः ॥ २२ ॥**

कवींद्र म्हणाला:—

२२ दैवयोगानें विषयासक्त झालेल्या निजामशहास दुष्ट मंत्री मिळून त्याची बुद्धि फिरली.

**तस्य मत्तस्य सविधे ययौ साधुरसाधुताम् ।**
**प्रियवादपरोऽत्यर्थमसाधुरपि साधुताम् ॥ २३ ॥**
**विपरीतदृशा तेन गुरवोऽपि लघूकृताः ।**
**गुणोपेताश्च गुरवो नीताः शीघ्रमगौरवम् ॥ २४ ॥**

२३-२४ त्या उन्मत्त सुलतानास सज्जन दुर्जनासारखा वाटूं लागला व हांजी हांजी करणारा अत्यंत दुष्ट माणूस सुद्धां सज्जन वाटूं लागला. त्याच्या दृष्टील विपरीत भासावयास लागल्यामुळें वडीलधाऱ्या माणसास तो तुच्छ लेखूं लागला व पोक्त सल्लामसलतगारांच्या गुणांबद्दल त्याची आदरबुद्धि नष्ट झाली.

**अव्यवस्थितचित्तस्य मत्तस्य मधुनान्वहम् ।**
**अवद्यवादिनस्तस्य बत राष्ट्रमहीयत ॥ २५ ॥**

२५ चंचल स्वभावाच्या व दररोज दारूनें बेहोष होऊन निंद्य भाषण करणाऱ्या त्या निजामशहाचें राज्य अगदीं खालावत चाललें.

**अथ प्रणंतुमायातमतीवप्रतिभान्वितम् ।**
**निजामो यादवाधीशमवमेने सुदुर्मतिः ॥ २६ ॥**

२६ ( अशा स्थितींत ) अत्यंत तेजस्वी जाधवराव एकदां त्यास मुजरा करण्यास आला असतां त्या दुर्बुद्धि निजामशहानें त्याचा अपमान केला.

**अवज्ञातो निजामेन महामांनी महामनाः ।**
**यदुराजस्तदा वीररसावेशवशोऽभवत् ॥ २७ ॥**

२७ निजामशहाकडून असा अपमान झाला तेव्हां त्या महामानी व बाणेदार जाधवरावास फार संताप आला.

**अथ सेनाधिपतयो हमीदाद्यास्सुदुर्मदाः ।**
**दुर्मन्त्रिते निजामेन पूर्वमेव प्रबोधिताः ॥ २८ ॥**
**साभिमानं परावर्तमानं मत्तमिव द्विपम् ।**
**आस्थानीतोरणोपान्ते रुरुधुर्यादवेश्वरम् ॥ २९ ॥**

२८-२९ मग हमीदादि दुष्ट सेनापतींना निजामशहानें हा दुष्ट बेत अगोदरच सांगून ठेविला होता. त्यांनीं मस्त हत्तीप्रमाणें संतापानें परत फिरणाऱ्या जाधवरावास सभागृहाच्या द्वारापाशींच घेरलें.

**स तत्र बहुभिर्युध्यन् सपुत्रामात्यबान्धवः ।**
**प्रत्युद्यातः सुरगणैः सुरलोकमलोकत ॥ ३० ॥**

३० आपले पुत्र, अमात्य, बांधव यांसह तेथें पुष्कळ लोकांशीं लढतां लढतां त्यानें स्वर्गलोकाची वाट धरली.

**यथा मेरोर्विपर्यासः पातो भानुमतो यथा ।**
**यथा ह्यन्तः कृतान्तस्य दाहः पत्युरपां यथा ॥ ३१ ॥**
**तथा यादवराजस्य तदा तत्र बतात्ययः ।**
**सप्तानामपिलोकानामभूदत्यहितावहः ॥ ३२ ॥**

३१–३२ जसें मेरूचें उलथून पडणें किंवा सूर्याचें खालीं पडणें किंवा यमाचा अंत होणें किंवा वरुणाचा दाह होणें तसा जाधवरावाचा तेथें झालेला अंत सातहि लोकांस अत्यंत अहितकारक झाला.

**तदवस्थमथ श्रुत्वा श्वशुरं यादवेश्वरम् ।**
**शाहो निजामसाहाय्याद्विरराम महायशाः ॥ ३३ ॥**

३३ आपला सासरा जाधवराव याची झालेली ती दशा ऐकून कीर्तिशाली शहाजी राजानें निजामास साहाय्य करण्याचें सोडून दिलें.

**अथ तापीतटात्तूर्णमेत्य ताम्रपताकिनी ।**
**अधिष्ठितं निजामेन धारागिरिमवेष्टयत् ॥ ३४ ॥**

३४ पुढें तापी नदीच्या तीराहून मोंगलाचें सैन्य त्वरेनें आलें आणि निजामशहाची राजधानी जी दौलताबाद तिला वेढा दिला.

**समुह्य स्वां महामानी तदानीमेव येदिलः ।**
**पृतनां प्रेषयामास लुब्धो धारागिरिं प्रति ॥ ३५ ॥**

३५ त्याच वेळीं महामानी व लोभी आदिलशहानें आपलें सैन्य जमवून दौलताबादेवर पाठविलें.

**सैन्यं साहिजहानस्य महमूदस्य चान्वहम् ।**
**अयुध्येतां मिथस्तत्र धारागिरिजिघृक्षया ॥ ३६ ॥**

३६ दौलताबाद घेण्याच्या इच्छेनें शहाजहानाच्या व महंमूद आदिलशहाच्या सैन्यामध्यें परस्पर दररोज लढाई होऊं लागली.

**स्वयं निजामशाहोऽपि धारागिरिशिरस्थितः ।**
**तदा ताभ्यामपि द्वाभ्यामनीकाभ्यामयुध्यत ॥ ३७ ॥**

३७ स्वतः निजामशहासुद्धां देवगिरीच्या माथ्यावरून त्या दोन्ही सैन्यांशीं लढूं लागला.

**ततोऽतिबलिभिस्ताम्रबलैर्युध्याद्भिरंजसा ।**
**महमूदस्य चानीकैर्निजामः पर्यभूयत ॥ ३८ ॥**

३८ पुढे मुख्यत्वेंकरून मोंगलांच्या अत्यंत प्रबळ सैन्याकडून आणि महंमूद आदिलशहाच्या सैन्याकडून निजामशहाचा तेव्हांच पराभव झाला.

ततः स तेन शैलेन सैन्येन विविधेन च ।
यथाजातेन च तथा फतेखानेन मन्त्रिणा ॥३९॥
परिग्रहेण सर्वेण कोषेण च महीयसा ।
ममज्ज सहितस्तत्र ताम्राननबलार्णवे ॥ ४० ॥

३९–४० तेव्हां तो किल्ला, नानाविध सैन्य, मूर्ख मंत्री फत्तेखान, सर्व परिवार आणि विपुल खजिना यांसह तो निजामशहा मोगलांच्या सेना-समुद्रांत बुडाला.

मनीषिण ऊचुः ।

यस्याशीतिसहस्राणि तुरगाणां तरस्विनाम् ।
अशीतिरद्रिदुर्गाणां चतुर्भिरधिका पुनः ॥ ४१ ॥
स्थले जले च यस्यासन् बत दुर्गाण्यनेकशः ।
समृद्धो विषयो यस्य वशे विद्वेषि दुर्ग्रहः ॥ ४२ ॥
येन येदिलशाहस्य दिल्लीन्द्रस्य च मानिनः ।
पदे पदे बलं सर्वं जीवग्राहं व्यसृज्यत ॥ ४३ ॥
यस्याकास्मिकझंपस्य श्येनस्येवोत्पतिष्यतः
प्रभावेण न्यलीयन्त परिपंथिविहंगमाः ॥ ४४ ॥
स निजामस्तदा येन हेतुना विलयं गतः ।
शुश्रूषमाणान् नः सर्वान् कवीन्द्र तमुदीरय ॥ ४५ ॥

४१–४५ ज्याच्या जवळ ऐंशीं हजार चलाख घोडा, चौऱ्यांशी गिरीदुर्ग, जलदुर्ग आणि स्थलदुर्ग होते, ज्याच्या ताब्यांत समृद्ध व शत्रूंस अजिंक्य असा देश होता, ज्यानें आदिलशहाच्या आणि मानी दिल्लीपतीच्या सैन्याचा पावलो-पावलीं फडशा उडविला होता, चालून येणाऱ्या ससाण्याच्या झडपे प्रमाणें ज्याच्या आकस्मिक छाप्याच्या जोरामुळें शत्रुरूपी पक्षी लपून बसत त्या निजाम-शहाचा नाश कोणत्या कारणामुळें झाला तें ऐकण्याची आमची इच्छा आहे तेव्हा तें आम्हांस सांगावें.

कवीन्द्र उवाच ।

समस्तपालनपरे पितर्युपरतेऽम्बरे ।
भावितव्यानुसारेण फत्तेखानोऽल्पचेतनः ॥ ४६ ॥
अमात्यतां निजामस्य प्रतिपद्य प्रतापवान् ।
तापयामास जनतां कृतान्त इव निष्कृपः ॥ ४७ ॥

कवींद्र म्हणालाः—

४६-४७ सर्वांचें पालन करणारा पिता मलिकंबर निवर्तल्यावर त्याचा मुलगा क्षुद्रबुद्धि फत्तेखान यास दैवयोगानें निजामशाहाची वजिरी मिळाली; आणि तो यमाप्रमाणें क्रूर आणि प्रतापवान् फत्तेखान जनतेला पीडा देऊं लागला.

**निजामस्तस्य मन्त्रेण हमीदस्य च दुर्मतेः ।**
**यदाप्रभृति राजन्यं यदुराजं न्यघातयत् ॥ ४८ ॥**
**शाहराजप्रभृतयः तदाप्रभृति भूभृतः ।**
**सर्वे विमनसो भूत्वा म्लेच्छाश्च पृतनाभृतः॥ ४९ ॥**
**अविश्रंभादमर्षाच्च साध्वसाच्च समाकुलाः ।**
**शिश्रियुर्येदिलं केऽपि केऽपि दिल्लीन्द्रमश्रयन् ॥ ५० ॥**
**केचिच्च क्रूरमनसो विरुद्धत्वमुपाचरन् ।**
**तटस्थमिव चात्मानं बत केचिददर्शयन् ॥ ५१ ॥**

४८-५१ त्याच्या आणि दुष्ट हमीदखानाच्या सल्यानें जेव्हां निजामशहानें जाधवरावास ठार मारविलें तेव्हांपासून शहाजीप्रभृति सर्व राजे व मुसलमान सरदार यांचीं मनें विटून गेलीं. विश्वास उडाल्यानें, संताप आल्यानें व भीतीमुळें कित्येक आदिलशहास जाऊन मिळाले, कित्येकांनीं दिल्लीच्या बादशहाचा आश्रय केला, कित्येक क्रूर मनाचे लोक विरोध करूं लागले आणि कित्येकांनीं तर आपण तटस्थ आहोंत असें दाखविलें.

**तेन तेन तदा तस्य दुर्नयेन दुरात्मनः ।**
**अवृष्टिरजनिष्टोच्चैरनिष्टाय शरीरिणाम् ॥ ५२ ॥**

५२ त्या दुष्ट निजामशहाच्या अशा प्रकारच्या अनेक दुष्कृत्यांमुळें भयंकर अवर्षण पडून लोकांच्या फार हालअपेष्टा होऊं लागल्या.

**चिरस्य विषये तस्य न ववर्ष वृषा यदा ।**
**सस्यं सुदुर्लभमभूत्स्वर्णं तु सुलभं तदा ॥ ५३ ॥**

५३ पुष्कळ काळपर्यंत त्याच्या देशांत पाऊस न पडल्यानें धान्य अत्यंत महाग झालें आणि सोनें मात्र स्वस्त झालें.

**प्रस्थमात्राणि रत्नानि विनिमय्य धनीजनः ।**
**कथंचन समादत्त कुलत्थान्प्रस्थसंमितान् ॥ ५४ ॥**

५४ श्रीमंत लोक शेरभर रत्नें देऊन मोठ्या प्रयासानें शेरभर कुळीथ घेत.

**आहाराभावतोऽत्यर्थं हाहाभूताः परस्परम् ।**
**पशून्वै पशवो जक्षुर्मानुषा अपि मानुषान् ॥ ५५ ॥**

५५ खाण्यास कांहीं न मिळाल्यामुळें एकच हाहाकार उडून जाऊन पशू पशूंस आणि माणसें माणसांस अशीं परस्परांस खाऊं लागलीं.

**तेनावर्षेण महता परचक्रागमेन च ।**
**अभावेन च मौलानामनीकस्य च भूयसः ॥ ५६ ॥**
**अनुक्षणं क्षीयमाणस्ताम्रास्यैरनुभाविभिः ।**
**धृतो धारागिरिपतिः फत्तेखानश्च दुर्मतिः ॥ ५७ ॥**

५६–५७ त्या भयंकर अवर्षणामुळें, परचक्र आल्यामुळें, पिढीजाद–जुन्या प्रधानांच्या आणि विपुल सैन्याच्या अभावामुळे क्षणोक्षणी क्षिण होत जाणारा निजामशहा आणि त्याच्याबरोबरच दुष्ट फत्तेखान प्रबल मोगलांच्या हातीं सापडले.

**अनुकूलेन कालेन सर्वं धत्तेऽनुकूलताम् ।**
**प्रतिकूलेन तेनैव सकलं प्रतिकूलताम् ॥ ५८ ॥**

५८ काळ अनुकूल असतां सर्व कांहीं अनुकूल होते आणि ताच प्रतिकूल झाला असतां सर्व कांहीं प्रतिकूल होते.

**यस्यानुकूलो भगवान् काल एष सनातनः ।**
**अनायासेन सिध्यंति तस्य कार्याणि देहिनः ॥ ५९ ॥**

५९ ज्या मनुष्यास हा भगवान् सनातन काळ अनुकूल असतो त्याचीं कार्यें अनायासेंच सिद्धीस जातात.

**जनिस्सत्ता च वृद्धिश्च विपाकोऽपचयोऽपि च ।**
**क्षयश्च षडमी भावाः विकाराः कालनिर्मिताः ॥ ६० ॥**

६० उत्पत्ति, स्थिति, वृद्धि, परिपक्वता, क्षय आणि नाश ह्या सहा अवस्था म्हणजे कालानेच निर्मिलेले विकार होत.

**जयः पराजयो वापि वैरं मन्त्रिबलाबले ।**
**सविद्यत्वमविद्यत्वमुदारत्वं कदर्यता ॥ ६१ ॥**
**प्रवृत्तिश्च निवृत्तिश्च स्वातन्त्र्यं परतन्त्रता ।**
**समृद्धिरसमृद्धिश्च जायन्ते कालपर्ययात् ॥ ६२ ॥**

६१–६२ जय किंवा अपजय, वैर, मंत्रिबल किंवा त्याचा अभाव, विद्वत्व किंवा अविद्वत्व, उदारता किंवा कृपणता, प्रवृत्ति किंवा निवृत्ति, स्वातंत्र्य आणि पारतंत्र्य, समृद्धि आणि असमृद्धि हीं काळाच्या उलटापालटीमुळे उत्पन्न होतात.

**मृत्युर्जन्मवयश्चापि तिस्रोऽवस्थाश्च तस्य ताः ।**
**कालादेवप्रवर्तन्ते तथा यज्ञादिकाः क्रियाः ॥ ६३ ॥**

६३ जन्म, आयुष्य आणि मृत्यु ह्या तीन्ही अवस्था काळामुळेंच होतात; तसेंच यज्ञादिक क्रियाहि त्याच्यामुळेंच होतात.

**न कालेन विना बीजं न कालेन विनांकुरः ।**
**न कालेन विना पुष्पं न कालेन विना फलम् ॥ ६४ ॥**
**न कालेन विना तीर्थं न कालेन विना तपः ।**
**न कालेन विना सिद्धिः न कालेन विना जयः ॥ ६५ ॥**
**न कालेन विना भान्ति शशांकशुचिभास्कराः ।**
**न कालेन विना वृद्धिमवृद्धिं चैति सागरः ॥ ६६ ॥**
**न कालेन विना गंगामाजहार भगीरथः ।**
**न कालेन विना कार्कलास्यान्मुक्तो नृगो नृपः ॥ ६७ ॥**
**न कालेन विना रामो निजघान दशाननम् ।**
**न कालेन विना लंकां प्रतिपेदे बिभीषणः ॥ ६८ ॥**
**न कालेन विना कृष्णो गोवर्धनमदीधरत् ।**
**न कालेन विना पार्थो वैकर्तनमजीघतत् ॥ ६९ ॥**
**सुखानामसुखानां च काल एव हि कारणम् ।**
**कालमेवेश्वरं मन्ये सर्गस्थित्यन्तकारिणम् ॥ ७० ॥**

६४–७० काळाशिवाय बीज नाहीं, काळाशिवाय अंकुर नाहीं, काळाशिवाय पुष्प नाहीं, काळाशिवाय फळ नाहीं, काळाशिवाय तीर्थ नाहीं, काळाशिवाय तप नाहीं, काळाशिवाय सिद्धि नाहीं, काळाशिवाय जय नाहीं, काळाशिवाय चंद्र, अग्नि व सूर्य हे प्रकाशत नाहींत, काळाशिवाय समुद्रास भरती–ओहटी होत नाहींत, काळाशिवाय भगीरथानें गंगेस आणलें नाहीं, नृगराजा काळ आल्यावांचून सरडेपणांतून सुटला नाहीं, काळाशिवाय रामानें रावणास मारलें नाहीं, काळाशिवाय बिभीषणास लंका प्राप्त झाली नाहीं, काळाशिवाय कृष्णानें गोवर्धन पर्वत उचलून धरला नाहीं, काळाशिवाय अर्जुनानें कर्णास मारलें नाहीं. सुखदुःखाचें कारण काळच आहे ह्मणून उत्पत्ति, स्थिती आणि लय करणाऱ्या काळासच मी ईश्वर समजतों.

**संगरे भंगमासाद्य निजामो विलयं गतः ।**
**लब्ध्वा देवगिरिं दैत्यो दिल्लीन्द्रो मुदमागतः ॥ ७१ ॥**
**तथा येदिलशाहोऽपि सैन्यभंगात् विलज्जितः ।**
**तदेतदखिलं कालाज्जात जानीत भो द्विजाः ॥ ७२ ॥**

७१–७२ युद्धांत मोड होऊन निजामशहाचा नाश झाला; देवागिरी प्राप्त होऊन दैत्य रूपी दिल्लीच्या बादशहास आनंद झाला आणि आपल्या सैन्याचा मोड झाल्यानें आदिलशहा खजील झाला हें सर्व काळामुळेंच झालें असें, हे पंडितानों समजा.

निरुध्य धारागिरिदुर्गमुग्रम् ।
ताम्राननैस्तत्र धृते निजामे ।
गताभिमाना विहितापयाना ।
बभूव सेना किल येदिलस्य ॥ ७३ ॥

७३ देवगिरीच्या प्रचंड किल्ल्यास वेढा देऊन मोंगलांनीं निजामशहास पकडलें असतां आदिलशहाच्या सैन्यानें, हतगर्व होऊन, आपला पाय तेथून काढला.

इत्यनुपुराणे कवीन्द्रपरमानंदविरचितेऽष्टमोऽध्यायः ॥

---

# अध्याय १ वा.

**कवींद्र उवाच**

**अथ देवगिरिं प्राप्य दिल्लीन्द्रे मुदितात्मनि ।**
**दुर्मदे महमूदे च सन्नसैन्ये विषादिनि ॥ १ ॥**
**शाहो निजामशाहस्य शैलदुर्गाण्यनेकशः ।**
**शिवनेरिमुखान्याशु बलेन वशमानयत् ॥ २ ॥**

कवींद्र म्हणाला

१–२ पुढें देवगिरि प्राप्त झाल्यानें दिल्लीच्या बादशहास आनंद झाला असतां व उन्मत्त महंमूदशहास आपलें सैन्य पराभूत झाल्यानें विषाद वाटला असतां शहाजी राजानें निजामशहाचे शिवनेरी इत्यादि अनेक गड भराभर घेतले.

**गोदावरीं महापुण्यां प्रवरां च प्रभाविणीम् ।**
**नीरां क्षीराब्धिसक्षीरां भीमां भीमरथीमपि ॥ ३ ॥**
**श्रितं जनपदं सर्वं समाक्रम्य क्रमेण च ।**
**स्ववशे स्थापयामास सद्यः सह्यं च पर्वतम् ॥ ४ ॥**

३–४ तसेंच, अत्यंत पवित्र ( पुण्यकारक ) गोदावरी, प्रवरा, क्षीर समुद्रासारखें पाणी असलेली नीरा, भयंकर भिमा, यांच्या कांठचा सर्व प्रदेश क्रमाक्रमानें पादाक्रांत करून त्यानें सह्याद्रिसुद्धां लगेच आपल्या ताब्यांत आणला.

**शक्रप्रस्थस्य शक्रेण विरुद्धोऽयमभूद्यदा ।**
**महाराजममुं भेजुर्महाराष्ट्रनृपास्तदा ॥ ५ ॥**
**घांटिकाः कांटिकास्तद्वद्गोकपाटाश्च कांकटाः ।**
**तोमराश्चाह्वाणाश्च महिताश्च महाद्रिकाः ॥ ६ ॥**
**खराटाः पांडरास्तद्वद्व्याघ्रघोरफटादयः ।**
**तदा शाहनरेन्द्रेण पृतनापतयः कृताः ॥ ७ ॥**

५–७ शहाजी दिल्लीच्या बादशहाविरुद्ध झालेला पाहून घाटगे, कांटे, गायकवाड, कंक, ठोमरे, चव्हाण, मोहिते, महाडीक, खराटे, पांढरे, वाघ, घोरपडे इत्यादि महाराष्ट्रिय ( मराठे ) राजे त्यास येऊन मिळाले आणि शहाजीनें त्यांस सेनापति ( सरदार ) केलें.

**अथ शाहजयापेक्षी जहानगिरनंदनः ।**
**समं येदिलशाहेन सद्यः संधिमयोजयत् ॥ ८ ॥**
**ततो राजतुरासाहं शाहं युधि जिगीषतोः ।**
**तयोस्समभवत्सीमा भीमा नाम महानदी ॥ ९ ॥**

८–९ पुढें शहाजीस जिंकण्याच्या हेतूनें शहाजहानानें आदिलशहा बरोबर लागलीच तह केला आणि त्या राजेंद्र शहाजीस जिंकू इच्छिणाऱ्या त्या दोघांनीं भीमा नदी ही परस्परांच्या मुलखांमधील हद्द ठरविली.

**मनीषिण ऊचुः**

**शाहः शाहिजहानस्य सेनया येदिलस्य च ।**
**साहसी सिंहविक्रान्तः कति वर्षाण्ययुद्धत ॥ १० ॥**
**कथं च संधिमकरोत् ताभ्यां द्वाभ्यामपि प्रभुः ।**
**कवीन्द्र भवतः श्रोतुमिदमीहामहे वयम् ॥ ११ ॥**

पंडित म्हणालेः—

१०–११ साहसी आणि सिंहाप्रमाणें पराक्रमी अशा शहाजी राजानें आदिलशहा आणि शहाजहान यांच्या सैन्याबरोबर किती वर्षें युद्ध केलें ? पुढें त्या दोघांशींहि तह कसा केला ? हें आपल्यापासून ऐकण्याची, हे कवींद्रा, आमची इच्छा आहे.

**कवीन्द्र उवाच**

**शाहः साहिजहानस्य येदिलस्य च सेनया ।**
**अयुध्यत समास्तिस्रः सहस्रकरविक्रमः॥ १२ ॥**

कवीन्द्र म्हणालाः—

१२ सूर्याप्रमाणें प्रतापी शहाजीनें शहाजहान आणि आदिलशहा यांच्या सैन्याबरोबर तीन वर्षें युद्ध केलें.

**ततो स्वप्नपतिः स्वप्ने धूर्जटिस्तेन वन्दितः ।**
**तद्दशौ दशनोद्योतैर्दीपयंस्तमवोचत ॥ १३ ॥**

१३ मग त्याला स्वप्नांत स्वप्नपति शंकराचें दर्शन होऊन त्यांस त्यानें वंदन केले, तेव्हां आपल्या दांतांच्या प्रभेनें त्याचे डोळे दिपवीत तो त्यास म्हणालाः–

**धूर्जटिरुवाच**

**अतीव दुर्जयो लोके दिल्लीन्द्रोऽसौ महाद्युतिः ।**
**तस्मादायोधनावेशात् विरम त्वं महामते ॥ १४ ॥**
**यद्दनेन पुरा चीर्णं तपस्तीव्रं दुरात्मना ।**
**तद्यावदस्त्यसौ तावन्न विनाशमुपैष्यति ॥ १५ ॥**
**सर्वेऽपि यवनास्तात पूर्वदेवान्वया इमे ।**
**देवांश्च भूमिदेवांश्च विद्विषन्ति पदे पदे ॥ १६ ॥**
**यो हन्तुं यवनानेतानेतां भुवमवातरत् ।**
**स एष भगवान् विष्णुः शिवसंज्ञः शिशुस्तव ॥ १७ ॥**

**करिष्यत्यचिरेणैव तदेतत्त्वच्चिकीर्षितम् ।**
**तस्मादनेहसं कंचित् प्रतीक्षस्व महाभुज ॥ १८ ॥**

शंकर म्हणाला:—

१४–१८ हा महातेजस्वी दिल्लीपति पृथ्वीवर अगदीं अजिंक्य आहे; म्हणून, हे शहाण्या राजा, तूं हा लढाईचा नाद सोडून दे. या दुरात्म्यानें पूर्वी केलेलें तप संपेपर्यंत याचा नाश होणार नाहीं. बाबा, हे सर्वच यवन असुरवंशी आहेत आणि ते देवब्राह्मणांचा पदोपदीं द्वेष करितात. ह्या यवनांचा संहार करण्यासाठीं जो पृथ्वीवर अवतरला आहे तो भगवान विष्णु शिव नांवाचा तुझा मुलगा झाला आहे. तो तुझें इष्टकार्य लवकरच घडवून आणील. म्हणून, हे महाबाहो, तूं कांहीं काळ वाट पहा.

**एवमुक्तवति प्रीतिमति देवे कपर्दिनि ।**
**प्राबुध्यत प्रसन्नात्मा प्रभाते पृथिवीपतिः ॥ १९ ॥**

१९ असें त्या प्रसन्न शंकरानें म्हटल्यावर राजा प्रसन्नचित्त होत्साता पहाटे जागा झाला.

**ततो निजामविषयं शाहः स्वविषयं विना ।**
**दिल्लीन्द्राय ददौ कंचित् येदिलाय च कंचन ॥ २० ॥**

२० तेव्हां शहाजीनें आपला देश वगळून राहिलेल्या निजामशहाच्या राज्यापैकीं कांहीं मुलुख दिल्लीच्या बादशहास आणि कांहीं आदिलशहास दिला.

**हठशीलोऽपि तं शाहः प्रहाय हठमात्मनः ।**
**व्यधाद्येदिलताम्राभ्यां संधिं त्रिनयनाज्ञया ॥ २१ ॥**

२१ शहाजी हा हट्टी स्वभावाचा असतांहि त्यानें आपला हट्ट सोडून शंकराच्या आज्ञेप्रमाणें दिल्लीचा बादशहा आणि आदिलशहा यांच्याशीं तह केला.

**ततो निजामविषयं संप्राप्य मुदितात्मसु ।**
**परावृत्तेषु ताम्रेषु पराक्रमणकारिषु ॥ २२ ॥**
**असमर्थमिवात्मानं मन्यमानो महामतिः ।**
**तदिदं चिंतयामास येदिलो निजचेतसि ॥ २३ ॥**
**समर्थैः समरांभोधौ निजामो यैर्निमज्जितः ।**
**तेऽमी ताम्राननाः प्रायो मज्जयिष्यन्ति मामपि ॥ २४ ॥**
**तस्मादमुं महाबाहुं मालवर्मात्मजं नृपम् ।**
**साहाय्ये स्वे निधास्यामि विधास्यामि विधित्सितम् ॥ २५॥**

२२–२५ निजामशहाचें राज्य मिळाल्याने परमुलखावर हल्ला करणारे ते मोंगल परत फिरले असतां, शहाण्या आदिलशहास आपण दुर्बळ आहों असें

वाटूं लागलें आणि त्यानें आपल्या मनांत विचार केला कीं, ज्या सामर्थ्यवान् मोंगलांनीं निजामशहास युद्धांत बुडविलें ते मलाहि बहुधा बुडवितील; म्हणून ह्या महाबाहू शहाजीस आपल्या मदतीस घेऊन मी आपले इष्टकार्य साधीन.

**पूर्वमस्यैवावलंबादिभरामः पिता मम ।**
**विध्वस्तारातिरध्यास्त निर्विशंकः स्वमानसम् ॥ २६ ॥**
**सहसावमतः सोऽयं मतिमंदतया मया ।**
**मामुपेक्ष्य गतो मानादिभरामादनंतरम् ॥ २७ ॥**
**महामानी महाबाहुरसौ शाहमहीपतिः ।**
**कृत्वा मदधिकं स्नेहमिभरामेण वर्धितः ॥ २८ ॥**

२६–२८ पूर्वी माझा बाप इब्राहिमशहा हा याच्याच साह्यानें शत्रूंचा विध्वंस करून निश्चिंत होता. पण त्याच्या मृत्यूनंतर म्या मूर्खपणानें त्याचा एकाएकीं अपमान केल्यामुळें तो मानी शहाजी मला सोडून गेला. इब्राहिम-शहानें ह्या महामानी व पराक्रमी शहाजीवर मजपेक्षां अधिक प्रेम करून त्यास योग्यतेस चढविलें.

**इति चेतसि संचिन्त्य महमूदो महाद्युतिः ।**
**अमात्यान् प्रेषयामास सद्यः शाहनृपं प्रति ॥ २९ ॥**

२९ असा मनांत विचार करून त्या महातेजस्वी महंमूदशहानें लागलीच शहाजीकडे आपले अमात्य पाठविले.

**अनुनीतः स तैस्तत्र मंत्रिभिर्मंत्रवेदिभिः ।**
**प्रतिजज्ञे महाबाहुर्येदिलस्य सहायताम् ॥ ३० ॥**

३० त्या मंत्रकुशल अमात्यांनीं शहाजीचें मन वळविलें आणि त्या पराक्रमी शहाजीनेंहि आदिलशहास साह्य करण्याचें वचन दिलें.

**अथ शाहमहीपालमवलंब्यावलंबदम् ।**
**बत प्रतिपदं लेभे महमूदो महामुदम् ॥ ३१ ॥**

३१ साह्यकर्त्या शहाजी राजाचा आधार मिळाल्यामुळें महंमूदशहास पदो-पदीं मोठा आनंद होऊं लागला.

**अथो फरादखानस्य सुतं समरधूर्वहम् ।**
**निखिलानीकिनीमान्यं सेनान्यं रणदुलहम् ॥ ३२ ॥**
**बलिना शाहराजेन महाराजेन संयुतम् ।**
**प्रतापी प्रेषयामास जेतुं कर्णाटनीवृतम् ॥ ३३ ॥**

३२–३३ नंतर त्या प्रतापवान् महंमूदानें, सर्व सेनेला प्रिय व रणधुरंधर असा जो फरादखानाचा पुत्र सेनापति रणदुल्लाखान त्यास पराक्रमी शहाजीसह कर्नाटक प्रांत जिंकण्यास पाठविलें.

**तदा फरादखानेन याकुतेनांकुशेन च ।**
**हुशेन्यंबरखानेन मसूदेन तथा पुनः ॥ ३४ ॥**
**प्रवारघांटिकेंगालगाढघोरफटादिभिः ।**
**सुभटैस्ससहितैस्तैस्तैः प्रतस्थे रणदूलहः ॥ ३५ ॥**

३४-३५ तेव्हां फरादखान, याकुतखान, अंकुशखान, हुसेन अंबरखान, मसाऊदखान तसेच पवार, घाटगे, इंगळे, गाढे, घोरपडे, इत्यादि मोठमोठ्या योध्यांसह रणदुल्लाखान निघाला.

**अथ सेनाधिपतिना सार्धं तेन महामनाः ।**
**बली भृशबलो राजा प्राप कार्णाटमंडलम् ॥ ३६ ॥**

३६ त्या सेनाधिपतीबरोबर महत्त्वाकांक्षी शहाजी राजा भोसलाहि कर्नाटकांत गेला.

**ततो बिंदुपुराधीशं वीरभद्रं महौजसम् ।**
**वृषपत्तनपालं च प्रसिद्धं केंगनायकम् ॥ ३७ ॥**
**कावेरीपत्तनपतिं जगद्देवं महाभुजम् ।**
**श्रीरंगपत्तनेंद्रं च क्रूरं कंठीरवाभिधम् ॥ ३८ ॥**
**तंजापुरप्रभुं चापि वीरं विजयराघवम् ।**
**तथा तंजीपरिवृढं प्रौढं वेंकटनायकम् ॥ ३९ ॥**
**त्रिमल्लनायकाह्वं च मधुरानाथमुद्धतम् ।**
**पीलुगण्डाखंडलं च बिकटं वेंकटाह्वयम् ॥ ४० ॥**
**धीरं श्रीरंगराजं च विद्यानगरनायकम् ।**
**प्रसिध्दं तम्मगौडं च हंसकूटपुरेश्वरम् ॥ ४१ ॥**
**वशीकृत्य प्रतापेन तथान्यानपि पार्थिवान् ।**
**शाहः संतोषयामास सेनान्यं रणदूलहम् ॥ ४२ ॥**

३७-४२ बिंदुपूर (बेदनूर) चा राजा महातेजस्वी वीरभद्र, वृषपत्तनचा (बेलूर?) राजा प्रसिद्ध केंग नाइक, कावेरीपत्तनचा राजा महाबाहू जगद्देव, श्रीरंगपट्टणचा राजा क्रूर कंठीरव, तंजावरचा राजा शूर विजयराघव, तंजीचा (चंजी) राजा प्रौढ वेंकटनाईक, मदुरेचा राजा गर्विष्ठ त्रिमलनाईक, पिलुगंडाचा राजा उद्धट वेंकटाप्पा, विद्यानगर (विजयानगर)चा राजा धीट श्रीरंगराजा, हंसकूटाचा(हास्पेट) राजा प्रसिद्ध तम्मगौडा यांना आणि इतरहि राजांना शहाजीनें आपल्या पराक्रमानें ताब्यांत आणून सेनापति रणदुल्लाखानास संतुष्ट केलें.

**कृत्वाऽथ वीरसंहारकारियुद्धमहर्दिवम् ।**
**युद्धशौण्डात् किंपगौडात् गृहीतं सुमनोहरम् ॥ ४३ ॥**

रणदुल्लहखानेन पारिबर्हमिवार्पितम् ।
सोऽध्यास्त विजयी राजा बिंगरूळाभिधं पुरम् ॥ ४४ ॥

४३–४४ मग रात्रंदिवस वीरांचा संहार करणारे युद्ध करून युद्धनिपुण किंपगौंडापासून घेतलेलें अतिशय रम्य बंगळूर नांवाचे शहर रणदुल्लाखानानें शहाजीला पारितोषिक म्हणून दिलें व त्या ठिकाणीं तो विजयी राजा राहूं लागला.

अथ तस्मिन् पुरवरे पटुप्राकारगोपुरे ।
सुधावदातसौधाग्रपताकोल्लिखितांबरे ॥ ४५ ॥
तत्तत्कारुकलाकीर्णरम्यहर्म्यमयान्तरे ।
विटंकस्थितबंहिष्ठपारावतकृतस्वरे ॥ ४६ ॥
वातायनोत्पतन्नीलकंठकूजितपूजिते ।
विस्तीर्णापणविन्यस्तपण्यवस्तुसमन्विते ॥ ४७ ॥
प्रतिसद्मोल्लसत्कूपे विकसद्दीर्घदीर्घिके ।
नैकशृंगाटके दंचज्जलयंत्रोच्छलज्जले ॥ ४८ ॥
प्रफुल्लनिष्कुटकुटच्छायच्छन्नमहीतले ।
भित्तिविन्यस्तसच्चित्रलुभ्यल्लोकविलोचने ॥ ४९ ॥
नानावर्णाश्मसंबध्दस्निग्धसुंदरमंदुरे ।
विसंकटपुरद्वारकूटकुट्टिममण्डिते ॥ ५० ॥
चयाट्टमस्तकन्यस्तनालायंत्रसुदुर्गमे ।
समीकनिपुणानीकप्रकरप्रतिपालिते ॥ ५१ ॥
समन्तादतलस्पर्शपरिखावारिभासुरे ।
अपारसागराकारकासारपरिशीलिते ॥ ५२ ॥
अनिलोल्लासितलतालालितोद्यानमण्डले ।
कनकाचलसंकाशदेवतायतनांचिते ॥ ५३ ॥
संवसन् वासवसमः स एष नृपसत्तमः ।
निजैः परिजनैः सार्धं विविधं मुदमाददे ॥ ५४ ॥
स कदाचिन्मृगयया कदाचित् साधुसेवया ।
कदाचिदर्चया शंभोः कदाचित् काव्यचर्चया ॥ ५५ ॥

४५--५५ त्या शहरचा तट व वेशी मजबूत होत्या. चुन्याच्यायोगें पांढऱ्या शुभ्र वाड्यांच्या शिखरावरील पताका गगनाला भेदीत होत्या; तें सर्व प्रकारच्या शिल्पानें—( कला कुसरीनें ) भरलेल्या रम्य हवेल्यांनीं व्यापून टाकलें होतें; तेथें खुराड्यांत बसलेले असंख्य पारवे घुमत असत; खिडक्यांतून उडणाऱ्या मोरांच्या केकांनीं ते मनोहर होतें; त्यांतील विस्तीर्ण पेठेंत विक्रीचे पदार्थ मांड-

# परमानन्दकृत शिवभारत.

# शहाजीकालीन मुसलमानी शाह्या.




स्केल.
एक इंचांत १६० मैल प्रमाणें.

१ मोंगलाई.

२ इमादशाही.

३ निजामशाही.

४ अदिलशाही.

५ बरिदशाही.

६ कुतुबशाही.

DECCAN P. WORKS, POONA CITY. B.D.H.


अध्याय ९ वा
परमानन्दकृत शिवभारत.
शहाजीकालीन कर्नाटक.
बेदनूर
(वीरभद्र)
तरिकेरी
चित्रदुर्ग
शिरें
रत्नागिरी
चिक्कनायकहळ्ळी
(केंपगौडा)
बंगळूर
मागडी
(तम्मगौडा)
कोलार
(चिक्कराय)
पुंगनूर
आनेकल
बालम
ऐगूर
नर्सीपूर
मंगळूर
कावेरीपट्टण
(जगद्देवराय)
चन्नापट्टण
कावेरी नदी
श्रीरंगपट्टण
म्हैसूर
(कंठीरव)
स्केल.
एक इंचांत सुमारें ५० मैल प्रमाणें.
DECCAN PRINTING WORKS, POONA CITY.


७८
८०
१५
१२
१०
पेनुकोंडा
गुडूर
हिंदुपूर
तिरुपती
चंद्रगिरी
पुलिकत
मद्रास
कोलार
वेलूर
कांचीवरम्
बंगळूर
अर्णी
जिंजी
(वेंकटनायक)
पांडिचरी
तेगेनापट्टण
कावेरी नदी
श्रीरंगम्
तंजावर
(विजयराघव)
त्रिचनापल्ली
मदुरा
(त्रिमलनायक)
अध्याय ९ वा.
परमानन्दकृत शिवभारत.
शहाजीकालीन
दक्षिण हिंदुस्थान-पूर्वभाग.
स्केल.
एक इंचांत सुमारें ६२ मैल प्रमाणें.
DECCAN PRINTING WORKS, POONA CITY.
B.D.M.

अध्याय ३०वा

परमानन्दकृत शिवभारत.

शके १५८३ मधील

# कोंकणावरील स्वारी.

स्केल

एक इंचांत २४ मैल प्रमाणें.

जंजिरा सं.

कुलाबा जिल्हा

मंडणगड

सुवर्णदुर्ग

पालगड

अंबवलीघाट

हातखंबा

दाभोळ

परशराम

चिपळूण

पश्चिम समुद्र

जयगड

शृंगारपूर

प्रचीतगड

धामणसें

संगमेश्वर

नेवरें

कोतवडें

देवरुखें

आंबेघाट

रत्नागिरी

हरचेरी

विशाळगड

पावस

पुरणगड

सातवली

करशेली

भालवली

यशवंतगड

राजापूर

जैतापूर

गोठणें

कळवली

विजयदुर्ग

खारेपाटण

देवगड

फोंडाघाट

रामगड

भगवंतगड

सिध्दगड

मालवण

निवटी किल्ला

वेंगुर्लें

सावंतवाडी सं.

कोल्हापूर संस्थान

DECCAN ... WORKS, POONA CITY.

लेले असत; तेथें घरोघरीं आड होते; त्या शहरांत सुंदर, विस्तीर्ण विहिरी होत्या, त्याचप्रमाणें अनेक चौक असून त्यांतील कारंज्यांमधून पाणी उडत असें; त्यांतील घरांच्या बागांतील फुललेल्या झाडांच्या छायेनें भूमि आच्छादित असे; त्यांतील वाड्यांच्या भिंतीवर काढलेल्या उत्कृष्ट चित्रांनीं लोकांचे नेत्र लुब्ध होऊन जात असत; त्यांत नाना रंगाच्या दगडांनीं बांधलेल्या तुळतुळित व सुंदर पागा होत्या; तें मोठमोठ्या वेशीच्या माथ्यावरील फरसबंदीनें सुशोभित होते; त्याच्या बुरजांच्या माथ्यावर ठेवलेल्या तोफांनीं ते अत्यंत दुर्गम झालें होतें. युद्धनिपुण सेनासमूहानें तें रक्षिलेलें होते; सभोंवतीं अगाध पाणी असलेल्या खंदकामुळें ते सुशोभित दिसत होतें; अपार सागराप्रमाणें विस्तीर्ण तलावाने त्याला शोभा आणली होती; त्यांत वाऱ्याच्यायोगें डुलणाऱ्या लतांनीं सुंदर अशीं उद्यानें होतीं; मेरुपर्वताप्रमाणें देवळांनीं तें शहर मंडित झालें होते; अशा त्या नगरामध्यें वास करणारा इंद्रासारखा तो नृपश्रेष्ठ आपल्या परिजनांसह नानाप्रकारचा आनंद अनुभवीत असे.

**कदाचिन्नर्तकीनृत्यदर्शनोत्सवलीलया ।**
**कदाचिन्नैकविधया शरसंधानशिक्षया ॥ ५६ ॥**
**कदाचिदायुधागारविन्यस्तायुधवीक्षया ।**
**कदाचिदात्मसंग्राह्यतत्तत्सैन्यपरीक्षया ॥ ५७ ॥**
**कदाचित् पुष्पितोद्दामनगरोद्यानयात्रया ।**
**कदाचित् सारसाक्षीभिः शृंगाररसदीक्षया ॥ ५८ ॥**
**कदाचिद्योगशास्त्रोक्तकलया योगमुद्रया ।**
**प्रभुस्तत्तद्रसमयं समयं समनीनयत् ॥ ५९ ॥**

५६--५९ कधीं मृगयेंत, तर कधीं साधुसेवेंत, कधीं शंकराच्या पूजाअर्चेंत तर कधीं काव्यचर्चेंत, कधीं नृत्यांगनांचे नाच पाहाण्याच्या आनंदांत, तर कधीं अनेक प्रकारच्या शरसंधानांत, कधीं आयुधागारांत ठेवलेल्या आयुधांची पाहाणी करण्यांत, तर कधीं आपल्या पदरीं ठेवण्यालायक अशा सर्व प्रकारच्या सैन्याची परीक्षा करण्यात, कधीं पुष्पांनीं सुगंधित अशा नगरोद्यानात हिंडण्यात, तर कधीं सुंदर स्त्रियाबरोबर शृंगाररसाचा आस्वाद घेण्यांत, तर कधीं योगशास्त्रोक्त पद्धतीनें योग मुद्रेंत याप्रमाणें तो राजा सर्व प्रकारचा उपभोग घेण्यांत आपला काळ घालवीत असे.

**जननी शंभुशिवयोस्तत्र यादवनंदिनी ।**
**जग्राह हृदयं पत्युः शुध्दान्ते सुमहत्यपि ॥ ६० ॥**

६० शहाजीच्या स्त्रिया पुष्कळ असूनहि, शंभू आणि शिवाजी यांची आई जी जाधवरावाची मुलगी (जिजाबाई) तिनें आपल्या पतीचें हृदय काबीज केलें होतें.

**हालिना हरिणा चापि वसुदेवो यथान्वहम् ।**
**व्यराजत तथा शाहः शंभुना च शिवेन च ॥ ६१ ॥**

६१ बलराम आणि कृष्ण यांच्यायोगें जसा वसुदेव नेहमी शोभत असे, त्याप्रमाणें शंभुजी व शिवाजी यांच्या योगें शहाजी हा शोभत असे.

**स तु शंभोः कनीयांसं गरीयांसं गुणश्रिया ।**
**बहु मेने महाराजः शिवशर्माणमात्मजम् ॥ ६२ ॥**

६२ शंभुजीपेक्षां वयानें धाकटा पण गुणांनीं मोठा असा आपला पुत्र शिवाजी यावर शहाजी राजाचें फार प्रेम होतें.

**यदाप्रभृति संजातः स एष तनयः शिवः ।**
**तदाप्रभृति शाहस्य समृध्दाः सर्वसंपदः ॥ ६३ ॥**

६३ जेव्हां हा पुत्र शिवाजी जन्मला तेव्हांपासून शहाजीचें सर्व ऐश्वर्य वृद्धिंगतच होत गेलें.

**आतिष्ठन् द्वारि बहुशो मंदराचलसुंदराः ।**
**विजितांभोरुहरुचो मदवारिमुचो गजाः ॥ ६४ ॥**

६४ मंदरपर्वताप्रमाणें सुंदर, कमळांच्या कांतीला ज्यांनीं मागें सारलें आहे, ज्यांच्या गंडस्थळांतून मदजळ गळत आहे असे पुष्कळ हत्ती त्याच्या द्वारीं उभे असत.

**आसन् सहस्रशश्चापि मंदुरायां मनोहराः ।**
**वाता इवाशुगतयः सैंधवाः समरोद्धुराः ॥ ६५ ॥**

६५ वायूप्रमाणें वेगवान् आणि युद्धांमध्यें खंबीर असे हजारों सुंदर घोडे त्याच्या पागेमध्यें होते.

**ववृधे चाधिकं कोषस्तोषेण सह नित्यशः ।**
**प्रतापः पप्रथेऽत्यर्थं प्रभावश्च दिने दिने ॥ ६६ ॥**

६६ त्याच्या संतोषाबरोबर त्याचा कोपहि नित्य अधिक अधिक वाढूं लागला. त्याचा प्रताप आणि दरारा हे दिवसेंदिवस अतिशय वाढत चालले.

**दुर्ग्रहाण्यपि दुर्गाणि सुग्रहत्वं प्रपेदिरे ।**
**विजयस्सर्वदैवासीत् स्वप्नेऽपि न पराभवः ॥ ६७ ॥**

६७ दुर्जय असे दुर्ग सुद्धां त्याला सुलभ झाले, त्याचा सदोदित विजयच होत असे; आणि स्वप्नांत सुद्धां त्याचा पराभव होत नसे.

**पुष्पाणां च फलानां च सस्यानां चाभिवृध्दयः ।**
**साधनेन विना सिद्धिमीयुस्सर्वाश्च सिद्धयः ॥ ६८ ॥**

६८ फुलें, फळें आणि धान्यें यांची अभिवृद्धि झाली, आणि साधनावांचूनच त्याचें सर्व मनोरथ सिद्धीस जाऊं लागले.

**एवं समृद्धतां नीतः पुराणपुरुषात्मना ।**
**सुतेन तेन सुतरां मुमुदे मालनंदनः ॥ ६९ ॥**

६९ याप्रमाणें विष्णुरूपी त्या पुत्राच्यायोगें भरभराट पावलेला मालोजीचा पुत्र ( शहाजी ) हा त्या मुलास पाहून अत्यंत आनंदित होत असे.

**ततस्तं तनयं वीक्ष्य सगुणं सप्तहायनम् ।**
**लिपिग्रहणयोग्योऽयमिति भूपो व्यचिन्तयत् ॥ ७० ॥**

७० मग तो गुणवान् मुलगा सात वर्षांचा झालेला पाहून तो मुळाक्षरें शिकण्यास योग्य झाला आहे असें राजास वाटलें.

**स तं पुत्रं मंत्रिपुत्रैः सवयोभिः समन्वितम् ।**
**न्यवेशयत गुर्वंके मेधाविनमलोहलम् ॥ ७१ ॥**

७१ प्रधानांच्या समवयस्क पुत्रांसह बुद्धिमान् आणि स्पष्टोच्चार करणाऱ्या त्या पुत्राला गुरूच्या मांडीवर बसविलें.

**आख्याति लिखितुं यावदाचार्यो वर्णमादिमम् ।**
**तावद् द्वितीयमप्येष विलिख्य तमदर्शयत् ॥ ७२ ॥**

७२ गुरुजी जों पहिलें अक्षर लिहिण्यास सांगतात, तोंच हा दुसरें अक्षर-सुद्धां लिहून दाखवीत असे.

**सर्वासामपि विद्यानां द्वारभावमुपागताम् ।**
**लिपिं यथावदखिलां ग्राहयामास तं गुरुः ॥ ७३ ॥**

७३ सकल विद्यांचें द्वारच अशीं जीं मूळाक्षरें तीं सर्व गुरुजीनें त्याला उत्तम रीतीनें शिकविलीं.

**तमथ सहजमेधाशालिनं सुस्वभावं ।**
**नृपमृगपतिशावं वागगम्यानुभावम् ।**
**गुरुरुपचितचित्तः शिक्षितानां समूहे**
**द्रुतधृतलिपिविद्यं वीक्ष्य वैलक्ष्यमूहे ॥ ७४ ॥**

७४ तेव्हां स्वभावतःच बुद्धिमान्, सुस्वभावी, आणि अवर्णनीय प्रभावाच्या त्या राजबिंड्याला सर्व विद्यार्थ्यांमध्यें इतक्या लवकर मुळाक्षरें शिकलेला पाहून गुरूला मोठा अभिमान वाटला आणि हा कांहीं विलक्षण मुलगा आहे अशी त्याने खूणगांठ बांधली.

इत्यनुपुराणे निवासकरपरमानंदप्रकाशितायां संहितायां नवमोऽध्यायः ।

---

# दशमोध्यायः ।



**कवीन्द्र उवाच—**

**शिववर्मा यदा वर्षे द्वादशं प्रत्यपद्यत ।**
**तदा नृपश्शाहवर्मा नियोगेन पिनाकिनः ॥ १ ॥**
**अमुं शंभुकनीयांसमाहूय शिवलक्षणम् ।**
**अर्कद्युतिमदर्कज्ञः पुण्यदेशेश्वरं व्यधात् ॥ २ ॥**

कवीन्द्र म्हणाला:—

१२ जेव्हां शिवाजीस बारावें वर्ष लागलें, तेव्हां दूरदर्शी शहाजी राजानें शंकराच्या आज्ञेप्रमाणें त्या सूर्याप्रमाणें तेजस्वी आणि शुभलक्षणी अशा शंभूच्या पाठच्या पुत्रास बोलावून पुणें प्रांताच्या अधिकारावर नेमलें.

**मनीषिण ऊचुः—**

**यथा देशात् भगवतो देवस्य त्रिपुरद्विषः ।**
**पुण्यदेशंप्रति नृपः प्रेषयामास तं शिवम् ॥ ३ ॥**
**यथा च पुण्यविषयं प्राप्तस्स पितुराज्ञया ।**
**कवीन्द्र परमानन्द तथा त्वमभिधेहि नः ॥ ४ ॥**

पंडित म्हणाले:—

३४ भगवान् शंकराच्या आज्ञेवरून शिवाजीस शहाजी राजानें पुणें प्रांतीं कसें पाठविलें आणि पित्याच्या आज्ञेनें तो पुणें प्रांतीं कसा गेला तें हे कविश्रेष्ठ परमानंदा, आम्हांस सांगा.

**कवीन्द्र उवाच—**

**एकदाभ्यर्च्य भवने भगवन्तं वृषध्वजम् ।**
**शयानस्सुखशय्यायां सुकृती शाहभूपतिः ॥ ५ ॥**
**प्रसन्नपंचवदनं दशहस्तं त्रिलोचनम् ।**
**मंदाकिनीजलस्निग्धजटाजूटमनोहरम् ॥ ६ ॥**
**शीतांशुशकलोत्तंसं त्रिपुण्ड्रलालितद्युतिम् ।**
**हरिन्मणिनिभग्रीवं सरीसृपविभूषणम् ॥ ७ ॥**
**वराभयप्रदं वीरं विविधायुधधारिणम् ।**
**द्वीपिचर्मोत्तरासंगं द्विपचर्माधरांबरम् ॥ ८ ॥**

**निदानं सर्वमुक्तीनां निधानं सकलश्रियाम् ।**
**योगिनं योगिनामिंद्रमिंद्रोपेंद्रादिवन्दितम् ॥ ९ ॥**
**समस्तलोकसहितं सहितं गिरिकन्यया ।**
**अपश्यद्विस्मितः स्वप्ने पुरस्तात्त्रिपुरद्विषम् ॥ १० ॥**

कवींद्र म्हणालाः —

५--१० एकदां घरीं भगवान् शंकराची पूजा करून पुण्यवान् शहाजी राजा सुखशय्येवर निजला असतां, ज्याचीं पांच मुखें प्रसन्न आहेत, ज्याला दहा हात व तीन डोळे आहेत, जो गंगेच्या जलानें तुळतुळीत असलेल्या जटाजूटाच्या योगें मनोहर दिसत आहे, ज्याच्या मस्तकीं चंद्राची कोर दिसत आहे, ज्याच्या कपाळाला त्रिपुंड्राच्या योगें शोभा आली आहे, ज्याचा कंठ पाचेप्रमाणें हिरवाचार आहे, ज्यानें सर्पांचीं भूषणें घातलीं आहेत, ज्यानें नाना प्रकारचीं आयुधें धारण केलीं आहेत, ज्यानें व्याघ्रचर्म पांघरलें आहे व जो गजचर्म नेसला आहे, जो वरदाता, अभयदाता व वीर्यवान् आहे, जो सकल मुक्तीचें आदिकारण आहे, ज्याला इंद्र, विष्णु इत्यादि देव वंदितात, जो सकल संपत्तीचें निधान आहे, जो योग्यांमध्यें श्रेष्ठ योगी आहे अशा त्रिपुरारि शंकरास समस्त लोकांसह व पार्वती सहवर्तमान स्वप्नामध्यें समोर पाहून तो चकित झाला.

**दृष्ट्वा तमीश्वरं साक्षात् स्वयं समभिवन्द्य सः ।**
**पुरोबद्धांजलिपुटस्तिष्ठति स्मातिनिर्वृतः ॥ ११ ॥**

११ त्या शंकराला प्रत्यक्ष पाहून शहाजीनें स्वतः त्यास वंदन केलें आणि अतिशय आनंदभरित होत्साता हात जोडून त्याच्यापुढें उभा राहिला.

**ततः स भगवान् भर्गः स्वभक्तमवनीश्वरम् ।**
**वचनेनानुजग्राह निरवग्रहशक्तिभृत् ॥ १२ ॥**

१२ नंतर अप्रतिहत-शक्ति भगवान शंकर आपला भक्त जो शहाजी राजा त्याच्यावर अनुग्रह करून म्हणाला.

**ईश्वर उवाच--**

**सूर्यवंश्य महाबाहो शहाराज महामते ।**
**समाकर्णय मद्वाचमिमां कुशलमास्तिते ॥ १३ ॥**
**य एष भ्राजतेभ्यर्णे कनीयांस्तनयस्तव ।**
**तमेनं लक्षणोपेतमवेहि पुरुषोत्तमम् ॥ १४ ॥**
**वर्धमानः क्रमेणैव त्वत्पुत्रोयमुरुक्रमः ।**
**समाक्रम्यावनीं सर्वां यवनान्निहनिष्यति ॥ १५ ॥**

**इयं भगवती देवी गिरिजा भक्तवत्सला ।**
**समये समयेभ्येत्य तमिमं पालयिष्यति ॥ १६ ॥**
**हर्ता धरित्रीभारस्य संहर्ता प्रतिभूभृताम् ।**
**मद्भक्त एष सर्वेषामप्यधृष्यो भविष्यति ॥ १७ ॥**
**तस्मादमुं महाबाहुं महाशयशिवाह्वयम् ।**
**पुण्यदेशाधिपत्येन महनीयेन योजय ॥ १८ ॥**

१३–१८ हे सूर्यवंशी महाबाहो, महामति शहाजी राजा, माझें हें भाषण ऐक. यांत तुझें कल्याण आहे. जो हा तुझा धाकटा मुलगा तुजसमीप शोभतो आहे तो सुलक्षणी मुलगा भगवान् विष्णु आहे असें जाण. हा तुझा पुत्र विष्णु हळुहळू वाढत जाऊन सर्व पृथ्वी पादाक्रांत करून यवनांचा संहार करील. ही भक्तवत्सल भगवती पार्वती देवी वेळोवेळीं जवळ येऊन त्याचें रक्षण करील. पृथ्वीचा भार हरण करणारा व शत्रुपक्षीय राजांचा संहार करणारा असा हा माझा भक्त सर्वांना अजिंक्य होईल. म्हणून हे महत्त्वाकांक्षी राजा, ह्या शिव नांवाच्या महाबाहूची पुणें प्रांताच्या मोठ्या अधिकारावर योजना कर.

**तमित्युक्त्वा महेशानस्तदा मुक्तामयीं स्रजम् ।**
**तस्य राजकुमारस्य कण्ठे स्वयमयोजयत् ॥ १९ ॥**

१९ त्यास असें बोलून नंतर शंकरानें मोत्यांचा हार त्या राजकुमाराच्या गळ्यांत स्वतः घातला.

**एवमाविर्भवद्धार्दभरे देवे कपर्दिनि ।**
**प्राबुध्यत धरापालो मुहूर्ते ब्रह्मदैवते ॥ २० ॥**

२० याप्रमाणें शंकराच्या अंतःकरणांत प्रेमाचा पूर आला असतां, तो राजा ब्राह्म मुहूर्तीं जागा झाला.

**विशिष्टः स्वेन तपसा विस्मयाविष्टमानसः ।**
**तामेव मूर्तिमीशस्य ध्यायन्नेष मुहुर्मुहुः ॥ २१ ॥**
**प्रातः प्रभाकरन्नाम प्रभाकरसमप्रभम् ।**
**पुरोहितं समानाय्य शशंस स्वप्नमात्मनः ॥ २२ ॥**

२१–२२ स्वतःच्या तपामुळें श्रेष्ठ असा तो (राजा) विस्मित होत्साता त्याच शंकराच्या मूर्तीचें वारंवार ध्यान करीत पहाटे सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा प्रभाकर नांवाच्या पुरोहितास आणवून आपलें स्वप्न (त्यास) सांगता झाला.

**अथानुमोदितस्तेन प्रहृष्टेन पुरोधसा ।**
**पुण्यदेशाधिपत्येन शाहः शिवमयोजयत् ॥ २३ ॥**

२३ तेव्हां आनंदित झालेल्या त्या पुरोहितानें (मोठ्या आनंदानें) अनुमोदन दिल्यावर शहाजीनें शिवाजीची पुणें प्रांताच्या आधिपत्यावर योजना केली.

**अथ तस्मिन्नाधिपत्ये पित्रादत्ते प्रतापिना ।**
**प्रयातुकामः स्वं राष्ट्रं शिवराजो व्यराजत ॥ २४ ॥**

२४ प्रतापी पित्यानें तें आधिपत्य दिलें असतां, स्वदेशाप्रत जाऊं इच्छिणारा तो शिवाजी राजा विशेष शोभूं लागला.

**ततः कतिपयैरेव गजवाजिपदातिभिः ।**
**मौलैराप्तैरमात्यैश्च ख्यातैरध्यापकैरपि ॥ २५ ॥**
**बिरुदैश्च ध्वजैरुच्चैः कोषेणापि च भूयसा ।**
**तथा परिजनैरन्यैरनन्यसमकर्मभिः ॥ २६ ॥**
**समवेतममुं शाहभूपतिश्शोभने दिने ।**
**प्राहिणोत्पुण्यदेशाय पुण्यकारिणमात्मजम् ॥ २७ ॥**

२५-१७ नंतर कांहीं हत्ती, घोडे व पायदळ, पिढीजाद व विश्वासु अमात्य, त्याचप्रमाणें विख्यात अध्यापक, बिरुदें, उंच ध्वज, विपुल द्रव्य त्याचप्रमाचें अद्वितीय कर्में करणारे दुसरे परिजन या समवेत त्या पुण्यशील पुत्रास शहाजी राजानें शुभदिनीं पुणें प्रांतीं पाठविलें.

**ततः कतिपयैरेष दिनैर्दिनकृदन्वयः ।**
**अयाद्देशं महाराष्ट्रं तस्मात् कर्णाटमंडलात् ॥ २८ ॥**

२८ मग कांहीं दिवसांनीं तो सूर्यवंशोत्पन्न ( शिवाजी राजा ) कर्णाटक प्रांताहून महाराष्ट्र देशास निघाला.

**सशक्तित्रितयोपेतः समेतस्सैन्यसंचयैः ।**
**शिवस्स्वया श्रिया सार्धं पुण्याहं पुरमासदत् ॥ २९ ॥**

२९ प्रभाव, उत्साह व मंत्र या तीन शक्ती, सेनासमूह आणि स्वतःची राजलक्ष्मी यांनीं युक्त असा तो शिवाजी पुणें शहरास पोंचला.

**चक्रप्रियकरः सद्यः समुल्लासितमंडलम् ।**
**नावेदयदमुं लोकबंधुं लोको व्यलोकत ॥ ३० ॥**

३० ( चक्रवाक पक्ष्याचें ) राष्ट्राचें हित करणारा आणि तत्काळ ( पृथ्वीस प्रकाशित करणारा ) राष्ट्रास उल्हसित करणारा अशा ह्या (सूर्यास) लोकमित्रास लोकांनीं पाहिलें, परंतु जाणलें नाहीं.

**ततोनुकूलप्रकृतिः कुर्वन् प्रकृतिरंजनम् ।**
**अवर्धत क्रमेणैष विक्रमी यशसा सह ॥ ३१ ॥**

३१ पुढें अनुकूल मंत्र्यांच्या साह्यानें प्रजेला ( आनंद ) देत असतां तो पराक्रमी ( शिवाजी ) हळू हळू वाढूं लागला, त्याबरोबरच त्याचें यशहि वाढूं लागलें.

**महाराष्ट्रो जनपदस्तदानीं तत्समाश्रयात् ।**
**अन्वर्थतामन्वभवत् समृद्धजनतान्वितः ॥ ३२ ॥**

३२ तेव्हां त्याच्या अधिकाराखालीं महाराष्ट्र देशांतील जनता समृद्ध झाली आणि ' महाराष्ट्र ' हें नांव अन्वर्थ झालें.

**श्रयंतः प्रश्रयोपेतं गुरवस्तं गुणैस्सह ।**
**अनन्यानिष्ठमनसः समगच्छन् कृतार्थताम् ॥ ३३ ॥**

३३ त्या विनशशील व गुणवान शिवाजीच्या पदरीं असलेले गुरु कृतार्थ झाले ( म्हणजे त्यांनीं शिकविलेल्या सर्व विद्या व कला यांमध्यें तो निपुण झाला. )

**श्रुतिस्मृतिपुराणेषु भारते दण्डनीतिषु ।**
**समस्तेष्वपि शास्त्रेषु काव्ये रामायणे तथा ॥ ३४ ॥**
**व्यायामे वास्तुविद्यायां होरासु गणितेष्वपि ।**
**धनुर्वेदचिकित्सायां मते सामुद्रिके पुनः ॥ ३५ ॥**
**तासु तासु च भाषासु छन्दस्सु च सुभाषिते ।**
**चर्यास्विभरथाश्वानां तथा तल्लक्षणेष्वपि ॥ ३६ ॥**
**आरोहणे प्रतरणे चंक्रमे च विघंलने ।**
**कृपाणचापचक्रेषु प्रासपट्टिशशक्तिषु ॥ ३७ ॥**
**युद्धे नियुद्धे दुर्गाणां दुर्गमीकरणेषु च ।**
**दुर्लक्ष्यलक्ष्यवेधेषु दुर्गमाभिगमेष्वपि ॥ ३८ ॥**
**इंगितेषु च मायासु विषनिर्हरणादिषु ।**
**तत्तद्रत्नपरीक्षायामवधाने लिपिष्वपि ॥ ३९ ॥**
**प्रवीणः स स्वयं तांस्तान् गुरून् गुरुयशोभरैः ।**
**अयोजयत् भृशं तत्तत् प्रत्यभिज्ञानवान् विभुः ॥ ४० ॥**

३४–४० श्रुति, स्मृति, पुराणें, भारत, राजनीति, सर्व शास्त्रें, रामायण, काव्य, व्यायाम, वास्तुविद्या, फलज्योतिष, सांग धनुर्वेद, तसेंच सामुद्रिक, निरनिराळ्या भाषा, पद्य, सुभाषित, हत्ती, घोडे व रथ यांवरून बसणें, तसेंच त्यांचीं लक्षणें, चढणें व उतरणें दौड मारणें, उडी मारणें, तरवार धनुष्य व चक्र, भाला, पट्टा व शक्ति, युद्ध व बाहुयुद्ध, दुर्ग अभेद्य ( दुर्गम ) करणें, दुर्लक्ष्य निशाण वेधणें, दुर्गम संस्थानांतून निसटून जाणें, इंगित जाणणें, जादुगिरी, विष उतरणें, नाना प्रकारची रत्नपरीक्षा, अवधानें, ह्या सर्व विद्या शास्त्रें व कला यांमध्यें स्वतः प्रवीण होऊन सर्व गुरूंस मोठें यश दिलें.

**स एष यौवनारंभे दधानोऽभिनवां श्रियम् ।**
**व्यभाद्यथा वासन्तविभवे सुरभूरुहः ॥ ४१ ॥**

४१ वसंत ऋतूंतील वैभवाच्या योगें देवतरु जसा शोभतो, तसा हा शिवाजी यौवनारंभीं नवीन प्राप्त झालेल्या कांतीमुळें शोभूं लागला.

**तमुल्लंघितकौमारमुद्भवन्नवयौवनम् ।**
**मीनकेतनलावण्यश्रीविलासमनोहरम् ॥ ४२ ॥**
**सती शीलवती रम्यरूपा चातिगुणोज्वला ।**
**अभजद् भूपतिं भार्या प्रवारकुलसंभवा ॥ ४३ ॥**

४२--४३ कौमारदशा संपून ज्याला नुकतेंच नवयौवन प्राप्त झालें आहे आणि मदनासारखें लावण्य अंगीं खेळूं लागल्यामुळें मनोहर अशा त्या शिवाजीला सती शीलवती, रमणीय रूपवती व अत्यंत गुणशालिनी अशी पवार कुळांतील भार्या प्राप्त झाली.

**पूर्वजन्मप्रणयिनीं स इमां वरवर्णिनीम् ।**
**लब्ध्वा मुदमुपादत्त श्रीकृष्ण इव रुक्मिणीम् ॥ ४४ ॥**

४४ रुक्मिणी प्राप्त झाल्यानें श्रीकृष्णास जसा आनंद झाला, तसा पूर्वजन्मींची पत्नी अशी ही सुंदर स्त्री प्राप्त झाल्यानें शिवाजीला झाला.

**प्रादुर्भवत् प्राग्भवसंस्तवाभ्यां ।**
**मिथोनुकूलत्वमुपागताभ्याम् ॥**

अधत्त ताभ्यामथदंपतीभ्यां ।
संभूय शोभां महतीं त्रिवर्गः ॥ ४५ ॥

४५ पूर्वजन्मींचा परिचय असलेलें हें जोडपें (पुनः) एकत्र आल्यानें त्यांच्यामध्यें परस्परांबद्दल प्रेम उत्पन्न झालें. मग धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ ह्या जोडप्याच्या ठिकाणीं एकत्र आल्यामुळें फार शोभूं लागले.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकर-कवीन्द्रपरमानन्द-
प्रकाशितायां संहितायां दशमोध्यायः

---

# अध्याय ११ वा.



**मनीषिण ऊचुः**

**संप्रेष्य पुण्यविषयं सनयं तनयं शिवम् ।**
**शाहराजः किमकरोत् कर्णाटविषये वसन् ॥ १ ॥**

पण्डित म्हणाले:—

१ आपला शहाणा मुलगा शिवाजी ह्यास पुणें प्रातीं पाठवून शहाजी राजानें कर्नाटकांत राहून काय केलें ?

**कथं च महमूदोऽपि तस्मिन् विजितविद्विषि ।**
**प्रसिद्धायोधनोत्साहे शाहे स्वयमवर्तत ॥ २ ॥**

२ आणि ज्यानें शत्रू जिंकले आहेत व ज्याचा युद्धोत्साह प्रसिद्ध आहे अशा शहाजीशीं महमुदशहा स्वतः कसा वागला ?

**कवीन्द्र उवाच**

**षाड्गुण्यस्य प्रयोगेण तत्तन्मंत्रबलेन च ।**
**वशीचकार सकलं शाहः कर्णाटमंडलम् ॥ ३ ॥**

कवीन्द्र म्हणाला:—

३ संधि, विग्रह, यान, आसन, सश्रय आणि द्वैध या सहा गुणांचा प्रयोग करून, त्याचप्रमाणे नानाप्रकारच्या मसलती लढवून, शहाजीनें सर्व कर्नाटक प्रांत आपल्या ताब्यांत आणला.

**प्रसूनमिव संप्राप्य प्रणयी प्रणतिस्पृशा ।**
**शिरसा प्रतिजग्राह जगद्देवोऽस्य शासनम् ॥ ४ ॥**

४ ( कावेरी पत्तनाच्या ) जगद्देवानें शरण येऊन, प्रणाम करून ह्याची सत्ता पुष्पाप्रमाणें मस्तकावर धारण केली.

**दुर्धर्षोऽपि विधेयोऽस्य बभूव मधुराधिपः ।**
**प्रतिपेदे महाशूरपतिरप्यस्य वश्यताम् ॥ ५ ॥**

५ मदुरेचा अजिंक्य राजा सुद्धां ह्याच्या आज्ञेंत वागूं लागला. म्हैसूरच्या राजानेंहि ह्याचा ताबा मान्य केला.

**रणदूलहखानेन खलेनोपहृतं बलात् ।**
**भद्रासनं स्वमध्यास्त वीरभद्रोऽस्य संश्रयात् ॥ ६ ॥**

६ दुष्ट रणदूल्लाखानानें बलात्कारानें घेतलेल्या आपल्या सिंहासनावर वीरभद्र हा शहाजीच्या आश्रयानें पुनः बसला.

तं तं मंत्रं तत्र तत्र प्रयुंजानस्य धीमतः ।
बहवोऽस्यानुभावेन जहुर्यवनजं भयम् ॥ ७ ॥

७ निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या मसलती योजणाऱ्या चतुर शहाजीच्या प्रभावानें पुष्कळांनीं यवनांची भीति टाकली.

शाहराजस्य मंत्रेण भवन्नन्यसुदुःसहः ।
सर्वाणि स्वामिकार्याणि चकार रणदूलहः ॥ ८ ॥

८ दुसऱ्यास अतिशय दुःसह असणारा रणदुल्लाखान सर्व स्वामिकार्यें शहाजी राजाच्या सल्लामसलतीनें करूं लागला.

अथ कालगतिं प्राप्ते सेनान्यां रणदूलहे ।
कार्णाटकान् नरपतीन् स्ववशीकर्तुमंजसा ॥ ९ ॥
यं यं सेनापतिं तत्र प्राहिणोत् किल येदिलः ।
स स तत्कांक्षिताकांक्षी शाहमेवान्ववर्तत ॥ १० ॥

९-१० पुढें सेनापति रणदुल्लाखान कालवश झाल्यावर कर्नाटकांतील राजांना तावडतोब आपल्या ताब्यांत आणण्यासाठीं ज्या ज्या सेनापतीस आदिलशहानें तिकडे पाठविलें तो तो सेनापति त्याचें इष्ट कार्य सिद्धीस नेण्यासाठीं शहाजीच्याच तंत्रानें वागूं लागला.

ततो भृशबलं भूपं नियन्तुमनयं स्पृशन् ।
इभरामसुतो दर्पात् मुस्तुफाखानमादिशत् ॥ ११ ॥

११ तेव्हां अनीतीचा आश्रय करणाऱ्या त्या इब्राहिम आदिलशहाच्या पुत्रानें (महमूदशहानें) घमेंडीनें भोसले राजास कैद करण्याची मुस्तुफाखानास आज्ञा केली.

अथानकनिनादेन सागरं प्रतिगर्जयन् ।
जयशब्देन योधानां दिङ्मुखानि प्रपूरयन् ॥ १२ ॥
तरलाभिः पताकाभिस्ताडितः परितर्जयन् ।
उदग्रैश्शुंडिशुण्डाग्रैर्मुदिरान् प्रतिसारयन् ॥ १३ ॥
पांसुभिस्तुरगोध्दूतैस्ससप्तिं विलोपयन् ।
वाहिनीनिवहैरध्ववाहिनीः परिशोषयन् ॥ १४ ॥
निम्नोन्नतां वसुमतीमतीव समतां नयन् ।
प्रपेदे सप्रतिभटैर्वृतं कर्णाटनीवृतम् ॥ १५ ॥

१२–१५ मग दुंदुभिध्वनीनें समुद्र दुमदुमवीत, योध्यांच्या जय शब्दानें दिशा भरून टाकीत, तरल पताकांनीं विजांना धमकावीत, हत्तींच्या उंच शुंडाग्रांनीं मेघांना बाजूस सारीत, घोड्यांनीं उडविलेल्या धुळीनें सूर्यास लोपवून टाकीत, सेनासमूहांनीं मार्गांतलि नद्या आटवीत, उंच सखल भूमि अगदीं सपाट करीत तो मुस्तफाखान शत्रू योद्धयांनीं व्याप्त अशा कर्नाटक प्रांतास जाऊन पोंचला.

ततः श्रुत्वा तमायान्तमनेकानीकपान्वितम् ।
प्राप्तसेनापतिपदं येदिलप्रत्ययास्पदम् ॥ १६ ॥
प्रथितं मुस्तुफाखानं महामानं महान्वयम् ।
कपटानोकहभुवां खुरासानभुवां वरम् ॥ १७ ॥
अविश्रब्धोऽपि विश्रंभमात्मनः संप्रदर्शयन् ।
प्रत्युज्जगाम संरभात् ससैन्यश्शाहभूपतिः ॥ १८ ॥

१६–१८ सेनापतिपद प्राप्त झालेला, आदिलशहाच्या विश्वासांतला कपटरूपी वृक्षांचें आगर असलेल्या खुरासान प्रांताचा अर्क, महामानी, थोर कुळांतला, प्रख्यात मुस्तुफाखान हा अनेक सरदारांसह येत आहे असें ऐकून आपला त्याच्यावर विश्वास नसतांहि तो आहे असें दाखवून शहाजी राजा आपल्या सैन्यासह लगबगीनें त्यास सामोरा गेला.

अथाधिकाधिकं स्नेहं मिथो दर्शयतोस्तयोः ।
सख्योरिव महान् जज्ञे पथि संदर्शनोत्सवः ॥ १९ ॥

१९ एकमेकांविषयीं अधिकाधिक प्रेम दाखविणाऱ्या त्यांच्या भेटीचा समारंभ मार्गांत दोघां मित्रांच्या भेटीप्रमाणें मोठा थाटाचा झाला.

उभावपि तदा तत्र वस्त्राण्याभरणानि च ।
कुंजरास्तुरगांश्चोच्चैरन्योन्यमुपजह्रतुः ॥ २० ॥

२० त्या समयीं दोघांनींहि तेथें वस्त्रें, अलंकार, हत्ती, घोडे हीं एकमेकास विपुल अर्पण केलीं.

तदानीं मुस्तुफानीकनिवेशस्यांतिके निजाम् ।
सेनां निवेशयामास भूभृत् भृशबलो बली ॥ २१ ॥

२१ त्या वेळेस मुस्तुफाखानाच्या सैन्याच्या तळाजवळच बलाढ्य शहाजी राजे भोसले यांनींहि आपल्या सेनेचा तळ दिला.

अद्राक्षीन्मुस्तुफाखानश्छिद्रान्वेषी यदा यदा ।
सन्नद्धमेव सुतरां शाहराजं तदा तदा ॥ २२ ॥

२२ छिन्द्रान्वेषी मुस्तुफाखान जेव्हां जेव्हां पाही तेव्हां तेव्हां त्यास शहाजी राजा अगदीं सज्ज आढळे.

**प्रत्याययितुमात्मानं परिदर्शितसौहृदः ।**
**स तत्तत्कार्यकरणे शाहमेव पुरो व्यधात् ॥ २३ ॥**

२३ आपल्याविषयीं खात्री पटविण्यासाठीं स्नेह दाखवून मुस्तुफाखान शहाजी राजास सर्व कार्यांत पुढें करीत असे.

**प्रत्युत्थानेन तरसा दूरप्रत्युद्गमेन च ।**
**हस्ताश्लेषेण हर्षेण हस्तसंधारणेन च ॥ २४ ॥**
**अर्धासनप्रदानेन संमुखीभवनेन च ।**
**स्मितपूर्वेण वचसा तथा प्रीतिस्पृशा दृशा ॥ २५ ॥**
**तत्तन्मत्रप्रयोगाणां प्रकाशकरणेन च ।**
**तेषु तेषु च कार्येषु पुरस्कारेण भूयसा ॥ २६ ॥**
**अर्हेण परिबर्हेण संस्तवेन स्तवेन च ।**
**परिहासरसेनोच्चैरध्यात्मकथनेन च ॥ २७ ॥**
**हिताहंतोद्भावनेन स्ववृत्तावेदनेन च ।**
**यवनः सोऽन्वहं तस्मै प्रत्ययं समदर्शयत् ॥ २८ ॥**

२४–२८ लगबगीनें उत्थापन देऊन, दुरून सामोरें जाऊन, हात घट्ट धरून, आनंद दाखवून, हातांत हात घालून, अर्धासन देऊन, त्याच्याकडे तोंड करून, स्मितपूर्वक बोलून, प्रीतिपूर्वक पाहून, नानाप्रकारच्या मसलतींच्या योजना त्यास प्रकट करून, सर्व कार्यांत त्याचा पुष्कळ पुरस्कार करून मूल्य-वान् नजराणे देऊन सलगी दाखवून, स्तुति करून, खूप थट्टा मस्करी करून, आध्यात्माच्या गोष्टी सांगून, हिताविषयीं अभिमान जागृत करून, किंवा आपला वृत्तांत सांगून तो यवन दररोज त्यास त्याच्यावर आपला विश्वास दाखवीत असे.

**ततः स पृतनापालः समस्तान् पृतनापतीन् ।**
**आनाय्य न्यायनिपुणो विविक्ते वाक्यमब्रवीत् ॥ २९ ॥**

२९ पुढें त्या राजनीतिनिपुण सेनापतीनें समस्त सेनानायकांस आणवून एकांतांत भाषण केलें.

**मुस्तुफाखान उवाच**

**यस्यान्नं भुज्यते येन मनुजेनानुजीविना ।**
**तस्य यो स भवेदात्मा नादसीयः कदाचन ॥ ३० ॥**

३० मुस्तुफाखान म्हणालाः—

जो सेवक ज्याचें ( धन्याचें ) अन्न खातो त्या सेवकाचा जो प्राण तो त्या धन्याचा होय, त्याचा ( सेवकाचा ) केव्हांहि नव्हे.

**न महत्वं विना विद्यां न काव्यं प्रतिभां विना ।**
**कदाचिदपि नाभीष्टं दृष्टं स्वामिकृपां विना ॥ ३१ ॥**

३१ विद्येशिवाय महत्त्व ( प्राप्त होत ) नाहीं; प्रतिभेशिवाय काव्य ( निर्माण होत ) नाहीं; त्याचप्रमाणें स्वामिकृपेशिवाय अभीष्ट झालेलें पाहण्यांत नाहीं.

**तस्माद् यः स्वामिनोऽर्थाय त्यजत्यात्मानमात्मनः ।**
**तमेव धन्यमित्याहुर्नीतितंत्रविदो जनाः ॥ ३२ ॥**

३२ म्हणुन जो ( सेवक ) स्वामिकार्यार्थ आपला प्राण वेंचतो तोच धन्य पुरुष होय असे नीतिशास्त्रवेत्ते म्हणतात.

**न बांधवो न च सखा न संबंधी न सोदरः ।**
**न पिताप्यनुरोद्धव्यः स्वामिसेवापरात्मभिः ॥ ३३ ॥**

३३ स्वामिसेवापरायण लोकांनीं संबंधी, मित्र, सोयरेधायरे, सख्खाभाऊ यांची, इतकेंच नव्हे तर, बापाचीं सुद्धां पर्वा करूं नयें.

**यस्मिंस्तुष्टे तुष्टिमेति यस्मिन् रुष्टेऽस्तमेति च ।**
**तमनन्येन मनसा न विषेवेत कः पुमान् ॥ ३४ ॥**

३४ जो संतुष्ट झाला असतां आपण तुष्ट होतों, आणि जो रुष्ट झाला असतां आपण नष्ट होतों त्याची ( स्वामिची ) सेवा कोणता पुरुष एकनिष्टपणें करणार नाहीं ?

**सर्वेऽपि वयमेतर्हि नियमे महति स्थिताः ।**
**संभूय महमूदस्य हिताय प्रयतेमहि ॥ ३५ ॥**

३५ आपण सर्वच जण सध्यां त्याच्या पूर्ण ताब्यांत आहोंत तेव्हां सर्व मिळुन महमूदाच्या हितासाठीं झटूं या.

**यदद्य स्वामिना स्वेन महमूदेन मानिना ।**
**निग्राह्यश्शाह इति वै संदेश्यावेदितं मयि ॥ ३६ ॥**
**बली भृशबलो भूपः स यावन्नावबुध्यते ।**
**तावत्ताद्धि विधातव्यमस्माभिः स्वहितार्थिभिः ॥ ३७ ॥**

३६-३७ आपला मानी धनी महमूदशहा ह्यानें 'शहाजीस कैद करा' असा आज निरोप पाठवून मला कळविलें आहे; तें आम्ही स्वहित साधकांनीं बलाढ्य शहाजीराजा भोसला जों जागा झाला नाहीं तोंच केलें पाहिजे.

**निशीथिनीमतीत्येमां महत्युषासि संहसाः ।**
**सहिताः सैनिकैः स्वैः स्वैस्तन्निगृह्णीत पार्थिवम् ॥ ३८ ॥**

३८ ही आजची रात्र उलटल्यावर मोठ्या पहाटेस आपआपल्या सैनिकांसह एकत्र होऊन त्या राजास पकडा.

**इत्थमावेदितास्तेन मुस्तुफेनार्थसिद्धये ।**
**पृतनापतयः स्वं स्वं शिबिरं प्रतिपेदिरे ॥ ३९ ॥**

३९ याप्रमाणें त्या मुस्तुफाखानानें सेनानायकांस कार्य सिद्धीस नेण्यास सांगितल्यावर ते आपआपल्या शिबिरास गेले.

**मंत्रमेतदविद्वांस्ते निशि यस्यामन्त्रयन् ।**
**तस्यामेव महोत्पाताः शाहस्य शिबिरेऽभवन् ॥ ४० ॥**

४० ही मसलत त्या अविंधांनीं ज्या रात्रीं केली त्याच रात्रीं शहाजीच्या शिबिरांत मोठे उत्पात झाले.

**सप्तयो दृक्पयोऽमुंचन्नरणन् करुणं गजाः ।**
**अतर्कितमभज्यंत क्रूरारवकृतो ध्वजाः ॥ ४१ ॥**

४१ घोडे अश्रु ढाळुं लागले, हत्ती करुण स्वर काढूं लागले, ध्वज कड्कड् आवाज होऊन एकाएकीं मोडून पडले,

**चक्रिरे नाहता एव पटहाः क्रूरमारवम् ।**
**रजसा सहसावर्तं वितेने वातमण्डली ॥ ४२ ॥**

४२ न वाजवतांच नगारे भयंकर आवाज करूं लागले, एकाएकीं वावटळ धुळीसह गरगर फिरूं लागली;

**अभ्रोदराद्विनैवाभ्रं करकाः परितोऽपतन् ।**
**विनैवांभोधरं व्योम्नः प्रादुरासीदिरंमदः ॥ ४३ ॥**

४३ मेघांशिवाय च आकाशांतून गारा चोहोंकडे पडूं लागल्या;मेघांशिवाय च आकाशांतून वीज चमकूं लागली;

**न प्रदीपनवेलायां प्रदीपाः प्रदिदीपिरे ।**
**न प्रसेदुर्मनुष्याणां वदनानि मनांसि च ॥ ४४ ॥**

४४ दिवे लावण्याचे वेळीं दिवे लागेनात; मनुष्यांचीं मुखें व मनें म्लान झालीं.

**अकारि पृतनोपांते शिवाभिरशिवो रवः ।**
**श्वभिरूर्ध्वमुखीभूय चक्रन्दे चातिनिंदितम् ॥ ४५ ॥**

४५ सेनेसमीप भालू अशुभ ओरडूं लागल्या. कुत्रीं वर तोंड करून अत्यंत घाणेरडें रडूं लागलीं;

**मुहुरभ्यर्णमभ्येत्य घूको घूत्कारमातनोत् ।**
**तथा वृकगणः क्रूरमारवं सहसाकरोत् ॥ ४६ ॥**

४६ वारंवार अत्यंत जवळ येऊन घुबड घूत्कार करूं लागलें; त्याचप्रमाणें लांडगेहि एकाएकीं भयंकर आवाज करूं लागले;

**चकंपिरे सुमनसां प्रतिमाः प्रतिमंदिरम् ।**
**अकस्माद्‌र्धरात्रे च गौश्चक्रन्द निकेतगा ॥ ४७ ॥**

४७ प्रत्येक देवळांत देवांच्या मूर्ति कापूं लागल्या; मध्यरात्रीं अकस्मात् गायी हंबरडें फोडूं लागल्या.

**इमान्यासन्निमित्तानि भयशंसीनि भूरिशः ।**
**तथाप्यवहितो नाभूत् भूपः स नियतेर्वशः ॥ ४८ ॥**

४८ अशीं भयसूचक दुश्चिन्हें पुष्कळ झालीं, तथापि तो शहाजी राजा दुर्दैवामुळें सावध झाला नाहीं.

**सज्जीभूय निजे निजेऽद्य शिबिरे तिष्ठन्त्यनीकाधिपाः**
**सार्धं यैर्व्यदधन्निशार्धसमये मंत्रं चिरं मुस्तुफः ।**
**आगत्येति निवेदितं प्रणिधिभिः श्रुत्वातिसत्वाधिको**
**दैवायत्ततया न शाहनृपतिश्चक्रे तदात्वोचितम् ॥ ४९ ॥**

४९ ज्यांच्याशीं मध्यरात्रींच्या वेळीं मुस्तुफाखानानें फार वेळ मसलत केली ते सेनानायक आपआपल्या शिबिरांत सज्ज होऊन राहिले आहेत असें हेरांनीं येऊन सांगितलें तरि तें ऐकूनहि अतिशय बलाढ्य शहाजी राजानें दुर्दैवामुळें तत्कालोचित गोष्ट केली नाहीं !

**इत्यनुपुराणे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां**
**संहितायामेकादशोऽध्यायः ।**

# अध्याय १२ वा.



अथ कोकवियोगार्तिहरेबंधूकभास्वरे ।
पूर्वपर्वतश्रृंगाग्रमारुरुक्षतिभास्करे ॥ १ ॥
प्रभातसंध्यारागेण रंजिते गगनांगने ।
तमस्तमीचरमुखप्रमुक्ते ककुभांगणे ॥ २ ॥
दरांदोलितपंपांभः कणसंपर्कशीतले ।
फुल्लदंभोरुहामोदमधुरे वाति मारुते ॥ ३ ॥
दिलावरो मसूदश्च सरजा याकुतोऽम्बरः ।
आदवन्याधिनाथश्च तथा कर्णपुराधिपः ॥ ४ ॥
फरादः कैरतश्चोभौ तथा याकुतसारभिः ।
आजमो बहुलोलश्च मानी मलिकराहनः ॥ ५ ॥
राघवो मंबतनयो वेदजिद्भास्करात्मजः ।
सुतो हैबतराजस्य बल्लाळश्च महाबलः ॥ ६ ॥
त्रयोऽप्येतेऽग्रजन्मानः सैनिकाग्र्याः सुदुर्मदाः ।
प्रवारौ सिद्धभंबाह्वौ मंबो भृशबलस्तथा ॥ ७ ॥
अन्येऽप्यनीकपतयः तत्तदन्वयसंभवाः ।
तदा युध्दमदावेशवशात्मानो महायुधाः ॥ ८ ॥
कम्पयन्त इवाकाशं पताकापटमण्डलैः ।
क्षोदयन्त इव क्षोणीं चलैर्हयखुरांचलैः ॥ ९ ॥
दिधक्षन्त इवाशेषां त्रिलोकीं तेजसां चयैः ।
प्राकारमिव कुर्वन्तः परित प्रबलैर्बलैः ॥ १० ॥
पावका इव दीव्यन्तः कृतान्त इव निर्भयाः ।
शिबिरं शाहराजस्य रुरुधुर्मुस्तुफाज्ञया ॥ ११ ॥

१--११ चक्रवाक पक्षाचें वियोगदुःख नाहींसें करणारा, दुपारींच्या फुला प्रमाणें कांतिमान् सूर्य उदयाचलाच्या शिखराग्रावर आरोहण करण्याच्या बेतांत होता; प्रभातकालीन संध्यारागानें गगनरूपी अंगणास लाली आली होती; अंधकाररूपी निशाचरापासून सर्व दिशा मुक्त झाल्या होत्या, जणू काय भीतीनें

आंदोलन पावणाऱ्या पंपा सरोवराच्या पाण्याच्या तुषारांच्या योगें शीतल आणि विकसित कमलांच्या सुगंधाच्या योगें अल्हाददायी असा वायू वाहात होता. अशा वेळीं दिलावरखान, मसूदखान, सरजा याकुतखान, अंबरखान. अदवनीचा राजा, कर्णरपूचा राजा, फरादखान, व कैरातखान, हे दोघे, त्याप्रमाणेंच याकुतखान, आजमखान व बडलोलखान, मानी मलिक राहनखान, राघव मंत्राजी, वेदोजी भास्कर आणि हैबत राजा ( वा ) चा पुत्र महाबलवान् बल्लाळ, असे तिघे मदोन्मत्त ब्राह्मण सरदार, सिधोजी आणि मंबाजी पवार मंबाजी भोसला आणि निरनिराळया कुलांतले दुसरेहि सरदार युद्धाची खुमखुम अंगांत चढल्यामुळें मोठमोठीं आयुधें धारण करून आपल्या पताकांच्या गर्दीनें आकाश जणूं काय कांपवीत, घोड्यांच्या खुरांच्या अग्रांनीं पृथ्वीचा जणूं काय चुरा करीत, आपल्या तेजोराशींनीं सकल त्रिभुवनास जणूं काय जाळून टाकीत, प्रबल सैन्यांच्या योगानें जणूं काय सभोंवतीं तट बांधीत अग्निप्रमाणें तेजस्वी आणि यमाप्रमाणें निर्भय असे ते ( सरदार ) मुस्तुफाखानाच्या आज्ञेवरून शहाजी राजाच्या शिबिरास वेढा देते झाले.

**असन्नाहितमातंगमपल्याणितसैन्धवम् ।**
**असज्जयोधसंदोहमसुप्तोत्थितनायकम् ॥ १२ ॥**
**यामिनीजागरोद्दामक्लमनिद्राणयामिकम् ।**
**शिबिरं तत्तदातंक वशाद्विहस्त्यमाददे ॥ १३ ॥**

१२--१३ इकडे शहाजीच्या शिबिरांत हत्तींवर हौदे चढविलेला नव्हते, घोड्यावर खोगिरें घातलीं नव्हतीं, सैनिकांचीं पथकें सज्ज नव्हतीं, नायक ( सेनापति ) निजून उठले नव्हते, रात्रींच्या जागरणानें अतिशय ग्लानि आल्यामुळें पाहरेकरी निद्रित होते, यामुळें नाना प्रकारच्या भीतीनें ग्रस्त होऊन त्या शिबिरांत एकच गोंधळ उडाला.

**परिवेषेण महता बिंबमंशुमतो यथा ।**
**शुशुभे प्रतिसैन्येन शाहस्य शिबिरं तथा ॥ १४ ॥**

१४ मोठ्या खळ्याच्या योगानें सूर्याचें बिंब जसें दिसतें तसें शत्रु सैन्याच्या योगें शहाजीचें शिबिर त्या समयीं दिसूं लागलें.

**सर्वतस्तस्य सैन्यस्य सागरस्येव गर्जतः ।**
**पार्ष्णिग्राहः स्वयमभून्मुस्तुफो वाहिनीश्वरः ॥ १५ ॥**

१५. सागराप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या सैन्याच्या पिछाडीचें सर्व बाजूंनीं संरक्षण सेनापति मुस्तुफखान स्वतः करीत होता.

**अथ खंडजिता चांबुजिता मानाजिता तथा ।**
**सहितो बन्धुभिश्चान्यैः सैनिकैश्च समन्ततः ॥ १६ ॥**

**चन्द्रहासधरैश्चापधरैः प्रासधरैरपि ।**
**अग्नियंत्रधरैश्चक्रधरैश्च पुरुषैर्वृतः ॥ १७ ॥**
**घोरकर्मा घोरफटो बाजराजो महाभुजः ।**
**वाडवो जसवन्तश्च वाडवाग्निरिवापरः ॥ १८ ॥**
**मल्लजिन्नरपालश्च प्रवारकुळदीपकः ।**
**ख्यातश्च तळजिन्नाम नृपो भृशबलान्वयः ॥ १९ ॥**
**अध्यासितसगर्वार्वखुरक्षुण्णवसुन्धराः ।**
**विविशुः शाहशिबिरं सर्वेऽमी बलिनां वराः ॥ २० ॥**

१६--२० नंतर खंडोजी, अंबाजी, मानाजी हे बंधु, तसेंच इतर सरदार आणि तरवारी, धनुष्यें, भाले, बंदुका, आणि चक्रे हीं धारण करणारे सैनिक ज्याच्या भोंवती आहेत असा घोर कृत्यें करणारा महाबाहु बाजराज घोरपडे, जणूं दुसरा वडवानलच असा यशवंतराव वाडवे, पवार कुलाचें भूषण मालोजी राजा, विख्यात तुळोजी राजा भोसला असे ते सर्व बलिष्ठ सरदार आपण बसलेल्या घोड्यांच्या खुरांनीं पृथ्वीचें चूर्ण करीत शहाजीच्या शिबिरांत शिरले.

**ते तदातीव गर्जन्तो जिगीषन्तो महामदाः ।**
**सुप्तं प्रबोधयामासुः शाहं सिंहमिव द्विपाः ॥ २१ ॥**

२१ हत्तींनीं सिंहास जसें जागें करावें तसें त्या समर्थी त्या मदोन्मत्त, जयेच्छु आणि अतिशय गर्जना करणाऱ्या सरदारानीं निजलेल्या शहाजीस जागें केलें.

**शाहः प्रबुद्धमात्रस्तु निशम्यागमनं द्विषाम् ।**
**सज्जमानः शशासोच्चैः सज्जध्वमिति सैनिकान् ॥ २२ ॥**

२२ शत्रु आलेले ऐकून जागा होतांच स्वतः सज्ज होत होत शहाजीनें "सज्ज व्हा" असा सर्व सैनिकांस जोराने हुकूम सोडला.

**अश्वोऽश्वोऽसिरसिःप्रासः प्रास इत्यादयस्तदा ।**
**आरवाः समजायन्त शिबिरे शाहभूभृतः ॥ २३ ॥**

२३ तेव्हां "घोडा घोडा, तरवार तरवार, भाला भाला" असा शहाजीच्या गोटात एकच गोंगाट उत्पन्न झाला.

**अथ शाहे महाबाहौ सज्जमाने महौजसि ।**
**अदसीये महासैन्येऽप्याकस्मिकभयस्पृशि ॥ २४ ॥**
**कण्ठीरव इवाकुण्ठगतिः संयति संयति ।**
**खण्डपाटल एवैको ययौ घोरफटान् प्रति ॥ २५ ॥**

२४--२५ महाबाहु व महाबलाढ्य असा शहाजी राजा सज्ज होत आहे आणि त्याचें मोठें सैन्य आकस्मिक भयानें ग्रस्त झालें आहे ( गोंधळून गेलें आहे ) इतक्यांत प्रत्येक युद्धांत सिंहाप्रमाणें अकुंठितगति असा खंडोजी पाटील हा एकटाच घोरपड्यांवर चालून गेला.

**आमुक्तकवचः श्रीमानभेद्यफलकोध्दुरः ।**
**कृतहस्तः कुन्तधरः कृपाणी कर्मकोविदः ॥ २६ ॥**
**स तूर्णं तुरगारूढो रणांगणमगाद्यदा ।**
**सिंहनादं नदान्ति स्म वाजराजादयस्तदा ॥ २७ ॥**

२६--२७ अंगांत कवच घातलेला, अभेद्य ढालीमुळें खंबीर, भाला घेतलेला, उत्तम नेम मारणारा, तरवार लटकविलेला, युद्धकुशल असा प्रख्यात खंडोजी जेव्हां त्वरित घोड्यावर बसून रणांगणांत गेला तेव्हां बाजी घोरपडे इत्यादींनीं सिंहगर्जना केली.

**ततो घोरफटानीकपतयोऽतिरयोध्दताः ।**
**तं पाटलं कुलोत्तंसं रुषा रुरुधिरेऽभितः ॥ २८ ॥**

२८ मग अत्यंत वेगवान घोरपडे सरदारांनीं त्या पाटील कुलभूषणाला त्वेषानें चोहोंकडून घेरलें.

**स तदाभ्रंलिहं भल्लं भ्रामयामास भासुरः ।**
**कारयामास चाश्वेन मंडलानि सहस्रशः ॥ २९ ॥**

२९ तेव्हां त्या तेजस्वी खंडोजी पाटिलानें मेघांना भिडणारा आपला भाला गरगर फिरवून आपल्या घोड्यास हजारों रिंगणें घ्यावयास लाविलीं.

**तद्भ्रामितस्य भल्लस्य परिभ्रांता नभोऽन्तरा ।**
**दिनेशमण्डलाकारा दिदीपे द्युतिमण्डली ॥ ३० ॥**

३० त्यानें गरगर फिरविलेल्या भाल्याचें अंतरालांत गरगर फिरणारें तेजोवलय सूर्य बिंबाप्रमाणें चमकूं लागलें.

**तैस्तैः प्रहरणैस्तत्र प्रहरन्तो महायुधाः ।**
**खण्डशः खण्डशः क्रोधात् तेन भल्लभृता कृताः ॥ ३१ ॥**

३१ नाना प्रकारच्या शस्त्रांनीं प्रहार करणाऱ्या, मोठीं आयुद्धें धारण करणाऱ्या वीरांचे त्यानें आपल्या भाल्यानें संतापानें तुकडे तुकडे केले.

**कुप्यता पविहस्तेन पर्वता इव पातिताः ।**
**प्रतिप्रतीकं त्रुट्यन्तः पेतुरुर्व्यामनेकशः ॥ ३२ ॥**

३२ क्रुद्ध इंद्रानें आपल्या वज्रानें पाडलेल्या पर्वताप्रमाणें प्रत्येक अवयव तुटून अनेक योद्धे भूमीवर पडले.

**रोषदष्टाधरैर्द्धीरैरायोधनपरैः परैः ।**
**प्रसभं प्रहृतोप्येष पौरुषं स्वमदर्शयत् ॥ ३३ ॥**

३३ क्रोधानें दांत ओठ चावून युद्धपरायण शूर शत्रूंनीं याच्यावर जोरानें प्रहार केले असतांहि यानें आपला पराक्रम दाखविला.

**स ततः स्वेन भल्लेन निशितेनायतेन च ।**
**जहार कस्यचित्तस्य शिरोऽद्रिशिखिरोपमम् ॥ ३४ ॥**

३४ त्यासाठीं त्यानें आपल्या लांब आणि तीक्ष्ण भाल्यानें कोणा एकाचें पर्वत शिखरासारखें शिर छाटून टाकलें.

**तथैव कस्यचिद्वक्षः शिलातलमिवायतम् ।**
**अभेद्यमपि संरंभात् बिभेद बलिनां वरः ॥ ३५ ॥**

३५ त्याचप्रमाणें कोणाची शिळेसारखी रुंद आणि अभेद्य छाती त्या बलिष्ठानें त्वेषानें फोडून टाकली.

**सभल्लफलकाघात पतिताश्वस्य कस्यचित् ।**
**कुंभि कुंभोपमं सद्यः स्कंधकूटमपातयत् ॥ ३६ ॥**

३६ त्याने कोणाचा घोडा भाल्याच्या पात्यानें भोसकून हत्तीच्या गंडस्थळासारखा त्याचा उंच खांदा एकदम खालीं पाडला.

**कस्यचिच्चरणद्वंद्वं वलग्नं चापि कस्यचित् ।**
**कस्यचित् कंठनालंच चिच्छेद किल खंडजित् ॥ ३७ ॥**

३७ कोणाचें पाय, तर कोणाची कंबर आणि कोणाचा कंठ त्या खंडोजींनं कापून काढले.

**उत्पत्योत्पत्य भल्लेन पातायन् परितः परान् ।**
**एकोपि पाटलः प्राप तत्र चित्रमनेकताम् ॥ ३८ ॥**

३८ एकसारखें चाल करून भाल्यानें शत्रूंना सभोंवतीं पाडणारा तो पाटील एकटा असूनहि अनेक आहे, असें भासलें.

**अभियातारि संघात शातहेति शताहतः ।**
**स भिन्नवारबाणोरिवारणान् प्रत्यवारयत् ॥ ३९ ॥**

३९ हल्ला करणाऱ्या शत्रुसमुहाच्या शेंकडों तीक्ष्ण शस्त्रांचे प्रहार होऊन ज्याचें कवच भग्न झालें होतें अशा त्या पाटलानें शत्रुरूपी हत्ती परतविले.

**सविपक्षविनिर्मुक्तविशिखक्षतविग्रहः ।**
**शुशुभे लोहितार्द्रांगो लोहितांग इव ग्रहः ॥ ४० ॥**

४० शत्रूंनीं सोडलेल्या बाणांनीं जखमी झालेला व रक्तानें भिजलेला तो ( खंडोजी ) मंगळाप्रमाणें शोभू लागला.

**युध्यतः पाटलस्यास्य दृष्ट्वा पाटवमद्भुतम् ।**
**क्ष्वेडितास्फोटितं चक्रुर्बाजराजादयो भटाः ॥ ४१ ॥**

४१ लढणाऱ्या त्या पाटलाचें अद्भुत कौशल्य पाहून बाजराज घोरपडे प्रभृति योद्धे गर्जना करूं लागले व दंड थोपटूं लागले.

**परमानजिता मानाजिता भल्लभृता युधि ।**
**भिन्नभल्लस्य जग्राह करे क्रूरां कृपाणिकाम् ॥ ४२ ॥**

४२ शत्रूचा गर्व हरण करणाऱ्या मानाजीनें आपल्या भाल्यानें त्याचा भाला मोडून टाकला असतां त्यानें एक तीक्ष्ण तरवार हातांत घेतली.

**कृतहस्तं खड्गहस्तं ततस्तं प्रेक्ष्यसास्मितः ।**
**बाजराजो महाबाहुराजुहाव महाहवे ॥ ४३ ॥**

४३ तेव्हां युद्धकुशल अशा त्या खड्गधारी खंडोजीस पाहून महाबाहु बाजराजानें स्मित करून युद्धास आव्हान केलें.

**कालदंडकरालेन करवालेन पाटलः ।**
**तदा प्रहारमकरोत् बालराजस्य वक्षसि ॥ ४४ ॥**

४४ तेव्हां खंडोजी पाटलानें यमदंडाप्रमाणें भयंकर अशा तरवारीनें बाजराज घोरपड्याच्या छातीवर वार केला.

**तेनाघातेन महता प्रहतायतवक्षसि ।**
**बाजराजे महाबाहौ मोहमुद्रामुपेयुषि ॥ ४५ ॥**
**अंबाजित् परिघं घोरं मानाजिन्मुद्गरं तथा**
**मल्लजिच्च सितां शक्तिं शिखां शैखावतीमिव ॥ ४६ ॥**
**बलजित् भल्लमतुलं जसवन्तश्च सायकम् ।**
**खंडजिच्च प्रचिक्षेप खड्गं खंडजितं प्रति ॥ ४७ ॥**

४५--४६--४७ विशाल छातीवर केलेल्या त्या जोराच्या प्रहारामुळें महाबाहु बाजराज घोरपड्यास मूर्च्छा आली असतां अंबाजीनें भयंकर परिघ, ( लोखंडी कांटे असलेला सोटा ) मानाजीनें मुद्गल, मालोजीनें अग्नीच्या ज्वाळेसारखी काळी शक्ति, बाळाजीनें अप्रतिम भाला जसवंतानें बाण आणि खंडोजीनें खड्ग ( तरवार ) अशीं शस्त्रें त्या खंडोजी पाटलाच्या अंगावर फेकलीं.

**स भीमेन समस्तानि समस्तानि समंततः ।**
**आपतंत्यायुधीयानामायुधानि समंततः ॥ ४८ ॥**

**द्विधा चक्रेऽसिना स्वेन कानिचिच्च त्रिधा त्रिधा ।**
**कानिचित् पंचधा चापि नवधा दशधा तथा ॥ ४९ ॥**

४८-४९ चोहोंकडून योध्यांनीं फेकलेलीं सर्व शस्त्रें अंगावर येऊन पडूं लागलीं; त्यांपैकीं कांहींचे आपल्या भयंकर तरवारीनें दोन तुकडे, कांहींचे तीन तीन, तर कांहींचे पांच पांच तसेच कांहींचे नऊ नऊ, दहा दहा तुकडे केले.

**बाजराजः क्षणं मूर्छां क्षणं सर्वविलक्षणम् ।**
**अनुभूय स्वयं भूयः प्रत्ययुध्यत पाटलम् ॥ ५० ॥**

५० बाजराजानें क्षणभर मूर्छा आणि क्षणभर अत्यंत विलक्षण स्थिति स्वतः अनुभवून पुनः तो पाटलाशीं लढूं लागला.

**अथ स्वया प्रतिभया परप्रतिभयाकृतिम् ।**
**बाजराजो गदामुर्वीं पातयामास पाटले ॥ ५१ ॥**

५१ जिचा आकार शत्रूंना भयंकर होता अशी प्रचंड गदा बाजराजानें आपल्या कौशल्यानें पाटलाच्या अंगावर हाणली.

**क्रूरया कार्तिकेयस्य शक्त्येव क्रौंचपर्वते ।**
**बाजराजस्य गदया तया भित्वा निपातिते ॥ ५२ ॥**
**त्रिदशस्यंदनारूढे सुभटे खंडपाटले ।**
**हन्यमानेन सैन्येन स्वसैन्ये चाति-विव्हले ॥ ५३ ॥**
**हतसंबध्दशीर्षण्यस्रस्तोष्णीषपटांचलः ।**
**चर्मवान् वर्मवानुच्चः शरासनवतां वरः ॥ ५४ ॥**
**कुन्तयोधी मंडलाग्रमंडलीकारपारगः ।**
**शाहराजो महाबाहुर्महाराजो महाहवः ॥ ५५ ॥**
**अधिरुह्य महावाहमंबुवाहमिवांबुदः ।**
**सपदि प्रतिजग्राह बाजराजं जिघांसया ॥ ५६ ॥**

५२-५६ कार्तिक स्वामीच्या तीक्ष्ण शक्तीनें क्रौंच पर्वत जसा पडला तसा बाजराजाच्या गदेनें भिन्न होऊन तो उत्कृष्ट योद्धा खंडोजी पाटील स्वर्गवासी झाला; तेव्हां मार खाणाऱ्या शत्रुसैन्याकडून स्वतःचें सैन्य अतिविव्हळ झालें असता, शिरस्त्राण घट्ट बांधलेलें, पटक्याचा शेवला सोडलेले, ढाल घेतलेले, चिलखत घातलेलें, धिप्पाड, उत्कृष्ट धनुर्धर, भाला फेकण्यात व पट्टा खेळण्यांत निष्णात असे युद्धकुशल महाबाहू शहाजी महाराज जसा मेघावर मेघ आरूढ होतो त्याप्रमाणें एका मोठ्या घोड्यावर स्वार होऊन बाजराज घोरपड्यास ठार करण्याच्या इच्छेनें एकदम त्याच्यावर चालून गेले.

**आभीरराजो दशजिद्दशदिग्जकारकः ।**
**योगाजिच्च धनुःकाण्डधरो भाण्डकरान्वयः ॥ ५७ ॥**
**गुंजावटकरः सन्तो मेघजिट्ठक्कुरस्तथा ।**
**भ्राता त्र्यंबकराजश्च दत्तराजश्च दर्पितः ॥ ५८ ॥**
**अन्येऽप्यनीकपतयः शाहराजं समंततः ।**
**जुगुपुः शतशस्तत्र पृष्ठगोपाश्च भूरिशः ॥ ५९ ॥**

५७-५९ दहाहि दिशा जिंकणारा गवळ्यांचा राजा दसोजी, धनुष्यबाण धारण करणारा योगाजी भांडकर, संताजी गुंजावटकर, मेघाजी ठाकूर, बंधु त्र्यंबकराज आणि गर्विष्ठ दत्तराज यांनीं व दुसऱ्याहि शेंकडो सरदारांनीं व पुष्कळ पृष्ठरक्षकांनीं चोहोंकडून शहाजी राजाचें रक्षण केलें.

**तमथाकृष्टकोदंडटंकारोट्टंकितांबरम् ।**
**वीरं कण्ठीरवग्रीवं वृषस्कंन्धं महौजसम् ॥ ६० ॥**
**दत्तत्र्यंबकराजाभ्यां भ्रातृभ्यां परिवारितम् ।**
**सैनिकैः स्वैः परिवृत्तं सुरैरिव शतक्रतुम् ॥ ६१ ॥**
**मरुता प्रतिकूलेन सपदि प्रतिवारितम् ।**
**ददृशुश्शाहनृपतिं बाजराजादयो नृपाः ॥ ६२ ॥**

६०--६२ ओढलेल्या धनुष्याच्या टणत्कारानें आकाश दुमदुमवून व दणाणून सोडणारा, सिंहासारखी मान व बैलासारखे खांदे असलेला, त्र्यंबकराज आणि दत्तराज यां बंधूंनीं वेष्टिलेला, देवांनीं जसा इंद्र तसा स्वतःच्या सैनिकांनीं रक्षिलेला प्रतिकूल वाऱ्याच्या माऱ्यामुळें हटविलेला असा शूर व महाबलाढ्य शहाजी राजा बाजराज प्रभृति सरदारांनीं पाहिला.

**शाहराजोभ्यभिप्रेक्ष्य प्रतिपक्षानुदायुधान् ।**
**नादयन् मेहिनीं द्यां च सिंहनादमनीनदत् ॥ ६३ ॥**

६३ शस्त्रें उगारलेल्या शत्रूंस आपल्या सभोंवतीं पाहून शहाजीराजानें सिंहाप्रमाणें गर्जना करून पृथ्वी व आकाश हीं दणाणून सोडलीं.

**शाहस्य तेन नादेन पूरिताः ककुभोऽभवन् ।**
**प्रतिदध्या न चांभोधिः सपदि क्षुभितोऽभवत् ॥ ६४ ॥**

६४ शहाजीच्या त्या गर्जनेने दिशा भरून ( दुमदुमून ) गेल्या आणि समुद्रांतूनाहि त्याचा प्रतिध्वनि निघून तो एकदम क्षुब्ध झाला.

**न सेहे बाजराजेन शाहराजस्य गर्जितम् ।**
**प्रमत्तेन द्विपेनेव प्रमत्तद्विपबृंहितम् ॥ ६५ ॥**

६५ मस्त हत्तीचें ओरडणें जसें मस्त हत्तीस सहन होत नाहीं त्याप्रमाणेंच बाजराज घोरपड्यास शहाजी राजाजी गर्जना सहन झाली नाहीं.

**अथ घोरपटैर्घोरवज्रनिर्घोषघोषिभिः ।**
**अभ्येत्य ज्ञापितस्वस्वनामभिः प्रौढधामभिः ॥ ६६ ॥**
**चारुचर्मभिरामुक्तवर्मभिः कृतकर्मभिः ।**
**परिवव्रेतरां शाहस्तोयदैरिव चंद्रमाः ॥ ६७ ॥**

६६-६७तेव्हां विजेच्या भकंकर कडकडाटा प्रमाणे गर्जना करून जवळ येऊन, आपलीं नांवें पुकारून लखलखित व सुंदर ढाल धारण केलेलें कवच धातलेले युद्धकुशल अशा घोरपडे सरदारांनीं—मेघ जसे चंद्रास वेष्टितात त्याप्रमाणें--पूर्णपणें पक्का गराडा दिला (घेरलें.)

**तदा त्र्यंबकदत्ताह्वौ राजानौ दशाजित्तथा ।**
**मेघजिच्चमहाबाहुर्महासेनसमप्रभः ॥ ६८ ॥**
**योगाजिच्च तथान्येऽपि गुंजावटकरादयः ।**
**प्रत्यगृह्णन् प्रतिभटान् शाहराजपरीप्सया ॥ ६९ ॥**

६८--६९ तेव्हां त्र्यंबकराज व दत्तराज, दसाजी व कार्तिकस्वामी प्रमाणें तेजस्वी, महाबाहु मेघाजी, योगाजी व गुंजावटकरादि दुसऱ्याहि वीरांनीं शहाजीराजाचें रक्षण करण्याच्या इच्छेनें शत्रूकडील योध्यांवर हल्ला केला.

**ततस्त्र्यंबकराजेन चापहस्तेन मानजित् ।**
**खलखंडजिता दत्तराजेनापि च खंडजित् ॥ ७० ॥**
**प्रतिमल्लजिता योगजिता च सहमल्लजित् ।**
**तथा मेघजिता मेघनादसाम्यभृतांबुजित् ॥ ७१ ॥**
**युयुधे शाहराजेन बाजराजः पराक्रमी ।**
**अन्ये चान्यैश्च बहवो बहुभिर्दीर्घबाहुभिः ॥ ७२ ॥**

७०--७२ त्या समयीं धनुर्धारी त्र्यंबकराजाबरोबर मानाजी, दुष्टांस जिकणाऱ्या दत्तराजाबरोबर खंडोजी, शत्रूवीरांस जिंकणाऱ्या योगाजी--बरोबर मालोजी, त्याचप्रमाणें इंद्रजिततुल्य मेघाजी बरोबर अंबाजी आणि शहाजीराजाबरोबर पराक्रमी बाजराज आणि दुसऱ्या पुष्कळ दीर्घबाहु वीरांबरोबर दुसरे पुष्कळ वीर लढूं लागले.

**टंकार्य चापमन्योन्यं जिगीषंतो मदोत्कटाः ।**
**रणरंगे नटंति स्म वटा इव महाभटाः ॥ ७३ ॥**

७३ एकमेकांस जिंकूं इच्छिणारे ते मदोन्मत्त महावीर धनुष्याचा टणत्कार करून रणभूमीवर वडवाघुळाप्रमाणें नाचूं लागले.

**पत्तिभिः पत्तयस्तत्र सप्तिभिस्सप्तयस्तथा ।**
**द्विपैर्द्विपाश्च बहवः ससंजुर्विजिगीषया ॥ ७४ ॥**

७४ पायदळांशीं पायदळ, घोडेस्वारांशीं घोडेस्वार, हत्तीस्वारांशीं हत्तीस्वार असे पुष्कळ योद्धे विजयेच्छेनें परस्परांशीं भिडले.

**शक्तिभिश्शक्तयो गाढमुष्टिभिर्गाढमुष्टयः ।**
**परिघाः परिघैर्घोरैर्मुद्गरैर्मुद्गरास्तथा ॥ ७५ ॥**
**पट्टिशाः पट्टिशैस्तीव्रैस्तोमरैरपितोमराः ।**
**गदाभिश्च गदाश्चक्रैश्चक्राणि च सहस्रशः ॥ ७६ ॥**
**सायकाः सायकैस्तीक्ष्णैः कटारैश्च कटारकाः ।**
**तदानीमभ्यहन्यंत भल्लैर्भल्लाश्च भूरिशः ॥ ७७ ॥**

७५--७७ शक्तींचे शक्तीवर, गाढमुष्टीचे गाढमुष्टीवर, परिघाचे भयंकर परिघांवर, मुद्गलांचें मुद्गलांवर, पट्यांचे पट्यावर, तोमरांचे तीव्र तोमरांवर, गदांचे गदांवर, हजारो चक्रांचे चक्रांवर, बाणांचे तीक्ष्ण बाणांवर, कट्यारींचे कट्यारींवर, भाल्यांचे भाल्यांवर असे त्या समयीं पुष्कळ प्रहार होऊं लागले.

**शिरांसि सशिरस्त्राणि सतनुत्राण्युरांसि च ।**
**पाणयस्सतलत्राश्च सकेयूराश्च बाहवः ॥ ७८ ॥**
**सपताको ध्वजश्चापि सशरं च शरासनम् ।**
**हयश्च सहयारोहः करी च सनियंतृकः ॥ ७९ ॥**
**इमानि द्विषदुन्मुक्तशस्त्रच्छिन्नान्यनेकशः ।**
**तदानीमपतन् भूमौ पक्षयोरुभयोरपि ॥ ८० ॥**

७८–८० शिरस्त्राणांसह शिरें, कवचांसह धडे, चामड्याच्या हातमोज्यांसह हात, केयूरासह भुज, पताकेसह ध्वज, बाणासह धनुष्य, स्वारासह घोडा, माहुतासह हत्ती अशीं दोन्हीं पक्षांकडील पुष्कळ माणसें शत्रूंनीं फेकलेल्या शस्त्रांनीं तुटून त्या समयीं भूमीवर पडली.

**शरासनानि कर्षतः सांगुलीयकपाणयः ।**
**पृथुस्कंधाः कबंधाश्च प्रत्यधावन्नितस्ततः ॥ ८१ ॥**

८१ धनुष्यें ओढणारे हातांत आंगठ्या असलेले, रुंद खांद्यांचे कबंध इतस्ततः एकमेकांवर धावूं लागले.

**यस्य येन शिरश्छिन्नं यद्यदंगमपात्यत ।**
**तस्य तत्तत्तदोत्पत्य बत तं प्रत्यधावत ॥ ८२ ॥**

८२ ज्याचें शिर आणि जो जो अवयव तोडून ज्यानें खालीं पाडला त्याचा तो तो अवयव तत्क्षणीं उडून त्याच्यावर ( तोडणाऱ्यावर ) धावून गेला.

अथाश्वेभ्यः करिभ्यश्च नरेभ्यश्च शितैश्शरैः ।
कर्त्यमानशरीरेभ्यः प्रवृत्ते रुधिरह्रदे ॥ ८३ ॥
मज्जामांसवसामेदोमेदुरे मेदिनीतले ।
नर्टतीभिः पिशाचीभिः प्रहृष्टे डाकिनीकुले ॥ ८४ ॥
तत्तत्पताकिनीपालकपालकृतकुंडले ।
भैरवीभिस्समं भूरिमत्ते भैरवमंडले ॥ ८५ ॥
चंडदीधितिभिर्वीरमुंडमालामनोहरे ।
भूतैस्समुदिते चातिमुदिते चंद्रशेखरे ॥ ८६ ॥
राज्ञा खंडजिता तत्र दत्तराजे विहस्तिते ।
बत त्र्यंबकराजे च राज्ञा मानजिता जिते ॥ ८७ ॥
तद्वदंबुजिदुन्मुक्त हेतिपातपराहते ।
भीते मेघजिति ह्री(?)ते दशजित्यपि विद्रुते ॥ ८८ ॥
अन्यस्मिन्नपि सैन्ये स्वे हीयमाने भयाकुले ।
कुंभोद्भवेन मुनिना पीयमान इवार्णवे ॥ ८९ ॥
तथा मल्लजितः कांडकुलैर्भांडकरेऽर्दिते ।
शाहराजश्शितैर्बाणैर्बाजराजमवाकिरत् ॥ ९० ॥

८३--९० तीक्ष्ण बाणांनीं छिन्न भिन्न झालेल्या घोड्याच्या, हत्तीच्या व माणसांच्या शरीरांतून निघालेल्या रक्ताचें खोल तळें बनलें; मज्जा, मास, चरबी व मेद यांचा भूमीवर चिखल झाला; नाचणाऱ्या हडळींसह डाकिनी कुलास मोठा हर्ष झाला; निरनिराळ्या सेनापतींच्या करट्यांची कुंडलें धारण करणारें भैरवमंडळ भैरवींसह अतिशय मत्त झालें; सूर्यमंडळ भेदून गेलेल्या ( धारातीर्थी पडलेल्या ) वीरांच्या मुंडक्यांच्या माळेनें शोभणाऱ्या शंकरास भूतगणासह अत्यंत आनंद झाला; खंडोजीराजानें दत्तराजाचे हात तोडले; अहो ! त्र्यंबकराजास सुद्धां मानाजी राजानें जिंकलें; त्याचप्रमाणें अबाजीनें केलेल्या प्रहारांनीं भयभीत झालेला मेघाजी मागें हटला; दसाजीनें सुद्धां पळ काढला; अगस्ति मुनींनी प्यालेल्या समुद्राप्रमाणें इतरहि आपलें सैन्य भयाकुल होऊन नष्ट झालें; त्याचप्रमाणें मालोजीच्या बाणांनीं भांडकर त्रस्त झाला; अशी स्थिति पाहून शहाजी राजानें बाजराज घोरपड्यावर आपल्या तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला.

बाजराजस्तु विक्रांतस्तैर्नितांतशितैश्शरैः ।
शीर्यमाणशरीरोपि न मुमोह महोर्मिभिः ॥ ९१ ॥

९१ परंतु पराक्रमी बाजराज, त्या अत्यंत तीक्ष्ण आणि वेगवान् बाणांच्या वर्षावांनीं छिन्नभिन्न झाला असतांहि, मूर्छित झाला नाहीं.

**ततस्स तत्र संप्रेक्ष्य प्रस्फुरद्वर्म सांतरम् ।**
**ताडयामास भल्लेन शाहराजभुजांतरम् ॥ ९२ ॥**

९२ नंतर त्यासमयीं चकाकणारें कवच घातलेल्या शहाजीराजास पाहून त्याच्या छातीवर ( बाजराजानें ) आपल्या भाल्यानें प्रहार केला.

**कुशलो युध्दविद्यायां कुलिशाभेद्यविग्रहः**
**तेन मल्लाभिघातेन शाहराजो न विव्यथे ॥ ९३ ॥**

९३ युद्धविद्येंत कुशल आणि वज्राला सुद्धां ज्याचें शरीर अभेद्य होते असा तो शहाजी राजा त्या भाल्याच्या प्रहारानें व्यथित झाला नाहीं.

**अथ प्रकटितक्रोधैर्योधैर्मानाजिदादिभिः ।**
**शरशक्तिगदाखड्गभल्लाद्यायुधधारिभिः ॥ ९४ ॥**
**बाजराजं पालयद्भिर्दर्शयद्भिस्सपौरुषम् ।**
**परिवव्रे महाराजः शाहराजः पराक्रमी ॥ ९५ ॥**

९४--९५ तेव्हां शर, शक्ति, गदा, खड्ग, भाले इत्यादि आयुधें धारण करणाऱ्या, क्रोधानें खवळलेल्या व आपला पराक्रम दाखविणाऱ्या आणि बाजराजाचें रक्षण करणाऱ्या मानाजी प्रभृति योद्धांनीं पराक्रमी शहाजी राजास वेढलें.

**तत्र कालानलज्वालासमस्पर्शधरैश्शरैः ।**
**तापयामास तान् सर्वान् प्रतापी स महीपतिः ॥ ९६ ॥**

९६ तेथें प्रलयाग्नीच्या ज्वाळांप्रमाणे प्रखर अशा बाणानीं त्या सर्वांस प्रतापी ( शहाजी ) राजानें त्रस्त करून सोडलें.

**तदानीं शाहराजेन शरैः स्वैः शकलीकृताः ।**
**स्रस्तबाहुलतास्तत्र स्रवल्लोहितलोहिताः ॥ ९७ ॥**
**चंडवाताहतास्सद्यः पुष्पिता इव किंशुकाः ।**
**शतशस्सैनिकाः पेतुः बाजराजस्य पश्यतः ॥ ९८ ॥**

९७--९८ त्या वेळीं शहाजी राजानें आपल्या बाणांनीं ज्यांचे तुकडे तुकडे केले आहेत, ज्यांचे बाहु तुटून पडले आहेत, जे अंगांतून वाहणाऱ्या रक्तानें तांबडेलाल झाले आहेत असे शेंकडों सैनिक, प्रचंड वाऱ्याच्या तडाख्यानें नुकतेच फुललेले पळसाचे वृक्ष उमलुन पडावेत त्याप्रमाणें बाजराजासमक्ष पडले.

**उत्पतत्तुरगारुढो यत्र यत्रोत्पपात सः ।**
**तत्र तत्र परित्रस्य प्रतिवीरास्सहस्रशः ॥ ९९ ॥**

**पर्वता इव संशीर्णाः पविपातपराहताः ।**
**समजायंत दशधा शतधा च सहस्रधा ॥ १०० ॥**

९९--१०० दौडणाऱ्या घोड्यावर बसलेला शहाजी राजा जेथें जेथे चालून गेला तेथें तेथें घाबरलेल्या हजारो शत्रुवीरांचे वज्रप्रहारानें विदीर्ण झालेल्या पर्वताप्रमाणें दशधा, शतधा व सहस्रधा तुकडे झाले.

**ततः परिचरं कश्चित् कश्चित् सहचरं पुनः ।**
**वर्म चाप्रतिमं कश्चित् कश्चिच्चर्म सचंद्रकम् ॥ १०१ ॥**
**ततो घोरपटः कश्चिदिषुधिं च शरासनम् ।**
**चिच्छेद शाहराजस्य कश्चिच्च ध्वजमुन्नतम् ॥ १०२ ॥**

१०१-१०२ मग कोणी शहाजी राजाचा नोकर, कोणी त्याचा मित्र, कोणी त्याचे अप्रतिम कवच, कोणी त्याची चंद्रयुक्त ढाल, कोणा घोरपड्यानें त्याचा बाणांचा भाता व धनुष्य, कोणी त्याचा उंच ध्वज अशीं तोडलीं.

**अथारिपातितापारहेतिपातपतापतान् ।**
**तूर्णमुत्पत्य तुरगादुरगारातिचेष्टिते ॥ १०३ ॥**
**शराचितशरीरोत्थलोहितद्रवलोहिते ।**
**प्रभूतप्रधनोद्भूतपरिश्रमविमोहिते ॥ १०४ ॥**
**महाराजे महाबाहौ परिरब्धमहीतले ।**
**क्ष्वेडितास्फोटितावेशपरे च परमंडले ॥ १०५ ॥**
**हाहाकारस्तदात्युच्चैरभूद्भार्शबले बले ।**
**तत्र धर्मधनं धीरं धर्मराजसमश्रियम् ॥ १०६ ॥**

१०३--१०६ झटकन् घोड्यावरून उडी मारून गरुडांप्रमाणें झडप घालणाऱ्या, बाणांनीं विद्ध अशा शरीरांतून वाहणाऱ्या रक्तानें लाल झालेल्या, फार लढल्यामुळें झालेल्या परिश्रमानें मूर्च्छा आलेल्या महाबाहु शहाजी महाराजांनीं भूमीस आलिंगन दिलें असतां ( भूमीवर पडले असतां ) शत्रुमंडळ गर्जना करूं लागलें व दंड थोपटूं लागलें; आणि इकडे भोसल्यांच्या सैन्यांत मोठा हाहाकार उडाला.

**सर्वस्वमिव लोकस्य सर्वस्यापि समाश्रयम् ।**
**तं महीतलसंलग्नं मग्नं मोहमहोर्मिषु ॥ १०७ ॥**
**दैवाद्दिवस्तटाद्देवं दिवाकरमिव च्युतम् ।**
**रयाद्धयादवप्लुत्य बांधवत्वं प्रकाशयन् ॥ १०८ ॥**
**फलकेन स्वकीयेन ररक्ष बलजिद्बली ।**
**अथ शाहं महाबाहुं बाजराजः स्मयं तथा ॥ १०९ ॥**

१०७--१०९ तेथें धर्मराजाप्रमाणें शोभणारा, धर्मनिष्ठ, धैर्यवान् , लोकांचें जणूं काय सर्वस्व, सर्वांचाच आधार दुर्दैवानें आकाशांतून पडलेल्या तेजस्वी सूर्याप्रमाणें मूर्च्छा येऊन भूमीवर पडलेल्या अशा त्या शहाजी महाराजांचें बलाढ्य बाळाजीनें वेगानें घोड्यावरून उडी मारून, बंधुभाव दाखवून आपल्या ढालीनें रक्षण केलें.

**निश्वसंतं निजग्राह नागं जांगुलिको यथा ।**
**ततो हास्तिनमारोप्य नीयमानमरातिभिः ॥ ११० ॥**

१०९--११० तेव्हां गारुडी जसा फुसफुसणाऱ्या नागास पकडतो त्याप्रमाणें निःश्वास टाकणाऱ्या महाबाहु शहाजी राजास बाजराजानें स्वतः कैद केलें.

**श्रितमूर्छासुखं शुष्कमुखं मुद्रितचक्षुषम् ।**
**पंचाननमिवानीय पंजराभ्यंतरेऽर्पितम् ॥ १११ ॥**
**निकृतं निकृतिज्ञेन मुस्तुफेन दुरात्मना ।**
**शाहभूभृतमालोक्य भृशमाचुक्रुशुर्जनाः ॥ ११२ ॥**

११०--११२ मग ज्यास मूर्छा आली आहे, ज्याचें तोंड सुकलें आहे, ज्याचे डोळे मिटले आहेत, ज्यास कपटपटु, दुष्ट मुस्तुफाखानानें फसविलें अशा शहाजी महाराजांस—पकडून आणून पिंजऱ्यांत घातलेल्या सिंहाप्रमाणें—हत्तीवर घालून शत्रु घेऊन चाललेले पाहून लोक अतिशय आक्रोश करूं लागले.

**व्यधत्त यवनः स्वेन कपटेन पटेन यम् ।**
**नयं न वेद तं विद्मः शाहः सर्वविदप्ययम् ॥ ११३ ॥**

११३ ज्या मुस्तुफाखानानें आपल्या कपटरूपी पटानें ( वस्त्रानें ) शहाजीराजास झांकून टाकलें तो शहाजी सर्व कांहीं जाणणारा असूनहि त्यास तो कावा समजला नाहीं असें आम्हांस वाटतें.

**मुस्तुफः स्वामिकार्यार्थी पस्पर्श सुतमातशम् ।**
**अहो विश्रंभणायास्य ललंघे च स्वपुस्तकम् ॥ ११४ ॥**

११४ स्वामिकार्येच्छु मुस्तुफाखानानें शहाजीस विश्वास पटावा म्हणून आपला मुलगा आतशखान याची शपथ घेतली व आपलें कुराण उल्लंघिलें.

**इति तं यवनं तत्र जगर्हे जनताभितः ।**
**स तु स्वस्वामिकार्यार्थी कृतकृत्योभवत्ततः ॥ ११५ ॥**

११५ म्हणून तेव्हां जनता त्या यवनाची सर्वत्र निंदा करूं लागली. परंतु तो स्वामिकार्येच्छु मात्र कृतार्थ झाला.

न पल्याणं न तुरगो न करी न क्रमेलकः ।
नायुधं नायुधीयश्च न वाद्यं न च वादकः ॥ ११६ ॥
न मंचको न चोल्लोचो न पताका न च ध्वजः ।
न विक्रेयं न विक्रेता नैधने न च कीलकः ॥ ११७ ॥
न कांडपटकस्तत्र न चासीत्पटमंडपः ।
तथाभवत् क्षणार्धेन शाहस्य शिबिरं तदा ॥ ११८ ॥

११६--११८ खोगीर नाहीं, घोडा नाहीं, हत्ती नाहीं, उंट नाहीं, आयुध नाहीं योद्धाहि नाहीं, शस्त्र नाहीं, शस्त्रधारीहि नाहीं, वाद्य नाहीं, वाजंत्रीहि नाहीं, पलंग नाहीं, छतहि नाहीं, पताका नाहीं, ध्वजहि नाहीं, विक्रीची वस्तू नाहीं, विकणाराहि नाहीं, सर्पण नाहीं, मेखहि नाहीं, कनात नाहीं, तंबुहि नाहीं अशी क्षणार्धांत शहाजीराजाच्या शिबिराची अवस्था झाली.

अमीभिः संवर्तानलनिभखलैर्मुस्तुफमुखैः
चमूपालैः कालैरिव युधि निलिंपाधिपबलम् ।
अमुं शाहं साहंकृतिमतिनितान्तं नियमितं
स्वदूतेभ्यः श्रुत्वा महसि महमूदेन मुमुदे ॥ ११९ ॥

११९ प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें प्रखर आणि यमाप्रमाणें क्रूर अशा त्या मुस्तुफाखान प्रभृति सरदारांनीं इंद्राप्रमाणें पराक्रमी अशा त्या अभिमानी शहाजीराजास युद्धांत पक्के कैद केले आहे असें आपल्या दूतांकडून ऐकून महमूद आदिलशहास आनंद झाला.

इत्यनुपुराणे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां संहितायां
द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

---

# अध्याय १३ वा.



**मनीषिण ऊचुः ।**

**अथ स्वपितरं श्रुत्वा निगृहीतमरातिभिः ।**
**शम्भुराजः किमकरोत् तथा शिवमहीपतिः ॥ १ ॥**

पंडित म्हणाले:—

१ शत्रूंनीं आपल्या पित्यास कैद केल्याचें ऐकून शंभूजी ( संभाजी ) आणि शिवाजी हे काय करते झाले ?

**तं निगृह्य महाराजं मुस्तुफो वाहिनीपतिः ।**
**व्यधत्त किमधर्मात्मा महमूदश्च दुर्मतिः ॥ २ ॥**

२ त्या शहाजी महाराजांस कैद करून सेनापति मुस्तुफाखान आणि दुष्ट, अधार्मिक महमूदशहा यांनीं काय केले ?

**कवीन्द्र उवाच ।**

**शम्भुः स्वपितरं श्रुत्वा निगृहीतमरातिभिः ।**
**चुकोप मुस्तुफायोच्चैर्बिङ्गरूरं पुरं श्रयन् ॥ ३ ॥**

कवींद्र म्हणाला:—

३ आपल्या पित्यास शत्रूंनीं पकडल्याचें ऐकून बंगळूर येथें राहणाऱ्या शंभूजीस मुस्तुफाखानाचा अतिशय संताप आला.

**निशम्य शिवराजोऽपि शाहराजदशामिमाम् ।**
**येदिलस्यापकाराय प्रतिजज्ञे प्रतापवान् ॥ ४ ॥**

४ प्रतापी शिवाजीनेंहि शहाजीची झालेली ही दशा ऐकून आदिलशहाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा केली.

**मुस्तुफस्तु महामानी बिङ्गरूरजिघृक्षया ।**
**रयान्नृपं तानजितं ड्डुरान्वयधुरन्धरम् ॥ ५ ॥**
**तथा विठ्ठलगोपालं विप्रं क्षात्रोपजीविनम् ।**
**प्रौढं फरादखानं च सद्यः प्रस्थातुमादिशत् ॥ ६ ॥**

५-६ महामानी मुस्तुफाखानानें बंगळूर त्वरित घेण्याच्या इच्छेनें ड्डुरे वंशांतील मुख्य तानाजी राजे, क्षत्रिय वृत्तीनें राहणारा ब्राह्मण विठ्ठल गोपाळ व प्रौढ फरादखान यांना तावडतोब निघण्याची आज्ञा केली.

**तदानीं महमूदोऽपि मेधावी पृतनापतीन् ।**
**योगमाज्ञापयामास शिवस्य विषयं प्रति ॥ ७ ॥**

७ त्याचवेळीं बुद्धिमान् महमूदशहानेंहि शिवाजीच्या प्रांतावर चालून जाण्याविषयीं आपल्या सरदारांना आज्ञा केली.

**अथ सेनापतिर्नाम फत्तेखानो महामनाः ।**
**मिनादरतनौ शेखौ फत्तेखानश्च कोपनः ॥ ८ ॥**
**क्रूरो शरफशाहश्च धन्वधारी यशोधनः ।**
**सन्नाहसहिता एते यवनाः सज्जसाधनाः ॥ ९ ॥**
**घाण्टिको मत्तराजश्च कुलिशोपमसायकः ।**
**तथा फलस्थानपतिर्बलवान् बाजनायकः ॥ १० ॥**
**सामन्ताः शतशश्चान्ये स्वर्णपृष्ठशरासनाः ।**
**स्वर्णसारसनाः स्वर्णवसनाः स्वर्णकेतनाः ॥ ११ ॥**
**स्वर्णचन्द्रकमुद्राङ्कफलकद्युतिशालिनः ।**
**तस्थुराक्रम्य तरसा पुरं बिल्वसरोऽभिधम् ॥ १२ ॥**

८-१२ नंतर थोर मनाचा फत्तेखान नांवाचा सेनापति, मिनादशेख व रतनशेख, कोपिष्ट फत्तेखान, क्रूर, धनुर्धारी, आणि कीर्तिमान शरफशहा हे कवचधारी व शास्त्रास्त्रांनीं सज्ज यवन, आणि वज्रासारखे ज्याचे बाण आहेत असा मत्तराज घाटगे (घांटिक), फलटणाचा राजा बाजनाईक आणि सोन्याच्या पाठीचीं धनुष्यें, सोन्याचे कंबरपट्टे, सोन्याचीं वस्त्रें, सोन्याचे ध्वज, सोन्याच्या चांदांनीं युक्त ढाली धारण करणारे इतर शेंकडो मांडलिक राजे यांनीं बेलसर नांवाचें नगर बलानें हस्तगत करून तेथें तळ दिला.

**तथा हैबतराजस्य सुतो बल्लाळसंज्ञकः ।**
**कृतहस्तः कृती क्रूरकर्मा द्रौणिरिवापरः ॥ १३ ॥**
**सिंहसंहननोऽनेकैरनीकैः परिवारितः ।**
**पुरं शिरोबलं प्राप शिवसैन्यैरवारितः ॥ १४ ॥**

१३-१४ त्याच प्रमाणे उत्तम गोलंदाज, कुशल, क्रूर, सुंदर, जणूं काय दुसरा अश्वत्थामा असा हैबतरावाचा पुत्र बल्लाळ यानें अनेक सैनिकांसह शिवाजीच्या सैनिकांकडून अडथळा न होतां शिरवळ गांठलें.

**पुरन्दरशिरोवर्ती पुरन्दरसुतोपमः ।**
**तदा तदागमं श्रुत्वा शिवः स्मेरनताननः ॥ १५ ॥**
**सन्नाहवान् धनुर्बाणपाणिः सन्नद्धसाधनः ।**
**सीरायुधसमान् धीरान् स्ववीरानिदमब्रवीत् ॥ १६ ॥**

१५-१६ तेव्हां तो आलेला ऐकून पुरंदरगडावर राहणाऱ्या, कार्तिकेयासारख्या शिवाजीनें कवच घालून धनुष्य बाण हातीं घेऊन, शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन, स्मितयुक्त व नम्र वदन शिवाजी बलरामासारख्या आपल्या धैर्यवान वीरांस असें म्हणाला:—

**शिव उवाच ।**

**विश्वस्तो मुस्तुफाखाने महाराजः पिता मम ।**
**अहो व्यसनमापन्नः सम्पन्नः सम्पदा स्वया ॥ १७ ॥**

शिवाजी म्हणाला:—

१७ माझे वडील शहाजी महाराज स्वतःच्या संपत्तीने युक्त असतांहि, मुस्तुफाखानावर विश्वास ठेवल्यामुळें संकटांत सांपडले ही केवढी खेदाची गोष्ट!

**न विश्वसेदविश्वस्ते विश्वस्तेऽपि न विश्वसेत् ।**
**विश्वासाद्भयमुत्पन्नं मूलान्यपि निकृन्तति ॥ १८ ॥**

१८ अविश्वासू लोकांवर विश्वास ठेवूं नये, इतकेंच नव्हे तर विश्वासू लोकांवर सुद्धां विश्वास ठेवूं नये; (कारण) विश्वासापासून उत्पन्न झालेलें भय समूळ उच्छेद करतें.

**इति व्यासस्य वचनं श्रुतवानपि पार्थिवः ।**
**अविश्वास्यतरे तस्मिन् अहो विश्वस्ततां गतः ॥ १९ ॥**

१९ हें व्यासवचन माहीत असतांहि महाराजांनीं त्या अत्यंत अविश्वासू माणसावर विश्वास ठेवला हें केवढें आश्चर्य !

**अविज्ञातेङ्गितगतिः श्रितयेदिलशासनः ।**
**निजग्राह महाराजं मुस्तुफो यवनाधमः ॥ २० ॥**

२० आपले मनोगत समजूं न देणाऱ्या यवनाधम मुस्तुफाखानें आदिलशहाच्या हुकुमाने महाराजांना कैद केले.

**विश्वस्तः स्वर्णहरिणे हरिणाक्ष्या प्रणोदितः ।**
**वञ्चितो दशवक्त्रेण सोऽपि दाशरथिर्नृपः ॥ २१ ॥**

२१ एवढा दाशरथि राम, पण तोसुद्धां मृगनयना सीतेच्या आग्रहाने सुवर्णमृगावर विश्वास ठेवल्यानें रावणाकडून फसविला गेला.

**अतिविश्रब्धतां नीत्वा विप्रलब्धो मरुत्वता ।**
**पपात त्रिदिवात्तूर्णं ययातिर्नहुषात्मजः ॥ २२ ॥**

२२ नहुषाचा पुत्र ययाति याचा इंद्रानें आपल्यावर अत्यंत विश्वास बसवून घेऊन त्यास फसविलें; आणि तो स्वर्गातून त्वरित खालीं पडला.

**सहजं कवचं बिभ्रद्विश्वस्तो बलविद्विषा ।**
**तथा स विहितः कर्णः पार्थेन निहतो यथा ॥ २३ ॥**

२३ जन्मतःच प्राप्त झालेले कवच धारण करणाऱ्या कर्णानें विश्वास ठेवल्यामुळें इंद्रानें त्यास असें बनविलें कीं, तेणेंकरून तो अर्जुनाकडून मारला गेला.

**विश्वस्तो धर्मराजोऽपि भरतानां धुरन्धरः ।**
**सुयोधनसहायेन द्यूते शकुनिना जितः ॥ २४ ॥**

२४ भरत कुलांतील मुख्य जो धर्मराजा तो सुद्धां विश्वास ठेवल्यामुळे दुर्योधनाच्या साह्यकर्त्या शकुनीकडून द्यूतात जिंकला गेला.

**अतो वैरिषु विश्वासं न कुर्वीत विचक्षणः ।**
**येन सम्यगधीतोऽस्ति राजधर्मः सलक्षणः ॥ २५ ॥**

२५ म्हणून ज्यानें लक्षणांसह व सांगोपांगांसह राजनीतिचे चांगलें अध्ययन केले आहे अशा चतुर पुरुषाने शत्रूंवर विश्वास ठेवूं नये.

**हालाहलधराश्लेषो हालाहलनिषेवणम् ।**
**विद्विषत्सु च विश्वासस्त्रयमेतत्समं स्मृतम् ॥ २६ ॥**

२६ नागाला ( सर्पाला ) मिठी मारणे, हालाहल विष पिणें आणि शत्रूवर विश्वास ठेवणे ह्या तीनहि गोष्टी सारख्याच होत.

**लालनं कपिबालानां कालपन्नगचालनम् ।**
**तथा स्यादपकाराय खलप्रणयपालनम् ॥ २७ ॥**

२७ माकडांच्या पिलांचे लालनपालन करणें, काळसर्पास हलवणें, त्याचप्रमाणे दुष्टांशीं मैत्री करणे ही अपायकारक होत.

**यथान्धमन्दिरालिन्दमध्यदीपकदीपनम् ।**
**यथा स्रोतस्विनीस्रोतः सिकतासेतुबन्धनम् ॥ २८ ॥**
**यथा शकलितानर्घ्यमुक्तासंधानसाधनम् ।**
**यथा च जगति ख्यातं कदलीकाण्डदारणम् ॥ २९ ॥**
**यथा ह्याकाशखननं यथा सलिलताडनम् ।**
**तथा परिश्रमायैव भवेदसदुपासनम् ॥ ३० ॥**

२८–३० आंधळ्याच्या घरांतील ओसऱ्याच्या मध्यभागीं दिवा लावणें, नदीच्या ओघांत वाळूचा पूल बांधणें, फुटलेलें मूल्यवान् मोती पुनः जोडणें,

केळीचा खांब पाडणें, आकाश खणणें, जलताडण करणें हें जसे केवळ परिश्रमास कारणीभूत होतें तशीच दुष्टांची सेवा होय.

**द्विषि विश्वसता येन नीतिशास्त्रं न तत्स्मृतम् ।**
**किं तेन खदिराङ्गारपर्यङ्कशयनं कृतम् ॥ ३१ ॥**

३१ शत्रूवर विश्वासून जो प्रसिद्ध राजनीतिशास्त्र साफ विसरला त्याचा काय उपयोग? त्यानें खदिरांगारांच्या शय्येवर शयन केलें म्हणावयाचें !

**भवेद्यदि सतृष्णस्य वैतृष्ण्यं मृगतृष्णया ।**
**तर्हि स्यादेव निखिलं कुशलं खलसेवया ॥ ३२ ॥**

३२ तृषार्ताची तृष्णा मृगजळ पिऊन जर शांत होईल तर दुष्टांच्या सेवेनेंहि पूर्ण कल्याण होईलच होईल.

**सुषिरान्वेषणपरः परस्पर्धाकरः खलः ।**
**आहितोप्यहितो ज्ञेयो नावज्ञेयो विजानता ॥ ३३ ॥**

३३ छिद्रान्वेषी शत्रु, दुसऱ्याची स्पर्धा करणारा दुष्ट हे सर्पापेक्षांहि अहितकारक जाणावेत; शहाण्यानें त्यांची उपेक्षा करूं नये.

**रक्षितं राष्ट्रमखिलं वाक्यं च परिपालितम् ।**
**अमुष्य महमूदस्य महाराजेन किं कृतम् ॥ ३४ ॥**

३४ त्या महमूदशहाचें अखिल राज्य रक्षिलें आणि आज्ञा पाळली; महाराजांनीं त्याचे काय ( वाईट ) केले होतें ?

**हितानामहितो भूत्वा महितोपि स्वया श्रिया ।**
**अहो येदिलशाहोयं न सीदति निराश्रयः ॥ ३५ ॥**

३५ मित्रांचा शत्रु झाल्यामुळें निराधार असा हा आदिलशहा आपल्या ऐश्वर्यामुळें मान्य असला तरी नाश पावत नाहीं हें आश्चर्य होय !

**रुद्धः फरादखानाद्यैर्विरुध्दैरुध्दतस्मयः ।**
**योत्स्यते तत्र मे भ्राता बिंगरूरपुराश्रयः ॥ ३६ ॥**

३६ बंगळुरीं राहणारा, फरादखानादि शत्रूंनीं वेढलेला अत्यंत मानी असा माझा भाऊ तेथें युद्ध करील.

**इमानि गिरिदुर्गाणि पालयन्नातिनिर्वृतः ।**
**योत्स्येहमहितैरत्र सन्नध्दानीकसंयुतः ॥ ३७ ॥**

३७ आणि मी ह्या गडांचें रक्षण करीत अगदीं निर्धास्तपणें सज्ज सैन्यानिशीं येथे शत्रूंशीं लढेन.

**अहमत्र स्वयं तत्र शंभुराजः पराक्रमी ।**
**मोचयिष्यावहे तातं युध्यमानावुभावपि ॥ ३८ ॥**

३८ इकडे मी स्वतः आणि तिकडे पराक्रमी शंभुराज असे दोघेहि युद्ध करून वडिलांस मुक्त करूं.

**अथास्मदाभिभूतात्मा महमूदः सुदुर्मदः ।**
**सहैव स्वेन दर्पेण महाराजं विमोक्ष्यति ॥ ३९ ॥**

३९ अत्यत गर्विष्ठ महमूदशहाचा आम्हाकडून पराभव झाला म्हणजे तो आपल्या गर्वाबरोबरच महाराजांस सोडील.

**स्वेन धर्मेण सहितं महितं तातमावयोः ।**
**महमूदो न चेन्मोक्ता तर्हि भोक्ता स्वकर्म तत् ॥ ४० ॥**

४० स्वधर्मनिष्ठ अशा आमच्या पूज्य पित्यास जर महमूद सोडणार नाहीं तर तो आपल्या कर्माचें फळ खास भोगील.

**यर्हि मोहान्महाराजं येदिलः प्रहरिष्यति ।**
**तर्हि तं सहितं सद्यस्तात एव हनिष्यति ॥ ४१ ॥**

४१ जर आदिलशहा मूर्खपणानें महाराजांस अपाय करील तर बाबाच त्याला त्याच्या साह्यकर्त्यांसह लगेच ठार करतील.

**अनारतं मनो येषां धर्मपाशनिबंधनम् ।**
**अलं न तेषां बंधाय कारागारादिबंधनम् ॥ ४२ ॥**

४२ ज्यांचे मन सदा धर्मपाशांनीं बद्ध असते त्यांना बांधण्यास कारागृहादि बंधने समर्थ नसतात.

**गृहीता महिता लोके जयवल्ली मया पुरा ।**
**स्थापितश्चंद्रराजश्च तस्यां तदभिलाषुकः ॥ ४३ ॥**

४३ लोकांमध्यें प्रसिद्ध असलेली जावळी ( जयवल्ली ) मी पूर्वी घेतली आणि तिचा अभिलाष करणाऱ्या चंद्ररावाची तेथें स्थापना केली.

**घोरात्मानो घोरफटाः कुपिता इव पन्नगाः ।**
**मां जांगुलिकमालोक्य महतीं शांतिमागताः ॥ ४४ ॥**

४४ संतापलेल्या नागांप्रमाणें भयंकर घोरपडे मला गारुड्याला पाहून अगदीं गोगलगाय झाले आहेत.

प्रस्थाय प्रथनाय द्राक् मया विद्रावितः पुरा ।
जीवन्नादाय मुक्तश्च फलस्थानपुरेश्वरः ॥ ४५ ॥

४५ युद्धार्थ एकदम चाल करून फलटणच्या राजास पूर्वी मी पळवून लाविलें आणि त्यांस जिवंत पकडून सोडून दिलें.

एतेऽधुना समुदिताः फतेखानादयो भटाः ।
योत्स्यन्तेऽस्मान् समासाद्य द्विपा इव मदोत्कटाः ॥ ४६ ॥

४६ आतां हे फत्तेखानादि एकत्र झालेले योद्धे आम्हांस गांठून मस्त हत्तीं· प्रमाणें लढतील.

बलीयानेष बल्लाळः पालयन् प्रबलं बलम् ।
मन्यते बहुमात्मानं समादाय शिरोबलम् ॥ ४७ ॥

४७ प्रबळ सैन्य बाळगणारा हा अतिबलाढ्य बल्लाळ शिरवळ घेतल्यामुळे आपणास फारच मोठा समजूं लागला आहे.

अतो द्रुतमितो गत्वा तमेव बलिनां वरम् ।
विनिगृह्य भवन्तोऽद्य मोचयंतु शिरोबलम् ॥ ४८ ॥

४८ म्हणून तुम्ही येथून त्वरेनें जाऊन त्या अति बलाढ्य बल्लाळास पकडून आज शिरवळ सोडवावें.

अथ श्वोवा परश्वोवा फतेखानं महाबलम् ।
अत्र वा तत्र वा वीक्ष्य प्रतियोत्स्यामहे वयम् ॥ ४९ ॥

४९ मग उद्यां किंवा परवां त्या महाबलवान फत्तेखानास इथें वा तिथे आम्ही त्याच्याशीं युद्ध करूं.

कवींद्र उवाच ।

शिवस्येति वचः श्रुत्वा सैनिकास्ते सहस्रशः ।
पुष्करं पूरयामासुः सिंहनादेन भूयसा ॥ ५० ॥

कवींद्र म्हणालाः—

५० शिवाजीचें हें भाषण ऐकून त्या हजारो सैनिकांनीं सिंहाप्रमाणें प्रचंड गर्जना करून आकाश दणाणून सोडलें.

अथारातिप्रमथनो जगत्स्थापकवंशजः ।
प्रवृध्दप्रथनामोदो गोदोनाम महायुधः ॥ ५१ ॥
व्याघ्रान्वयस्तथा भीमो भीमो भीम इवापरः ।
दलितद्वेषिदोःस्तंभदंभस्संभश्च कांटिकः ॥ ५२ ॥

**शृंगारस्संगरांगानामिंगालकुलसंभवः ।**
**शिवश्चोत्तालकुंताग्रः करालः कालसन्निभः ॥ ५३ ॥**
**परवीरश्रियां चोरश्चोरवंश्यो गणाग्रणीः ।**
**भीकोऽतिभीषणानीकोऽत्यभीको रणकर्मणि ॥ ५४ ॥**
**वैरिवित्रासजननो युधि भैरवभैरवः ।**
**सभाभिभासमानोऽस्य सनाभिरपि भैरवः ॥ ५५ ॥**
**अमी शैलपतेश्शूराः सूरा इव सतेजसः ।**
**स्वया स्वया श्रिया रम्याः प्रणम्यामुं प्रतस्थिरे ॥ ५६ ॥**

५१–५६ मग शत्रूंचा विध्वंस करणारा हाडें (घुसळणारा) व निकराच्या युद्धांत आनंद मानणारा महायोद्धा गोदाजी जगताप, जणूं काय दुसरा भीमच असा भयंकर भीमाजी वाघ, शत्रूंच्या बाहुबलाचा गर्व हरण करणारा संभाजी कांटे, भयंकर आहे असा यमाप्रमाणें भयंकर युद्धांगाचा शृंगार, ज्याच्या भाल्याचें टोक शिवाजी इंगळे, शत्रुवीरांची लक्ष्मी चोरणारा (हरण करणारा) लढण्यांत अत्यंत निर्भय, अत्यंत भयंकर सैन्य असलेला असा सेनानायक भिकाजी चोर, शत्रूंच्या हृदयांत धडकी उत्पन्न करणारा, युद्धांत भैरवाप्रमाणें भयंकर, तो तेजःपुंज भैरव नांवाचा ह्याचा सख्खा भाऊ हे सूर्याप्रमाणें तेजस्वी, आपआपल्या वैभवानें शोभणारे गडांच्या स्वामीचे (शिवाजीचे) शूर वीर त्याला प्रणाम करून निघाले.

**आध्यक्ष्ये शिव एतेषां न्ययोजयत कावुकम् ।**
**सर्वेषां वृष्णिवीराणां वासुदेव इवाहुकम् ॥ ५७ ॥**

५७ ज्याप्रमाणें श्रीकृष्णानें सात्यकीस सर्व यादववीरांचा सेनापति नेमलें, त्याप्रमाणें शिवाजीनें कावुकास (कावजीस) त्या सर्वांचा सेनापति नेमिलें.

**सन्नाहैः स्वैः समाकीर्णास्तेऽवतीर्णाः पुरंदरात् ।**
**अंबुदा इव गर्जंतः सन्नध्दतरसैंधवाः ॥ ५८ ॥**
**तामतीत्य निशां तत्र प्रतीपविजिगीषया ।**
**प्रयाणाभिमुखीभूय कारयामासुरानकान् ॥ ५९ ॥**

५८–५९ आपला युद्धाचा पोषाख चढवून अतिशय सज्ज घोड्यांवर बसून मेघांप्रमाणें गर्जना करीत ते पुरंदर गडावरून खालीं उतरले आणि ती रात्र तेथेंच घालवून शत्रूस जिंकण्याच्या इच्छेनें प्रयाणाभिमुख होऊन त्यांनीं नौबत वाजविण्यास सांगितलें.

**अथ पाद्भिः पदातीनां भिन्दंत इव भूतलम् ।**
**कर्तयंत इवाश्वीयवर्तकैर्व्योममंडलम् ॥ ६० ॥**
**प्रकिरन्त इवारीणामुपरि प्रलयानलम् ॥**
**शूरास्ते ददृशुस्सद्यो विकुर्वाणाश्शिरोबलम् ॥ ६१ ॥**

६०–६१ मग पायदळाच्या पदाघातांनीं भूतल जणूं काय विदीर्ण करीत, घोड्यांच्या खुरांनीं आकाश जणूं काय कापीत, शत्रूंवर जणूं काय प्रळयाग्नि उधळीत त्या शूर वीरांनीं युद्धाचे आविर्भाव करीत शिरवळ लगेच पाहिलें ( गांठलें ).

**परस्तु बलवद्वीक्ष्य शिवसैन्यमुपागतम् ।**
**निजगाद निजानीकपत्तीनतिमतीनिदम् ॥ ६२ ॥**

६२ शिवाजीचें बलाढ्य सैन्य जवळ आलेलें पाहून शत्रूसुद्धां आपल्या सैन्यांतील अत्यंत बुद्धिमान पायदळांस असें म्हणाला:—

**बल्लाळ उवाच**

**मा भैष्ट स्मयबंहिष्ठमवलोक्य द्विषद्बलम् ।**
**प्रधने निधनं श्रेष्ठमश्रेष्ठं हि पलायनम् ॥ ६३ ॥**

बल्लाळ म्हणाला:—

६३ शत्रूचें अत्यंत गर्विष्ठ सैन्य पाहून घाबरूं नका; युद्धांत मरणें हें श्रेष्ठ होय आणि युद्धांतून पळून जाणें हें निंद्य होय.

**फतेखानमतेनैते वयं प्राप्ताश्शिरोबलम् ॥**
**अवस्थानमिहास्माकं ध्रुवस्थानमिव ध्रुवम् ॥ ६४ ॥**

६४ फत्तेखानाच्या आज्ञेवरून हे आपण शिरवळास आलों आहों; या ठिकाणीं आपलें ठाणें ध्रुवाप्रमाणें अढळ आहे.

**यदि वो भयमेतर्हि तर्हि सद्यो ममाज्ञया ॥**
**द्वितीयमिवमामत्र वप्रमालंब्य तिष्ठत ॥ ६५ ॥**

६५ आतांहि जर तुम्हांस भय वाटत असेल तर जणूं काय दुसरा तटच अशा माझा ताबडतोब आश्रय करून माझ्या आज्ञेनें येथें राहा.

**न ह्यस्मन्निधनेनैव स्वामिकार्यं प्रसिध्यति ॥**
**अतो युध्दाय महते वप्रमेवाश्रयामहे ॥ ६६ ॥**

६६ आणि केवळ आमच्या मरण्यानेंच स्वामिकार्य सिद्धीस जातें असें नाहीं. म्हणून जोराच्या युद्धासाठीं आपण टेकडीचाच आश्रय करूं.

**क्षोदिष्ठमपि दिष्टेन दिष्टेऽमुष्मिन् सुदुर्गमे ॥**
**दुर्गमेतध्दि सिध्दिन्नो युध्दस्यास्य विधास्यति ॥ ६७ ॥**

६७ दैवानें आणलेल्या ह्या अत्यंत कठिण प्रसंगीं ही अत्यंत क्षुद्र टेकडी-सुद्धां ह्या युद्धांत यश प्राप्त करून देईल.

**साभिमानैस्साभिमानं युध्यमानैश्शिरोबले ॥**
**इहास्माभिश्शिरोदेयं न तु देयं यशो रणे ॥ ६८ ॥**

६८ आपण मानी लोकांनीं अभिमानानें या शिरवळामध्यें लढतां लढता आपलें शिर द्यावें; पण युद्धांत ( शत्रूंस ) यश देऊं नये.

**यशसे दयितां स्वीयां दशास्यदमनो जहौ ॥**
**यशसे दानवाधीशो बलिः पातालमाययौ ॥ ६९ ॥**
**यशसे दानवारातिः कामठीं तनुमाददे ॥**
**यशसे स्वयमुत्कृत्योत्कृत्य मांसं शिबिर्ददौ ॥ ७० ॥**
**यशसे खंडपरशुः सद्यो हालाहलं पपौ ॥**
**यशसेऽस्थीन्यहोत्कृत्य दधीचिस्सद्गतिं ययौ ॥ ७१ ॥**
**यशसे काश्यपीं सर्वामत्यजज्जमदग्निजः ॥**
**यशसे शरशय्यायामशेत स्वर्णदीसुतः ॥ ७२ ॥**
**तदद्य यशसेऽर्थाय प्रतियोत्स्यामहे परान् ॥**
**यावन्न प्रहरन्त्येते वीक्ष्य वीक्ष्य वरान् वरान् ॥ ७३ ॥**

६९–७३ यशासाठींच आपली प्रिय पत्नी रामाने टाकली; यशासाठींच दानवांचा राजा बळी पाताळांत गेला; यशासाठींच विष्णूनें कूर्मावतार घेतला; यशासाठींच शिबीनें आपलें स्वतःचें मांस तोडतोडून दिलें; शंकर एकदम हालाहल प्याला; यशासाठींच दधीचीनें आपलीं हाडें कापून दिलें व सद्गति मिळविली; यशासाठींच परशुरामानें सर्व पृथ्वी सोडून दिली; यशासाठींच भीष्म शरशय्येवर पडले; म्हणून आज ह्यांनीं आपल्यांतील मुख्य मुख्य लोक वेंचून वेंचून मारिले नाहींत तोपर्यंत आम्ही यशासाठी व अर्थासाठीं शत्रूंशीं युद्ध करूं.

**इत्युक्तवति बल्लाळे योधास्तस्य सहस्रशः ॥**
**सद्यस्तद्दुर्गमास्थाय विनेदुर्द्विरदा इव ॥ ७४ ॥**

७४ याप्रमाणें बल्लाळानें भाषण केल्यावर त्याचे हजारों वीर दुर्गाचा आश्रय करून हत्तीप्रमाणें गर्जना करूं लागले.

**अथ प्रतिभटान् दृष्ट्वा कृतवप्रावलंबनान् ।**
**कावुकस्समराकांक्षी स्वान् सैन्यानिदमब्रवीत् ॥ ७५ ॥**

७५ शत्रूंनीं तटाचा आश्रय केलेला पाहून युद्धेच्छु कावुक आपल्या सैनिकांस असें म्हणालाः—

**कावुक उवाच**

**अहो शिवस्य विषयं संप्राप्तो विजिगीषया ।**
**बलवानेष बल्लाळो वप्रमाश्रित्य तिष्ठति ॥ ७६ ॥**

कावुक म्हणालाः—

७६ अहो, शिवाजीचा प्रांत जिंकण्याच्या इच्छेनें आलेला हा बळवान बल्लाळ तटाचा आश्रय करून राहिला आहे.

**अस्मदीयमिदं ह्येष समाश्रित्य शिरोबलम् ।**
**अहो दर्शयते मन्दमतिरात्मशिरोबलम् ॥ ७७ ॥**

७७ आपल्या ह्या शिरवळाचा आश्रय करून राहिलेला हा मंदमति आपल्या अकलेचें प्रदर्शन करीत आहे.

**न सन्त्यट्टास्तथा चास्य नह्यस्ति परिखा तथा ।**
**अतो न दुर्गमं दुर्गमदो जानीत सैनिकाः ॥ ७८ ॥**

७८ याला बुरूज नाहींत आणि म्हणण्यासारखा खंदकहि नाहीं. म्हणून, हे सैनिक हो, हा दुर्ग दुर्गम आहे असें समजूं नका.

**क्रियतां परिवेषोऽस्य परितोऽध्वा निरुध्यताम् ।**
**क्षणेनैकेन निखिला परिखापि प्रपूर्यताम् ॥ ७९ ॥**

७९ याला वेढा द्या, सभोंवतालचा मार्ग रोखून टाका आणि एका क्षणांत सगळा खंदकहि बुजवून टाका.

**विहंगमानिवोदग्रक्रमानात्मतुरंगमान् ।**
**उत्पात्यादीयतामेतत् कुद्दालैर्वा विदार्यताम् ॥ ८० ॥**

८० पक्ष्यांप्रमाणें उंच उडी मारणारे आपले घोडे उडवून हा घ्या किंवा कुदळींनीं फोडून टाका.

**उत्खन्यतामदः सद्यो मूळमस्य निखन्यताम् ।**
**किमु दुर्गमिदं लंका येनातंकाय जायताम् ॥ ८१ ॥**

८१ हा खणून टाका आणि लगेच याचा पायाहि खोदून काढा. हा किल्ला म्हणजे काय लंका लागली आहे कीं ज्यामुळें त्याची भीति वाटावी ?

**इत्युक्ताः कावुकेनोच्चैः सैनिकाः समरोध्दताः।**
**सद्यस्तद्दुर्गमादातुमुपचक्रमिरेऽभितः ॥ ८२ ॥**

८२ कावुकाच्या ह्या जोरदार भाषणानें युद्धावेश चढलेल्या सैनिकांनीं तावडतोब त्या किल्ल्यावर चोहोंकडून हल्ला चढविला.

**परेप्यमून् पुरो वीक्ष्य सुरोध्दुरपराक्रमान् ।**
**मन्वानाः प्रधनारंभं धन्वान्यादुधुवुस्तमाम् ॥ ८३ ॥**

८३ देवाप्रमाणें महा पराक्रमी अशा त्या वीरांना समोर पाहून लढाईस तोंड लागलें असें समजून श[illegible]ी धनुष्याची हालचाल करूं लागले.

**उपरिष्टादिमान् द्रष्टुं यश्चकारोन्नतं शिरः।**
**स सद्यश्छिन्नमूर्धत्वादभूत् केतुग्रहो यथा ॥ ८४ ॥**

८४ वरून यांस पाहण्याकरितां जो डोकें वर करी त्याचें डोकें लगेच कापलें जाऊन तो केतुग्रहासारखा होई.

**शाखाभ्य इव वृक्षाणां चंचरीकपरंपराः।**
**शरासनेभ्यश्शूराणां निरीयुर्निशिताश्शराः ॥ ८५ ॥**

८५ वृक्षांच्या फांद्यांवरून जशा भुंग्यांच्या रांगांच्या रांगा उडून जाऊं शक-तात त्याप्रमाणें शूर वीरांच्या धनुष्यांपासून तीक्ष्ण बाण सुटूं लागले.

**क्रूराः कार्मुकमाकर्ण समाकृष्य महौजसः।**
**शूराश्शिरांसि शूराणां निचकर्तुश्शितैश्शरैः ॥ ८६ ॥**

८६ क्रूर, महाबलाढ्य, शूर वीर धनुष्य आकर्ण ओढून तीक्ष्ण बाणांनीं शत्रु-वीरांचीं मुंडकीं छेदूं लागले.

**कृतहस्तविनिर्मुक्ताः सायकाः पातुकाः क्षितिम् ।**
**विविशुस्तत्तलं चोच्चैः ददृशुश्च फणीश्वरम् ॥ ८७ ॥**

८७ उत्कृष्ट तिरंदाजांनीं सोडलेले व भूमीवर पडणारे बाण तिच्या पृष्ठांत इतक्या जोरानें घुसत कीं, त्यांना शेषदर्शन होई.

**रथांगैर्लांगलैरक्षैर्मुसलैरप्युलूखलैः।**
**उपलैश्च घरट्टैश्च प्रज्वलद्भिस्तथोल्मुकैः॥ ८८ ॥**
**खादिरांगारपुंजैश्च तप्तैस्तैलैश्च भूरिशः।**
**तैस्तैश्शस्त्रैश्च वप्रस्थाः प्रतिवीरानवाकिरन् ॥ ८९ ॥**

८८-८९ चाकें, नांगर, कणें, मुसळें, उखळें, गोटे. घिरटें, पेटलेलीं कोलितें, खैराच्या निखाऱ्यांचे ढीग, तापलेलीं तेलें आणि दुसरीं नाना प्रकारचीं शस्त्रें तटावरील लोक शत्रुवीरांवर फेकूं लागले.

**हन्यमानैरपि परैः शिवसैन्यैरुदायुधैः ।**
**परिमंडालितं दुर्गमिदमभ्याधिकं बभौ ॥ ९० ॥**

९० शत्रूंचा मारा होत असतांहि शस्त्रें उगारणाऱ्या शिवाजीच्या सैनिकांनीं वेढलेला तो किल्ला अधिक शोभूं लागला.

**ततो गदाभिर्दीर्घाभिः परिघैरप्यनेकधा ।**
**तद्दुर्गं दारयामासुरुध्दताः केपि सैनिकाः ॥ ९१ ॥**

९१ मग दीर्घ गदांनीं व परिघांनीं ( लोखंडी कांड्यांच्या सोट्यांनीं ) सुद्धां कांहीं आवेशयुक्त सैनिकांनीं अनेक ठिकाणीं तो दुर्ग फोडला.

**केपि कुंताभिघातेन सुषिराणि प्रचक्रिरे ।**
**निश्रेणीरधिरुह्यान्ये तद्भित्तीः परिरेभिरे ॥ ९२ ॥**

९२ कांहींनीं भाल्यांच्या प्रहारांनीं भोकें पाडलीं; कांहीं शिड्यांवर चढून तटास बिलगले.

**आरूढास्तुरगान् केपि गरुडानिव रंहसा ।**
**तदुत्पातितुमैहन्त हंत संप्रेक्ष्य सर्वतः ॥ ९३ ॥**

९३ गरुडासारख्या वेगवान घोड्यांवर बसलेले कांहीं वीर चोहोंकडे नीट पाहून त्याच्यावर उडी मारून जाण्याचा प्रयत्न करूं लागले.

**कावुकस्तु गदादीनामायुधानामनेकधा ।**
**अभिघातेन महता दारयामास गोपुरम् ॥ ९४ ॥**

९४ कावुकाने तर गदा इत्यादि नानाप्रकारच्या आयुधांनीं अनेक ठिकाणीं जोर जोराने प्रहार करून वेस फोडली.

**स भिन्नगोपुरं वीरः प्राकारं प्राविशद्यदा ।**
**अभ्येत्य युयुधे तत्र येदिलानीकिनी तदा ॥ ९५ ॥**

९५ जेव्हां तो वीर वेस फुटलेल्या त्या तटाच्या आंत घुसला तेव्हां आदिलशहाची सेना त्याच्यावर चाल करून लढूं लागली.

**वडवाग्नीनिवाग्राह्यतमानभ्यागतानिमान् ।**
**प्रतिगृह्य प्रतिग्राह्यान् बल्लालो बलवान् बभौ ॥ ९६ ॥**

९६ वडवाग्नीप्रमाणें अत्यंत अनावर असे हे शत्रु चालून आलेले पाहून वडवाग्नीप्रमाणें अत्यंत प्रतिपक्ष्याचा प्रतिकार करीत असतां शोभूं लागला.

**दर्शनीयतमः प्रांशुः पिनध्दकवचो युवा ॥**
**कुंतधारी धन्वधरो धीरः सैनिकसंवृतः ॥ ९७ ॥**
**तुंगं तुरंगमारूढः स तदाभ्यधिकं तथा ॥**
**दिर्दीपे किल निर्वाणवेलायां दीपको यथा ॥ ९८ ॥**

९७–९८ अतिशय देखणा, उंच, कवच घातलेला, जवान, भाला आणि धनुष्य धारण करणारा. धैर्यवान, सैनिकांनीं परिवेष्टित, उंच घोड्यावर बसलेला तो बल्लाळ, विझण्याच्या वेळीं दिवा जसा विशेष प्रकाशतो तसा, फार शोभूं लागला.

**अथ भीकश्च भीमश्च तुको गोदः सदस्तथा ॥**
**संभश्चान्येच सुभटाः पुरोविहितकावुकाः ॥ ९९ ॥**
**द्रुतमुत्पातितोदग्रतुरगास्तरलायुधाः ॥**
**प्रहरंति स्म बल्लालप्रभृतींस्तीव्रया क्रुधा ॥ १०० ॥**

९९–१०० मग कावुकाच्या पुढारीपणाखालीं भिकाजी, भीमाजी, तुकाजी, गोदाजी, सदोजी, संभाजी आणि दुसरेहि शूर योद्धे आपले उंच घोडे वेगानें उडवीत व शस्त्रे परजीत बल्लाळ प्रभृति वीरांवर अतिशय त्वेषानें प्रहार करूं लागले.

**ततस्तेषां च तेषां च द्वेषांधतमसांतरे ॥**
**आयुधान्यायुधीयानामन्योन्यं परिरेभिरे ॥ १०१ ॥**

१०१ त्या समयीं द्वेषरूपी काळ्याकुट्ट अंधकारामध्यें उभय पक्षांच्या योध्यांचीं आयुधें परस्परांवर थडकूं लागलीं.

**समरारंभसंरभादन्योन्यमभियायिनाम् ॥**
**तार्क्ष्यस्फुरत्तरतरतुरगस्थातिशालिनाम् ॥ १०२ ॥**
**प्रत्यहन्यंत शतशः शस्त्रैः शस्त्राणि शस्त्रिणाम् ॥**
**विद्युतामिव तेजोभिर्दिवि तेजांसि विद्युताम् ॥ १०३ ॥**

१०२–१०३ युद्धावेशानें एकमेकांवर चालून जाणाऱ्या, गरुडापेक्षां अधिक वेगवान् घोड्यांवर बसलेल्या योध्यांच्या शस्त्रांवर—आकाशांत विजांची एकमेकींवर धडक व्हावी त्याप्रमाणें—शतशः शस्त्रे धडकलीं.

**कुंतपाणिः कुंतधरं धन्वधारी धनुर्धरम् ॥**
**गदी जघान गदिनं तदानीं शकलीभवन् ॥ १०४ ॥**

१०४ स्वतःचीं शकलें होत असतां भालाईत भालाइतास, धनुंधारी धनुंधाऱ्यास, गदाधारी गदाधाऱ्यास ठार करूं लागला.

न चार्मिणं विना चर्मी न वर्मी वार्मिणं विना ॥
युयुधे प्रधनेऽमुष्मिन्न धन्वी धन्विनं विना ॥ १०५ ॥

१०५ ढालाईत ढालाइताशिवाय, कवचधारी कवचधाऱ्याशिवाय व धनुर्धर धनुर्धराशिवाय दुसऱ्या कोणाशीं लढला नाहीं.

उरच्छदमनिर्भिद्य द्रुतमुत्पातिताः शराः ॥
क्षणं नभस्यभासंत यथा वैभाकराः कराः ॥१०६ ॥

१०६ कवच भेदूं न शकल्यामुळें वेगानें वर उडालेले बाण सूर्याच्या किरणाप्रमाणें क्षणभर आकाशांत चमकले.

भटान् सारेच्छदान् भित्वा वसुधां विविशुः शराः ॥
ततो रुधिरधाराणामाविरासुः परंपराः ॥ १०७ ॥

१०७ कवचधारी योध्यांना भेदून जेव्हां बाण पृथ्वींत घुसले तेव्हां त्यांच्या आंगातून रक्ताच्या धारा एकसारख्या वाहूं लागल्या.

क्रुद्धहस्तवदुन्मुक्तपृषत्कोत्कृत्तमस्तकाः ॥
क्षरद्रुधिरदिग्धांङ्गाः कबंधास्तत्र चुक्रुधुः ॥ १०८ ॥

१०८ त्या ठिकाणीं क्रुद्ध तिरंदाजांनीं सोडलेल्या बाणांनीं मस्तकें छेदलीं जाऊन गळणाऱ्या रक्तानें रक्तबंबाळ झालेलीं धडें खवळलीं.

ततो धरातले पेतुर्मातंगानां ततः कराः ॥
शरैश्शकलितांगानां तुरंगाणांच कंधराः ॥ १०९ ॥

१०९ हत्तींच्या लांब सोंडा आणि बाणांनीं ज्यांच्या अंगांचे तुकडे झाले आहेत अशा घोड्यांच्या माना भूमीवर तुटून पडल्या.

शरासनधरैश्शूरैः शरच्छिन्नान्यनेकशः ॥
परितस्तरिरेऽरीणां शिरांसि समराजिरे ॥ ११० ॥

११० शूर धनुर्धाऱ्यांनीं बाणांनीं तोडलेलीं शत्रूंचीं पुष्कळ मुंडकीं समरांगणावर पसरलीं गेलीं.

कंचित्प्रसभमभ्येत्य गदापाणिमुपागतम् ॥
संग्रामसागरग्राहमभिजग्राह कश्चन ॥ १११ ॥

१११ युद्धरूपी सागरांतून जवळ आलेल्या एका गदाधारी रूपी मगरावर कोणी एकानें जोरानें चाल करून त्यास पकडलें.

तत्रान्याच्छिभमेकं यः स्वं हस्तं नावबुद्धवान् ॥
स एकेनैव हस्तेन हस्तीवाभिययौ परान् ॥ ११२ ॥

**पंचविंशतिमिंगालः पोलः पंच च सप्त च ॥**
**चोरश्चतुर्दश तथा नवाष्टौ षट्च घांटिकः ॥ ११३ ॥**
**निजघान क्षणात्तत्र वीरान् व्याघ्रश्च षोडश ॥**
**एकोनविंशाः सुभटाः कावुकेन निषूदिताः ॥ ११४ ॥**

११३--११४ त्या ठिकाणीं इंगळ्यानें पंचवीस, पोळानें बारा, चोरानें चौदा, घाटग्यानें तेवीस, वाघानें सोळा असे वीर एका क्षणांत ठार केले आणि कावुकानें एकोणीस उत्तम योद्धे ठार मारले.

**प्रहतानेकपत्यश्व द्विपवर्ष्मसमुद्भवा ॥**
**प्रावर्तत तदा तत्र रयाद्रक्ततरंगिणी ॥ ११५ ॥**

११५ तेव्हां तेथें पायदळ, घोडे व हत्ती यांच्या शरीरांतून निघणाऱ्या रक्ताची नदी वेगानें वाहूं लागली.

**पराभूय परे वीराः परिवव्रुर्यदा बलात् ॥**
**तदाभयाद्विदुद्राव बल्लालबलमाहवात् ॥ ११६ ॥**

११६ जेव्हां शत्रुवीरांनीं बळानें पराभव करून वेढलें तेव्हा बल्लाळाचें सैन्य भीतीनें समरांतून पळूं लागलें.

**हैबतस्यात्मजस्तत्र शत्रुभिर्विमुखीकृतम् ॥**
**न चक्षमे स्थिरीकर्तुं तद्दलं विचलद्दलम् ॥ ११७ ॥**

११७ शत्रूंनीं परतविलेल्या व सैरावैरा पळणाऱ्या त्या सैन्यास हैबत राजाचा पुत्र थोपवून धरूं शकला नाहीं.

**अथाद्धा स किल स्पर्धामादायोद्यमितायुधः ॥**
**रयादभीयाय परान् रुषा वृत्र इवामरान् ॥ ११८ ॥**

११८ तेव्हां त्याला अतिशय त्वेष येऊन तो आपलें शस्त्र झुगारून ज्याप्रमाणें वृत्रासुर रागानें देवांवर चालून गेला त्याप्रमाणें, शत्रूंवर वेगाने धावून गेला.

**यावन्तः किल तस्यासन्निषुधिद्वितयी शराः ॥**
**तावन्तः पातितास्तेन कावुकीयाः पुरस्सराः ॥ ११९ ॥**

११९ त्याच्या भात्यांच्या जोडांत जितके बाण होते तितके कावुकाचे अघाडीचे वीर त्यानें पाडले.

**स यावत् प्रासमादाय त्रासयत्यभितः परान् ॥**
**तावत् कुंताभिघातेन कावुकस्तमपातयत् ॥ १२० ॥**

१२० तो जों भाला घेऊन सभोंवतीं शत्रूंची त्रेधा उडवीत आहे तोंच कावुकानें त्यास आपल्या भाल्याच्या प्रहारानें पाडलें.

**युध्यमानेऽभिमानेन सिंहेनेवोन्मदे गजे ॥**
**शिवसेनाधिपतिना पातिते हैबतात्मजे ॥ १२१ ॥**
**रक्तमेदोवसामांसमसृणे क्षोणिमंडले ॥**
**कोपि धर्तुमहो धैर्यं प्रभुरासीन्न तद्बले ॥ १२२ ॥**

१२१--१२२ सिंहानें जसें मत्त हत्तीला पाडावें तसें आवेशानें लढणाऱ्या त्या शिवाजीच्या सेनाधिपतीनें हैबत राजाच्या पुत्रास पाडल्यावर रक्त, मेद, वसा आणि मांस यांचा भूमीवर चिखल झाला नंतर त्याच्या सैन्यांत कोणासहि धैर्य धरवेना !

**तत्र दंताग्रविन्यस्ततृणास्त्राणार्थिनो जनाः ॥**
**शतशः स्वैरमगमन् विमुक्तास्तेन मानिना ॥ १२३ ॥**

१२३ त्यावेळीं दांतीं तृण धरून शरण आलेल्या शेंकडों लोकांना त्या मानी कावुकानें सोडून दिलें व ते वाटेल तिकडे निघून गेले.

**केपि युद्धाभिमानेन युध्यमानाः प्रमन्यवः ॥**
**सायकैश्शकलीभूताः शतक्रतुपदं ययुः ॥ १२४ ॥**

१२४ अतिशय क्रोधाविष्ट झालेले कांहीं लोक युद्धाभिमानानें लढत असतां बाणांनीं त्यांचीं शकलें होऊन ते स्वर्गवासी झाले.

**केचन च्छिन्नचरणाः केचन च्छिन्नपाणयः ॥**
**केचन च्छिन्नवर्माणः केचन च्छिन्नवक्षसः ॥ १२५ ॥**
**छिन्नत्रिकास्तथा केचित् केचिच्छिन्नकफोणयः ॥**
**रणंतः करुणं मम्लुर्विलुठंतो महीतले ॥ १२६ ॥**

१२५--१२६ कांहींचे पाय तुटून, कांहींचे हात तुटून, कांहींचें कवच फुटून, कांहींची छाती भिन्न होऊन, कांहींचें माकड हाड मोडून आणि काहींचीं कोंपरें फुटून ते करुणाजनक स्वर काढून भूमीवर गडबडां लोळत असतांच बेशुद्ध झाले.

**अथ विद्विषतस्तस्य शयानस्य रणांगणे ॥**
**कुंजरांस्तुरगांस्तुंगांस्तत्तदाभरणानि च ॥ १२७ ॥**
**चित्राण्यपि च वस्त्राणि तनुत्राण्यायुधानि च ॥**
**याप्ययानानि कोषांश्च संभारानपरानपि ॥ १२८ ॥**
**संप्रहृष्टास्समादाय सुभटाः कावुकादयः ॥**
**पुरंदरप्रभुं द्रष्टुं पुरंदरगिरिं ययुः ॥ १२९ ॥**

१२७--१२९ मग तो शत्रु रणांगणावर पडला असतां हत्ती, उंच घोडे, नानाप्रकारचे अलंकार चित्रविचित्र रंगांचीं वस्त्रें, कवचें, आयुधें, पालख्या कोष

आणि दुसरेंहि सामान घेऊन अत्यंत आनंदित होत्साते कावुकादि उत्तम योद्धे शिवाजीस भेटण्यास पुरंदरगडावर गेले.

अपहृतरिपुवीरानेकयाश्वप्रवेक—
प्रचुरकनकमुक्ताहाररत्नोपहाराः ।
अवनमिताशिरस्काः सैनिकाः कावुकाद्याः
सरभसकृतकार्याः शाहसूनुं प्रणेमुः ॥ १३० ॥

१३० शत्रुवीरांस मारून, आपलें कार्य त्वरित आटोपून उत्तम हत्ती, घोडे विपुल सोनें, मोत्यांचे हार व रत्नें अर्पण करून, मस्तक नम्र करून कावुक प्रभृति सैनिकांनीं शिवाजीस प्रणाम केला.

इत्यनुपुराणे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां
संहितायां त्रयोदशोध्यायः ॥ १३ ॥

---

# अध्याय १४ वा.



**कवींद्र उवाच**

**प्रधने पातितं श्रुत्वा बलिनं हैबतात्मजम् ।**
**चुकोप शिवराजाय फत्तेखानः स्मयं वहन् ॥ १ ॥**

कवींद्र म्हणालाः—

१ हैबतराजाचा बलाढ्य पुत्र युद्धांत पडला असें ऐकून गर्विष्ठ फत्तेखान शिवाजीवर संतापला.

**ततो मुसेखानमुखैर्यवनैस्सबलैर्वृतः ।**
**मत्ताजित्प्रमुखैर्भूपैरनेकैश्चाभिरक्षितः ॥ २ ॥**
**मतंगजैरिवोन्मत्तैः सामन्तैश्च समंततः ।**
**युतस्सोऽभिययौ तूर्णं शिवराजजिगीषया ॥ ३ ॥**

२–३ नंतर मुसेखान प्रभृति बलवान यवनांनीं परिवेष्टित, मत्ताजिप्रमुख राजांनीं रक्षिलेला व हत्तींप्रमाणें मदोन्मत्त असे मांडलिक चोहों बाजूंस असलेला तो (फत्तेखान) शिवराजास जिंकण्याच्या इच्छेनें त्वरित स्वारीवर निघाला.

**प्रचलन्मत्तमातंगचक्रनक्रसमाकुलम् ।**
**प्रोत्पतत्तरलोत्तुंगतुरंगातिमिमंडलम् ॥ ४ ॥**
**मारुतांदोलितानेकपताकोर्मिविराजितम् ।**
**धरातलोद्भूतरजोभरधाराधरोद्धुरम् ॥ ५ ॥**
**स्फुरद्दुंदुभिनिर्घोषं घोषोद्घोषितदिक्तटम् ।**
**सितातपत्राडिंडीरपिंडमंडलपांडुरम् ॥ ६ ॥**
**कठोरचर्मकमठं चंडकोदंडपन्नगम् ।**
**विस्फुरद्धेतिवडवानलप्रतिभयप्रदम् ॥ ७ ॥**
**समरार्थी समादाय तरसा सैन्यसागरम् ।**
**स येदिलचमूपालः पश्यति स्म पुरंदरम् ॥ ८ ॥**

४–८ चालणाऱ्या मस्त हत्तींचा समूह हेच कोणी नक्र त्यांनीं गजबजलेला, उड्या मारीत जाणारे चपल आणि उंच घोडे हेच कोणी प्रचंड मासे त्यांनीं भरलेला, वाऱ्यानें आंदोलन पावणाऱ्या पताकारूपी लाटांनीं शोभणारा, जमिनीपासून उडणारे धुळीचे लोट हेच कोणी मेघ त्यांनीं व्याप्त, दुंदुभिध्वनि हीच कोणी

दिशारूप किनारा दुमदुमून टाकणारी गर्जना, पांढऱ्या शुभ्र छत्र्या हेच फेनपिंड त्यांच्या समूहानें पांढरा शुभ्र दिसणारा, कठिण ढाली हींच कोणी कांसवें प्रचंड धनुष्यें हेच कोणी सर्प त्यांनीं चकाकणारा, शस्त्ररूपी वडवालनानें भयंकर असा सेनासमुद्र युद्धासाठीं वेगानें बरोबर घेऊन चालला असतां आदिलशहाच्या त्या सेनापतीस पुरंदरगड दिसला.

साभिमानः फतेखानः प्रचलंतीं प्रभाविणीम् ।
अविदूरे गिरेस्तस्य न्यवेशयत वाहिनीम् ॥ ९ ॥

९ गर्विष्ठ फत्तेखानानें चाल करून जाणाऱ्या त्या बलाढ्य सेनेचा तळ त्या गडापासून थोड्याच अंतरावर दिला.

शाहसूनुस्तदालोक्य द्विषत्सैन्यमुपागतम् ।
न्यध्वानयद् गिरेस्तस्य शिखरे संगरानकम् ॥ १० ॥

१० तें शत्रूचें सैन्य समीप आलेलें पाहून शहाजीच्या पुत्रानें ( शिवाजीनें ) गडाच्या शिखरावर युद्धाची दुंदुभि वाजविली.

तेनानकनिनादेन परसैनिकमानसम् ।
चकंपे पवनेनेव सरः सपदि मानसम् ॥ ११ ॥

११ वाऱ्यानें जसें मानससरोवर एकदम खळवळून जावें त्याप्रमाणें त्या दुंदुभीच्या ध्वनीनें शत्रूकडील सैनिकांच्या मनाचा थरकांप उडाला.

अथ मानी फतेखानः समानगुणशालिभिः ।
मुसेखानप्रभृतिभिर्महाहंकारकारिभिः ॥ १२ ॥
कल्पानलसमप्राणकृपाणवरधारिभिः ।
प्रवृद्धाभ्याहवोत्साहैः ससन्नाहैः प्रभाविभिः ॥ १३ ॥
धीरैः परिवृतो वीरैः क्ष्वेडारवविधायिभिः ।
सद्यः पुरंदरं शैलमारोढुमुपचक्रमे ॥ १४ ॥

१२–१४ मग समानगुणाचे, महागर्विष्ठ, प्रळयाग्निप्रमाणें प्रखर अशा उत्कृष्ट तलवारी धारण करणारे, युद्धाची खुमखुमी अंगांत भरलेले, आयुधांनीं सज्ज झालेले, गर्जना करणारे असे मुसेखानप्रभृति पराक्रमी आणि धैर्यवान वीर बरोबर घेऊन मानी फत्तेखान पुरंदरगड लागलीच चढूं लागला.

विदारिताभ्रगर्भाणि क्ष्वेडितानि वितन्वतः ।
तस्यानीकस्य महतो धरंतमधिरोहतः ॥ १५ ॥
अभूत् पृष्ठे फतेखानो मुसेखानो मुखेऽभवत् ।
फलस्थानपतिस्सव्ये पार्श्वेऽन्यत्र च घांटिकः ॥ १६ ॥

१५-१६ मेघांना विदीर्ण करून टाकणारी गर्जना करीत ती प्रचंड सेना त्या गडावर चढत असतांना तिच्या पिछाडीस फत्तेखान, आघाडीस मुसेखान, डाव्या बगलेस फलटणचा राजा आणि उजव्या बगलेस घाटगे होता.

**दृष्टुर्नैवपदं भूमौ येन्वहं यानयायिनः।**
**ते तमारुरुहुश्शैलं तदा बत निजैः पदैः ॥ १७ ॥**

१७ ज्यांनीं कधीं जमिनीवर पाऊल टाकलें नाहीं व जे नित्य वाहनांतूनच जावयाचे त्यांना सुद्धां त्या समयीं तो गड आपल्या पायानींच चढावा लागला !

**अचलारोहणपरांस्ततोदृष्ट्वाभितः परान्।**
**शिवसेनाधिपतयः क्रुद्धास्सिंहा इवानदन् ॥ १८ ॥**

१८ नंतर चोहोंकडून गड चढूं लागलेल्या शत्रूंना पाहून ( शिवाजीच्या सेनाधिपतींनीं ) क्रुद्ध-सिंहाप्रमाणें गर्जना केली.

**प्रज्वलद्भिरयःपिंडैर्नालायंत्रास्यनिःसृतैः।**
**नलिकागुळिकाभिश्च गंडशैलैरनेकशः ॥ १९ ॥**
**उल्काबाणैश्च शतशो भिंदिपालैश्च भूरिशः।**
**परानवाकिरन् भूरि शिवशूरास्सहस्रशः ॥ २० ॥**

१९-२० तोफांच्या तोंडांतून सुटणाऱ्या जळजळीत लोखंडी गोळ्यांचा, बंदुकींच्या गोळ्यांचा, अनेक मोठमोठ्या शिळांचा, दारूच्या शेंकडों बाणांचा, गोफणींतून भिरकावलेल्या पुष्कळ दगडांचा शिवाजीच्या हजारों शूर सैनिकांनीं शत्रूंवर अतिशय वर्षाव केला.

**शिलोच्चयपरिभ्रष्टानुपलानुरुविग्रहान्।**
**यांस्तले पातयामासुः शिवसैन्याः किलोद्धुरान् ॥ २१ ॥**
**दूरादापततां तेषां संघट्टादध्वसंस्थिताः।**
**धाराधरारवधराः समुद्धूतरजोभवाः ॥ २२ ॥**
**पृथुलास्तत्क्षणोन्मीलत्प्रचुराग्निकणाकुलाः।**
**... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ॥ २३ ॥**
**उपलाश्शकलीभूताः प्रभूताः परितोऽबरम्।**
**प्रोत्पत्य प्राहरन्नुच्चैस्तदुपेतं द्विषद्बलम् ॥ २४ ॥**

२१-२४ पर्वतापासून निखळलेल्या ज्या प्रचंड शिळा शिवाजीच्या सैनिकांनीं खालीं ढकलून दिल्या त्या उंचावरून खालीं पडतांना होणाऱ्या धडकेमुळें मार्गांतील मोठ्या शिळांचा मेघांप्रमाणें गडगडाट होऊन धुरळा उसळून व तत्क्षणींच अग्नीच्या खूप ठिणग्या उडून त्यांचे पुष्कळ तुकडे होऊन ते सर्वत्र आकाशांत उडून जवळ आलेल्या त्या शत्रुसैन्यावर जाऊन जोरानें आपटूं लागले.

**दुरंमदप्रतिभयैर्ज्वालजालमयैस्तदा ।**
**अग्नियंत्रोद्गतैरश्मसारपिंडैरनेकशः ॥ २५ ॥**
**खडशः खंडशोभूतास्ते येदिलचमूभटाः ।**
**खगा इव खमुत्पत्य श्येनश्रेणिमतर्पयन् ॥ २६ ॥**

२५–२६ तोफांतून उडणाऱ्या, विजेप्रमाणें भयंकर, ज्वाळांचे लोळ बनलेल्या अशा अनेक लोखंडी गोळ्याच्या योगें अदिलशहाच्या सैन्यांतील त्या योध्यांचे तुकडे तुकडे होऊन पक्ष्यांप्रमाणें आकाशांत उडून ससाण्यांच्या पंक्तींना तृप्त करूं लागले ( म्हणजे भक्ष्यस्थानीं पडूं लागले. )

**उल्काबाणाः क्षणे तस्मिन् उंपाहितसलक्षणाः ।**
**प्रोद्भवद्दारुणारावमापतंतो नभोंगणात् ॥ २७ ॥**
**गरलज्वलनज्वालाननाः किमनिलाशनाः ।**
**भ्रांत्वा भ्रांत्वा परिभ्रांतां विदधुर्यावनीं चमूम ॥ २८ ॥**

२७–२८ ( सों सों ) भयंकर आवाज करीत आकाशांतून खालीं पडणारे, समान लक्षणांनीं युक्त असे दारूचे बाण हे विषाग्नीच्या ज्वाळा तोंडांतून सोडणारे जणूं काय सर्पच आहेत असा भास उत्पन्न करीत गरगर फिरून अदिलशहाच्या सैन्याची दाणादाण उडवूं लागले.

**एकापि गुळिका तत्र नलिकायंत्रनिर्गता ।**
**भित्वाभ्यपातयद् भूमौ जवना यवनान् बहून् ॥ २९ ॥**

२९ बंदुकींतून सुटलेली एकच जोराची गोळी पुष्कळ यवनांस भेदून त्यांस भूमीवर पाडूं लागली.

**गिरिस्थपरिमुक्ताभिः शिलाभिश्शीर्णवक्षसः ।**
**केचित्प्रपद्य वैचित्त्यमध्वनोर्ध्येवतस्थिरे ॥ ३० ॥**

३० गडावरील लोकांनीं सोडलेल्या शिळांनीं वक्षःस्थळें चूर्ण झालेले कित्येक-जण मूर्च्छित होऊन अर्ध्या वाटेंतच पडले.

**गिरेस्तस्य तटे लग्नाः केऽपि भग्ना महाश्मभिः ।**
**वमन्तो लोहितं भूरि रक्तवालुकलोहितम् ॥ ३१ ॥**
**समुह्यानुप्लवैरुह्यमानाः प्राणावनार्थिनः ।**
**परावृत्य रयाद्दात्मशिबिराय प्रतस्थिरे ॥ ३२ ॥**

३१–३२ त्या गडाच्या तटास बिलगलेले कित्येक लोक मोठ्या दगडांनीं भग्न होतसाते शेंदुराप्रमाणें लाल रक्त ओकूं लागले. त्यांच्या दोस्तांकडून—

उचलून वाहून नेले जाणारे असे ते प्राणरक्षणार्थ परत फिरून वेगानें आपल्या गोटाकडे निघाले.

**गुलिकायन्त्रनिर्यातगुलिकाभिन्नविग्रहाः ।**
**जलयन्त्रजलाकारकीलालोत्कलिकाकुलाः ॥ ३३ ॥**
**संजातसंज्वरावेशभरास्तनुतरस्वराः ।**
**केचित्पिपासिता एव कृतान्तातिथितां ययुः ॥ ३४ ॥**

३३–३४ ज्यांचीं शरीरें बंदुकींच्या गोळ्यांनीं विदीर्ण झालीं आहेत, कारंजांच्या फवाऱ्याप्रमाणें उडणाऱ्या रक्ताच्या चिळकांड्यांनीं जे व्याप्त झाले आहेत, ज्यांच्या अंगाचा एकसारखा दाह होत आहे, व ज्यांचा स्वर अतिशय खोल गेला आहे, असे कित्येक लोक पाणी पाणी करीतच यमाजी भास्कराचा पाहुणचार घेण्यास गेले !

**पताकिनीं तामालोक्य द्विषत्कृतपराभवाम् ।**
**मुसेखानः सजातीयान्सुभटानभ्यभाषत ॥ ३५ ॥**

३५ शत्रूनें आपल्या सेनेचा पराभव केलेला पाहून मुसेखान आपल्या सजातीय श्रेष्ठ योध्यांस म्हणाला.

**मुसेखान उवाच**

**अमी महाश्मनां पाताः किमुत्पाताः पदे पदे ।**
**समन्तादापतन्तोऽमून् पातयन्ति चमूपतीन् ॥ ३६ ॥**

३६ मुसेखान म्हणाला:—

खालीं पडणाऱ्या मोठाल्या शिळांचे हे पात जणूं काय पदोपदीं उत्पातच नव्हेत का ? चोहोंकडून पडणारे हे आपल्या सेनापतींना ठार करीत आहेत.

**अहो महोदयोऽमुष्य पुरन्दरपतेरयम् ।**
**यदस्मानपि विक्रान्तान् विक्रम्याक्रामति स्वयम् ॥ ३७ ॥**

३७ अहो हा ह्या पुरंदरगडाच्या स्वामीचा ( शिवाजीचा ) मोठा उत्कर्षच· स्वतः चालून येऊन आम्हांसारख्या शूरांचा पराभव करीत आहे.

**निस्त्रिंशप्रभवं लोके येषां नः प्रथितं यशः ।**
**अपयानमितस्तेषां नितान्तमयशस्करम् ॥ ३८ ॥**

३८ ज्या आमची तलवारबहादुरी लोकप्रसिद्ध आहे, त्यांनीं येथून पराङ्मुख होणें—हें अत्यंत लांछनास्पद आहे.

**मैव दद्ध्वं पदं पश्चात् पुरः पश्यत भूधरम् ।**
**न जहाति जयः प्रायः संपरायस्थितं नरम् ॥ ३९ ॥**

३९ मागें पाऊल टाकूं नका; समोर गडावर दृष्टि द्या. युद्धामध्यें ( स्थिर ) उभा राहणाऱ्या मनुष्यास जय प्रायः सोडीत नाहीं.

**इति ब्रुवाण एवायं समन्तैरनिवर्तिभिः ।**
**पुरन्दराचलतरामारुरोह महामनाः ॥ ४० ॥**
**अथो शरफशाहेन सैनिकैः स्वैश्च भूरिशः ।**
**उभाभ्यामपि शेखाभ्यां राज्ञा मत्रजिता तथा ॥ ४१ ॥**
**प्रबलेन फलस्थाननायकेन च रंहसा ।**
**फतेखानस्य चानीकैः सामंतैरप्यनेकशः ॥ ४२ ॥**

४०–४२ नंतर असें बोलत असतांच गर्जना करणाऱ्या मोठ्या मेघांनीं युक्त अशा महामेघाप्रमाणें तो मोठ्या मनाचा मुसेखान पराङ्मुख न होणारें अफाट सैन्य, आणि स्वसेनायुक्त अशरफशहा, दोनहि शेख, मचाजी राजा, तसाच फलटणचा प्रबळ राजा फत्तेखानाचें सैन्य आणि पुष्कळ मांडलिक यांसह वेगानें पुरंदरगडाची चढण चढूं लागला.

**सनिर्घोषैर्महामेघैर्महामेघ इवाभितः ।**
**तमारोहंतमालोक्य पुरंदरतटीं रुषा ॥ ४३ ॥**
**सद्यश्शिवतमादिष्टाः क्षेपिष्ठाः सर्वतो दिशम् ।**
**गोदप्रभृतयो योधाः प्रत्यगृण्हन्नुदायुधाः ॥ ४४ ॥**

४३–४४ पुरंदरचा चढ चढणाऱ्या त्यास क्रोधानें पाहून लगेच कल्याणकारक व अज्ञान झालेल्या गोदप्रभृति अत्यंत वेगवान योध्यांनीं शस्त्रें उगारून सर्व बाजूंनीं हल्ला केला.

**मुसेखानप्रभृतयोप्यमून् परचमूभटान् ।**
**अभीयुराभियाभ्येत्य ग्रहा इव महाग्रहान् ॥ ४५ ॥**

४५ मुसेखानप्रभृतींनींहि ग्रह जसे महाग्रहांवर हल्ला करतात त्याप्रमाणें त्या शत्रुसैन्यांतील योद्धयांवर निर्भयपणें चाल करून त्यांच्यावर हल्ला केला.

**तदा शरफशाहेन सदोभुजमदोद्धतः ।**
**मुसेखानेन सरुषा जगत्स्थापकवंशजः ॥ ४६ ॥**
**मिनादरतनाभ्यां तु युयुधे भैरवाभिधः ।**
**घांटिकेन च वीरेण व्याघ्रश्शीघ्रतरायुधः ॥ ४७ ॥**

४६–४७ तेव्हां अशरफशहाशीं बाहुबलोन्मत्त सदोजी, क्रुद्ध मुसेखानाशीं जगताप, मिनाद व रतन यांच्याशीं भैरव, शूर घाटग्याशीं अत्यंत चपळ चलाख आयुधांचा वाघ, असे लढूं लागले.

**महामानी गदापाणिः प्रबलानीकिनी युतः ।**
**सैन्यैरन्यैश्च बहुभिर्बह्वयुध्यत काबुकः ॥ ४८ ॥**

४८ अत्यंत मानी, गदाधारी व प्रबल सैन्यानें युक्त असा काबुक दुसऱ्या पुष्कळ सैनिकांशीं खूप लढला.

**अभ्याहवस्मयभृतो युगव्यायतबाहवः ।**
**वरशीर्षण्यशीर्षाणोवर्मसंवृत विग्रहाः ॥ ४९ ॥**
**ते तेऽनीकद्वयीयोधाः सविरोधाः परस्परम् ।**
**शरासनं विधुन्वानाः संदधानाश्शितं शरम् ॥ ५० ॥**
**भूयोभूयस्सहस्वेति भाषमाणास्स्मयाभृतम् ।**
**तटे पुरंदरगिरेस्तदा युयुधिरेऽद्भुतम् ॥ ५१ ॥**

४९–५१ युद्धावेश ( युद्धमद ) चढलेले, जोखडाप्रमाणें लांब हात असलेले डोक्यावर उत्कृष्ट शिरस्त्राण आणि अंगात कवच घातलेले परस्परांशीं विरोध करणारे असे त्या दोन्ही सैन्यांतील प्रमुख योद्धे, धनुष्यें हलवीत व तीक्ष्ण बाण जोडीत, ' सांभाळ सांभाळ ' असें पुनः पुनः गर्वानें म्हणत पुरंदरगडाच्या चढणी-वर त्यासमयीं अद्भुत प्रकारें लढले.

**तदा पुरंदरार्थाय प्रहरंतः परस्परम् ।**
**नैकेऽवरोदुमारोढुं बत नैके तदा शकन् ॥ ५२ ॥**

५२ त्या वेळीं पुरंदरासाठीं परस्परांवर प्रहार करणाऱ्या सैन्यांपैकीं एक ( वरचे लोक ) खालीं उतरूं शकले नाहींत ! आणि ( दुसरे खालचे लोक ) वर चढूं शकले नाहींत !

**अवलोक्य बतान्योन्यमानीय च शरव्यताम् ।**
**एके भुवस्तलं बाणैः प्यधुरन्ये दिवस्तलम् ॥ ५३ ॥**

५३ एकमेकांकडे पाहून व नेम धरून एकानीं बाणांनीं पृथ्वीतल व दुसऱ्यांनीं आकाश झाकून टाकलें.

**यः कस्यचिदुरो भित्वा भुजं चिच्छेद कस्यचित् ।**
**स एवेषुस्सशीर्षण्यमन्यदीयं शिरो हरत् ॥ ५४ ॥**

५४ जो बाण एकाची छाती भेदून दुसऱ्याचा भुज छेदी तोच बाण तिसऱ्याचें शिरस्त्राणयुक्त डोकेंही उडवी.

**तत्र प्रसभमभ्येत्य गोदः क्रोधरयोद्धतः ।**
**निचखान क्षुतं भल्लं मुसेखानभुजांतरे ॥ ५५ ॥**

५५ क्रोधानें बेफाम ( क्रोधाविष्ट ) झालेल्या गोदाजीनें जोरानें चाल करून मुसेखानाच्या छातींत तीक्ष्ण भाला खुपसला.

**निशातं विद्विषा तेन निखातं निजवक्षसि ।**
**यवनस्स तु तं भल्लं भीमं सन्नाहभेदिनम् ॥ ५६ ॥**
**उभाभ्यामपि पाणिभ्यामुद्धृत्य स्वभुजांतरात् ।**
**रोषदष्टाधरतलः सद्य एव द्विधा व्यधात् ॥ ५७ ॥**

५६–५७ पण त्या शत्रूनें आपल्या छातींत खुपसलेला, कवच भेदून जाणारा तो तीक्ष्ण व भयंकर भाला त्या यवनानें दोन्ही हातांनीं उपटू ( सून )न काढून क्रोधानें दांत ओंठ चावून लगेच त्याचे दोन तुकडे करून टाकले.

**अलंचकार तं तत्र रुधिरार्द्रमुरस्स्थलम् ।**
**यथा शिलोच्चयं सांद्रगैरिकाक्तशिलातलम् ॥ ५८ ॥**

५८ दाट कावेनें रंग माखलेलें शिलातल ज्याप्रमाणें पर्वताला शोभा देतें त्याप्रमाणें रक्तबंबाळ झालेली छाती त्यास शोभा देऊं लागली.

**इहांतरे खड्गचर्मधारी धीरः सदः स्यदात् ।**
**योध्द्रा शरफशाहेन योध्दुमद्धाभ्यपद्यत ॥ ५९ ॥**

५९ इतक्यांत ढाल तलवार धारण करणारा धैर्यवान सदाजी हा योद्धा अशरफशहाशीं लढण्यासाठीं वेगानें चालून गेला.

**उभावपि युधामत्तौ रक्तनेत्रावुभावपि ।**
**उभावपि ससन्नाहौ महोत्साहावुभावपि ॥ ६० ॥**
**स्वया स्वयासिलतया परिनर्तितया भृशम् ।**
**दिवं सौदामिनीद्योतैर्दीपयंतावुभावपि ॥ ६१ ॥**
**परस्परांतरप्रेक्षापरौ पंचाननस्वरौ ।**
**भ्रांतोद्भ्रांतादिकान् भेदान् दर्शयंतौ विरेजतुः ॥ ६२ ॥**

६०–६२ दोघांनांही युद्धावेश चढला होता; दोघांचेहि नेत्र रक्तासारखे लाल झाले होते; दोघेहि आयुधांनीं सज झाले होते; दोघांचाहि उत्साह दांडगा होता आणि दोघेहि आपआपली तलवार फिरवून ( नाचवून ) विजेच्या चमकेप्रमाणें आकाश प्रकाशित करीत होते; ते दोघेहि एकमेकांचे छिद्र पाहण्यास टपलेले असून सिंहासारखी गर्जना करीत होते, ' भ्रान्त ' ' उद्भ्रान्त ' इत्यादि पट्टयाचे हात दाखवीत असता ते फारच शोभत होते.

**अथासिपातैरन्योन्यविहितैः क्षतविग्रहौ ।**
**एकेनैव क्षणेनैतौ रुधिरार्द्रौ बभूवतुः ॥ ६३ ॥**

६३ नंतर परपस्परांनीं केलेल्या तरवारीच्या वारांनीं शरीरें जखमी होऊन एका क्षणांतच ते रक्तबंबाळ झाले.

**व्याघ्रस्तु पुरुषव्याघ्रं घांटिकं घोरशाक्तिकम् ।**
**प्रजहार भुजस्तंभे शक्त्यानिशितया द्रुतम् ॥ ६४ ॥**

६४ इकडे वाघानें, भयंकर शक्ति धारण करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ घाटग्याच्या खांबासारख्या दंडावर अत्यंत तीक्ष्ण शक्तीनें झटकन प्रहार केला.

**ततस्स्रवदसृग्दिग्धदेहो युद्धविशारदः ।**
**शक्त्यैव घांटिकोत्युच्चैः प्रवेष्टे तमताडयत् ॥ ६५ ॥**

६५ तेव्हां अंगांतून स्रवणाऱ्या-वाहणाऱ्या रक्तानें रक्तबंबाळ झालेल्या त्या युद्धविशारद घाटग्यानेंहि शक्तीनेंच त्याच्या मनगटावर ( भुजावर ) जोरानें प्रहार केला.

**तदामुना हन्यमानो व्याघ्रो व्याघ्र इवापरः ।**
**स्वशौर्यं दर्शयामास हर्षयामास च स्वकान् ॥ ६६ ॥**

६६ तेव्हां जणूं काय दुसरा वाघच अशा त्या वाघानें त्याच्याकडून प्रहार होत असतांही स्वतःचें शौर्य दाखवून आपल्या लोकांस हर्षविलें.

**आकर्णाकृष्टधन्वानौ मिनादरतनावपि ।**
**अभ्येतं भैरवं चोरं छादयामासतुः शरैः ॥ ६७ ॥**

६७ मिनाद व रतनु यांनींहि धनुष्य आकर्ण ओढून चालून आलेल्या भैरव चोरास बाणांनीं झाकून टाकलें.

**ताभ्यामुभाभ्यामुन्मुक्तैः शरैर्नीतं शरव्यताम् ।**
**अवाप्तचालनीभावं तदभ्राजत तद्वपुः ॥ ६८ ॥**

६८ त्या दोघांनीं सोडलेल्या बाणांनीं विद्ध केलेलें तें त्याचें शरीर चाळणी-सारखें दिसूं लागलें.

**स एकोद्वाविमौ तत्र युद्धमप्यभवच्चिरम् ।**
**तथापि भैरवश्चोरः प्रतिपेदे जयश्रियम् ॥ ६९ ॥**

६९ हा एकटा आणि ते दोघे असतांहि तेथें पुष्कळ वेळ युद्ध चाललें तथापि भैरव चोरासच विजयश्री प्राप्त झाली.

**कावुकेनापि सरुषा पावकप्रतिमौजसा ।**
**गदाघातेन महता शायिताश्शतशो द्विषः ॥ ७० ॥**

७० क्रुद्ध आणि अग्नीप्रमाणें तेजस्वी कावुकानेंहि जोराच्या गदाप्रहारानें शेंकडों शत्रु लोळविलें.

**विशीर्णवरवर्माणो विदीर्णतरवक्षसः ।**
**सहसा परिमुह्यंतो हस्तविस्रस्तहेतयः ॥ ७१ ॥**

**प्रतिप्रतीकनिर्गच्छद्रक्तरंजितभूमयः ।**
**आयोधनाजिरेऽमुष्मिन्निपतंतो विरेजिरे ॥ ७२ ॥**

७१-७२ ज्यांची उत्कृष्ट कवचें भग्न झालीं आहेत व वक्षःस्थळें विदीर्ण झालीं आहेत, जे एकाएकीं मूर्च्छित होऊन ज्यांच्या हातांतून शस्त्रे गळून पडलीं आहेत, ज्यांच्या प्रत्येक अवयवांतून वाहणाऱ्या रक्तानें जमीन तांबडी लाल झाली आहे असे रणभूमीवर पडणारे लोक शोभूं लागले.

**विगलद्रक्तरक्तांगाः सुभटास्ते बभुस्तदा ।**
**निर्झरोद्गारसंपृक्तगैरिकार्द्रा इवाद्रयः ॥ ७३ ॥**

७३ गळणाऱ्या रक्तानें लाल शरीरें झालेले ते उत्कृष्ट वीर झऱ्याच्या प्रवाहांत मिसळलेल्या गेरूनें रंगलेल्या पर्वतांप्रमाणें शोभूं लागले.

**तत्र तेषां परेषां च तदभ्याहवकौतुकम् ।**
**व्यलोकत शिवोऽप्यद्धा वीरो वीरश्रियोल्लसन् ॥ ७४ ॥**

७४ वीरश्रीनें विराजणारा वीर शिवाजीहि तेथे त्यांच्या ( मराठ्यांच्या ) व शत्रुच्यामध्यें चाललेल्या त्या युद्धाचें कौतुक त्यासमयीं प्रत्यक्ष पहात होता.

**तदा पुरंदरतटादतिमात्रस्मयोद्धता ।**
**प्रणदंती प्रववृते लोहितोदा महानदी ॥ ७५ ॥**

७५ त्या वेळीं पुरंदरगडाच्या दरडीवरून रक्ताची महानदी गर्जना करीत अत्यंत गर्वानें उन्मत्त झालेली घडाघड वाहूं लागली.

**आरुह्य व्योमयानानि द्योतयंतो दिवोंतरम् ।**
**दर्शं दर्शं सुरास्सर्वे प्रशशंसुर्महाहवम् ॥ ७६ ॥**

७६ विमानांत बसून अंतरिक्ष प्रकाशित करणारे सर्व देव तें महायुद्ध वारंवार पाहून त्याची प्रशंसा करूं लागले.

**तत्कालकलितोद्दाममुंडमाला मनोहरः ।**
**प्रावर्तत मुदा तत्र प्रमथैस्सहितो हरः ॥ ७७ ॥**

७७ त्या वेळीं धारण केलेल्या भयंकर मुंडमाळांनीं मनोहर दिसणारा शंकर प्रमथांसह ( प्रथम गणांसह ) आनंदानें तेथें आला.

**अतिमात्रं जिघत्संतस्तत्क्षणाधिगतक्षणाः ।**
**अतृप्यन् प्रचुरं प्राप्य पिशितं पिशिताशनाः ॥ ७८ ॥**

७८ अतिशय बुभुक्षित राक्षस त्याक्षणीं आनंदित होऊन पुष्कळ मांस मिळाल्यामुळें तृप्त झाले.

**प्रेतरं कोऽकमारोप्य करंकमकुतोभयः ।**
**संपृक्तशोणितरसं तरसं बुबुधे तदा ॥ ७९ ॥**

७९ त्या वेळीं बुभुक्षित पिशाच रक्तानें भरलेलें मुंडकें निर्भयपणें मांडीवर ठेवून भराभर खाऊं लागलें.

**उद्दामोड्डानशौंडाभिर्डाकिनीभिस्समं तदा ।**
**वपूंषि पुपुषुः स्वानि शाकिन्यस्सैनिकामिषैः ॥ ८० ॥**

८० त्या वेळीं स्वैर ( भयंकर ) उड्या मारण्यांत पटाईत ( निपुण ) अशा डाकिनींसह शाकिनींनी सैनिकांच्या मांसानें आपलीं शरीरें पुष्ट केलीं ( मांसावर ताव मारला. ).

**कवींद्र उवाच**

**यथा तत्र मुसेखानो गोदेन निहतस्तदा ।**
**निशम्यतां तथा सर्वमभिधास्याम्यथ द्विजाः ॥ ८१ ॥**

कवींद्र म्हणालाः—

८१ अहो द्विजांनों, त्यासमयीं गोदाजीनें मुसेखानास कसें मारलें हें सर्व मी आतां सांगतो तें आपण ऐकावें.

**मुसेखानेन बलिना भग्नभल्लस्सकोपनः ।**
**कालकाकोदराकारकरवालकरोऽभवत् ॥ ८२ ॥**

८२ बलवान मुसेखानानें (गोदाचा) भाला मोडल्यावर तो क्रुद्ध होऊन त्यानें काळ्या कावळ्याच्या उदराप्रमाणे दिसणारी तरवार हातांत घेतली.

**तत्र तत्करवालेन ताडिदाकारधारिणा ।**
**पेतुः पठाणाः शतशः शकलीभूय भूतले ॥ ८३ ॥**

८३ तेथें त्या विजेसारख्या तरवारीनें शेंकडों पठाणांचे तुकडे तुकडे होऊन ते भूमीवर पडले.

**मुसेखानस्तु तद्दृष्ट्वा तस्यकर्मातिमानुषम् ।**
**तमात्मकरवालेन भुजे सव्ये व्यताडयत् ॥ ८४ ॥**

८४ पण मुसेखानाने त्याचें तें अतिमानुष कृत्य पाहून त्याच्या डाव्या बाहूवर आपल्या तरवारीने वार केला.

**ताडितस्स भुजे मुसेखानेन वेगिना ।**
**नावेपत महावीरो वातेनेववनद्रुमः ॥ ८५ ॥**

८५ वेगवान मुसेखानानें डाव्या भुजावर वार केला असतांहि तो महावीर वाऱ्यानें जसा वनवृक्ष कंप पावत नाहीं त्याप्रमाणें, कंप पावला नाहीं.

**निबद्धभ्रूपुटौ भूरिरोषरूक्षेक्षणावुभौ ।**
**गतप्रत्यागतकरौ घोरखड्गलताकरौ ॥ ८६ ॥**

**द्विरदा इव नर्दंतौ प्रहरंतौ परस्परम् ।**
**विशीर्यमाणशीर्षण्यतनुत्रौ तौ विरेजतुः ॥ ८७ ॥**

८६–८७ कपाळास खूप आठ्या घातलेले व क्रोधानें क्रूर दृष्टि झालेले ते दोघेहि हातांत भयंकर तरवारी घेऊन पुढें जात मागें येत, हत्तीप्रमाणें गर्जना करीत, परस्परांना प्रहार करीत असतां त्यांची शिरस्त्राणें व कवचें विदीर्ण होऊन ते शोभूं लागले.

**अथान्योन्यायुधाघातदीर्यमाणावुभाविमौ ।**
**समं रुधिरधाराभिर्वसुधामभ्यषिंचताम् ॥ ८८ ॥**

८८ मग एकमेकांच्या शस्त्रप्रहारांनीं जखमी झालेले हे दोघेहि एकदम रक्ताच्या धारांनीं पृथ्वीला अभिषेक करूं लागले.

**क्षणमात्रमहो तत्र युद्धमासीत्तयोस्समम् ।**
**ततस्तत् कृततोदोपि ततो गोदोऽधिकोऽभवत् ॥ ८९ ॥**

८९ अहो ! क्षणमात्र तेथें त्या दोघांचें बरोबरीचे युद्ध ( समसमान ) झालें. मग त्या युद्धामुळे होणाऱ्या वेदना होत असतांहि गोदाजीनें मुसेखानावर वरचढ केली.

**अथप्रहारैर्बहुभिर्निर्भरं विह्वलोऽपि सन् ।**
**बली स पातयामास खड्गं गोदस्य मूर्धनि ॥ ९० ॥**

९० मग पुष्कळ प्रहारांच्या योगें अत्यंत विव्हल झाला असतांहि त्या बलवान मुसेखानानें गोदाजीच्या मस्तकावर तरवार हाणली.

**यावदापतति ह्यस्य करवालस्स्वमूर्धनि ।**
**तावद्गोदोसिनास्वेन तमरातिमताडयत् ॥ ९१ ॥**

९१ जों याची तरवार आपल्या डोक्यावर पडते न पडते तोंच गोदाजीनें आपल्या तरवारीनें त्या शत्रूस मारलें.

**ताडितःस तदा तत्र गोदेन क्रोधमूर्तिना ।**
**आस्कंधभागमामध्यभागं भिन्नो द्विधाभवत् ॥ ९२ ॥**

९२ त्या वेळीं तेथें क्रुद्ध गोदाजीनें प्रहार केलेल्या तो मुसेखान खांद्यापासून मध्यभागापर्यंत चिरला जाऊन त्याचे दोन तुकडे झाले.

**निपातितं तदा तस्य द्विधाभूतं कलेवरम् ।**
**अभूच्च रुधिरोद्गारैररुणं धरणीतलम् ॥ ९३ ॥**

९३ तेव्हां दोन तुकडे झालेलें त्याचें शरीर पाडण्यांत आलें आणि त्यामुळें रक्तप्रवाहाच्या योगें पृथ्वीतल ( भूमि ) तांबडें लाल झालें.

**जगत्स्थापकवंश्येन मुसेखाने निपातिते ।**
**शतशस्तत्र यवनाः शमनातिथयोऽभवन् ॥ ९४ ॥**

९४ गोदाजी जगतापानें मुसेखानास पाडलें असतां तेथें शेंकडों यवन यम-राजाचें पाहुणे झाले.

**सदेन खड्गिनाखड्गयुद्धं योद्धुमपारयन् ।**
**परः शरासनं गर्वादर्वाग्भूयाग्र्यमग्रहीत् ॥ ९५ ॥**

९५ खड्गधारी सदाजीशीं खड्गयुद्ध करण्यास असमर्थ असणाऱ्या शत्रूनें मागें सरून गर्वानें उत्तम धनुष्य उचललें.

**ततोऽशरफशाहस्य तुदतस्ते शितैश्शरैः ।**
**विकृष्यमाणमौर्वीकं व्योमांतवलयायितम् ॥ ९६ ॥**
**अनेकवर्णनिन्यासमिंद्रायुधमिवायतम् ।**
**धनुरभ्येत्य चिच्छेद करवालकरस्सदः ॥ ९७ ॥**

९६–९७ नंतर तीक्ष्ण बाणांनीं विद्ध करणाऱ्या अशरफशहानें दोरी ओढून क्षितिजापर्यंत वांकविलें, अनेक रंगांनीं रंगविलेलें, इंद्रधनुष्याप्रमाणें लांब असें धनुष्य खड्गधारी सदाजीनें चालून जाऊन छेदून टाकलें.

**स तेन शीघ्रहस्तेन द्विषता द्विदलीकृतम् ।**
**विचित्रवर्णदुर्वर्णबिंदुराजिविराजितम् ॥ ९८ ॥**
**तदा तदाहवसखं विहाय विशिखासनम् ।**
**सद्यस्तमाहितं हन्तुं घोरं परिघमाददे ॥ ९९ ॥**

९८–९९ चलाख हाताच्या त्या शत्रूनें दोन तुकडे केलेलें, चित्रविचित्र रंगांचें, रुप्याच्या टिकल्यांनीं चमकणारें, युद्धांतील मित्र असें तें धनुष्य त्या वेळीं टाकून लगेच त्या शत्रूस मारण्यासाठीं त्यानें भयंकर परिघ ( लोखंडी कांटे लावलेला सोटा–अस्त्र ) घेतला.

**पंचाननसमस्तन्वातन्वानोतितमां युधम् ।**
**गृहीतमात्रं चिच्छेद सदस्तस्य तदायुधम् ॥ १०० ॥**

१०० शरीरानें सिंहासारखा व अतिशय निकरानें युद्ध करणाऱ्या त्या सदोजीनें त्याचें तें आयुध घेतांक्षणींच तोडून टाकलें.

**आदत्त तत्र हस्ते स्वे स म्लेच्छो यद्यदायुधम् ।**
**सदो वीररसावेशात् तरसा तत्तदाच्छिनत् ॥ १०१ ॥**

१०१ तेथें त्या यवनानें जें जें आयुध आपल्या हातीं घेतलें तें तें सदाजीनें तेव्हाच तोडून टाकलें.

ततो निरायुधो भूत्वा कृत्वानभिमुखं मुखम्।
यवनस्स परावृत्तिपथं लेभे यथासुखम् ॥ १०२॥

१०२ तेव्हां निःशस्त्र होऊन, तोंड फिरवून तो यवन वाट फुटेल तिकडे पळत सुटला.

अथ प्रतिभटात्तस्मात् घांटिकोऽपि द्रुतं तथा।
अपद्रुताश्चिरं युद्ध्वा द्विरदाद्द्विरदो यथा ॥ १०३॥

१०३ नंतर घांटगेहि त्या शत्रु योद्धयाशीं (वाघाशीं) बराच वेळ युद्ध करून एका हत्तीपासून दुसरा हत्ती जसा पळून जातो तसा त्याच्यापासून वेगानें पळून गेला.

भैरवं भैरवं मत्वा मिनादरतनावपि।
संवर्तसमयप्रायात् संपरायादपेयतुः ॥ १०४॥

१०४ मिनाद व रतनु यांनींहि भैरवास (प्रत्यक्ष) काळभैरव समजून प्रलयकाळासारख्या त्या युद्धांतून पाय काढला.

पुरंदरात् परावर्तमानां त्राणार्थिनीं चमूम्।
नालोकत फतेखानो ग्लानोऽनभिमुखीभवन् ॥ १०५॥

१०५ पुरंदराहून रक्षणार्थ परत फिरणाऱ्या त्या सेनेकडे खिन्न फत्तेखानानें वळून पाहिलें नाहीं.

अभिमुखमुपायातं तत्र प्रभूतबलं बला-
द्युधि किल फतेखानं भंक्त्वा स शाहनृपात्मजः।
अविहतगतिर्दैवोद्रेकादुदित्वरविक्रमो
विजयपुरभूशक्रं जेतुं बताभिमुखोऽभवत् ॥ १०६॥

१०६ तेथें पुष्कळ सैन्यासह समोर चालून आलेल्या त्या फत्तेखानाचा त्या शहाजीच्या पुत्रानें—शिवाजीनें—बलानें मोड करून दैवोत्कर्षामुळें अप्रतिहतगति आणि चढत्या पराक्रमाचा तो शिवाजी विजापूरच्या सुलतानाला जिंकण्यास उद्युक्त झाला.

भृशं युद्ध्वावाप्तः शिवधरणिपालादभिभवं
फतेखानो म्लानो विजयपुरमभ्यर्णमकरोत्।
तमाकर्ण्योदन्तं सदसि महमूदेन सहसा
ममज्जे चिंताब्धौ सुचिरमनुतप्तेन मनसा ॥ १०७॥

१०७ जोरानें लढून त्यांत शिवाजीमहाराजांकडून पराभव पावून खिन्न (म्लान) झालेल्या फत्तेखानानें विजापूर गांठलें आणि ती बातमी दरबारांत एकदम ऐकून महमूदशहाचें मन दुःखी होऊन तो पुष्कळ काळपर्यंत चिंतासागरांत बुडाला.

इत्यनुपुराणे कवींद्र परमानंद प्रकाशितायां मुसेखान-
वधोनाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

---

# अध्याय १५ वा

कवीन्द्र उवाच

परैः पुरन्दरतटे मुसेखानं निपातितम् ।
प्रभूतं सैन्यमन्यच्च पराक्रम्य पराहतम् ॥ १ ॥
फतेखानं च विमुखीकृतमंतिकमागतम् ।
निशम्य महमूदेन मुमुदे न दिवानिशम् ॥ २ ॥

१-२ कवींद्र म्हणतात—शत्रूंनीं मुसेखानास पुरंदर किल्यावर लोळविलें; तसेंच त्यानें इतर पुष्कळ सैन्यहि पराक्रम करून मागें हटविलें आणि फतेखान पराभव पावून परत जवळ आला आहे, हें ऐकून महमूदशहाला रात्रंदिवस चैन पडेना.

अथो विदूयमानोऽन्तः फतेखानस्य भङ्गतः ।
स्वे चेतसि चिरस्येत्थं महमूदो व्यचिन्तयत् ॥ ३ ॥

३ तेव्हां फत्तेखानाच्या पराभवामुळें अंतःकरणांत दुःखित झालेला महमूद-शहा आपल्या मनांत पुढीलप्रमाणें विचार करूं लागला.

अहो अहर्दिवममी अस्माभिः परिपालिताः ।
क्षिण्वन्ति यवनानस्मान् क्षत्रियाः कालनोदिताः ॥ ४ ॥

४ अहो ! रात्रंदिवस ज्यांचें आम्हीं पालन केलें ते हे क्षत्रिय मराठे अनुकूल काल येतांच आम्हां यवनांचा नाश करीत आहेत.

समृद्धिमधिकां लब्ध्वा दुर्मदात्मा मदाश्रयात् ।
साहसी शाहराजोऽयं मन्नियोगं न मन्यते ॥ ५ ॥

५ माझ्या आश्रयानें अधिक समृद्धि पावून हा उन्मत्त झालेला साहसी शाहाजी राजा माझी आज्ञा मानीनासा झाला आहे.

अनेन कोपनेनाद्धा विधायोद्धतमाहवम् ।
पुण्डरीकपुरोपान्ते विजितो रणदूलहः ॥ ६ ॥

६ ह्या रागिटानें उघडपणें जोराचें युद्ध करून पंढरपुरापाशीं रणदुल्लाखानास जिंकिलें.

अनेन मन्त्रकलया कलितो मलिकोऽम्बरः ।
निरर्गलेन निकृतः स चानेनार्गलेश्वरः ॥ ७ ॥

७ ह्यानें आपल्या मसलतीनें मलिकअंबरास ताब्यांत आणलें आणि ह्या उद्दामानें अगोळच्या राजास पराभूत केलें.

**चिररात्राय पित्रेव येनायं परिपालितः ।**
**स निजामोऽप्यनेनोच्चैर्निकृतिस्थेन वञ्चितः ॥ ८ ॥**

८ ज्यानें पित्याप्रमाणें ह्याचें पुष्कळ काळ परिपालन केलें त्या निजामास सुद्धां ह्या कपटी शहाजीनें चांगलेंच फसविलें.

**कार्णाटकाः क्षोणिभृतः परिहाय मदीयताम् ।**
**वतैतन्मन्त्रयोगेन प्रथयन्त्येतदीयताम् ॥ ९ ॥**

९ कर्नाटकांतील राजांनीं माझा अंकितपणा सोडून देऊन ते ह्याच्या मसलतीमुळें, आपण त्याचे अंकित आहों, असें जाहीर करीत आहेत.

**मुहुराहूयमानोऽपि नायातोऽयमुपह्वरे ।**
**अपातयदयं ह्यस्मज्जयं संशयगह्वरे ॥ १० ॥**

१० वारंवार बोलाविलें असतांहि हा सन्निध आला नाहीं; व ह्यानेंच आमचा जय संशयगर्तेंत पाडला आहे.

**अनेनोपकृतः पूर्वमिभरामः पदे पदे ।**
**निवेशितोऽयं सन्तुष्य तेनाप्यत्युन्नते पदे ॥ ११**

११ ह्यानें पूर्वी इब्राहिमशहास पदोपदीं उपकृत केल्यामुळें त्यानें सुद्धां संतुष्ट होऊन ह्या शहाजीस अत्युच्च पदावर स्थापिलें.

**अनेन हेतुना ह्यस्य मन्तवः शतशो मया ।**
**अतिक्रान्ताध्वनोऽत्यर्थं क्षान्ता एव दिने दिने ॥ १२ ॥**

१२ ह्याच कारणास्तव फार मार्ग सोडून वागणाऱ्या ह्या शहाजीचे शेंकडो अपराध मीं रोजच्या रोज पोटांतच घातले.

**आगांसि सुगरीयांसि क्षन्तुं नैव क्षमोऽभवम् ।**
**तदानीं निग्रहायास्य मुस्तुफाखानमादिशम् ॥ १३ ॥**

१३ पण अक्षम्य असे मोठे अपराध जेव्हां ह्याचे माझ्या नजरेस आले तेव्हां त्यास पकडण्यासाठीं मीं मुस्तुफाखानास हुकूम केला.

**अस्मिंस्तु निगृहीतेऽस्य सुतौ शम्भुशिवावुभौ ।**
**उन्नद्धीभूय युध्येते मन्निमज्जनलोलुभौ ॥ १४ ॥**

१४ नंतर ह्याला कैद केला असतां ह्याचे संभाजी व शहाजी हे दोघे मुलगे उद्दाम होऊन मला बुडविण्याच्या इच्छेने युद्ध करीत आहेत.

**पित्रर्थे शम्भुना तत्र फराद: परिभावित:।**
**सम्पराये शिवेनात्र फतेखानोऽपि यापित: ॥ १५ ॥**

१५ आपल्या पित्यासाठीं संभाजीनें तिकडे फरादखानाचा पराभव केला आणि इकडे शिवाजीनें युद्धामध्यें फतेखानासहि पळवून लाविलें.

**अलं बलमहो शम्भो: किल येन यशस्विना।**
**फरादस्तत्र भग्नो न भग्नं किन्त्वद्य मन्मन: ॥ १६ ॥**

१६ त्या विजयी संभाजीनें तिकडे फरादाचा मोड केला नाहीं तर माझेंच मन आज ह्यानें भग्न केलें आहे. केवढें मोठें त्याचें सामर्थ्य हें !

**शिवस्य यस्य हस्तेऽद्य धरौ सिंहपुरन्दरौ।**
**सोहंकारं कथंकारं न करिष्यति मय्यरौ ॥ १७ ॥**

१७ ज्या शिवाजीच्या हातांत आज सिंहगड व पुरंदरगड हे आहेत तो मज शत्रूबरोबर ताठा कां बरें धरणार नाहीं ?

**रणो यत्राजनिष्टायं भीषणो भीष्मपर्वत:।**
**सुतरां दुर्ग्रहोऽस्माभि: स पुरन्दरपर्वत: ॥ १८ ॥**

१८ जेथें हें भयंकर युद्ध झालें तो भयंकर मोठा पर्वत पुरंदरगड आम्हास हस्तगत करण्यास अतिशय कठिण आहे.

**बिंबरूरे पुरे शम्भुं शिवं चाद्रौ पुरन्दरे।**
**न्यवेशयत शाहोऽयं किमस्मत्परिभूयते ॥ १९ ॥**

१९ ह्या शहाजीनें संभाजीस बंगळुरास ठेविलें आहे; व शिवाजीस पुरंदरगडावर ठेविलें आहे. ( तेव्हां ) हा कसचा आमच्या हातून पराभव पावतो !

**जनक: शम्भुशिवयोर्न मोक्तव्यो मया यदा।**
**समृद्धायै श्रियेऽमुष्यै बत देयोऽञ्जलिस्तदा ॥ २० ॥**

२० जर मी ह्या संभाजी व शिवाजी ह्यांच्या बापास सोडून न दिलें तर मला माझ्या ह्या समृद्ध संपत्तीवर तिलांजलि सोडावी लागेल !

**पृदाकुरिव निर्मुक्तो मोक्तव्योऽयं मया यदि।**
**अपकारपरस्तर्हि किं मां नापकरिष्यति ॥ २१ ॥**

२१ कात टाकलेल्या सापाप्रमाणें ह्या शहाजीला जर मीं सोडून द्यावें तर हा अपकारक, मलाच अपकार कशावरून करणार नाहीं ?

**अयं मोक्तव्य इत्येको मोक्तव्यो नेति चापर:।**
**मन्त्रयोरुभयोर्मन्ये प्रथमो मद्धितावह: ॥ २२ ॥**

२२ ह्याला सोडून द्यावें ही एक व सोडून देऊं नये ही दुसरी, अशा ह्या दोन्ही मसलतींपैकीं, पहिली माझ्या हिताची आहे.

**सर्वथा जिह्मगस्यास्य रोषो मन्मन्त्रवैभवात् ।**
**अपकारपरस्यापि प्रयास्यत्यवकेशिताम् ॥ २३ ॥**

२३ अपकारशील अशा ह्या सापाचा क्रोध माझ्या युक्तिप्रभावाने पूर्ण निष्फळ होईल.

**इमामुपकृतिं कृत्वा निधास्याम्यस्य मूर्धनि ।**
**न विस्मरिष्यति ह्येनां कुलीनोऽयं गुणाग्रणीः ॥ २४ ॥**

२४ मी ह्याच्या डोक्यावर ( त्याला सोडून देण्याचा ) हा उपकार करून ठेवीन म्हणजे हा कुलीन व गुणाग्रणी शहाजी तो ( उपकार ) विसरणार नाहीं.

**चिरं विचिन्त्य मनसा सुधीर्धीसचिवानिदम् ।**
**न्यगदद्यादिलो युक्तमित्यमन्यन्त तेऽप्यरम् ॥ २५ ॥**

२५ मनामध्यें असा पुष्कळ वेळ विचार करून चतुर अदिलशहानें ( आपल्या) बुद्धिमान् मंत्र्यांना ही मसलत सांगितली व त्यांना सुद्धां ती एकदम पटली.

**अथ तं मङ्गलस्नानं निर्मलाम्बरभूषणम् ।**
**परिवेषविनिर्मुक्तं नवीनमिवपूषणम् ॥ २६ ॥**
**उपह्वरे समानाय्य मानार्हमुपवेश्य च ।**
**अनुनीय च सोल्लासं महमूदोऽभ्यभाषत ॥ २७ ॥**

२६-२७ नंतर, मंगल स्नान करून, निर्मळ वस्त्रें व भूषणें धारण केलेल्या, जणूं काय खळ्यांतून सुटलेल्या नवीन सूर्याप्रमाणे दिसणाऱ्या, त्या शहाजीस संनिध आणवून, त्याच्या मानास शोभेशा जागीं बसवून व त्याचें सांत्वन करून महमूदशहा आनंदानें त्यास म्हणालाः—

**महमूद उवाच**

**मत्तो ह्यजानतो जातं तद्धि नो विद्धि जानतः ।**
**न जगत्यत्र दुर्ज्ञेयं राजंस्तव विजानतः ॥ २८ ॥**

२८ महमूदशहा म्हणतो—माझ्या अजाणत्याच्या हातून जे कांहीं झालें तें जाणून बुजून नव्हे असें समज. हे राजा, तुझ्या सारख्या जाणत्यास या जगांत दुर्ज्ञेय असें कांहीं नाहीं.

**विहितो मुस्तुफेनोच्चैर्द्वेषादफजलेन वा ।**
**तं मन्तुतन्तुं राजेन्द्र मदीयं मन्तुमर्हसि ॥ २९ ॥**

२९ मुस्तुफाखानानें किंवा अफजलखानानें अत्यंत द्वेषानें जो काय लहान सहान अपराध केला असेल तो, हे राजश्रेष्ठा ! माझाच समज.

**दिदृक्षुस्त्वामहं यस्मै यत्नानकरवं बहून् ।**
**बत मे सम्मदः सोऽभूदस्तु वा मास्तु वा तव ॥ ३० ॥**

३० तुला पाहूं इच्छिणाऱ्या मीं, ज्या तुझ्यासाठीं पुष्कळ यत्न केले तो अत्यानंद मला झाला आहे; तुला झाला असो वा नसो.

**उक्तोऽसि मृदुभिर्वाक्यैः परिमुक्तोऽसि निग्रहात् ।**
**अभिजातोऽसि भूपाल मदभीष्टपरो भव ॥ ३१ ॥**

३१ तुला मृदुवाक्यें बोललों आहे; तुझी कैदेंतून सुटका केली आहे, हे राजा, तूं कुलीन आहेस. तेव्हां माझें प्रिय करण्यास तत्पर रहा.

**एकामप्युपकारस्य कणिकां प्राप्य निर्वृताः ।**
**शतमप्यपकाराणां न स्मरन्ति महाव्रताः ॥ ३२ ॥**
**अणुनाप्यपकारेण परिक्षुभितमानसाः ।**
**उपकारसहस्राणि न स्मरन्त्यपचेतसः ॥ ३३ ॥**

३२–३३ थोर लोक अगदीं लहानशा उपकारानेंहि संतुष्ट होऊन शेकडों अपकार विसरून जातात; व लहानशा अपकारानेंहि खवळून जाऊन क्षुद्र मनाचे लोक हजारों उपकार विसरून जातात.

**अपकारसहस्राणि करोत्वलमसज्जनः ।**
**उपकारसहस्राणि करोत्येव तु सज्जनः ॥ ३४ ॥**

३४ दुर्जन हजारो अपकार करो, तरी पण सज्जन हजारों उपकार त्याच्यावर करतोच करतो.

**उपकारं परकृतं स्मरन्ति स्वकृतं न ये ।**
**त एव धारणावन्तः कृतज्ञाश्च सतां नये ॥ ३५ ॥**

३५ जे लोक दुसऱ्यानें केलेले उपकार स्मरतात व आपण केलेले उपकार विसरून जातात, तेच लोक सज्जनाचे मतें स्मरणशील व कृतज्ञ होत.

**उपकारपरं लोकं प्रभुर्नोपकरोति यः ।**
**स्वप्नलब्धा इव सुधा समृद्धा अपि तच्छ्रियः ॥ ३६ ॥**

३६ जो राजा, उपकारतत्पर असलेल्या लोकांवर उपकार करीत नाहीं त्याची विपुल संपत्ति हि स्वप्नांत प्राप्त झालेल्या अमृताप्रमाणें होय.

**शिक्षयस्व कनीयांसं तनयं गर्वपर्वतम् ।**
**महाराज मदीयं मे देहि तं सिंहपर्वतम् ॥ ३७ ॥**

३७ हे महाराजा. गर्वाचा पर्वत अशा तुझ्या धाकट्या पुत्रास उपदेश कर आणि तो माझा सिंहगड मला दे.

**न हि मां मुञ्चतितमां सिंहशैलग्रहाग्रहः ।**
**मदीयेन नियोगेन शिवायास्तु पुरन्दरः ॥ ३८ ॥**

३८ सिंहगड घेण्याचा माझा निश्चय मला मुळींच सोडीत नाहीं. मात्र, माझ्या आज्ञेनें पुरंदर शिवाजीस असूं दे.

**करोतु मह्यं सोऽप्यद्धा बिंगरूरमुपायनम् ।**
**यद्भग्नेन फरादेन व्यधीयत पलायनम् ॥ ३९ ॥**

३९ त्याचप्रमाणें ज्या संभाजीकडून मोड होऊन फरादखानानें पलायन केलें त्यानें सुद्धां बंगळूर शहर मला नजराणा म्हणून द्यावें.

**नियुञ्जते नियोगार्हान् कार्यायार्याः क्षणे क्षणे ।**
**तन्न कुर्वन्ति ते तर्हि को हेतुः शीलरक्षणे ॥ ४० ॥**

४० श्रेष्ठ लोक सेवकांना क्षणोक्षणींच्या कार्यासाठींच नेमीत असतात. त्यांनीं जर तें केलें नाहीं तर ( सेवकांच्या ) शीलरक्षणाचा हेतु काय ?

**प्रभुर्नियुंक्ते कार्यार्थी कार्यार्थी तं निषेवते ।**
**तयोरन्यतराकार्यान्न कार्यमुभयोरपि ॥ ४१ ॥**

४१ आपल्या कामासाठींच धनी ( सेवकाची ) नेमणूक करतो व आपल्या कामासाठींच ( सेवकहि ) त्याची सेवा करतो. त्या दोघांपैकीं एकानें जरी कर्तव्य केलें नाहीं तरी दोघांचेंहि काम होत नाहीं.

**न सौहित्यं विना पानं विना प्राणं न विग्रहः ।**
**विराजते महाराज नानुयानं विना नुगः ॥ ४२ ॥**

४२ तृप्तीशिवाय पिण्यांत मजा नाहीं व प्राणावांचून शरीरास शोभा नाहीं; त्याचप्रमाणें, हे महाराजा, ( आपल्या धन्यास ) अनुसरल्याशिवाय सेवक शोभत नाहीं.

**किं स्यादुक्तेन बहुना तवाहं त्वं ममाधुना ।**
**अन्योन्यमवलम्बो नौ लोकस्यास्यावलम्बनम् ॥ ४३ ॥**

४३ फार काय सांगूं ! आतां मी तुझा आणि तूं माझा आहेस; आपलें परस्परावलंबन, हाच ह्या लोकांचा आधार होय.

**अल्पवर्णमयीमित्थमनल्पार्थगरीयसीम् ।**
**येदिलः शाहराजाय श्रावयामास भारतीम् ॥ ४४ ॥**

४४ ह्याप्रमाणें थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ भरलेलें भाषण, अदिलशहानें शहाजी राजास उद्देशून केलें.

**यत्र यद्व्यञ्जयामास महमूदो वदावदः ।**
**शाहः स्वेन स्मितार्धेन तत्र तस्योत्तरं ददौ ॥ ४५ ॥**

४५ विसंगत भाषण करणारा महमूदशहा जेव्हां हें व्यक्त करीत होता तेव्हां त्याचें उत्तर शहाजी आपल्या अर्धवट स्मितानें देत असे.

**स तदानीं महाबुद्धिर्महमूदं मदोद्धतम् ।**
**तद्दुर्गद्वितयीदानप्रसंदानममन्यत ॥ ४६ ॥**

४६ मदोन्मत्त महमूदशहास ती गडांची जोडी देणें म्हणजे आपल्या पायात बेडीच अडकवून घेणें होय, असें तेव्हां त्या महाबुद्धिवान् शहाजीस वाटलें.

**अथ तस्य विमुक्तस्य सत्कृतस्य यथायथम् ।**
**येदिलः सदनद्वारि द्विरदाश्वमबन्धयत् ॥ ४७ ॥**

४७ नंतर ( कैदेंतून ) सुटका झालेल्या व यथायोग्य सत्कार झालेल्या त्या शहाजीच्या वाड्याच्या दारांत अदिलशहानें हत्ती घोडे बांधविले.

**स तदा जगदाह्लादतत्परः परसङ्कटात् ।**
**मुमुचेऽम्भोधरघटापटलादिव चन्द्रमाः ॥ ४८ ॥**

४८ तेव्हां ज्याप्रमाणें मेघसमूहाच्या पटलापासून जगदाल्हादकारक चंद्राची मुक्तता व्हावी त्याप्रमाणें जगास आनंद देणाऱ्या शहाजीची मोठ्या संकटांतून सुटका झाली.

**बन्धुः सर्वस्य लोकस्य मुक्तस्तस्मात् स निग्रहात् ।**
**व्यराजततरां तत्र दिवाकर इव ग्रहात् ॥ ४९ ॥**

४९ कैदेंतून सुटका झालेला तो सर्व लोकांचा बंधु शहाजी, ग्रहणांतून सुटलेल्या ( लोकबन्धु ) सूर्याप्रमाणें अतिशय शोभूं लागला.

**मुक्तमात्रः स युक्तोऽभूदनीकेन महीयसा ।**
**दिदीपे जगती सर्वा तदीयेन सुतेजसा ॥ ५० ॥**

५० तो सुटतांक्षणींच त्यानें मोठें सैन्य जमा केलें. आणि त्याच्या उत्कृष्ट तेजानें सर्व पृथ्वी देदीप्यमान् झाली.

**अथ शम्भुर्महाबाहुरनतिक्रमणीयया ।**
**बिंगरूरं पुरं सद्यस्तत्याज पितुराज्ञया ॥ ५१ ॥**

५१ मग बापाच्या अनुल्लंघनीय अशा आज्ञेनें महाबाहु संभाजीनें बेंगळूर शहर लगेच सोडून दिलें.

**समर्थोऽप्याहवं कर्तुमदेयमपि सर्वथा ।**
**शिवः सिंहाचलं प्रादात् पित्रर्थाय गरीयसे ॥ ५२ ॥**

५२ युद्ध करण्यास समर्थ असूनहि शिवाजीनें सर्वथा देण्यास अयोग्य असा सिंहगड बापाप्रीत्यर्थ देऊन टाकला.

अथ निज इति मत्वा पूजयित्वा वचोभिः।
पदि पदि विहिताभिः प्रीणयित्वोपदाभिः।
उपचितबहुसेनः प्रेषितो येदिलेन।
प्रतिभटविजयार्थं शाहराजः प्रतस्थे ॥ ५३ ॥

५३ नंतर आपलासा मानून (सु)शब्दांनीं गौरव करून; पदोपदीं दिलेल्या नजराण्यांनीं संतुष्ट करून आदिलशहानें पाठविलेला शहाजी मोठें सैन्य जमवून शत्रूंस जिंकण्यासाठीं निघाला.

इत्यनुपुराणे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां
संहितायां पञ्चदशोऽध्यायः ॥ १५ ॥

---

# अध्याय १६ वा

**कवींद्र उवाच ।**

**अथाभिमतलाभेन महमूदेऽतिनिर्वृते ।**
**स्वयं तु पितुरर्थाय वितीर्णे सिंहपर्वते ॥ १ ॥**
**आहूय स्वर्णशर्माणमग्रजन्मानमान्तिके ।**
**शिवोद्धा मंत्रवित्तत्तन्मंत्रवेदिनमब्रवीत् ॥ २ ॥**

कवीन्द्र म्हणाला—

१–२ नंतर महमूदशहास हवें होतें तें प्राप्त झाल्याने अत्यानंद झाला. पण केवळ पित्याकरतां स्वतः सिंहगड दिल्यावर, मसलतींत निपुण असलेला शिवाजी, सर्व मसलती जाणणाऱ्या सोनोपंत नावाच्या ब्राह्मण मंत्र्यास जवळ बोलावून म्हणाला.

**शिव उवाच ।**

**जानतामतिमूर्धन्यं यं धन्यं जानते जनाः ।**
**स मां नूनं न जानीते महाराजो महामनाः ॥ ३ ॥**

३ शिवाजी म्हणतो—ज्या धन्य पुरुषाला लोक शहाण्या पुरुषांमध्यें अत्यंत श्रेष्ठ समजतात तो थोर मनाचा महाराजा शहाजी मला खरोखर ओळखत नाहीं.

**अजानानो न जानातु सुखेनैव सतो गुणान् ।**
**जानानो यन्न जानीते तद्दुनोति हि सन्मनः ॥ ४ ॥**

४ अडाण्यानें सज्जनाच्या अंगचे गुण जाणले नाहींत तर तो न जाणो बापडा, पण जाणत्यानेंहि जर ते जाणले नाहींत तर ती गोष्ट मात्र सज्जनांच्या मनास दुःख देते.

**सोऽज्ञास्यद्यर्हि मां तर्हि नादास्यत्सिंहपर्वतम् ।**
**कोऽन्यथा तरसा जेष्यत्तमिम मत्करास्थितम् ॥ ५ ॥**

५ जर तो मला ओळखत असता तर त्यानें सिंहगड दिलाच नसता; नाहीं तर, माझ्या हातचा हा गड बलानें कोण जिंकूं शकला असता बरें !

**अप्रमत्तोपि यो मत्तो द्विषते सिंहपर्वतम् ।**
**आदापयद्येदिलाय किं वक्ष्ये तं महाव्रतम् ॥ ६ ॥**

६ शहाणासुरता असून सुद्धां ज्या वेड्यानें शत्रु अदिलशहास सिंहगड माझ्याकडून देवविला, त्या करारी पुरुषास मी काय म्हणूं ?

**स्वयं नियंता विश्वस्य विश्वस्य बत वैरिषु ।**
**सुखं सुप्तो निजगृहे ततो निजगृहेऽरिभिः ॥ ७ ॥**

७ खरोखर स्वतः विश्वाचा नियंता असून, शत्रूंवर विश्वासून आपल्या घरीं सुखानें निजला, म्हणून तो शत्रूंकडून पकडला गेला !

**नावज्ञेयाः खलु ज्ञेन वराका अपि विद्विषः ।**
**प्रशाम्यते पतंगेन प्रज्वलन्नपि दीपकः ॥ ८ ॥**

८ शत्रु क्षुद्र असले तरी शहाण्यानें त्यांची उपेक्षा करूं नये; कारण जळणारा दिवा सुद्धां पतंगाकडून विझविला जातो.

**दीपं विनाशयन्नेव पतंगश्चेद्विनश्यति ।**
**तुल्यतां कस्तयोस्तर्हि जात्यंध इव पश्यति ॥ ९ ॥**

९ दिव्याचा नाश करतांक्षणींच जरी पतंग नाश पावतो, तरी एकाद्या जन्मांधाप्रमाणें कोण डोळस मनुष्य दोघांनाहि सारखे मानील ?

**नूनं पिपीलकोऽप्येकः प्रविश्य करिणः करम् ।**
**भवत्यंतकरस्तस्मादल्पं मन्येत नो परम् ॥ १० ॥**

१० खरोखर एकादी मुंगी देखील हत्तीच्या सोंडेंत शिरून त्याचा अंत करते. म्हणून शत्रूस केव्हांहि क्षुद्र मानूं नये.

**अहो महाबाहुरसौ जानानोऽपि महानयम् ।**
**गणयत्येव न परानस्य दोषो महानयम् ॥ ११ ॥**

११ अहो, हा महाबाहु, मोठा राजनीतिज्ञ असूनहि शत्रूंची मुळीं पर्वा करीतच नाहीं, हा ह्याचा मोठा दोष होय.

**अरातिनिगृहीतेन शाहेन गुरुणा मम ।**
**यः प्राप्तश्चिररात्राय कारागारपरिश्रमः ॥ १२ ॥**
**तस्य निर्यातनं कर्तुं संप्रवृत्तोस्मि सर्वथा ।**
**यवनान्तात् प्रवृत्ताद्यप्रभृत्यत्रास्तुमत्प्रथा ॥ १३ ॥**

१२–१३ शत्रूंनीं पकडलेल्या माझ्या पिता शहाजीचे कारागृहामध्यें फार दिवस जे हाल झाले त्यांचा सूड घेण्यास मी अगदीं तयार झालों आहें; आणि आजपासून यवनांच्या नाशामुळेंच या लोकीं माझी कीर्ति होवो.

**यः परस्माद्बिभेत्युच्चैः परस्तस्माद्बिभेति च ।**
**न बिभेति परस्माद्यः परस्तस्माद्बिभेति हि ॥ १४ ॥**

१४ जो शत्रूस अतिशय भितो त्यासहि शत्रु भीत असतो मग जो शत्रूस (मुळींच) भीत नाहीं त्याला शत्रु भितो हें सांगावयास नकोच.

**नूनं मया निहंतव्यास्ते ते यवननायकाः ।**
**शराधिद्वितयस्यैते तेजितास्संति सायकाः ॥ १५ ॥**

१५ खरोखरच मी त्या सर्व यवननायकांचा फडशा उडविणारच (आणि त्याकरतां) भात्याच्या जोडीमधले हे बाण पाजळलेले आहेत.

**विजयाह्वपुरग्राहोत्सुकं संप्रति मन्मनः ।**
**अतोऽद्य नोद्यसे सद्यो नियुज्यंतां तुरंगिणः ॥ १६ ॥**

१६ विजापूर शहर घेण्याविषयीं सांप्रत माझें मन उत्सुक झालें आहे. म्हणून आज तुम्हास माझें सांगणें आहे कीं, लगेच घोडेस्वारांस तयार करा.

**सुवर्णशर्मोवाच ।**
**दुरंतं बलवद्वैरं दुरंतः पापसंचयः ।**
**दुरंताभ्यर्हिता गर्हा दुरंता गुरुगर्हणा ॥ १७ ॥**

१७ सोनोपंत म्हणाले:—
बळवानाशीं वैर, पापाचा संचय, पूज्यांची व वडिलांची निंदा याचा परिणाम वाईट होतो.

**विधाय बलवद्वैरं तव तातः कृताग्रहः ।**
**नाभूदवहितो यर्हि तदर्हस्तर्हि निग्रहः ॥ १८ ॥**

१८ बलवानाशीं वैर करून तुझा पिता भलता आग्रह धरून सावध राहिला नाहीं. यामुळे तो पकडला गेला हें योग्य झालें.

**स प्रभावी महाराजो मंत्रिणस्तस्य सुव्रताः ।**
**तेन यद्बलवद्वैरं कृतं सोपनयः कृतः ॥ १९ ॥**

१९ तो शहाजी महाराजा पराक्रमी आहे, त्याचे मंत्रीहि कर्तृत्ववान् आहेत; तथापि त्यानें जें बलिष्ठाशीं वैर केलें तें राजनीतिदृष्ट्या चुकीचें झालें.

**तनुते यद्यलं वैरमबलीयान् बलीयसा ।**
**तर्हि तस्य पराभावे सर्वथा प्रभुरेव सः ॥ २० ॥**

२० जर दुर्बळ माणसानें प्रबळ माणसाशीं अतिशय वैर केलें तर त्याचा पराभव करण्यास तो सर्वथा समर्थ असतो.

**दानमभ्यधिके शत्रौ समे साम विधीयते ।**
**ऊने दंडविधिः प्रोक्तो भेदः साधारणः स्मृतः ॥ २१ ॥**

२१ आपल्यापेक्षां अधिक सामर्थ्यवान् शत्रूस खंडणी द्यावी; बरोबरीच्या शत्रूशीं सलोखा करावा; कमी सामर्थ्यवान् शत्रूचें दंडन करावें; आणि भेद ( फितुरी, फूट पाडणें ) हा मात्र सर्वसामान्य उपाय होय.

**दिने दिने भवन्नूनः समः साम्यं विमुंचति ।**
**आधिक्यं चाधिको येन को भेदं न प्रशंसति ॥ २२ ॥**

२२ ज्या ( भेदा) च्या योगें बरोबरीचा शत्रु दिवसानुदिवस कमी सामर्थ्यवान् होऊन बरोबरी सोडून देतो आणि अधिक सामर्थ्यवान् शत्रु आपले आधिक्य टाकतो त्या भेदाची कोण बरें प्रशंसा करणार नाहीं ?

**नरेंद्र नूनमूनोपि द्वेषणो भेदमर्हति ।**
**ऊनस्याप्यूनतात्यर्थं हितायैव भवेद्युधि ॥ २३ ॥**

२३ हे राजा, कमी सामर्थ्यवान् शत्रूच्या ठिकाणीं सुद्धां भेद योजणें योग्य आहे. कारण, कमी सामर्थ्यवान् शत्रुसुद्धां अधिक दुर्बल होणें हें युद्धांत फायद्याचेंच होईल.

**ऊनोपि यदि दूनोयमिति मत्वाऽनुनीयते ।**
**तर्ह्यतः श्लाघ्यमानोऽसौ स्वमेव बहुमन्यते ॥ २४ ॥**

२४ ‘ हा दुःखित आहे ’ असें मानून जर कमी सामर्थ्यवान् शत्रूचें सांत्वन केलें तर तो मनात फुगून जाऊन आपणा स्वतःलाच मोठा समजूं लागतो.

**ऊनानामप्यनूनत्वमनूनानां तथोनता ।**
**दृश्यते मनुजाधीश समयांतरवैभवात् ॥ २५ ॥**

२५ हे राजा, दुर्बळ शत्रूंचें प्राबल्य, त्याचप्रमाणें प्रबळ शत्रूंचें दौर्बल्य हें कालमाहात्म्यानें झालेलें आढळतें.

**तस्मादूने नरेंद्रेण द्विषि दंडो विधीयते ।**
**मते पत्युरपां येन मनस्सम्यङ्निधीयते ॥ २६ ॥**

२६ सारांश. वरुणाच्या ह्या मताकडे जो राजा चागलें लक्ष देतो तो दुर्बळ शत्रूचें ( सहज ) शासन करतो.

**समर्थश्चासमर्थश्चेत्युपायो द्विविधो मतः ।**
**द्वितीयो ह्यवकेशी स्यात् प्रथमस्तु फलेग्रहिः ॥ २७ ॥**

२७ समर्थ आणि असमर्थ असे दोन प्रकारचे उपाय आहेत. दुसऱ्या प्रकारचा उपाय निष्फळ होतो पण पहिल्या प्रकारचा सफळ होतो.

**योषितस्सारहारिण्यो मदिरा मोहदायिनी ।**
**दुरोदरं धनहरं कादर्यं कार्यहानिकृत् ॥ २८ ॥**

**वाक्पारुष्यमलक्ष्मीकं मृगया पापकारिणी।**
**नरेंद्र दंडपारुष्यमत्यर्थमयशस्करम् ॥ २९ ॥**

२८--२९ स्त्रिया शक्ति हरण करतात; मदिरा मतिभ्रम उत्पन्न करते; द्यूत धन नाहींसें करतें; कृपणपणानें कार्याची हानि होते; कठोर भाषण हें अभद्र आहे; तसेंच मृगयेपासून पाप लागतें, आणि हे राजा, कडक शासन हें अत्यंत अपकीर्तिकारक आहे.

**तस्मादेतानि सप्तानि व्यसनानि परित्यजेत्।**
**बतान्यतममप्येषां मतिभ्रंशाय जायते ॥ ३० ॥**

३० म्हणून हीं सातहि व्यसनें टाकावींत, कारण यांपैकीं एकहि मतिभ्रंशास कारण होतें !

**येषामेकतरेणापि मतिभ्रंशो विधीयते ॥**
**तान्यनेकानि संसेव्य कः पुमान्नप्रहीयते ॥ ३१ ॥**

३१ जर त्यांपैकीं एकानेंहि मतिभ्रंश होतो तर तीं अनेक सेवन केल्यावर कोणता माणूस अधोगतीस जाणार नाहीं ?

**नीतिशास्त्रेषु विरसं निजकार्यभरालसम्।**
**मानुषं विजहाति श्रीर्व्यसनापन्नमानसम् ॥ ३२ ॥**

३२ राजनीतिशास्त्राविषयीं तिटकारा असणारा, आपल्या कामामध्यें आळशी व व्यसनामध्यें मग्न अशा माणसास लक्ष्मी सोडून जाते.

**मुष्णंत्युच्चैः प्रमत्तेऽस्मिन् कोशं कोशाधिकारिणः।**
**तुदंति च दुरात्मानो राष्ट्रं राष्ट्राधिकारिणः ॥ ३३ ॥**

३३ तो अतिशय बेसावध झाला असतां खजिनदार खजिना लुटतात आणि दुष्ट अधिकारी लोकांस पीडा देतात.

**तत्तद्व्यसनसक्तस्य वैचित्यमुपचीयते।**
**वैचित्योपचयादुच्चैरौचित्यमपचीयते ॥ ३४ ॥**

३४ नाना व्यसनांत राजाचा भ्रम वृद्धिंगत होतो व भ्रम अतिशय वाढल्यानें त्यास योग्यायोग्य कळेनासें होतें.

**औचित्यापचयादेनं जनस्सर्वोऽवमन्यते।**
**विनियुक्ताश्च कार्येषु नैव तान्याशु कुर्वते ॥ ३५ ॥**

३५ योग्यायोग्य कळेनासें झाल्यानें सर्व लोक त्याचा अपमान करतात. आणि कार्यांच्या ठिकाणीं नेमलेले लोक तीं ( ताबडतोब ) करीत नाहींत.

**अथ क्रोधोद्धुरोत्युच्चैरुच्चरन् रुशतीं गिरम् ।**
**दिने दिने तुदत्येतान् समेतानपि संसदि ॥ ३६ ॥**

३६ मग क्रोधानें अत्यंत बेफाम होऊन सभेंत जमलेल्या लोकांनाहि दररोज मनाला दुखविणारें भाषण करून तो त्यांस दुःख देतो.

**ततो ह्यनुक्षणकृतासूर्क्षणक्षतचेतसः ।**
**परोक्षे परिभाषंते यथाचोपहसंत्यमुम् ॥ ३७ ॥**

३७ पुढें क्षणोक्षणीं केलेल्या अनादरामुळें त्यांचें अंतःकरण खिन्न होऊन ते त्याच्या पाठीमागें बोलतात व त्याची निंदाहि करतात.

**ततो मुंचंत्यमुं केऽपि केऽप्यमुष्मिन्नुदासते ।**
**केचिद्द्विपक्षपक्षांतार्निपत्य सुखमासते ॥ ३८ ॥**
**प्रकोपनममुं मत्वा शपंत्येव तु केचन ।**
**भजंति न यथापूर्वमत्यजंतोऽपि केचन ॥ ३९ ॥**

३८-३९ नंतर कोणी त्यास सोडून जातात, कोणी त्याच्याविषयीं उदासीन राहतात, कोणी त्याच्या शत्रुपक्षास मिळून सुखानें राहतात, कोणी त्यास कोपी समजून शिव्याशापच देतात, कोणी त्यास न सोडलें तरी पूर्वीप्रमाणें त्याची सेवा करीत नाहींत.

**सप्तव्यसनसक्तत्वादजानानच्छलं बलम् ।**
**मन्यते प्रभुमात्मानमहंकारेण केवलम् ॥ ४० ॥**

४० ह्या सात व्यसनांत आसक्त झाल्यानें तो(शत्रूचें)कपट आणि बळ न जाणतां केवळ अहंकारानें आपणास समर्थ मानतो.

**व्यसनासक्तचित्तेन येनेत्थं बत भूयते ।**
**जैत्रयात्रापरैस्सद्यः परैस्स परिभूयते ॥ ४१ ॥**

४१ चित्त व्यसनासक्त झाल्यानें जो अशा प्रकारचा बनतो, त्याचा विजयार्थ स्वाऱ्या करणाऱ्या शत्रूंकडून एकदम पराभव होतो.

**गिरयो नैव गुरवो गुरुरेव गुरुर्मतः ।**
**भवतात्र प्रभवता दत्तः सिंह्माचलस्ततः ॥ ४२ ॥**

४२ गडांची कांहीं मोठीशी किंमत नाहीं, पित्याचीच खरोखरी थोरवी आहे; ह्मणून तुम्हीं पराक्रमी असूनहि सिंहगड दिला.

**प्रदत्ते द्विषतेऽमुष्मिन् विमुक्तश्चेत् स पार्थिवः ।**
**तर्हि दत्तोपि भवता न दत्तः सिंह्मपर्वतः ॥ ४३ ॥**

४३ तो शत्रूस देऊन जर राजा (शहाजी)ची सुटका झाली आहे तर तो सिंहगड आपण देऊनहि न दिल्यासारखाच आहे.

यः सिंह्मपर्वतं मेने समं शाहसुमेरुणा।
विंगरूरं च नगरं किं कृतं तेन वैरिणा ॥ ४४ ॥

४४ ज्यानें सिंहगड आणि बंगळूर शहर हीं शहाजीरूपी मेरूपर्वताच्या तोडीचीं मानिलीं त्या शत्रूनें (विशेष ते) काय केलें?

उपक्रांतमिदानीं तु त्वया विजयमंडलम्।
सुविक्रांतस्य नृपतेः सर्वमेव महीतलम् ॥ ४५ ॥

४५ तुम्हीं आतां विजयास प्रारंभ केला आहे; आणि अत्यंत पराक्रमी राजाचीच सर्व पृथ्वी असते.

राजा तावत्ततो मंत्री सुहृदो विपुलं धनम्।
राष्ट्रं दुर्गाणि सैन्यानि राज्यस्यांगानि सप्त वै ॥ ४६ ॥

४६ प्रथम राजा, नंतर मंत्री, मित्र, विपुल धन, राष्ट्र (प्रजा), गड आणि सैन्यें हीं सात राज्याचीं अंगें होत.

एतैरविकलैर्युक्तं राज्यं सद्भिः प्रशस्यते।
एकेनापि विहीनं तदितरैरुपहस्यते ॥ ४७॥

४७ ज्या राज्याचीं हीं अंगें अव्यंग आहेत त्या राज्याची चांगले लोक प्रशंसा करतात. तेंच जरी एका अंगानें कमी असलें, तरी इतरांकडून त्याचा उपहास होतो.

मौळिर्नृपो मुखं मंत्री धनसैन्ये भुजद्वयम्।
राष्ट्रमन्यद्वपुस्सर्वं सुहृदस्संधयो दृढाः ॥ ४८ ॥
दुर्गाणि तु दृढान्युच्चैस्तदस्थीनि तदंतरा।
एवमंगानि राज्यस्य सप्तोक्तानि मनीषिभिः ॥ ४९ ॥

४८–४९ राजा हें मस्तक, मंत्री हें मुख, धन आणि सैन्य हे भुज; बाकीचें सारें राष्ट्र (प्रजा) हें शरीर, मित्र हे सांधे आणि दुर्ग हीं त्यांमधील अत्यंत दृढ हाडें होत. याप्रमाणें शहाण्या लोकांनीं राज्याचीं सात अंगें सांगितलीं आहेत.

सप्तांगस्यास्य राज्यस्य धर्म आत्माऽभिधीयते।
मंत्रः प्राणो बलं नीतिरनीतिरसमर्थता ॥ ५० ॥
दंडो यथोचितः शौर्यमधर्मो रिपुरुद्धतः।
मदः परस्परं भेदो दीर्घमायुरभेद्यता ॥ ५१ ॥

जनरंजनमुत्कर्षो दर्शनं दीर्घदर्शिता।
प्रतापः प्रोज्वलं रूपं विमला बुद्धिरायुधम् ॥ ५२ ॥
तथैव बलवद्वैरमंतरायः प्रकीर्तितः।
प्रमादस्तु भवेन्निद्रा प्रबोधः सावधानता ॥ ५३ ॥

५०-५३ त्या सप्तांगात्मक राज्याचा धर्म हा आत्मा होय; मसलत हा प्राण, नीति हें बल, आणि अनीति हें दौर्बल्य होय. यथोचित दंड हें शौर्य, शत्रु बेफाम होऊं देणें हा अधर्म, परस्परांतील फूट हा मद आणि दृढैक्य हें दीर्घायुष्य, लोकरंजन हा उत्कर्ष, दूरदर्शित्व ही दृष्टि, प्रताप हें उज्ज्वल रूप, आयुध ही विमल बुद्धि. तसेंच बलवानाशीं वैर हें विघ्न होय, असावधपणा ही निद्रा, आणि सावधानता हा जागेपणा होय.

समं च विषमं चेति वैरं द्विविधमुच्यते।
प्रथमं तु समेनाहुर्द्वितीयमधिकेन चेत् ॥ ५४ ॥

५४ सम आणि विषम असें दोन प्रकारचें वैर आहे. बरोबरीच्या शत्रूशीं असलेलें वैर हें पहिल्या प्रकारचें होय; अधिक सामर्थ्यवानाशीं असणारें दुसऱ्या प्रकारचें होय.

समे समत्वादुभयोर्न भवेद्विजयः खलु।
अधिकस्याधिकत्वेन विषमे विजयो ध्रुवम् ॥ ५५ ॥

५५ सम वैरामध्यें दोन्हि बरोबरीचे असल्यामुळें कोणालाहि खचित विजय मिळणार नाहीं. विषम वैरामध्यें अधिक सामर्थ्यवानाचें सामर्थ्य अधिक असल्यामुळें त्यास विजय खात्रीनें मिळावयाचा.

फतेखानप्रभंगेन मुसेखानवधेन च।
अहर्दिवं प्रभो तुभ्यं महमूदोऽभ्यसूयति ॥ ५६ ॥

५६ फत्तेखानाच्या पराभवामुळें व मुसेखानाच्या वधामुळें, अहो महाराज, महमूदशहा हा रात्रंदिवस तुमचा द्वेष करीत आहे.

पश्य येदिलदिल्लींद्रौ विषयानंतरौ तव।
यवनौ बलिनौ तुभ्यं दुह्यतोऽहर्निशं नृप ॥ ५७ ॥

५७ महाराज, पहा. तुमच्या देशास लागूनच असलेले आदिलशहा व दिल्लीचा बादशहा हे बलाढ्य मुसलमान तुमचा रात्रंदिवस द्रोह करीत आहेत.

अमू उभयतो यस्य द्विषणौ रोषणौ तव।
तस्य नूनमिहस्थाने स्थितिः स्थाने न संप्रति ॥ ५८ ॥

५८ ते दोघे शत्रु दोन्हीकडून ज्या तुमच्यावर क्रुद्ध झाले आहेत त्या तुमचे येथें राहणें हें सांप्रत खरोखर योग्य नाहीं.

**अतोऽतिदुर्गमं स्थानमास्थाय जगतीपते।**
**यतस्व जगतीं जेतुं किमजय्यं शिवस्य ते ॥ ५९ ॥**

५९ म्हणून महाराज, अत्यंत दुर्गम अशा स्थानीं राहून जग जिंकण्याचा यत्न करा; तुम्हां शिवाजी महाराजांना काय अजिंक्य आहे ?

**कंठेकालेन कैलासः स मेरुः शंबपाणिना।**
**अभ्यंतरमपां पत्युः शिश्रिये दनुजारिणा ॥ ६० ॥**

६० शंकरानें कैलासाचा, इंद्रानें मेरूचा, आणि विष्णूनें समुद्राचा आश्रय केला आहे.

**न दुर्गं दुर्गमित्येव दुर्गमं मन्यते जनः।**
**तस्य दुर्गमता सैव यत्प्रभुस्तस्य दुर्गमः ॥ ६१ ॥**

६१दुर्गाला केवळ दुर्ग म्हणूनच लोक दुर्गम मानीत नाहींत,तर त्याचा स्वामी दुर्गम असणें हीच त्याची दुर्गमता होय.

**प्रभुणा दुर्गमं दुर्गं प्रभुर्दुर्गेण दुर्गमः।**
**अदुर्गमत्वादुभयोर्विद्विषन्नेव दुर्गमः ॥ ६२ ॥**

६२ प्रभूमुळें दुर्ग दुर्गम होतो व दुर्गामुळें प्रभु दुर्गम होतो. दोघांच्याहि अभावी शत्रुच दुर्गम होतो.

**संति ते यानि दुर्गाणि तानि सर्वाणि सर्वथा।**
**यथा सुदुर्गमाणि स्युस्तथा सद्यो विधीयताम् ॥ ६३ ॥**

६३ तुमचे जे दुर्ग आहेत ते सर्व ज्यायोगें सर्वस्वी अत्यंत दुर्गम होतील असें ताबडतोब करा.

**सुवर्णशर्मणोवाचमिमां श्रुत्वा नृपोत्तमः।**
**माननीयोऽतिमहतां माननीयाममन्यत ॥ ६४ ॥**

६४ सोनोपंतांचें हें भाषण ऐकून अति मोठयांना सुद्धां माननीय अशा त्या नृपश्रेष्ठास तें पसंत पडलें.

**प्रभुत्वं बिभ्राणस्त्रिभुवनपरित्राणकरणे।**
**पितुर्द्वेषिद्वेषी तदनुतनुजः शाहनृमणेः।**
**निरातंकस्सक्तो यवनकदनायातिमहते।**
**समग्रामप्युर्वीममनुत वसंतीं करतले ॥ ६५ ॥**

६५ नंतर त्रिभुवनाचें पालन करण्यासाठीं प्रभुत्व धारण करणारा, पित्याच्या शत्रूंचा द्वेष करणारा, यवनांचे मोठें कंदन (नाश) करण्यास उद्युक्त झालेला, आणि निर्भय असा शिवाजी समग्र पृथ्वीच आपल्या तळहातात आली असें मानूं लागला.

इत्यनुपुराणे निवासकरकवींद्र परमानंद-
प्रकाशितायां षोडशोऽध्यायः ॥

---

# अध्याय १७ वा

**कवीन्द्र उवाच ।**

**ततोऽफजलमाहूय स्वीयसैन्यधुरन्धरम् ।**
**अल्लीशाहः स्वयं वाचमुवाच समयोचितम् ॥ १ ॥**

कवींद्र म्हणालाः—

१ मग आपल्या सैन्याचा मुख्य अफजलखान यास बोलावून अल्लीशहानें स्वतः त्यास उद्देशून समयोचित भाषण केलें:—

**अल्लीशाह उवाच ।**

**हितावहस्त्वमस्माकमस्मिन् सैनिकसंचये ।**
**विरोद्धा द्विजदेवानां कालः कलिरिवापरः ॥ २ ॥**

अल्लीशहा म्हणालाः—

२ ह्या सैनिकांच्या समुदायामध्यें तूं आमचें हित करणारा आहेस; देवब्राह्मणांचा विरोध करणारा ( द्वेष्टा ) आणि जणूं काय दुसरा कलिकालच आहेस.

**प्रस्थितेन त्वया पूर्वं पृतनाव्यूहवर्तिना ।**
**रामराजान्वयभुवो राजानो युधि निर्जिताः ॥ ३ ॥**

३ पूर्वीं तूं मोठें सैन्य घेऊन स्वारीवर निघून रामराजाच्या वंशांतील राजांना युद्धामध्यें जिंकलेंस.

**कृतप्रतीपसंतापे प्रतापे तव जाग्रति ।**
**बत श्रीरंगराजोऽपि रणरंगाद्विरज्यते ॥ ४ ॥**

४ शत्रूंस ताप ( पीडा ) देणारा तुझा प्रताप जागृत असतां श्रीरंगपट्टणचा राजा सुद्धां समरांगणापासून विरक्त झाला आहे.

**त्वया विक्रम्य वीरेण क्षणात् कर्णपुराधिपः ।**
**सर्पो जांगुळिकेनेव स्फुरद्दर्पो वशीकृतः ॥ ५ ॥**

५ ज्याप्रमाणें गारुड्यानें अतिशय चिडलेल्या सापास वश करावें त्याप्रमाणें त्वां वीरानें पराक्रम करून एका क्षणांत कर्णपूरचा राजा ताब्यांत आणला.

**त्वया मन्दरसारेण मथिता मधुरापुरी ।**
**निगृह्य नगरीं काञ्चीं आहृतं चापि कांचनम् ॥ ६ ॥**

६ मंदराचलाप्रमाणें सामर्थ्य असणाऱ्या त्वां मदुरा शहर उध्वस्त केलें; व कांची हस्तगत करून सुवर्णहि लुटून आणलें.

पदे पदे शुभवता भवता किंकरीकृतः ।
ध्यस्मरद्वीरभद्रोऽपि छत्रचामरसम्पदः ॥ ७ ॥

७ पदोपदीं यश मिळणाऱ्या त्वां दास बनविलेला वीरभद्र सुद्धां छत्रचामरयुक्त ऐश्वर्य विसरून गेला आहे.

बिभेति सिंहलपतिर्मत्तो लंकापतिस्तथा ।
भजत्यंभोधिरपि मां तदिदं पौरुषं तव ॥ ८ ॥

८ सिंहलचा राजा, त्याचप्रमाणें लंकेचा मत्त राजा मला भितो आणि समुद्रहि माझी सेवा करतो, हें तुझ्या पराक्रमाचेंच फळ होय.

प्रचलंत्यचलाः सप्त चलत्यफजल त्वयि ।
क्षुभ्यन्ति चाब्धयः सप्त द्वीपाः सीदन्ति सप्त च ॥ ९ ॥

९ हे अफजलखाना, तूं चालूं लागलास म्हणजे सातहि कुलपर्वत डळमळूं लागतात, सातहि समुद्र क्षुब्ध होतात आणि सातहि द्वीपें खचतात !

बतेंद्रप्रस्थनाथोऽपि निशम्य तव पौरुषम् ।
रोषावेशवशीभूतो न निद्राति दिवानिशम् ॥ १० ॥

१० तुझा पराक्रम ऐकून क्रोधाविष्ट झाल्यानें दिल्लीच्या बादशहास सुद्धां रात्रंदिवस निद्रा येत नाहीं.

एतादृशि महावीरे दुर्जये त्वयि जाग्रति ।
मह्यं द्रुह्यत्यहोरात्रमहो शाहसुतः शिवः ॥ ११ ॥

११ अशा प्रकारचा तूं अजिंक्य महावीर जागृत असतां शहाजीचा पुत्र शिवाजी माझा रात्रंदिवस द्रोह करतो हें आश्चर्य होय !

हंत तेन महोत्साहवता वीरेण मानिना ।
स्वधर्माभिनिविष्टेन म्लेच्छधर्मो विहन्यते ॥ १२ ॥

१२ अरेरे ! त्या महा उत्साही, मानी, स्वधर्माभिमानी वीराकडून मुसलमानी धर्माचा नाश होत आहे !

क्रमेणाक्रम्य विकटां कण्ठीरव इवाटवीम् ।
एष आत्मवशो नैव मन्यते मम शासनम् ॥ १३ ॥

१३ भयंकर अरण्य सिंहाप्रमाणें क्रमाक्रमानें आक्रमण करून हा स्वतंत्र ( वीर ) माझा अंमल मुळींच मानीत नाहीं.

छलप्रचलचित्तस्य खलस्यास्य समाश्रयात् ।
मम चित्ते चिरं धत्ते शलः सह्योऽप्यसह्यताम् ॥ १४ ॥

१४ कपटामुळें ज्याचें चित्त चलित झालें आहे, अशा त्या दुष्टाच्या हातीं हा सह्य पर्वत असल्यामुळें माझ्या मनाला पुष्कळ काळ असह्य झाला आहे.

**महमूदेन पित्रा मे यदि न स्यात् स वारितः ।**
**तर्हि स्यान्मज्जितोंऽभोधौ तेन राजपुरीश्वरः ॥ १५ ॥**

१५ माझा बाप महमूदशहा यानें जर त्याचें निवारण केलें नसतें, तर त्यानें दंडाराजपुरीच्या राजास समुद्रांत बुडविलें असतें.

**स चन्द्रराजं निर्जित्य पुत्रामात्यसमन्वितम् ।**
**जयवल्लीं च नगरीमग्रहीन्निरवग्रहः ॥ १६ ॥**

१६ पुत्र व अमात्य यांसह चंद्रराव मोरे यास जिंकून त्यानें अप्रतिबंधपणें जावली घेतली.

**दत्तोऽवरंगशाहाय मया यः सन्धिकाम्यया ।**
**नीवृन्निजामशाहस्य सपर्वतवनाकरः ॥ १७ ॥**
**स तेनात्मवशेनास्मानवमत्य प्रतापिना ।**
**परानप्यविनीतेन प्रसह्य स्ववशीकृतः ॥ १८ ॥**

१७–१८ सख्य करण्याच्या इच्छेनें मीं औरंगजेबास गड, अरण्यें व खाणी यांसह जो प्रदेश दिला होता तो त्या प्रतापी, स्वतंत्र व उन्मत्त अशा ( शिवाजीनें), मला व त्या ( मोंगलां )ना न जुमानता बलात्कारानें काबीज केला !

**अतर्कितागमोऽभ्येत्य दस्युवृत्तिपरायणः ।**
**मत्पत्तनपुरग्रामानुद्वृत्तोऽयं विलुण्ठति ॥ १९ ॥**

१९ हा लुटारूपणा करणारा, व बंडखोर शिवाजी अचानक छापा घालून माझीं शहरें, गांवें व खेडीं लुटतो.

**अहोरात्रेण पक्षेण गम्यं पक्षद्वयेन च ।**
**अत्येति स किलाध्वानं क्षणेनैवाकुतोभयः ॥ २० ॥**

२० एका अहोरात्रांत, एका पंधरवड्यांत किंवा एका महिन्यांत करावयाची मजल हा निर्भय शिवाजी एका क्षणांतच करतो.

**अयं कौमारमारभ्य निकृतिप्रकृतिः स्वयम् ।**
**यवनानवजानाति जाग्रदुग्रपराक्रमः ॥ २१ ॥**

२१ उग्र पराक्रमाचा आणि स्वतः कपटी स्वभावाचा हा जागरूक शिवाजी लहानपणापासून यवनांचा अपमान करीत आला आहे.

**आक्रम्य ताम्रवक्त्राणां नगराण्युरुविक्रमः ।**
**नगरप्रभृतीन्येष चण्डचण्डमदण्डयत् ॥ २२ ॥**

२२ ह्या अत्यंत पराक्रमी शिवाजीनें मोंगलांचीं शहरें काबीज करून अहमद-नगरादि शहरांना भयंकर शासन केलें.

स्थैर्यं निजामराष्ट्रस्य गृहीतस्यापि यत्नतः ।
अपि दिल्लीपतिर्नैव मनुतेऽस्माद्विशंकितः ॥ २३ ॥

२३ मोठ्या प्रयासानें घेतलेल्या निजामशहाच्या राज्याचीहि शाश्वती दिल्लीच्या बादशहास सुद्धां ह्याच्या भीतीमुळें मुळींच वाटत नाहीं.

पितामहेन मे पूर्वं पिता तस्य विवर्धितः ।
शाहराजो दुर्विनीतं तं न शिक्षयितुं क्षमः ॥ २४ ॥

२४ पूर्वी माझ्या आजोबानें वाढविलेला त्याचा पिता शहाजी हाहि त्या उद्धट पोराला शिक्षा करण्यास समर्थ नाहीं.

अयं विगृह्य पित्रा मे निगृहीतं प्रतापिना ।
शाहराजं महाबाहुर्बलनैव व्यमोचयत् ॥ २५ ॥

२५ माझ्या प्रतापवान पित्यानें छापा घालून कैद केलेल्या शहाजी राजास ह्या महाबाहु शिवाजीनें आपल्या बळावरच सोडविलें.

नो दूयते परभयादयमल्पवया अपि ।
अतिक्रामति चाप्यस्मान् विस्मापकपराक्रमः ॥ २६ ॥

२६ हा अल्पवयी असूनहि शत्रूच्या भीतीनें घाबरून जात नाहीं; आणि आश्चर्यकारक पराक्रमी असा हा आमच्यावरहि ताण करीत आहे.

दिने दिने वर्धमानः प्रतापेन सह श्रिया ।
अयमाश्रीयते भूपैराकांक्षितसमृद्धिभिः ॥ २७ ॥

२७ रोजच्यारोज प्रताप आणि संपत्ती यांच्यायोगें हा उत्कर्ष पावत असल्या-मुळें वैभवाची इच्छा करणारे राजे ह्याचा आश्रय करूं लागले आहेत.

शनैः शनैरेष बली पदं कुर्वन् पुरः पुरः ।
अस्मद्राज्यं समाच्छिद्य करिष्यति किमात्मसात् ॥ २८ ॥

२८ हा बलवान् शिवाजी हळुहळू पाऊल पुढें पुढें टाकीत आमचें राज्य हिसकावून घेऊन गिळंकृत करणार कीं काय ?

तज्जयाय पुरा वीरान् यान्यान्प्रास्थापयं मुहुः ।
न प्राप्ताः पुनरावृत्तिं ते तं प्राप्य प्रतापिनम् ॥ २९ ॥

२९ त्याला जिंकण्यासाठीं पूर्वी ज्या ज्या वीरांना वारंवार पाठविलें त्यांची याच्याशीं गांठ पडल्यावर ते पुनः परत आले नाहींत.

निर्वाणमरिवीराणां कुर्वाणमकुतोभयम् ।
त्वां विना तस्य जेतारं नान्यं पश्यामि कंचन ॥ ३० ॥

३० शत्रुवीरांचा नाश करणाऱ्या, निर्भय अशा तुझ्याशिवाय त्याला जिंकणारा दुसरा कोणी मला दिसत नाहीं.

तस्मात्त्वमेव गत्वा तं कृतदुर्गपरिग्रहम् ।
सविग्रहं ग्रहमिव निगृह्यानय दुर्ग्रहम् ॥ ३१ ॥

३१ म्हणून तूंच जाऊन गडांच्या आश्रयानें राहणाऱ्या त्या दुर्जय शिवाजीला मूर्तिमंत ग्रहाप्रमाणें जिवंत पकडून आण.

**कवीन्द्र उवाच**

एवमुक्तोऽतिविश्रंभादल्लीशाहेन मानिना ।
प्रोवाचाफजलः प्रीत्या प्रस्तुतार्थमयं वचः ॥ ३२ ॥

कवीन्द्र म्हणाला—

३२ ह्याप्रमाणें अतिशय विश्वासानें मानी अल्लीशहा त्याला बोलला असतां, अफजलखान खूष होऊन प्रस्तुत कार्यासंबंधीं बोलला.

**अफजल उवाच**

विश्रंभेणापि च प्रेम्णा यदाज्ञापयति प्रभुः ।
तस्य कर्ता स एव स्यात् गुणीभूतस्तु किंकरः ॥ ३३ ॥

अफजलखान म्हणाला—

३३ विश्वासानें आणि प्रेमानें धनी जें करावयास सांगतो त्याचा कर्ता तो ( धनीच ) होय; सेवक हा केवळ निमित्तमात्र होय.

द्विषद्वर्गक्षयकरी जागर्ति किल या मयि ।
कार्यमादिशता साद्य शक्तिरुत्तेजिता त्वया ॥ ३४ ॥

३४ शत्रूंचा नाश करण्याची जी शक्ति माझ्या ठिकाणीं जागृत आहे ती आपण आज मला कार्य सांगून उत्तेजित केलीत.

उग्राय विग्रहायास्मै त्वया प्रेषयता ह्यमुम् ।
अवैम्यनुग्रहेणैष संगृहीतोऽनुगः स्वयम् ॥ ३५ ॥

३५ भयंकर युद्ध करण्यासाठीं ह्या सेवकाला त्याच्यावर पाठविल्यानें आपण ह्याच्यावर अनुग्रह करून ह्याला आपलासा केला, असें मी समजतों.

कर्तव्यं भृत्यवर्गाय स्वामी चेन्नममादिशेत् ।
अस्ति नास्तीति कस्तर्हि तस्य ज्ञास्यति पौरुषम् ॥ ३६ ॥

३६ स्वामी जर सेवकांस काम सांगणार नाहीं तर त्यांच्या ठिकाणीं पराक्रम आहे कीं नाहीं हें कोणाला समजणार ?

अहमद्धा भृशं बद्ध्वा स्पर्धाकरमहर्निशम् ।
तमन्तकमिवोद्वृत्तमानयिष्ये तवान्तिकम् ॥ ३७ ॥

३७ अहर्निश स्पर्धा करणाऱ्या व काळाप्रमाणें दुष्ट अशा त्या शिवाजीला पक्का बांधून प्रत्यक्ष आपणासमीप आणीन.

प्रविश्य देशं कार्णाटं निर्जिता शतशो नृपाः ।
स जयस्तमनिर्जित्य जीवतो मे निरर्थकः ॥ ३८ ॥

३८ कर्णाटक प्रांतांत शिरून शेंकडों राजांना मीं जिंकलें. तो माझा जय, ह्या शिवाजीला न जिंकतां मी जगलों असतां, फुकट होय.

कवीन्द्र उवाच

इत्युक्तवन्तमत्यर्थं समर्थबलदर्पितम् ।
कर्तुं प्रतिश्रुतं कर्म सद्य एव समुद्यतम् ॥ ३९ ॥
येदिलोऽफजलं तत्र प्रस्थापयितुमादृतः ।
तदा संभावयामास बहुभिः पारितोषिकैः ॥ ४० ॥

कवीन्द्र म्हणाला —

३९–४० ह्याप्रमाणें बोलणाऱ्या, आपल्या प्रचंड शक्तीचा अतिशय गर्व वाहणाऱ्या आणि अंगीकृत कार्य करण्यास तावडतोब तयार झालेल्या अफजलखानास तिकडे पाठविण्यास उत्सुक अशा आदिलशाहानें त्या समयीं पुष्कळ पारितोषिकें देऊन त्याचा सत्कार केला.

ततः सरत्नपर्याणपृष्ठानुष्ट्रांस्तुरंगमान् ।
तथैवाभरणोपेतान् भद्रजातीन्मतंगजान् ॥ ४१ ॥
तनुत्राणि शिरस्त्राणि शस्त्राणि विविधानि च ।
विचित्राणि च वस्त्राणि निजानि बिरुदानि च ॥ ४२ ॥
तिरस्कृतविमानानि याप्ययानान्यनेकधा ।
रौप्यान् रौक्मांश्च पर्यंकान् करंकांश्च पतद्ग्रहान् ॥ ४३ ॥
रत्नोत्तंसानथोमुक्तास्रजोर्हारांगदानि च ।
कटकान्यूर्मिकाश्चापि चित्ररत्नचयांकिताः ॥ ४४ ॥
तथा द्वीपान्तरोत्थानि जातिश्रेष्ठान्यनेकशः ।
अल्लीशाहादफजलः प्रापत्कोषांश्च कोटिशः ॥ ४५ ॥

४१-४५ रत्नखचित खोगीर असलेले उंट व घोडे, तसेच अलंकारयुक्त (साज घातलेले) 'भद्र जातीचे हत्ती, नाना प्रकारचीं कवचें (चिलखतें), शिरस्त्राणें, शस्त्रें, विचित्र वस्त्रें स्वतःचीं बिरुदें, विमानांना मागे टाकणाऱ्या अनेक प्रकारच्या पालख्या, चांदीसोन्याचे पलंग, पानसुपारीचे डबे, तस्तें, रत्नांचीं शिरोभूषणें, मोत्यांच्या माळा (हार), हिऱ्यांचीं बाहुभूषणें, कडीं, नाना रंगांच्या रत्नजडित आंगठ्या, तसेच दुसऱ्या देशांत होणारे त्या त्या जातीचे अनेक उत्कृष्ट पदार्थ आणि कोट्यवधि खजिना अल्लीशहापासून अफजलखानास मिळाला.

**वज्रधारामिव शितां रत्नकोषनिवेशिताम् ।**
**निजां पाणिस्थितां प्रादात्प्रभुस्तस्मै कृपाणिकाम् ॥ ४६ ॥**

४६ वज्राच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण, रत्नजडित म्यानांत ठेवलेली, हातांत असलेली आपली स्वतःची कट्यार अल्लीशहानें त्यास दिली.

**स्वामिनैवाथ विन्यस्तां प्रेम्णा सारसनान्तरे ।**
**सरत्नकोषाभरणां स बभार कटारिकाम् ॥ ४७ ॥**

४७ मग स्वामीनेंच प्रेमानें त्याच्या कमरपट्ट्यांत अडकाविलेली ती रत्नजडित म्यानांत असलेली व अलंकारांनीं युक्त अशी कट्यार त्यानें धारण केली.

**ततः पुनः पुनस्तस्मै प्रीत्या प्रास्थानकालिकीः ।**
**कृत्वा नतीरफजलः प्रचचालाचलोपमः ॥ ४८ ॥**

४८ नंतर निघण्याच्या समयास उचित असा मुजरा त्यास प्रेमानें पुनःपुनः करून पर्वतासारखा तो अफजलखान चालूं लागला.

**प्रचलन्तममुं तावत् प्रणमन्तं मुहुर्मुहुः ।**
**पदे पदेऽनुजग्राह दिशन्नीशो दयादृशम् ॥ ४९ ॥**

४९ वारंवार मुजरा करणाऱ्या व चालूं लागलेल्या त्या अफजलखानावर पदोपदीं कृपादृष्टि फेंकून स्वामीनें अनुग्रह केला.

**तं वीरमान्यं सेनान्यं स विधाय महामनाः ।**
**अन्यानमूंश्चमूनाथांस्तत्साहाय्ये समादिशत् ॥ ५० ॥**

५० त्या महत्त्वाकांक्षी (आदिलशहानें) त्या वीरमान्य अफजलखानास सेनापति करून दुसऱ्याही सेनानायकांस त्याला साहाय्य करण्याविषयीं आज्ञा केली.

**अम्बरः शम्बरसमः प्रतापी याकुतः पुनः ।**
**महामानी मुखेखानः पठानो हसनोऽपि च ॥ ५१ ॥**

रणदूलहसूनुश्च रणदूलहसंज्ञकः ।
तथैवांकुशखानोऽपि निरंकुशगजक्रमः ॥ ५२ ॥
बर्बरः खेलकर्णस्य प्राप्तो यः क्रीतपुत्रताम् ।
स हिलालो महाबाहुः प्रत्यर्थिद्रुमकुंजरः ॥ ५३ ॥
इत्येतेऽन्ये च यवनाः ससैन्याःससुहृद्गणाः ।
सद्यः स्वामिसमादिष्टाः तं सेनापतिमन्वयुः ॥ ५४ ॥

५१–५४ शंबर दैत्यासारखा अंबर आणि प्रतापवान् याकुत, महामानी मुसेखान आणि हसन पठाण, रणदुल्लाखानाचा रणदुल्ला नांवाचा पुत्र आणि निरंकुश हत्तीप्रमाणें स्वैरगति अंकुशखान, खेलकर्णाचा विकत घेतलेला पुत्र (गुलाम) बर्बर आणि तो शत्रुरूपी वृक्षांना हत्तीप्रमाणें असलेला महाबाहु हिलाल हे आणि सैन्यानें व मित्रसमुदायाने युक्त असे दुसरे यवन ताबडतोब स्वामींच्या आज्ञेनें त्या सेनापतीच्या मागून गेले.

जितानेकप्रतिभटाः प्रसभं समरोद्भटाः ।
घोरकर्मकृतो घोरफटा अपि तमन्वयुः ॥ ५५ ॥
पांडरो नायकश्चैव खराटोऽपि च नायकः ।
कल्याणयादवश्चापि नैकसैनिकनायकः ॥ ५६ ॥
समुद्यद्युद्धसंरंभो मंबो भृशबलस्तथा ।
विश्वविश्रुतकर्माणो घांटिकाः कांटिका अपि ॥ ५७ ॥
इत्येतेऽन्ये च राजानः सामंताश्च सहस्रशः ।
चतुरंगचमूयुक्तास्तं सेनापतिमन्वयुः ॥ ५८ ॥

५५–५८ ज्यांनीं बलानें अनेक शत्रुवीर जिंकले आहेत असे युद्धनिपुण, घोरकर्मे घोरपडेसुद्धां त्याच्या मागून गेले. पांढरे नाईक, खराटे नाईक, पुष्कळ सैनिकांचा नाईक कल्याण यादव जाधव), ज्याचा युद्धावेश प्रचंड आहे असा मंबाजी भोसले, जगद्विख्यात पराक्रम करणारे घांटगे व कांटे हे आणि दुसरे राजे आणि हजारों सामंत चतुरंग सेनेसह त्या सेनापती मागून गेले.

ततः कार्तान्तिकादिष्टे समये तस्य गच्छतः ।
अभव्यशंसीन्यभवन्दुर्निमित्तान्यनेकशः ॥ ५९ ॥

५९ तेव्हां ज्योतिष्यानें सांगितलेल्या मुहूर्तावर निघालेल्या त्याला अशुभसूचक पुष्कळ दुश्चिन्हें झालीं.

स पक्षपातं क्रोशन्तः प्रकामं वामगामिनः ।
वृथेति कथयामासुर्वायसास्तस्य साहसम् ॥ ६० ॥

बत भेजे दिनार्धेऽपि भानुरस्पष्टभानुताम् ।
प्रजज्वालेवान्तरिक्षं बभूवुर्धूसरा दिशः ॥ ६१ ॥
सहसैव महत्युल्का निपपात दिवस्तटात् ।
घनं विनैव च व्योम्नि बभूवाशनिनिस्वनः ॥ ६२ ॥
ववाशिरे प्रतिभयं दिशमैन्द्रीं श्रिताः शिवाः ।
भंगमाप ध्वजो यानान्यप्रहृष्टानि चाभवन् ॥ ६३ ॥
अवाप सदृशाद्रेणु वर्षीवातः प्रतीपताम् ।
बभ्रामाग्रे प्रणुन्नोऽपि वारणः पृतनाग्रणीः ॥ ६४ ॥

६०–६४ पंख फडफडवून मोठमोठ्याने ओरडणाऱ्या व डाव्या डाव्या बाजूनें जाणाऱ्या कावळ्यांनीं त्याचें साहस वृथा आहे असें सांगितलें. भर दुपारीं सूर्य अस्पष्ट दिसूं लागला. अंतरिक्ष जणूं काय पेटलें, दिशा धूसर (धुंद) झाल्या. एक मोठी उल्का आकाशांतून एकाएकीं पडली. मेघाशिवायच आकाशांत विजेचा मोठा कडकडाट झाला. पूर्वेकडे कोल्ह्या भयंकर ओरडूं लागल्या; ध्वज मोडला, आणि वाहनें खिन्न झालीं. खडे, धूळ यांचा वर्षाव करणारा वारा उलट वाहूं लागला; सैन्याच्या अघाडीचा हत्ती अंकुशानें टोंचला असतांहि पुढें सैरावैरा पळूं लागला.

यद्यप्येतानि चान्यानि तन्निमित्तान्यवारयन् ।
तथापि सरणोत्साहं नामुंचन्नमुचिर्यथा ॥ ६५ ॥

६५ ह्या व दुसऱ्या दुश्चिन्हांनीं जरी त्याचें निवारण केलें तथापि नमुचीप्रमाणें त्यानें युद्धोत्साह सोडला नाहीं.

ततः स प्रस्थितस्तस्मात्पत्तनाद्विजयाह्वयात् ।
योजनार्धमिते देशे वसतिं स्वामकल्पयत् ॥ ६६ ॥

६६ मग विजापुराहून निघालेल्या त्या अफजलखानानें अर्ध्या योजनावर आपला तळ दिला.

तत्रागताभिरभितो वाहिनीभिः समन्वितः ।
स निवेशोन्मुखः सैन्यव्यूहोंऽभोधिरिवाबभौ ॥ ६७ ॥

६७ तेथें चोहोंकडून आलेल्या सेनांनीं युक्त असा तो तळ देण्याच्या बेतांत असलेला सेनासमूह समुद्राप्रमाणें भासला.

महार्हवर्णैरुच्छ्रायच्छादितव्योममण्डलैः ।
नवैरुत्तंभितस्तंभैर्मण्डितं पटमण्डपैः ॥ ६८ ॥
प्रोल्लसत्काण्डपटकप्राकारमयमण्डपम् ।
विचित्रासनविस्तारप्रस्तारितसभांतरम् ॥ ६९ ॥

पुंजीकृतेष्टभूयिष्ठवस्तुसंभारभासुरम् ।
उच्चैरुत्तानितोल्लोचप्रच्छायांचितचत्वरम् ॥ ७० ॥
अविदूरपुरोदेशबद्धपीनद्धतुरंगमम् ।
समदद्विपदव्यूहबृंहितस्पृष्टदिक्तटम् ॥ ७१ ॥
जागरूकैरहोरात्रं गुटिकायन्त्रधारिभिः ।
कोदंडिभिस्तथान्यैश्च खड्गखेटकपाणिभिः ॥ ७२ ॥
अपारैश्च तथा पारश्वधिकैः शक्तिहेतिकैः ।
अभिगुप्ताष्टदिग्भागमभितास्थितिशालिभिः ॥ ७३ ॥
तदनेकानकोदग्रवाद्यनिर्घोषभीषणम् ।
तत्तत्कार्यविधिव्यग्रजनकोलाहलाकुलम् ॥ ७४ ॥
यथास्थानस्थिताशेषजनलब्धसुखोदयम् ।
सैन्यं सैन्यपतिः सर्वं गुरुगर्वं व्यलोकत ॥ ७५ ॥

६८—७५ उंची कापडाचे खांब उभे केलेल्या उंचीमुळें आकाश झांकून टाकणाऱ्या, नव्या तंबूंनीं तें सैन्य शोभत होतें; अनेक रंगाच्या विस्तीर्ण बैठकी सभामंडपाच्या आंत पसरलेल्या होत्या; आवडीच्या पुष्कळ वस्तूंच्या रचलेल्या राशींनीं तें सुशोभित दिसत होतें; उंच उभारलेल्या छतांनीं त्यांतील अंगणें छायामय व शोभिवंत दिसत होतीं; जवळच पुढील भागीं घोडे बांधलेले होते; मदोन्मत्त गजसमूहांच्या गर्जनांनीं दिशा भरून गेल्या होत्या; अहोरात्र पहारा करणारे बंदूकवाले, धनुर्धर, दुसरे ढाल तरवार धारण करणारे, अगणित परशुधारी, शक्ति ( भाला ] धारण करणारे असे लोक सभोंवतीं उभे राहून त्याच्या आठहि दिशांचें रक्षण करीत होते; पुष्कळ नगारे व प्रचंड वाद्यें यांच्या घडाक्यानें तें भयंकर भासत होतें; नाना प्रकारचीं कार्यें करण्यांत गढून गेलेल्या लोकांच्या गोंगाटानें तें व्यापून गेलें होतें; आपआपल्या योग्य ठिकाणीं राहिलेले सर्व लोक आनदांत होते; अशा प्रकारचें तें सर्व सैन्य सेनापतीनें मोठ्या गर्वानें पाहिलें.

संग्रामे साभिमानः स भृशमफजलः स्वामिनो लब्धमानः ।
शौर्यश्रीशोभमानः सपदि भृशबलं भूपतिं जेतुकामः ।
दुर्दैवाकृष्टचित्तः पथि पथि परितो दुर्निमित्तानि पश्यन् ।
वैराटं राष्ट्रमन्तर्गतगुरुनिकृतिः क्षिप्रमभ्याससाद ॥ ७६ ॥

७६ युद्धाभिमानी, स्वामीकडून अतिशय मान मिळालेला, शौर्यतेजानें शोभणारा, भोसले राजास एकदम जिंकू इच्छिणारा, दुर्दैवानें ओढून नेलेला असा तो अफजलखान ठिकठिकाणीं सारखीं दुश्चिन्हें पाहात, अंतःकरणांत मोठें कपट ठेवून वाई प्रांतीं शीघ्र आला.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरपरमानन्दकवीन्द्र प्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां अफजलाभ्यागमो नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥

# अध्याय १८ वा



**मनीषिण ऊचुः—**

**उपेक्ष्य स खलः कस्माच्छिवं पुण्यपुरस्थितम् ।**
**वैराटमेव विषयं ययौ सेनासमन्वितः ॥ १ ।**

पंडित म्हणाले:—

१ पुणें शहरीं राहणाऱ्या शिवाजीवर चाल करण्याचें सोडून तो दुष्ट आपल्या सैन्यासह वाईप्रांतीच कां गेला ?

**कवींद्र उवाच—**

**साहंकारश्शिवं जेतुं स कालयवनद्युतिः ।**
**यवनोऽफजलस्तूर्णं प्रस्थितः स्वामिशासनात् ॥ २ ॥**
**वैराटमेव विषयं प्राविशद्येन हेतुना ।**
**तमहं संप्रवक्ष्यामि शृणुध्वं भो मनीषिणः ॥ ३ ॥**

कवींद्र म्हणाले:—

२–३ तो गर्विष्ठ व कालयवनाप्रमाणें प्रखर अफजलखान यवन शिवाजीला जिंकण्याकरतां स्वामीच्या आज्ञेवरून सत्वर निघून वाई प्रांतींच कोणत्या हेतूनें शिरला तें मी सांगतों; पंडित हो, ऐका.

**निगृह्य बाजराजं तं कृष्णराजं च दुर्मदम् ।**
**जनकं च तयोश्चंद्रराजमाजौ महौजसम् ॥ ४ ॥**
**अव्यक्तवर्तनीयुक्तां सह्यपर्यंतवर्तिनीम् ।**
**अटवीप्रायविषयां महादुर्गसमाश्रयाम् ॥ ५ ॥**
**उन्निद्रसैनिकोदग्रामद्रिप्राकारमध्यगाम् ।**
**जयवल्लीं नाम पुरीं अग्रहीद्दुर्ग्रहां शिवः ॥ ६ ॥**

४–६ बाजराज व उन्मत्त कृष्णराज आणि त्यांचा बाप महा बलवान् चंद्रराज यांना युद्धांत मारून, गुप्त वाटा असलेली, सह्याद्रीच्या लगत्यास वसलेली, दाट झाडी असलेली, किल्ल्याचा आश्रय असलेली, जागरूक सैनिकां (च्या पाहऱ्यामुळें) मुळें भयंकर, गिरितटाच्यामध्यें असलेली अशी जवली (जयवल्ली) नांवाची दुर्जय पुरी शिवाजीनें घेतली.

ये येऽत्र चंद्रराजस्य सहायाश्च सनाभयः ।
तांस्तानशातयद्वीरः शिवः शक्तिमतां वरः ॥ ७ ॥

७ जे जे चंद्रराजाचे साह्यकर्ते व नातेवाईक होते त्या सर्वांना बलवानांमध्यें बलिष्ठ असलेल्या वीर शिवाजीनें कापून काढलें.

तदा प्रतापवर्मायश्चंद्रराजस्य बांधवः ।
पलायितश्शिवभयाद्येदिलं प्रत्यपद्यत ॥ ८ ॥

८ तेव्हां चंद्रराजाचा बंधु जो प्रतापवर्मा तो शिवाजीच्या भीतीनें आदिलशहाकडे पळून गेला.

चंद्रराजपदाकांक्षी मंत्रविन्मंत्रिभिर्युतम् ।
येदिलं प्रीणयामास चिरं स परिचर्यया ॥ ९ ॥

९ चंद्रराजाच्या राज्याची इच्छा करणाऱ्या त्या कारस्थानी प्रतापवर्म्यानें मंत्र्यांनीं युक्त अशा आदिलशहाची पुष्कळ काळ सेवा करून त्यास संतुष्ट केलें.

तं देशं चंद्रराजस्य महावनसमाश्रयम् ।
तस्मादाच्छिद्य नृपतेर्दास्यामि भवते ध्रुवम् ॥ १० ॥
येदिलस्येति वचसा तदा सोऽपहृतव्यथः ।
चकाराफजलस्याभिक्रमकर्मे सहायताम् ॥ ११ ॥

१०–११ " अरण्यमय प्रदेशांत असलेलें तें चंद्रराजाचें राज्य त्या शिवाजी राजापासून हिसकावून घेऊन तुला खात्रीने देईन " असें आदिलशहानें म्हटल्यावर त्याची काळजी नाहींशी होऊन त्यानें अफजलखानास स्वारी करण्याच्या कामीं साहाय्य केलें.

ततोऽभिमानिना तेन चंद्रराजसनाभिना ।
भेदं निवेद्याफजलो वैराटं समनीयत ॥ १२ ॥

१२ मग चंद्रराजाच्या त्या अभिमानी बंधूनें भेद सांगून अफजलखानास वाईस आणलें.

जयवल्ली वशा यस्य वैराटं तस्य सर्वथा ।
तथा सह्याद्रिरखिलः सांतरीपश्च सागरः ॥ १३ ॥
इति मत्वा स यवनस्तामेवादातुमादितः ।
समुद्यतो महाबाहुर्द्रुतं वैराटमाययौ ॥ १४ ॥

१३–१४ ज्याच्या ताब्यांत जावली आहे त्याच्या ताब्यांत वाईप्रांत पूर्णपणें आहे. त्याचप्रमाणें सर्व सह्याद्रि आणि समुद्रकिनाराहि आहे, असा विचार करून तो महाबाहु यवन प्रथम तीच घेण्याच्या तयारीनें वाईस शीघ्र आला.

**ततस्समेत्य सैन्येन वैराटं राष्ट्रमास्थिते ।**
**यवनेऽफजले तूर्णं जयवल्लीं जिघृक्षति ॥ १५ ॥**
**शिवराजः कृती तत्र प्रतीकारपरायणः ।**
**प्रभुः प्रभूतदर्पत्वादिदमात्मन्यचिंतयत् ॥ १६ ॥**

१५-१६ मग सैन्यासह वाईप्रांतीं येऊन तो अफजलखान यवन जावली लवकर घेण्याच्या बेतांत असतां त्यावेळीं प्रतिकार करण्यास तत्पर असलेला चतुर शिवाजी राजा मोठ्या अभिमानानें आपल्याशींच असा विचार करूं लागला:—

**येदिलेन विसृष्टोऽसौ मयि रुष्टेन मानिना ।**
**करिष्यत्यात्मसदृशं पौरुषं पौरुषक्रमः ॥ १७ ॥**
**स एष यवनो यस्य दुर्नयेन गरीयसा ।**
**अहो कलियुगस्यास्य माहात्म्यमुपचीयते ॥ १८ ॥**

१७-१८ माझ्यावर क्रुद्ध झालेल्या मानी अदिलशहानें पाठविलेला हा पराक्रमी ( अफजलखान ) आपणास साजेल असा पराक्रम करील. अहो, ज्याच्या अत्यंत दुष्टपणामुळें ह्या कलियुगाचें माहात्म्य वाढत आहे,तोचहा यवन होय.

**दुर्नयेन भृशं येन निशुंभसमतेजसा ।**
**अवाज्ञायत वै देवी तुलजापुरवासिनी ॥ १९ ॥**
**यः सदैवानस्तिदयो रोषणो राशिरंहसाम् ।**
**द्विजानक्षिगतानक्षिगतानिव जिघांसति ॥ २० ॥**
**पर्वतः पातकस्येव सर्वतः सुमदोद्धतः ।**
**पद्धतिं वर्णधर्माणां रोध्दुं यो हि व्यवस्थितः ॥ २१ ॥**
**निषेद्धा सर्वधर्माणामधर्माणां विवर्धकः ।**
**स मया हंत हंतव्यः स मया समुपागतः ॥ २२ ॥**

१९-२२ निशुंभाप्रमाणें तेजस्वी अशा ज्या दुष्टानें तुळजापूरच्या भवानीचा मोठा अपमान केला; जो सदैव, निर्दय व कोपी असून पापाचा राशी आहे; जणूं काय डोळ्यांत सलूं लागल्याप्रमाणें ब्राम्हणांना पहातांक्षणींच ठार मारूं इच्छितो; जणूं काय पातकाचा पर्वतच, जो मदोमत्त वर्णाश्रमधर्माचा सर्वस्वी नाश करण्यास उद्युक्त झाला आहे; जो सर्व धर्मांचा निषेध करून अधर्माची वाढ करीत आहे,अशा त्या समीप आलेल्या अफजलखानास मला मारलेंच पाहिजे.

**हविःप्रकृतयो गावः पयसा सर्पिषापि च ।**
**विधये सप्ततंतूनां विधिना विहिता भुवि ॥ २३ ॥**

२३ यज्ञासाठीं दूध व तूप हें हविर्द्रव्य पुरविण्याकरितां गाई ब्रह्मदेवानें पृथ्वीवर निर्माण केल्या आहेत;

**तासामसौ तामसात्मा हंता हंत दिने दिने।**
**विपर्यासयितुं धर्ममशेषमपि वांछति ॥ २४ ॥**

२४ त्यांना हा तामसी अफजलखान अरेरे ! प्रतिदिवशीं ठार मारून सर्वच धर्म उलथून टाकूं इच्छीत आहे.

**इयं वसुंधरा देवी धर्मेण खलु धार्यते।**
**ध्रुवं स धार्यते देवैस्तेऽधार्यंत द्विजातिभिः ॥ २५ ॥**

२५ ही वसुंधरादेवी खरोखर धर्माच्या योगें धारण केली जाते. तो धर्म निःसंशय देवांकडून राखिला जातो आणि ते देव ब्राम्हणांकडून राखले गेले आहेत.

**अतस्सर्वस्य लोकस्य मूलमेते द्विजातयः।**
**पालनीयाः प्रयत्नेन पूजनीयाश्च सर्वदा ॥ २६ ॥**

२६ म्हणून या सर्व लोकांचा आधार अशा ब्राह्मणांचें सर्वदा प्रयत्नानें पालन व पूजन ( सत्कार ) केलें पाहिजे.

**सुराणां भूसुराणांच सुरभीणां च पालनम्।**
**विदधाम्यहमेवाद्धा भूत्वा भूत्वा युगे युगे ॥ २७ ॥**

२७ देवांचें, ब्राह्मणांचें आणि गाईचें पालन मीच प्रत्यक्ष प्रतियुगीं अवतार घेऊन करतों.

**येनांभोनिधिमाविश्य बिभ्रता मीनरूपताम्।**
**हतः शंखासुरः संख्ये श्रुतयश्चाप्युपाहृताः ॥ २८ ॥**
**अधारिमंदरो येन पृष्ठे स्वे कमठात्मना।**
**तथाचाधारतामेत्य व्यधायि वसुधा स्थिरा ॥ २९ ॥**
**उद्धृत्य वसुधां सद्यः समुद्राद्दंष्ट्रया स्वया।**
**येन वाराहरूपेण हिरण्याक्षो निषूदितः ॥ ३० ॥**
**हरेर्यवीयसा येन हरिणा ह्रस्वरूपिणा।**
**अलं छलं कलयता बलिर्नीतो रसातलम् ॥ ३१ ॥**
**आविर्भूय सभास्तंभान्नरसिंहत्वमीयुषा।**
**व्यदारि करजैर्येन हिरण्यकशिपोरुरः ॥ ३२ ॥**
**भृगुवंशावतंसेन रैणुकेयेन येन वै।**
**कार्तवीर्यं निहत्याजौ कृता निःक्षत्रिया मही ॥ ३३ ॥**
**येन दाशरथीभूय निबद्धांभोधिसेतुना।**
**दशकंठशिरःश्रेणी शरेणैकेन पातिता ॥ ३४ ॥**
**वृष्णिवंशावतंसेन येन शूरेण शौरिणा।**
**धर्मं व्यवस्थापयता हताः कंसादयः खलाः ॥ ३५ ॥**

**स विष्णुस्सर्वदेवानां सर्वस्वमहमीश्वरः।**
**हर्तुं भारमिमं भूमेराविर्भूतोस्मि भूतले ॥ ३६ ॥**

२८–३६ ज्यानें समुद्रांत प्रवेश करून माशाचें रूप धारण करून युद्धामध्यें शंखासुराला मारलें व वेद परत आणले; ज्यानें कांसवाचें रूप घेऊन मंदर पर्वत स्वतःच्या पाठीवर धारण केला आणि पृथ्वीला आधारभूत होऊन तिला स्थिर केली; ज्यानें वराहाचें रूप घेऊन आपल्या सुळयांच्या योगानें पृथ्वीला समुद्रांतून एकदम वर काढून हिरण्याक्षास ठार मारलें; ज्या इंद्रानुज विष्णूनें वामनाचें रूप घेऊन पूर्ण कपट करून बळीला रसातळास नेलें; ज्यानें सभामंडपाच्या खांबामधून नरसिंहरूपानें प्रकट होऊन आपल्या नखांनीं हिरण्यकशिपूचें वक्षःस्थळ विदीर्ण केलें; ज्या भृगुवंशभूषण रेणुकापुत्रानें ( परशुरामाने ) कार्तवीर्याचा नाश केला आणि पृथ्वी निःक्षत्रिय केली; ज्यानें दशरथाचा पुत्र होऊन समुद्रावर सेतु बांधला व एकाच बाणानें दहाहि मस्तकें उडविलीं; ज्यानें वृष्णिवंशाला भूषण होऊन शूरसेनाच्या कुळांत जन्म घेऊन कंसादि दुष्ट ठार मारलें व धर्मस्थापना केली; तो सर्व देवांचें सर्वस्व असा विष्णुच मी असून पृथ्वीचा भार हरण करण्यासाठीं भूतलावर प्रगट झालों आहें.

**यवनानाममी वंशाः सर्वेप्यंशास्सुरद्विषाम् ।**
**जगतीं निजधर्मेण निमज्जयितुमुद्यताः ॥ ३७ ॥**

३७ यवनांचे हे सर्वच वंश असुरांचे अंश होत. हे आपल्या धर्माच्या योगें पृथ्वीला बुडविण्यास उद्युक्त झाले आहेत.

**तस्मादेतान् हनिष्यामि दानवान् यवनाकृतीन्।**
**प्रथयिष्यामि धर्मस्य पंथानमकुतोभयम् ॥ ३८ ॥**

३८ म्हणून या यवनरूपी दानवांना मी मारीन आणि धर्माचा निर्भय असा मार्ग प्रचलित करीन.

**जयवल्लीवनं घोरं गृहं कंठीरवस्य मे ।**
**विशन्निधनमागंता द्विषन्नफजलो गजः ॥ ३९ ॥**

३९ जावळीचें घोर वन हीं माझी सिंहाची गुहाच होय. तींत शिरणारा हा शत्रु अफजलरूपी हत्ती खात्रीनें नाश पावणार.

**समुत्पतन्पक्षबलादलक्षितनिजांतकः ।**
**पतंग इव मां लब्ध्वा स वै निधनमेष्यति ॥ ४० ॥**

४० आपला अंतक न पाहातां पंखांच्या बळावर उडणाऱ्या पक्ष्याप्रमाणें तो माझ्या तावडींत सांपडून ( माझ्याशीं गांठ पडून ) खात्रीनें मृत्यु पावेल.

इति चित्ते विनिश्चित्य स शिवः पुरुषोत्तमः ।
संदिश्य निजसेनान्यं रिपुराष्ट्रविकर्षणे ॥ ४१ ॥
नरानधिकृतांस्तत्तत्कार्येष्ववहितान् हितान् ।
नियुज्य निजराष्ट्रस्य दुर्गाणां चाभिगुप्तये ॥ ४२ ॥
स्वयं षाड्गुण्यनिपुणः परवीरविमर्दनः ।
परीतः पत्तिसैन्येन जयवल्लीमुपागमत् ॥ ४३ ॥

४१–४३ असा मनामध्यें निश्चय करून त्या ( विष्णुरूपी ) पुरुषश्रेष्ठ शिवाजीनें आपल्या सेनापतीला शत्रूच्या राज्याचा विध्वंस करण्यास सांगून आणि आपल्या राज्याच्या व दुर्गांच्या रक्षणासाठीं त्या त्या कामीं दक्ष व हितकर्त्या अधिकारी लोकांना नेमून संधिविग्रह इत्यादि सहा गुणांमध्यें निपुण व शत्रुवीरांचा चुराडा करणारा असा शिवाजी स्वत: पायदळासह जावलीस आला.

अथ गुप्तेंगिताकारमपारभुजपौरुषम् ।
प्रतीतमन्यैरजितं शक्तित्रयसमन्वितम् ॥ ४४ ॥
जयवल्लीमधिष्ठाय स्वयं योद्धुमवस्थितम् ।
सन्नद्धानीकनिवहं निशम्याफजलश्शिवम् ॥ ४५ ॥
व्यसृजद्वाचिकं तस्मै सर्वार्थविदुषे यथा ।
तथा निशम्यतां सर्वे विबुधाः कथयामि वः ॥ ४६ ॥

४४–४६ मग ज्याचा अभिप्राय गुप्त आहे, ज्याचा बाहुपराक्रम अपार आहे, जो शत्रूंना अजिंक्य आहे, जो प्रभाव, उत्साह व मंत्र या तिन्ही शक्तींनीं युक्त आहे, ज्याचा सेना–समूह सज्ज आहे, असा तो प्रख्यात शिवाजी जावलीस ठाणें देऊन स्वतः युद्धास तयार होऊन बसला आहे, असें ऐकून त्या सर्वार्थकुशल शिवाजीस अफजलखानानें जो निरोप पाठविला तो समग्र जशाचा तसाच अहो पंडितांनों, मी तुम्हांस सांगतों, ऐका.

अफजल उवाच

विदधाति यदौद्धत्यं भवानद्य पदे पदे ।
तद्येदिलस्य हृदये भजते शल्यरूपताम् ॥ ४७ ॥

अफजलखान म्हणाला:—

४७ आपण आजकाल पावलोपावलीं जो उद्धटपणा करीत आहां तो आदिलशहाच्या अंतःकरणांत शल्यासारखा बोंचत आहे.

गते निजामे विलयं गमितः स्वीयतां स्वयम् ।
येदिलेन वितीर्णोयस्ताम्रेभ्यः संधिकाम्यया ॥ ४८ ॥

**स एष विषयस्तेषां गिरिदुर्गसमाश्रयः ।**
**गृहीतस्संगृहीतश्च शाहराजात्मज त्वया ॥ ४९ ॥**

४८–४९ निजामशहा विलयाला गेल्यावर स्वतः हस्तगत केलेला त्याचा जो मुलूख आदिलशहानें तह करण्याच्या इच्छेनें मोंगलांना दिला, तो हा त्यांचा डोंगरी किल्ल्यांनीं भरलेला मुलूख शिवाजी राजा, आपल्या ताब्यांत आणला आहेस.

**भवता सततं लाभवता तत्र पदे पदे ।**
**गृहीतविषयः क्रुद्धो रुद्धो राजपुरीश्वरः ॥ ५० ॥**

५० तेथें सतत भाग्यशाली अशा तुम्हीं पदोपदीं मुलूख काबीज करून कैदेंत टाकल्यानें दंडाराजपुरीचा राजा जळफळत आहे.

**त्वयेदं चंद्रराजस्य गाढमन्यदुरासदम् ।**
**अभिक्रम्य च विक्रम्य प्राज्यं राज्यं हृतं हठात् ॥ ५१ ॥**

५१ शत्रूंना अगदीं अजिंक्य अशा चंद्रराजाच्या विस्तीर्ण राज्यावर हल्ला करून व पराक्रम करून तुम्हीं तें बलानें हरण केलें.

**त्वया गृहीत्वा कल्याणं तथा भीमपुरीमपि ।**
**यवनानां महासिद्धिनिलयाः किल पातिताः ॥ ५२ ॥**

५२ कल्याण आणि भीमपुरी ( भिवंडी ) देखील घेऊन आपण यवनांच्या मशिदी जमीनदोस्त केल्या.

**तुभ्यं कुप्यंति तेऽद्यापि यवनाः पवनाशनाः ।**
**अपहृत्यापि सर्वस्वं कृता येषां विडंबना ॥ ५३ ॥**

५३ ज्यांचें सर्वस्वच हरण करून आपण त्यांचीं विडंबना केली ते यवनरूपी सर्प अद्याप तुम्हांवर खवळले आहेत.

**निगृह्य यवनाचार्यानविचार्यात्मनो बलम् ।**
**प्रतिबध्नास्यविद्धानामध्वानमकुतोभयः ॥ ५४ ॥**

५४ तुम्हीं आपल्या बळाबळाचा विचार न करतां काजी मुल्लांना कैद करून निर्भयपणें अविंधाचा मार्ग अडविला आहे.

**यच्चक्रवर्तिचिह्नानि धत्से स्वयमभीतवत् ।**
**अध्यारोहासि च स्वर्णसिंहासनमनीतिमान् ॥ ५५ ॥**
**स्वयमेवानुगृह्णासि निगृह्णासि च मानवान् ।**
**अहो आत्मवशोनन्यान्नमस्याभिमानवान् ॥ ५६ ॥**
**दुर्निवारगतिर्यस्माद्यस्मात् कस्माद्बिभेषि न ।**
**तस्मादहं प्रेषितोस्मि येदिलेन प्रतापिना ॥ ५७ ॥**

५५—५७ ज्याअर्थी तुम्ही निर्भयपणें स्वतःच चक्रवर्ती राजाचीं चिन्हें धारण करीत आहां, आणि अन्यायानें सुवर्णसिंहासनावर बसतां आणि स्वतःच मनुष्यांचा निग्रहानुग्रह करितां, स्वतंत्र होऊन वंदनीयांना वंदन करीत नाहीं; अजिंक्य होऊन लुंग्यासुंग्यांना भीत नाहीं, त्याअर्थी प्रतापी आदिलशहानें मला तुम्हावर पाठविलें आहे.

येदिलस्य नियोगाद्यन्मयासह समागतम् ।
उद्योजयति सद्यो मां तदिदं षड्विधं बलम् ॥ ५८ ॥

५८ आदिलशहाच्या आज्ञेवरून जें हें सहा प्रकारचें सैन्य माझ्याबरोबर आलें आहे, तें मला ताबडतोब युद्धास उद्युक्त करीत आहे.

मुसेखानादयो ह्येते त्वयासह युयुत्सवः ।
प्रोत्साहयंति मामत्र जयवल्लीं जिघृक्षवः ॥ ५९ ॥

५९ हे मुसेखानादि तुम्हाबरोबर युद्ध करूं इच्छिणारे वीर व जावली काबीज करूं इच्छिणारे सरदार मला या कामीं प्रोत्साहन देत आहेत.

तदद्यमन्नियोगेन संधिमेव महीपते ।
विधेहि देहि सकलानचलानचलामपि ॥ ६० ॥

६० तेव्हां, हे राजा, माझ्या आज्ञेप्रमाणें संधिच कर, आणि सर्व किल्ले व मुलूखहि देऊन टाक.

सिंहं लोहं महांतं च प्रबलं च शिलोच्चयम् ।
पुरंदरं गिरिं तद्वत् पुरीं चक्रावतीमपि ॥ ६१ ॥
विषयं च तथा नीराभीमरथ्यंतराश्रयम् ।
प्रणिपत्य प्रयच्छाशु दिल्लींद्रायामितौजसे ॥ ६२ ॥

६१—६२ सिंहगड आणि लोहगड हे मोठे आणि प्रबळ किल्ले, त्याचप्रमाणें पुरंदरगड आणि चक्रवर्तीपुरी (चाकण), नीरा आणि भिमा यांच्यामधला प्रदेश हीं सर्व महाबलाढ्य अशा दिल्लीच्या बादशहास शरण जाऊन लवकर देऊन टाका.

या चंद्रराजादाच्छिद्य गृहीतानिग्रहात्त्वया ।
जयवल्लीमिमामल्लीशाहस्त्वां तां हि याचते ॥ ६३ ॥

६३ जी जावली तुम्ही चंद्रराजापासून जबरदस्तीनें हिसकावून घेतलीत ती ही जावली देखील अल्लीशहा तुझ्यापाशीं मागत आहे.

उपनतमहितस्य पत्रलेखं
रहसि निशम्य तमेतमेकवीरः ।

**स किल सकलराजलोकरत्नं**
**न्याधित निजे हृदि कंचिदेव यत्नम् ॥ ६४ ॥**

६४ असें हें शत्रूचें आलेलें पत्र एकांतांत ऐकून त्या सकलराजशिरोमणी व अद्वितीय वीरानें आपल्या मनामध्यें कांहीं एक उपाय योजला.

**स्मृत्वा मंत्रमथेप्सिताय जगतः सर्वस्य सर्वोत्तरं**
**यत्संप्रेषितवानसौ नरपतिः पत्रस्य तस्योत्तरम् ॥**
**यच्चागादभिमानवानफजलः सज्जस्य तस्याटवीं**
**तत् सर्वं कथयामि वः सुमतयः श्रेयस्करं श्रूयताम् ॥ ६५ ॥**

६५ सर्व जगाच्या कल्याणासाठीं सर्वोत्कृष्ट मसलत योजून त्या राजानें त्या पत्राचें काय उत्तर पाठविलें आणि सज्ज असलेल्या त्या शिवाजीच्या अरण्यां-मध्यें तो गर्विष्ठ अफजलखान कसा गेला तें सर्व श्रेयस्कर वृत्त हे पंडितानों, मी तुम्हांस सांगतों, ऐका.

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां**
**शतसाहस्र्यां संहितायां संदेशदेशनाम**
**अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥**

---

# अध्याय १९ वा

**कवीन्द्र उवाच ।**

**नियोजयन्स सर्वत्र दृशं प्रणिधिरूपिणीम् ।**
**पश्यत्यवहितः सर्वं शिवो बाह्यं तथान्तरम् ॥ १ ॥**
**ततोऽसौ दूतमाहूय निष्णातं निजकर्मणि ।**
**प्रतिवाचमिमां तस्मै प्राहिणोत्परिपन्थिने ॥ २ ॥**

कवींद्र म्हणाला:—

१–२ हेररूपी आपली दृष्टी सर्वत्र योजून—फेंकून तो शिवाजी परराज्यांतील आणि स्वराष्ट्रांतील सर्व गोष्टी दक्षतेनें पहात असतो. असो. नंतर आपल्याकामामध्यें निष्णात अशा दूतास (वकिलास) बोलावून त्या शत्रूला हें उत्तर पाठविलें.

**शिवराज उवाच ।**
**समस्ताः समरे येन ध्वस्ताः कार्णाटभूमिपाः ।**
**तस्य तेऽद्य मयि श्रेयानियानपि दयोदयः ॥ ३ ॥**

शिवाजी म्हणाला:—

३ ज्यानें कर्नाटकांतील समस्त राजे युद्धामध्यें नष्ट केले. अशा आपण आज माझ्यावर एवढी तरी दया दाखविली हें फार चांगलें केलें.

**अतुलं ते बाहुबलं बलं च तुलितानलम् ।**
**अलंकृतं क्षितितलं त्वया त्वयि न हि च्छलम् ॥ ४ ॥**

४ आपलें बाहुबल अतुल आहे. आपला पराक्रम अग्नितुल्य आहे. आपण पृथ्वीतळाला अलंकृत केलें असून आपल्या ठिकाणीं मुळींच कपट नाहीं.

**दिदृक्षुरसि यद्येतान् विभवान्वनसंभवान् ।**
**तद्विलोकयतामेत्य जयवल्लीमिमां भवान् ॥ ५ ।**

५ जर हें वनवैभव पाहण्याची आपली इच्छा असेल तर आपण ह्या जावलीला येऊन तें पहावें.

**तवागमनमेवेतः सांप्रतं वेद्मि सांप्रतम् ।**
**अभयं मम तेनैव भवितापि च वैभवम् ॥ ६ ॥**

६ आपण इकडे येणें हेंच सांप्रत योग्य आहे असें मला वाटतें. आणि त्यामुळेंच मला निर्भयता प्राप्त होऊन माझें वैभवही वाढेल.

**तृणाय मन्ये ताम्राणामनम्राणामनीकिनीम् ।**
**येदिलस्य च तां तद्वत् त्वां विना तीव्रविक्रमम् ॥ ७॥**

७ भयंकर पराक्रमी अशा आपणावांचून उन्मत्त मोंगलांचें सैन्य त्याचप्रमाणें अदिलशहाचें सैन्य कस्पटासमान आहे असें मला वाटतें.

**दक्षः पथा त्वमागच्छ प्रयच्छामि शिलोच्चयान् ।**
**भवते याचमानाय जयवल्लीमिमामपि ॥ ८ ॥**

८ आपण मार्गानें दक्षपणें यावें. आपण मागत आहां ते किल्ले आणि ही जावली देखील मी देतों.

**प्रेक्ष्य दुःप्रेक्षणीयं त्वामिह विश्रब्धमानसः ।**
**इमां पुरः करिष्यामि निजपाणिकृपाणिकाम् ॥ ९ ॥**

९ ज्यांच्याकडे दृष्टि फेकणें देखील कठीण अशा आपणास येथें निःशंक मनानें पाहून ही माझ्या हातांतली कट्यार मी आपणापुढें ठेवीन.

**वनीमिमां ते पृतना प्रतनामतनीयसीम् ।**
**पश्यन्ती सुतलच्छाया सुखान्यनुभविष्यति ॥ १० ॥**

१० हें जुनाट व अफाट अरण्य पहात असतां आपलें सैन्य पाताळाच्या छायेचें सुख अनुभवील.

**इति सूत्रमिवात्यल्पवर्णं बह्वर्थसंयुतम् ।**
**शिवः सन्देशमादिश्य व्यसृजद्दूतमात्मनः ॥ ११ ॥**

११ असा सूत्राप्रमाणें अगदीं संक्षिप्त पण बव्हर्थयुक्त निरोप सांगून आपल्या दूताला ( वकिलास ) शिवाजीनें पाठविलें.

**स तं संदेशमाकर्ण्य शिवदूतेन भाषितम् ।**
**स्वामिकार्यं कृतं स्वेनेत्यमन्यत सुदुर्मतिः ॥ १२ ॥**

१२ शिवाजीच्या दूतानें ( वकिलानें ) सांगितलेला तो सन्देश ऐकून आपण स्वामिकार्य केलेंच असें त्या दुर्बुद्धि अफजलखानास वाटलें.

**वैराटस्थोऽपि सुतरां योजनत्रयसान्तराम् ।**
**जयवल्लीं स यवनः स्वहस्तस्थामवागमत् ॥ १३ ॥**

१३ तो यवन वाई येथें असूनहि, तीन योजनें अंतरावर असलेली जावली अगदीं आपल्या हातांत आलीच असें त्यास वाटलें.

**अथास्थाय स आस्थानीं समाहूय स्वसैनिकान् ।**
**वाचमेतां नयोपेतां व्याजहार महामनाः ॥ १४ ॥**

१४ नंतर दरबारांत बसून आपल्या सैनिकांना बोलावून त्या महत्त्वाकांक्षी अफजलखानानें असें राजनीतियुक्त भाषण केलें.

**अफजल उवाच ।**

**समाह्वयति मां तत्र स शिवः संधिकाम्यया ।**
**स्वामिकार्येप्सुना तत्र प्रयातव्यमितो मया ॥ १५ ॥**

अफजलखान म्हणाला:—

१५ तो शिवाजी तह करण्याच्या इच्छेनें मला तेथें बोलावीत आहे, तेव्हां स्वामिकार्य साधूं इच्छिणाऱ्या मला एथून तेथें गेलें पाहिजे.

**समुन्नध्दैः सुसन्नद्धैः सैनिकैः स्वैः समीयुषाम् ।**
**सदैवोज्जागरूकाणां न तत्र भयमस्ति नः ॥ १६ ॥**

१६ उमद्या आणि उत्तम रीतीनें सज्ज अशा आपल्या सैनिकांसह सदोदित जागरूक असणाऱ्या आपणांस तेथें जाण्यांत भीति नाहीं.

**समुह्य व्यूह्यसैन्यानि यास्यामस्तत्र सर्वथा ।**
**अहो यत्र वने घोरे नैव नाभास्वती कथा ॥ १७ ॥**

१७ ज्या ठिकाणीं कांहींना कांहीं कृष्णकारस्थान असणारच अशा त्या घोर अरण्यांत सैन्य घेऊन व त्याची रचना करून आम्ही कांहीं झालें तरी जाऊंच.

**द्विपद्वीपिशरण्यानामरण्यानामुदीक्षणम् ।**
**भवताद्भवतां तत्र विश्रान्तानामनुक्षणम् ॥ १८ ॥**

१८ वाघ आणि हत्ती यांचें आश्रयस्थान असलेल्या त्या अरण्यांत विश्रांति घेत असतांना तुम्हाला त्याची क्षणोक्षणीं टेहेळणी केली पाहिजे.

**तत्र भूभृत्तटावन्यां वन्यां वीक्ष्य महीयसीम् ।**
**वन्या इव विनालानं क्रीडंतु करिणो मम ॥ १९ ॥**

१९ तेथें पर्वताच्या कडांवरील अत्यंत मोठा वनसमूह (जलाशय) पाहून माझे हत्ती वन्य हत्तींप्रमाणें तेथें स्वैरपणें विहार करूं देत.

**प्रपतेद्यपि चाकाशं निपतेयुः शतह्रदाः ।**
**तदप्यफजलस्यास्य न भवेन्मतिरन्यथा ॥ २० ॥**

२० जरी आकाश कोसळून पडलें किंवा वीज कडाडली तरी ह्या अफजलखानाचा बेत बदलणार नाहीं

**क्षितिमुत्खातयिष्यामि पातयिष्यामि पर्वतान् ।**
**वनानि च प्रधक्ष्यामि सद्यः क्रोधकृशानुना ॥ २१ ॥**

२१ माझ्या क्रोधाग्नीनें मी तत्काळ वनें जाळून खाक करीन, पृथ्वी खणून काढीन व पर्वत जमीनदोस्त करीन.

**प्रतिज्ञां पारयिष्यामि भ्रंशयिष्यामि देवताः ।**
**नादास्यते स चेन्मौढ्यान्मदीयमुचितं वचः ॥ २२ ॥**

२२ मूर्खपणानें जर तो माझें योग्य बोलणें कबूल करणार नाहीं तर मी देवता भ्रष्ट करीन आणि प्रतिज्ञा पार पाडीन.

**इति ब्रुवाणमास्थानभ्राजमानासनास्थितम् ।**
**दैवध्वस्तधियस्ते तु न तं प्रत्याचचक्षिरे ॥ २३ ॥**

२३ दरबारामध्यें लकलकीत आसनांवर बसून असें बोलणाऱ्या त्या अफजलखानाचा निषेध दुर्दैवानें बुद्धि नष्ट झालेल्या त्या सैनिकांनीं केला नाहीं.

**अथ तं मन्त्रिणः सर्वे पुरः प्रस्थातुमुद्यतम् ।**
**इति नीतिमुपाश्रित्य विनयेन व्यजिज्ञपन् ॥ २४ ॥**

२४ मग पुढें कूच करण्यास सिद्ध झालेल्या त्या अफजलखानास सर्व मंत्र्यांनीं राजनीतीस अनुसरून नम्रपणें अशी विनंती केली.

**मन्त्रिण ऊचुः ।**

**स्वामिन्विधीयतामेव भवतात्मचिकीर्षितम् ।**
**प्रत्याख्यातास्तु कस्तस्य यत्र दैवमवस्थितम् ॥ २५ ॥**

मंत्री म्हणाले:—

२५ खाविंद, आपण जें करूं इच्छितां तें आपण अवश्य करावें. जेथें दैवच उभें राहिलें तेथें त्याचा निषेध कोण करूं शकणार ?

**प्रशस्तेन स्वचित्तेन विश्वस्तः स यदि त्वयि ।**
**तर्हि सद्यः समायातु जयवल्लीवनाद्बहिः ॥ २६ ॥**

२६ त्यानें जर तुम्हावर शुद्ध अंतःकरणानें विश्वास ठेवला आहे तर त्यानें जावलीच्या वनांतून तत्काल बाहेर यावें.

**उपाहरतु सर्वस्वमात्मीयं भवतो मुदे ।**
**निजां नामयतु ग्रीवां नमन्निह पदे पदे ॥ २७ ॥**

२७ तुम्हांला संतुष्ट करण्यासाठीं त्यानें आपलें सर्वस्व अर्पण करावें. तुम्हाला पावलोपावलीं मुजरा करीत त्यानें आपली मान तुम्हांपुढें वांकवावी.

**येन कौमारमारभ्य धन्विना धूर्जटिं विना ।**
**स्वप्नेऽपि स्वामिनेऽन्यस्मै न निजं नामितं शिरः ॥ २८ ॥**

बाल्यात्प्रभृति लोकेऽस्मिन् अनल्पबलशालिनः ।
कर्माण्यमानुषस्येव प्रायो यस्येह शुश्रुम ॥ २९ ॥
विगायति च यो लोके यवनानां विलोकनम् ।
निजधर्मधुरीणोऽद्धा शृणोति च न तद्वचः ॥ ३० ॥
स आह्वयति तत्रैव भवन्तमभयो यदि ।
तर्हि मन्यामहे तस्य विद्यते साहसं हृदि ॥ ३१ ॥

२८–३१ ज्या धनुर्धाऱ्यानें लहानपणापासून शंकरावांचून दुसऱ्या कोणत्याही स्वामीपुढें आपलें डोकें स्वप्नांतसुद्धां नमविलें नाहीं, ज्या महाबलाढ्य पुरुषाचीं अमानुष कृत्यें बाळपणापासून आम्ही प्रायः ऐकत आलों, जो यवनांचें मुखावलोकन करणेंसुद्धां अतिशय निंद्य समजतो आणि जो स्वधर्मधुरीण त्यांचें बोलणें मुळींच ऐकत नाहीं, तो ज्या अर्थी निर्भयपणें आपणास तिकडेच बोलावीत आहे त्या अर्थी त्याच्या हृदयांत कांहींतरी साहस आहे असें आम्हांस वाटतें.

पदे पदे परिश्लिष्टकर्मारकुलसंकुला ।
न गताय हिताश्वानां विषमानगमेदिनी ॥ ३२ ॥

३२ जागोजाग वेळूच्या दाट बेटांनीं व्याप्त आहे अशी ती दुर्गम पर्वतभूमि घोड्यांना जाण्यास सुखकर नाहीं.

श्लिष्टाग्रानोकहशतैः श्लिष्टारोहावरोहया ।
स्तंबेरमाः कथं यान्तु तया पर्वतपद्यया ॥ ३३ ॥

३३ जिचें तोंड शेकडों वृक्षांनीं व्याप्त आहे व जी चढण्या उतरण्यास अगदीं आकुंचित आहे अशा डोंगरी वाटेनें हत्ती कसे जाऊं शकतील ?

आत्मा त्वमल्लीशाहस्य शल्यं दिल्लीन्द्रवक्षसः ।
स्वामीसेनामतल्लीनां विश माविषमावटीम् ॥ ३४ ॥

३४ तूं अल्लीशहाचा प्राण आहेस व दिल्लीच्या बादशहाच्या हृदयांतील शल्य आहेस आणि उत्तम सैन्याचा स्वामी आहेस. तूं या भयंकर रस्त्यांत किंवा खड्यांत शिरूं नकोस.

योगीव विजिताहारविहारो विजितासनः ।
यः सर्वस्यापि लोकस्य वेत्त्यहो गुप्तमाशयम् ॥ ३५ ॥
उत्प्लुत्य पर्वतशिरः प्राकाराभ्यंतरस्थितान् ।
निहन्ति यो जिह्मगतीन् परान् पतगराडिव ॥ ३६
यस्य यातमविज्ञातं भवत्यमितयोजनम् ।
अवैति मनसैवास्तं द्विषन्तमपि यो जनम् ॥ ३७ ॥

**भवतापकृता पूर्वं भवतापकृता स्वयम्।**
**विधत्ते तुलजादेवी सततं यत्सहायताम् ॥ ३८**
**तेन विद्विषतानेकसैन्ययुक्तेन पालिताम्।**
**कथं त्वं तामरण्यानीमभिमानी गमिष्यसि ॥ ३९. ॥**

३५–३९ ज्यानें योग्याप्रमाणें आपला आहारविहार व आपली बैठक हीं जिंकली आहेत व जो झाडून सर्व लोकांचे गुप्त बेत जाणतो, गरुड ज्याप्रमाणें सर्पांचा फन्ना उडवितो त्याप्रमाणें जो किल्याच्या माथ्यावर उडी मारून तटांच्या आत असलेल्या शत्रूंचा निःपात करतो, जो न कळतां अगणित कोस दूर जातो, जो मित्र कोण व शत्रु कोण हें मनानेंच जाणतो, लोकांना ताप देणाऱ्या आपणाकडून अपमान केली गेलेली तुळजा देवी ज्याला सदोदित साह्य करते व जो पुष्कळ सैन्यानें युक्त आहे अशा त्या शत्रूकडून रक्षिलेल्या महा अरण्यांत अभिमानी असलेले आपण कसें जाल ?

**इत्याकर्ण्य वचस्तेषां स विद्वेषांधमानसः।**
**प्रोवाचताननादृत्य दृप्तः शोणविलोचनः ॥४०॥**

४० असें त्यांचें भाषण ऐकून द्वेषानें अंध बनलेला व रागानें डोळे लाल झालेला तो उन्मत्त त्यांचा धिक्कार करून म्हणाला.

**अफजल उवाच।**
**जन्मप्रभृति दृप्तात्मा योऽस्मभ्यमपराध्यति।**
**स परः स्वयमस्माकमभ्यर्णं कथमेष्यति ॥ ४१॥**

अफजलखान म्हणालाः—

४१ स्वभावतः गर्विष्ठ असा जो शत्रु अपराध करीत आला आहे तो आपणहून आमच्या समीप कसा बरें येईल ?

**यदमानुषकर्मेति तं प्रशंसथ मानुषम्।**
**अवैमि तदविज्ञाय मदीयमपि पौरुषम् ॥४२॥**

४२ 'अमानुष कृत्यें करणारा' अशी जी त्या मनुष्याची तुम्ही प्रशंसा करता ती माझा पराक्रम न ओळखल्यामुळेंच करतां असें मी समजतें.

**धावद्वाहखुरांचलैर्विदलितं कार्णाटकानां बलम्।**
**तत्तत्स्थानभिदा च संप्रति पराभूतं सुराणां कुलम् ॥**
**तं सर्वोन्नतमंतकोऽपि सहसा कोपानलव्याकुलम्।**
**मां दृष्ट्वा समया मया सह भयाद्द्रुताद्य संधास्यति ॥४३॥**

४३ ज्याच्या दौडणाऱ्या घोड्यांच्या खुराग्रांनीं कर्नाटकांतील राजांच्या सैन्याचें निर्दाळण केलें, ज्यानें सर्व स्थानें फोडून टाकून सांप्रत सर्व देवांना भ्रष्ट

केलें, त्या सर्व श्रेष्ठ व क्रोधाग्नीनें संतप्त अशा मला जवळ आलेला पाहून प्रत्यक्ष यमसुद्धां भीतीनें माझ्याशीं आज तह करील.

या युष्मानतिविक्रमानपि भिया संयोजयंती तता ।
नैकानोकहसंवृता प्रतिभटैर्युध्यद्भिरप्यन्विता ॥ ?
तामेतामटवीमतीवविषमां सद्यः करिष्ये समाम् ।
व्याहृत्येऽतिहितान् हितान् कुमतिना तेन प्रतस्थेतमाम् ४४

४४ जें विस्तीर्ण, पुष्कळ वृक्षांनीं आच्छादित आणि युद्ध करणाऱ्या शत्रु-योद्धयांनींहि युक्त असें अरण्य अत्यंत पराक्रमी अशा तुम्हालासुद्धां घाबरवून सोडतें तें हें अत्यंत दुर्गम अरण्य तत्काळ जमीनदोस्त करून टाकीन. असें त्या हितकर्त्यांस बोलून तो दुष्टबुद्धि झपाट्यानें निघालाच.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां अफजलप्रयाणं नाम एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥

---

# अध्याय २० वा

**कवींद्र उवाच ।**

**अत्रांतरे भगवती तुलजा भक्तवत्सला ।**
**स्वं रूपं दर्शयामास शिवाय जगतीजिते ॥ १ ॥**

कवींद्र म्हणाला:—

१ इकडे भक्तवत्सल भगवती तुळजादेवीनें जगज्जेत्या शिवाजीला आपलें दर्शन दिलें.

**कल्पवल्लीमिव नवां पुरस्तादथ तां स्थिताम् ।**
**सरत्नाभरणां शोणचरणां चंपकप्रभाम् ॥ २ ॥**
**विलसन्नीलवसनां नीलधम्मिल्लशालिनीम् ।**
**अतीव सुकुमारांगीं कुमारीवेषधारिणीम् ॥ ३ ॥**
**पूर्णेन्दुवंद्यवदनां इन्दीवरविलोचनाम् ।**
**मन्दस्मितामभिनवप्रवालतुलिताधराम् ॥ ४ ॥**
**भ्राजिष्णुभालतिलकां रत्नरंजितकर्णिकाम् ।**
**मनोज्ञनासिकान्यस्त-चित्ररत्नमयूरिकाम् ॥ ५ ॥**
**मृदुबाहुलतां पद्महस्तां सुललितांगुलिम् ।**
**रत्नरश्मिकुलाकीर्णकंकणां शुभलक्षणाम् ॥ ६ ॥**
**कंठसंसक्तगुच्छार्धगुच्छरत्नललन्तिकाम् ।**
**सुवर्णसुमनःश्लिष्टनीलकंचुलिकावृताम् ॥ ७ ॥**
**आनाभिविलसद्धारां रत्नकांचीकृतश्रियम् ।**
**वरदां विश्वजननीमवनीपतिरैक्षत ॥ ८ ॥**

२–८जणूं काय टवटवीत कल्पलताच समोर उभी आहे अशी रत्नालंकारयुक्त, आरक्त–चरण, सोनचाफ्याच्या फुलाप्रमाणें कांतिमान्, झगझगीत नील वस्त्र परिधान केलेली, काळया बुचड्यानें खोप्यानें--शोभणारी, अत्यंत सुकुमार, कुमारीचा वेष धारण करणारी, पूर्णेंदुप्रमाणें सुंदर मुख असलेली, इंदीवरा ( नील कमला ) प्रमाणें सुंदर नेत्र असलेली, मंद स्मित करणारी, नव्या पोंव-ळयाप्रमाणें लाल ओठ असलेली, तेजस्वी कुंकुम तिलक लावलेली, रत्नजडित कर्णभूषणे घातलेली, सुंदर नासिकेंत चित्र विचित्र रत्नजडित नथ घातलेली, कोमळ भुज असलेली, कमळाप्रमाणे हात असलेली, नाजूक बोटें असलेली,

रत्नांच्या तेजानें चमकणाऱ्या बांगड्या घातलेली, शुभ लक्षणी, गळ्यांत मोत्यांचे अनेकपदरी लहानमोठे हार व रत्नांची कंठी घातलेली, जरीच्या फुलांची काळी चोळी घातलेली, नाभीपर्यंत लोंबणारा हार घातलेली, रत्नजडित कमरपट्यानें शोभणारी, वरदात्री अशी ती विश्वमाता राजानें पाहिली.

**अथ तद्दर्शनोल्लासभृशसंजातसंभ्रमः।**
**प्रश्रयेणादिमायां तामनंसीत् स मुहुर्मुहुः ॥ ९ ॥**

९ नंतर तिच्या दर्शनाच्या आनंदाने अत्यंत गोंधळून गेलेल्या त्यानें नम्रतापूर्वक त्या आदिमायेला वारंवार नमस्कार केला.

**प्रणमन्तं तु तं देवी समुत्थाप्यात्मपाणिना।**
**दृशा दयार्द्रया भक्तमपश्यज्जगदीश्वरी ॥ १० ॥**

१० प्रणाम करणाऱ्या त्या भक्ताला त्या जगदीश्वरी देवीनेंहि आपल्या हातानें उठवून त्याच्याकडे दयार्द्र दृष्टीनें पाहिलें.

**अभिष्टूय सहस्रेण नाम्नां स्थितमथाग्रतः।**
**तमुवाचेति सा देवी सुदती सस्मितानना ॥ ११ ॥**

११ नंतर सहस्रनामांनीं स्तुति करून ती सुदंती हंसतमुखी देवी आपल्यापुढें उभा राहिलेल्या त्याला असें म्हणाली.

**देव्युवाच।**

**उपैत्यफजलो नाम योऽयं यवनपुंगवः।**
**स एष सच्छलो वत्स त्वया सह युयुत्सते ॥ १२ ॥**

देवी म्हणालीः—

१२ जो हा अफजलखान नांवाचा यवनश्रेष्ठ जवळ येत आहे तो, हे वत्सा, कपटी असून तुझ्याशीं युद्ध करूं पाहात आहे.

**कलिकालतरोर्मूलं प्रतिकूलं दिवौकसाम्।**
**तमिमं यवनात्मानं दुर्मदं विद्धि दानवम् ॥ १३ ॥**

१३ तो हा कलिकालरूपी वृक्षाचें मूळ, देवांचा शत्रु असा यवनरूपी उन्मत्त दानवच समज.

**अवध्यं सर्वदेवानां दशाननमिवापरम्।**
**सहितं सर्वसैन्येन मोहितं मायया मया ॥ १४ ॥**
**सहसैव समायातमंतकस्य तवांतिके।**
**तममुं हतमेवेति त्वमवेहि महीपते ॥ १५ ॥**

१४-१५ सर्व देवांना अवध्य असा जणूं काय दुसरा रावणच, सर्व सैन्यासह माझ्या मायेनें मोहित होऊन, अंतक अशा तुझ्या समीप एकाएकीं आला आहे. हे राजा, तो हा मेलेलाच आहे असें तूं समज.

**उद्भवन्तं निरोधाय धर्मस्येह मुहुर्मुहुः ।**
**तमेनमसिपातेन महता भुवि पातय ॥ १६ ॥**

१६ धर्माचा निरोध करण्यासाठीं वारंवार या लोकीं उत्पन्न होणाऱ्या त्याला तलवारीच्या जोराच्या वारानें भूमीवर पाड.

**क्षरद्रुधिरधारार्द्रप्रतीकमपमस्तकम् ।**
**स्रस्तबाहुलतं व्यस्तप्रसारितपदद्वयम् ॥ १७ ॥**
**गृध्रगोमायुभल्लूकारिष्टोत्कृष्टांत्रसंचयम् ।**
**पश्यन्तु विबुधास्सर्वे तमिमं पातितं भुवि ॥ १८ ॥**

१७-१८ गळणाऱ्या रक्ताच्या धारांनीं अवयव भिजलेला, मुंडकें तुटलेला, बाहु गळालेला, पाय अस्ताव्यस्त पसरलेला, गिधाड, कोल्हे, कुतरे आणि कावळे यांनीं सर्व आंतडीं ओढून काढलेला, अशा त्यास सर्व देव भूमीवर पाडलेला पाहूं देत.

**त्वं यदा वासुदेवोऽभूस्तदाहं नन्दमन्दिरे ।**
**त्रिदिवात्तव साहाय्यविधानार्थमवातरम् ॥ १९ ॥**

१९ जेव्हां तूं वासुदेव झालास तेव्हां मी नंदाच्या घरीं तुला साहाय्य करण्यासाठीं स्वर्गातून अवतीर्ण झाल्यें होत्यें.

**इदानीमपि दैत्यारे विमुच्य तुलजापुरम् ।**
**उपेतास्मीति जानीहि साहाय्यायैव ते स्वयम् ॥ २० ॥**

२० हे दैत्यशत्रो, सध्यांसुद्धां तुळजापूर सोडून तुझ्या साह्यार्थच मी स्वतः जवळ आल्यें आहें असें समज.

**यथाजातेन कंसेन यथाहमवमानिता ।**
**पूर्वं तथाधुनैतेनाप्यवज्ञातास्मि पाप्मना ॥ २१ ॥**

२१ मूर्ख कंसानें पूर्वीं ज्याप्रमाणें माझा अपमान केला त्याचप्रमाणें हल्लीं या पाप्यानें सुद्धां माझा अपमान केला आहे.

**विधिना विहितोऽस्त्यस्य मृत्युस्त्वत्पाणिनामुना ।**
**अतस्तिष्ठामि भूत्वाहं कृपाणी भूमणे तव ॥ २२ ॥**

२२ तुझ्या ह्या हातानें त्याचा मृत्यु व्हावा अशी ब्रम्हदेवानें योजना केली आहे. म्हणून हे राजा, मी तुझी तलवार होऊन राहिल्यें आहें.

**व्याहरन्तीति शर्वाणी तत्कृपाणीमवीविशत् ।**
**असौ जाग्रदवस्थोऽपि तत्स्वप्नमवमन्यत ॥ २३ ॥**

२३ याप्रमाणें बोलून भवानी त्याच्या तलवारींत शिरली आणि तो जागृतावस्थेंत असूनही त्यानें तें स्वप्न आहे असें मानलें.

**ततोऽसौ तुलजां देवीं ध्यायं ध्यायं निजे हृदि ।**
**समस्तमपि भूभारममंस्त हृतमात्मना ॥ २४ ॥**

२४ मग तो आपल्या अंतःकरणांत तुळजादेवीचें वारंवार ध्यान करून सगळा पृथ्वीचा भार आपण नाहींसा केलाच, असें मनिता झाला.

**तिष्ठन्नयं प्रतापाद्रिशिरः प्राकारसंसदि ।**
**आनाय्य न्यगदद्वाचं पत्तिसेनापतीनिति ॥ २५ ॥**

२५ प्रतापगडच्या शिखराच्या तटाच्या आंतील सभेंत बसून त्यानें पायदळाच्या सेनापतींना आणवून असें ( पुढील ) भाषण केलें.

**समाहूतो मया सैन्यसमवेतो महाश्रयः ।**
**इत एव समायाति स म्लेच्छः संधिकाम्यया ॥ २६ ॥**

२६ मी बोलावल्यावरून सैन्यासमवेत तो मोठा आश्रय असलेला यवन संधि करण्याच्या इच्छेनें इकडेच येत आहे.

**तदद्य मन्नियोगेन युष्माभिरनिवारिता ।**
**संपश्यत्वटवीमेतामेता परपताकिनी ॥ २७ ॥**

२७ म्हणून आज माझ्या आज्ञेनें तुमच्याकडून अडथळा न होता, आलेली ही शत्रुसेना हें अरण्य पाहूं दे.

**मिथो मद्वीक्षणाकांक्षी स मां योधैरुदायुधैः ।**
**भवद्भिः सहितं श्रुत्वा भयं संभावयेदपि ॥ २८ ॥**

२८ एकान्तांत माझ्या भेटीची इच्छा करणारा तो, शस्त्रास्त्रांनीं सज्ज असलेले तुम्ही मजबरोबर आहांत असें ऐकून, कदाचित् भीतीची शंकाहि घेईल.

**तस्माद्विशत वै सर्वे गहनं गहनोदरम् ।**
**यूयं परैरविज्ञाताः सज्जास्सन्निहिता अपि ॥ २९ ॥**

२९ म्हणून तुम्ही सर्वांनीं जवळच सज्ज असूनही गहन अरण्याच्या आंत शत्रूंना न कळत दडून रहावें.

**स्वयं विहितसंधोऽपि न संधास्यति यद्यसौ ।**
**तर्हि विघ्नन्तु तत्सेनां जातेऽस्मद्दुंदुभिध्वनौ ॥ ३० ॥**

३० स्वतः करार करून सुद्धां जर तो संधि करणार नाहीं तर आमच्या दुंदुभीचा ध्वनि होतांच त्याची सेना कापून काढावी.

**रहस्यमिव राजेन्द्रो रहस्तानीत्युपादिशत् ।**
**परोऽपि सेनया सार्धं तं पंथानमथासदत् ।। ३१ ॥**

३१ त्या राजश्रेष्ठानें याप्रमाणें त्यांना एकान्तात जणूं काय रहस्यच उपदेशिलें. आणि शत्रूसुद्धां सेनेसह त्या मार्गावर येऊन पोंचला.

**विसंकटदृषद्घृष्टजानुभ्रश्यद्दृढत्वचः ।**
**अध्यारोहन् करटिनः कथंचिदथ तं गिरिम् ॥ ३२ ॥**

३२ भयंकर दगडांवर घासल्यामुळें ज्यांच्या गुडघ्यांची घट्ट कातडी गळूं लागली आहे, असे हत्ती त्या पर्वतावर मोठ्या मेटाकुटीनें चढले.

**निषादिनुन्नाः करिणो द्रुमाणां वर्त्मवर्तिनाम् ।**
**बुध्नानधुरवाग्भावभियाशुण्डाग्रमण्डलैः ॥ ३३ ॥**

३३ माहातांनीं हांकलेल्या हत्तींनीं खालीं घसरण्याच्या भीतीनें रस्त्यावरील झाडांचे बुंधे सोंडेच्या शेंड्यानें वेटोळें घालून धरले.

**उत्तारितमहाभारलघवोप्युन्नतेऽध्वनि ।**
**शरीराण्येव करभाः स्वानि भाराय मेनिरे ॥ ३४ ॥**

३४ ( पाठीवरील ओझ्याचा ) मोठा भार उतरल्यामुळें हलके झालेल्या हत्तींच्या छाव्यांना चढणीच्या रस्त्यावर आपलीं शरिरेंच भारभूत वाटलीं.

**सप्तयो वल्लभधरैर्नीयमानाः शनैः शनैः ।**
**अवरूढहयारोहा अप्यायन्त कथंचन ॥ ३५ ॥**

३५ मोतद्दारांनीं हळू हळू नेले जाणारे घोडे पाठीवरील स्वार उतरले असतांहि कष्टानें चढले.

**प्रपातपातकातर्याद् धृतेषु बत पाणिभिः ।**
**क्षुपेषु मुक्तमूलेषु केचित् पेतुरवाङ्मुखाः ॥ ३६ ॥**

३६ चढणीवरून पडण्याच्या भीतीमुळें हातांनीं धरलेलीं झुडपें उपळून पडलीं असतां कांहीं जण खालीं तोंडघशीं पडले.

**आरोहन्मत्तमातंगपदाभिहतिनिःसृतैः ।**
**पतद्भिरुपलैस्स्थूलैर्विध्वस्तोऽधः स्थितो जनः ॥ ३७ ॥**

३७ वर चढणाऱ्या मस्त हत्तींच्या पायांच्या तडाक्यांनीं निघून पडणाऱ्या मोठमोठ्या धोंड्यांच्या योगें खालचे लोक नाश पावले.

**लताप्रतानसंमिश्रत्वक्सारांतरचारिणी।**
**वीतध्वजपटा वीतच्छत्रा साभूदनीकिनी ॥ ३८॥**

३८ वेलींच्या प्रतानांनीं गुरफटलेल्या बांबूच्या बेटांमधून जाणाऱ्या त्या सेनेचीं निशाणें व छत्र्या हीं फाटून गेलीं.

**प्रमत्ततरमातंगकरसंपर्कभीरवः।**
**तत्र तत्यजुरात्मानं भृगुपातेन केचन ॥ ३९ ॥**

३९ अत्यंत मस्त हत्तींच्या सोंडेच्या स्पर्शाच्या भीतीनें तेथें कांहीं जणांनीं कडयावरून पडून प्राण सोडला.

**प्रोच्चप्रपातपर्यंतस्रस्तहस्तपदैस्तदा।**
**कैश्चित् पतद्भिरन्येऽपि बहवः स्वसखीकृताः ॥ ४० ॥**

४० उंच कडयाच्या कांठावरून हातपाय घसरून पडणाऱ्या कांहीं जणांनीं दुसऱ्याहि पुष्कळ जणांना आपले जोडिदार केलें (त्यांच्या धक्यानें तेहि खालीं पडले).

**एवमारुह्य तं शैलं सर्वा यवनवाहिनी।**
**परिम्लानापि सा धैर्यादवरोहे मतिं दधे ॥ ४१ ॥**

४१ याप्रमाणें त्या पर्वतावर चढून ती यवनांची सर्व सेना अतिशय थकली असतांहि तिनें धैर्य धरून पलीकडची उतरण उतरण्याची इच्छा केली.

**स्तंबेरमास्तमारुह्य पर्वतं पर्वता इव।**
**मंदं मंदमवारोहन्नुज्झन्तो मदमात्मनः ॥ ४२ ॥**

४२ पर्वतासारखे हत्ती तो पर्वत चढून आपला मद हळूहळू टाकीत उतरले.

**आरुह्य भूधरममुं यथा त्रिदशभूतलम्।**
**तथावरुह्य तैर्लोकैर्बतालोकि तलातलम् ॥ ४३ ॥**

४३ ज्याप्रमाणें तो पर्वत चढून त्यांनीं स्वर्ग पाहिला त्याप्रमाणें तो उतरून त्या लोकांनीं जणूं काय पाताळ पाहिलें.

**अथ पर्वतमध्यस्थां गंभीरां कंदरामिव।**
**सिंहव्याघ्रवराहर्क्षतरक्षुकुलसेविताम् ॥ ४४ ॥**
**वज्रपाणिमणिश्याम-वनां वज्रमयीमिव।**
**तमोऽबुनिधिसंभूतां ततां विषलतामिव ॥ ४५ ॥**
**तलातलस्येव महीमहीनगुणशालिना।**
**त्रिजगज्जयिना नित्यं शिवेन परिपालिताम् ॥ ४६ ॥**
**दिवाकरकरास्पृष्टतलां प्रच्छायसंकुलाम्।**
**अभ्यागच्छन्नफजलो जयवल्लीं व्यवलोकत ॥ ४७ ॥**

४४-४७ नंतर पर्वताच्या मध्यभागीं असलेली, गुहेप्रमाणें खोल, सिंह, वाघ, डुक्कर, अस्वलें, तरस यांनीं आश्रय केलेली, इंद्रनील मण्याप्रमाणें काळीकुट्ट झाडी असलेली, जणू काय वज्राचीच केलेली, अंधःकाररूपी सागरांत उत्पन्न झालेली, जणूं काय लांबलचक विषलता, जणूं काय पातालभूमि, तिन्ही लोक जिंकणाऱ्या उत्कृष्ट गुणशाली शिवाजीनें नित्य रक्षिलेली, सूर्याच्या किरणांचा तळीं स्पर्श न झालेली, गर्द छायेनें व्यापलेली, अशी ती जावळी जवळ येऊन अफजलखानानें पाहिली.

**उपेत्य जयवल्लीं तामसावफजलो बली ।**

**इयं मया गृहीतेति निजे चेतस्यचिंतयत् ॥ ४८ ॥**

४८ तो बलाढ्य अफजलखान त्या जावळीजवळ आल्यावर "ही माझ्या हातीं आलीच" असे तो आपल्या मनांत मांडे खाऊं लागला.

**शिवराजोऽपि तं श्रुत्वा जयवल्लीमुपागतम् ।**

**मम पाणितलं दैवादयमायात इत्यवैत् ॥ ४९ ॥**

४९ तो जावळीजवळ आलेला ऐकून शिवाजीराजास सुद्धां हा सुदैवानें आयताच माझ्या तावडींत सांपडला, असें वाटलें.

**ततः कुमुद्वतीकूले कीचकव्रजसंकुले ।**

**निरुत्सवा इव भयादवात्सुर्मिलिताः परे ॥ ५० ॥**

५० नंतर भीतीनें जणूंकाय निरुत्साही होऊन वेळूच्या बेटांनीं व्याप्त अशा कुमुद्वतीच्या तीरावर शत्रूनें तळ दिला.

**भयमीयुः प्रतिभये यत्र ते तस्य सैनिकाः ।**

**स एकोऽफजलस्तत्र साभिमानो बिभाय न ॥ ५१ ॥**

५१ ज्या भयंकर स्थलीं त्याचे ते सैनिक घाबरून गेले, तेथें तो एकटा अफजलखान मात्र भ्याला नाहीं.

**ततः प्रोच्छ्रायितोद्दामपटमंडपमंडितम् ।**

**निबद्धनिगडालाननियंत्रितमदद्विपम् ॥ ५२ ॥**

**निखातशंकुसंबद्धसैंधवश्रेणिसंयुतम् ।**

**सद्यः संदानितानेकक्रमेलककुलाकुलम् ॥ ५३ ॥**

**पण्यपूर्णापणाकीर्णविपणिभ्राजितांतरम् ।**

**व्रजदाव्रजदुद्भ्रांतजनस्वनभरान्वितम् ॥ ५४ ॥**

**अत्यायतं वनावन्यामनायतमिव स्थितम् ।**

**दृश्यमप्याददे तत्र तदनीकमदृश्यताम् ॥ ५५ ॥**

५२–५५ अत्यंत उंच आणि भव्य तबूंनीं सुशोभित, साखळदंडांनीं खुंटाला बांधलेले मस्त हत्ती असलेलें, जमिनींत पुरलेल्या मेखांना बांधलेल्या घोड्यांच्या रांगांनीं युक्त, नुकत्याच बांधलेल्या अनेक उंटांच्या तांड्यांनीं व्यापलेलें; विक्रीच्या पदार्थांनीं भरलेल्या दुकानांनीं गजबजलेल्या बाजारानें शोभणारें, जाणाऱ्या येणाऱ्या व इकडे तिकडे भटकणाऱ्या लोकांच्या गलबल्यानें भरून गेलेलें, अतिशय लांब असूनही त्या वनप्रदेशांत अगदीं छोटें दिसणारें असे तें सैन्य दृश्य असूनही त्याठिकाणीं अदृश्य झालें.

**शिवश्चाफजलश्चोभावपि तावदनामयम् ।**
**प्रष्टुं निजं निजं दूतं न्ययुंजातां परस्परम् ॥ ५६ ॥**

५६ शिवाजी आणि अफजलखान या दोघांनींही कुशल विचारण्याकरितां आपापले वकील एकमेकांकडे पाठविले.

**शिवस्याफजलो वेद हृदयं स च तस्य तत् ।**
**तं विधिं तु विधिर्वेद वेद संधिविधिं जनः ॥ ५७ ॥**

५७ शिवाजीचें अंतःकरण अफजलखानानें ओळखलें आणि अफजलखानाचेंहि शिवाजीनें ओळखलें. विधात्यानेंच तेवढा तो खरा प्रकार ओळखला. इतर लोकांस तो तह होत आहे असें समजलें.

**देयान्युपायनान्यस्मै प्राप्तायातिथये मया ।**
**निजनीत्युनुरोधेन तत्सुतेभ्योऽपि सर्वथा ॥ ५८ ॥**

५८ या आलेल्या पाहुण्याला व त्याच्या पुत्रांनासुद्धां कसेंहि करून मी आपल्या शिष्टाचारास अनुसरून देणग्या दिल्या पाहिजेत.

**मुसेखानायांकुशाय याकुतायांबराय च ।**
**तथा हसनखानाय परेभ्यश्च पृथक् पृथक् ॥ ५९ ॥**
**तथैव मंबराजाय पितृव्याय गरीयसे ।**
**तत्तद्रत्नपरीक्षा च कारणीयास्ति वै पुनः ॥ ६० ॥**

५९–६० (त्याजबरोबर) मुसेखान, अंकुशखान, याकुत, अंबर, त्याचप्रमाणें हसनखान आणि इतर या सर्वांना; तसेंच मोठा चुलता मंबाजीराजे यालाहि वेगवेगळया (देणग्या) दिल्या पाहिजेत आणि सर्व प्रकारच्या रत्नांची परीक्षा करविली पाहिजे.

**इत्थमानायितास्तेन राज्ञा विपणिनो यदा ।**
**तदा तेऽफजलादिष्टाः शिवस्यांतिकमाययुः ॥ ६१ ॥**

६१ अशाप्रकारें त्या राजानें जेव्हां व्यापारी बोलाविले तेव्हां त्या अफजलखानाच्या आज्ञेवरून ते शिवाजीच्या जवळ आले.

**स्वानि स्वानि समानीतान्यथ रत्नानि तानि ते ।**
**धनिनो दर्शयामासुः शिवायाशुजिघृक्षवे ॥ ६२ ॥**

६२ मग आपापलीं आणलेलीं तीं रत्नें त्या व्यापाऱ्यांनीं ताबडतोब घेणाऱ्या शिवाजीला दाखविलीं.

**आहूतेभ्यः स तस्मादफजलकटकात्तत्र तेभ्यो धनिभ्यः**
**सर्वाण्यादत्त रत्नान्यथ निजसविधे तान् समस्तान्यरुत्त ।**
**लुब्धात्मानस्तदानीं विधिविहतधियो भूरिभारानुरोधा-**
**दज्ञा नाज्ञासिषुस्ते बत गिरिशिखरे सर्वतः स्वं निरोधम् ॥६३॥**

६३ त्या अफजलखानाच्या सैन्यांतून तेथें बोलावलेल्या व्यापाऱ्यापासून त्यानें सर्व रत्नें घेतलीं आणि त्या सर्वांना आपल्याजवळ ठेविलें. तेव्हां त्या लोभी व दैवानें बुद्धि नष्ट केलेल्या मूर्ख व्यापाऱ्यांनीं पुष्कळ लोभाच्या आशेनें आपण पर्वतशिखरावर सर्व बाजूंनीं कोंडलें गेलों आहों हें ओळखलें नाहीं.

**विश्रब्धो मयि वर्तते शिवमहीपालः स तस्मादहम्**
**तस्योपांतमुपेत्य सांप्रतममुं सामोपधिं संश्रयन् ।**
**गुप्तामात्मकटारिकां तदुदरे गाढं निखाय स्वयं**
**देवानामपि मंदिरेऽद्य सुतरां सद्यो विधास्ये भयम् ॥ ६४ ॥**

६४ त्या शिवाजीराजानें माझ्यावर विश्वास ठेविला आहे म्हणून मी त्याच्याजवळ जाऊन सांप्रत सख्य करण्याचें कपट करून आपली गुप्त कट्यार स्वतः त्याच्या पोटांत खोल खुपसून आज ताबडतोब देवाच्या मंदिरामध्यें सुद्धां अतिशय भय उत्पन्न करीन.

**इत्थं चेतसि चिंतितं बत निजे म्लेच्छेन तेनच्छलम्**
**तद्विज्ञाय शिवः स एष सकलं सद्यस्तदीयं फलम् ।**
**तस्मै दातुमथोद्यतो युधि यथा वक्ष्यामि सर्वं तथा**
**मन्ये तद्यशसा सुधामधुकथा पीयूषवार्ता वृथा ॥ ६५ ॥**

६५ याप्रमाणें त्या यवनानें आपल्या मनांत योजलेलें हें कपट जाणून तो शिवाजी त्या सगळयाचें फळ त्याला युद्धामध्यें देण्यास कसा सज्ज झाला हें सर्व मी सांगेन, त्याच्या यशाचा गोड असा वृत्तांत हेंच अमृत होय; त्याच्यापुढें अमृताची गोष्ट व्यर्थ होय.

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां**
**शतसाहस्र्यां संहितायामफजलागमनं**
**नाम विंशोऽध्यायः ॥ २० ॥**

# अध्याय २१ वा



कवीन्द्र उवाच ।

अथो मिथो दर्शनार्थे भृशमुद्यतयोस्तयोः ।
अप्यस्तत्रधियोस्तत्र निजनीतिसमेतयोः ॥ १ ॥
यथा दूतमुखेनैव नियमः समजायत ।
कथयामि तथा सर्वं शृणुत द्विजसत्तमाः ॥ २ ॥

कवींद्र म्हणालाः—

१-२ नंतर एकमेकांच्या भेटीकरितां अत्यंत उद्युक्त, त्या गोष्टीचा ध्यास लागलेल्या तत्पर व आपआपल्या राजनीतीनें वागणाऱ्या त्या दोघांचा दूतांच्या ( वकिलांच्या ) द्वारें जसा करार झाला तसा सर्व सांगतों; हे पंडितांनो ! ऐका.

विन्यस्यानीकमात्मीयं यथावस्थितमात्मना ।
एकेनाफजलेनैव प्रस्थेयं शस्त्रपाणिना ॥ ३ ॥
याप्ययानाधिरूढेन यातव्यं च पुरः पुनः ।
सन्तु तत्परिचर्यार्थे द्वित्रा एवानुजीविनः ॥ ४ ॥
तथैव स्वयमभ्येत्य प्रतापाद्रेरुपत्यकाम् ।
शिवं प्रतीक्षमाणेन स्थेयं तत्रैव संसदि ॥ ५ ॥
शिवेन च समभ्येत्य शस्त्रहस्तेन गौरवात् ।
आतिथ्यमतिथेस्तस्य विधातव्यं यथाविधि ॥ ६ ॥
तिष्ठन्तु दंशिताः शूराः पृष्ठे दश दश स्थिराः ।
शरस्यांतरमासाद्य रक्षणाय द्वयोरपि ॥ ७ ॥
मिलिताभ्यामुभाभ्यां च कर्तव्यं तत्र तद्रहः ।
सर्वस्यापि हि लोकस्य भवेद्येन महान्महः ॥ ८ ॥

३-८ आपलें सैन्य जसें आहे तसेंच ठेवून एकट्या अफजलखानानें स्वतः सशस्त्र निघावें आणि पालखींत बसून पुढें जावें; त्याच्या सेवेसाठीं दोन तीनच सेवक असावेत; तसेंच त्यानें प्रतापगडाच्या पायथ्याजवळ स्वतः येऊन तेथेंच सभा मंडपांत वाट पाहात राहावें. आणि शिवाजीनें सशस्त्र येऊन त्या पाहुण्याचा आदरसत्कार गौरवानें यथाविधि करावा. दोघांच्याहि रक्षणासाठीं सज्ज, स्वामिनिष्ठ, शूर व निष्ठावान् अशा दहा दहा सैनिकांनीं बाणाच्या टप्प्यावर येऊन मागें उभें राहावें; आणि दोघांनींहि भेटल्यावर सर्वच लोकांना अत्यानंदकारक असें गुप्त बोलणें ( खलबत ) तेथें करावें.

एवं विधाय नियमं विधायच्छलमांतरम् ।
दिदृक्षमाणावन्योन्यं तदानीं तौ व्यराजताम् ॥ ९ ॥

९ याप्रमाणें करार करून व आंतून कपट योजून एकमेकांस भेटूं इच्छिणारे ते दोघे त्या समयीं शोभले.

ततः श्रुत्वा तमायान्तं प्रतापाद्रितलस्थलीम् ।
शिवराजो महाराजः सज्जमानो व्यराजत ॥ १० ॥

१० नंतर तो प्रतापगडाच्या पायथ्यावरील मैदानाकडे येत आहे असें ऐकून शिवाजी महाराज सज्ज होत असताना शोभूं लागले.

विविधाभिर्विधाभिर्वै यथादिष्टं पुरोधसा ।
तथा नित्यवदभ्यर्च्य देवदेवं वृषध्वजम् ॥ ११ ॥
नित्यदानाविधिं कृत्वा भुक्त्वा स्वल्पमनल्पधीः ।
सम्यगाचम्य च मुहुर्मुहुरंबु शुचि स्वयम् ॥ १२ ॥
चिन्तयित्वा च तां देवीं तुलजां क्षणमात्मनि ।
विधाय चात्मनो वेषं तदात्वोचितमात्मना ॥ १३ ॥
निजमप्रतिमं लोके विलोक्य मुकुरे मुखम् ।
उत्थाय चासनात्सद्यः प्रणिपत्य पुरोहितम् ॥ १४ ॥
द्विजानन्यांश्च तैः सर्वैराशंसितशुभोदयः ।
दधिदुर्वाक्षतान् स्पृष्ट्वा दृष्ट्वा मार्तंडमंडलम् ॥ १५ ॥
स्थितामभ्येत्य च पुरः सवत्सां स्वर्णसंयुताम् ।
वितीर्य सुरभिं सद्यः सगुणायाग्रजन्मने ॥ १६ ॥
उद्यतानुयानार्थमात्मीयाननुयायिनः ।
प्रतापिनः प्रतापाद्रेर्गुप्तये विनियुज्य च ॥ १७ ॥
तमन्तस्सच्छलं म्लेच्छमभ्येत्य स्थितमान्तिके ।
अभ्यगच्छदसौ हार्दादभ्यागतमिवात्मनः ॥ १८ ॥

११–१८ उपाध्यायानें सांगितल्याप्रमाणें विविध प्रकारांनीं देवाधिदेव शंकराची नित्याप्रमाणें पूजा करून, नित्याचा दानविधि उरकला, थोडेंसें जेवले, स्वतः शुद्ध परिमित जल वारंवार आचमनाप्रमाणें पिऊन त्या तुळजा देवीचें क्षणभर मनांत चिंतन केलें, तत्कालोचित असा आपला वेष केला, जगांत अप्रतिम असें आपलें मुख आरशांत पाहिलें, लगेच आसनावरून उठून आणि पुरोहितास व दुसऱ्या

ब्राह्मणांस नमस्कार करून त्या सर्वांचा शुभाशीर्वाद घेतला. दहीं, दूर्वा आणि अक्षता यास स्पर्श केला, सूर्यबिंब पाहिलें, पुढें उभ्या असलेल्या सवत्स गाईजवळ येऊन लगेच ती सुवर्णासह गुणवान् ब्राह्मणास दिली, आपल्या मागोमाग येण्यासाठीं सज्ज असलेल्या पराक्रमी अनुयायांस प्रतापगडाच्या रक्षणार्थ नेमलें आणि मनात कपट ठेवून समीप येऊन राहिलेल्या त्या यवनाकडे, तो महाबुद्धिमान् शिवाजी आपल्या पाहुण्याला जसें सामोरें जावें त्याप्रमाणें, स्नेहभावाने गेला.

उष्णीषेणैव शुचिना व्यभादुत्तंसधारिणा ।
कश्मीरजपृषद्वर्षरंजितेनांगिकेन च ॥ १९ ॥
शिववर्मा भृशबलः संवृतः शिववर्मणा ।
तस्य वज्रशरीरस्य किं कार्यं तेन वर्मणा ॥ २० ॥

१९-२० उत्तम कवच घातलेला शिवाजी राजा भोंसला, तुरा खोंवलेल्या शुभ्र पगडीनें व केशराचा शिडकाव मारलेल्या अंगरख्यानें फारच शोभत होता. त्या वज्रकायास त्या कवचाची काय गरज ?

कृपाणं पाणिनैकेन बिभ्राणोन्येन पट्टिशम् ।
स नंदकगदाहस्तः साक्षाद्धरिरुदैक्ष्यत ॥ २१ ॥

२१ एका हातांत तरवार आणि दुसऱ्या हातांत पट्टा धारण करणारा तो शिवाजी राजा, नंदक खड्ग व कौमोदकी गदा धारण करणाऱ्या प्रत्यक्ष विष्णूप्रमाणें दिसत होता.

अथ पर्वतपर्यंतात् पंचाननमिवोद्गतम् ।
द्रुतप्रत्यर्पितपदं संप्रसज्य पुरः स्थितम् ॥ २२ ॥
सृण्यग्रसुंदरोदग्रव्यायतश्मश्रुभीषणम् ।
धीरं धीरदृशं वीरं शिवं रिपुरुदैक्षत ॥ २३ ॥

२२-२३ मग गडाच्या कडेवरून सिंहाप्रमाणें बाहेर पडून, झप् झप् पावलें टाकीत अगदीं निकट येऊन उभा राहिलेल्या, अंकुशाग्राप्रमाणें सुंदर, भव्य आणि लांब अशा दाढीनें भीषण दिसणाऱ्या, धैर्यवान् व धैर्यदृष्टि अशा वीर शिवाजीस शत्रूनें पाहिलें.

शिवोपि तं पुरो वीक्ष्य वृषा वृत्रमिवागतम् ।
स्मयमानः स्वयं तस्य दृशा दृशमयोजयत् ॥ २४ ॥

२४ इंद्रानें जसें वृत्र आलेला पाहिलें, त्याप्रमाणें शिवाजीनें देखील तो

समोर आलेला पाहून गालांत किंचित् हसत स्वतः त्याच्या दृष्टीशीं दृष्टि भिडविली.

विरुद्धस्थितिमुद्बुद्धं क्रुद्धः क्रुद्धमिवांतकम् ।
स तं शाहसुतं वीरं विश्वासयितुमात्मनि ॥ २५ ॥
स्वहस्तस्थायिनं खड्गमखंडितगतिं खलः ।
स्वपार्श्ववर्तिपाणिस्थमकरोद्विधृतच्छलः ॥ २६ ॥

२५-२६ क्रुद्ध यमाप्रमाणें समोर उभा असलेल्या त्या दक्ष वीर शिवाजीचा विश्वास आपल्यावर बसवून घेण्यासाठीं, आपल्या हातांत असलेली अकुंठित तरवार त्या क्रुद्ध, कपटी खलानें जवळ असलेल्या आपल्या सेवकाच्या हातांत दिली.

ततः स्वरेण तारेण मृषादर्शितसौहृदः ।
प्रतिकूलेन विधिना हतः स तमवोचत ॥ २७ ॥

२७ मग खोटा स्नेह दाखवून, प्रतिकूल दैवानें पछाडलेला तो खान त्यास मोठ्या स्वरानें म्हणाला,

अफजल उवाच

अये मृषामृधोत्साहधारिन् स्वैरतरास्थिते ।
किं नीतिपथमुत्सृज्य भजस्यपथपान्थताम् ॥ २८ ॥

अफजलखान म्हणाला:—

२८ अरे, फुकट युद्धोत्साह धारण करणाऱ्या व अत्यंत स्वैर वर्तन करणाऱ्या ! नीतिमार्ग सोडून कुमार्ग कां धरतोस ?

येदिलं कुतुबं वापि दिल्लीन्द्रं वा महौजसम् ।
न सेवसे न मनुषे तनुषे गर्वमात्मनि ॥ २९ ॥

२९ आदिलशहाची, कुतुबशहाची किंवा महाबलवान दिल्लीपतीची सुद्धां सेवा करीत नाहींस, त्यांस मानीत नाहींस आणि मनांत गर्व वाहतोस !

तदद्य दुर्विनीतं त्वां विनेतुमहमागतः ।
प्रयच्छ पर्वतानेतान् गृध्नुतां त्यज मां भज ॥ ३० ॥

३० म्हणून आज मी तुज उद्धटाला शिक्षा लावण्यासाठीं आलों आहे. हे गड दे, लोभीपणा सोड आणि मला शरण ये.

धृत्वाहं त्वां स्वहस्तेन नीत्वा विजयपत्तनम् ।
अलीशाहस्य पुरो नामयित्वा शिरस्तव ॥ ३१ ॥

प्रणिपत्य च विज्ञाप्य तं प्रतापिनमीश्वरम् ।
दास्यामि वैभवं तुभ्यं भूयो भूयस्तरं नृप ॥ ३२ ॥

३१-३२ मी तुला स्वहस्तानें धरून, विजापुरास नेऊन अल्लिशहापुढें तुझें शीर तुला नमवावयास लावीन आणि त्या प्रतापी प्रभूस प्रणिपात करून विनंती करीन आणि हे राजा, तुला पुनः अतिशय मोठें वैभव ( मिळवून ) देईन.

शाहराजात्मज शिशो विहाय स्वां विहस्तताम् ।
स्पृश हस्तेन मे हस्तमेहि देह्यंकपालिकाम् ॥ ३३ ॥

३३ अरे शहाजीराजाच्या पुत्रा, पोरा, आपली शहाणपणाची घमेंड सोडून ( आपला ) हात माझ्या हातांत दे, ये, आलिंगन दे.

एवमुक्त्वा स तद्ग्रीवां धृत्वा वामेन पाणिना ।
इतरेण च तत्कुक्षौ निचखान कटारिकाम् ॥ ३४ ॥

३४ असें बोलून त्यानें त्याची मान डाव्या हातानें धरून दुसऱ्या-उजव्या हातानें त्याच्या कुशींत कट्यार खुपसली.

नियुद्धविच्छिवस्सद्यस्तद्धस्तोन्मुक्तकंधरः ।
ध्वनिना धीरधीरेण प्रतिध्वानितकंदरः ॥ ३५ ॥
प्रविशंतीमात्मकुक्षिभागमभ्रांतमानसः ।
किंचिदाकुंचितांगस्तां शिवः स्वयमवंचयत् ॥ ३६ ॥

३५-३६ बाहुयुद्धनिपुण शिवाजीनें लगेच त्याच्या हातांतून मान सोडवून घेऊन अत्यंत गंभीर ध्वनीनें दरी दुमदुमवून टाकली आणि गोंधळून न जातां आपलें अंग किंचित् आकुंचित करून शिवाजीनें आपल्या पोटांत घुसणारी ती कट्यार स्वतः चुकविली.

ददाम्येतं कृपाणं ते गृहाण निगृहाण माम् ।
इदं विनिगदन्नेव धीरः सिंहसमस्वरः ॥ ३७ ॥
सिंहयायी सिंहकायः सिंहदृक् सिंहकंधरः ।
स्वपाणिद्वितयोद्धूतविकोशायुधसुंदरः ॥ ३८ ॥
तं निर्यातयितुं वैरं प्रवृत्तोसौ महाव्रतः ।
शिवः कृपाणिकाग्रेण कुक्षावेव तमस्पृशत् ॥ ३९ ॥

३७-३९ "हा वार तुला करतों तो घे, मला धर" असें म्हणतच, सिंहासारखा स्वर, सिंहासारखी गति, सिंहासारखें शरीर, सिंहासारखी दृष्टि,

सिंहासारखी मान असलेला व आपल्या दोन्ही हातांनीं फिरविलेल्या नागव्या तरवारीनें शोभणारा तो धैर्यवान् व कर्तृत्ववान् (करारी)शिवाजी, त्या वैन्याचा सूड घेण्यास प्रवृत्त होऊन त्यानें, आपल्या तरवारीचें टोंक त्याच्या पोटांतच खुपसलें.

**आपृष्ठं विद्विषत्कुक्षिं तूर्णं तेन प्रवेशिता ।**
**आकृष्यान्त्राणि सर्वाणि सा कृपाणी विनिर्गता ॥ ४० ॥**

४० त्यानें शत्रूच्या पोटांत पाठीपर्यंत झटकन् खुपसलेली ती तरवार सर्व आंतडीं ओढून बाहेर पडली.

**कुंप्यतः कार्तिकेयस्य शक्तिः क्रौंचाचलं यथा ।**
**व्यभादफजलं भित्वा शिवखड्गलता तथा ॥ ४१ ॥**

४१ क्रुद्ध कार्तिकेयाची शक्ति क्रौंच पर्वतास विदीर्ण करून जशी शोभली, तशी शिवाजीची तरवार अफजलखानास भेदून शोभूं लागली.

**घूर्णमानेन शिरसा बभावफजलस्तदा ।**
**ईदृशं शिवराजेन पौरुषं दर्शितं यदा ॥ ४२ ॥**

४२ असा पराक्रम शिवाजी महाराजानें जेव्हां दाखविला तेव्हां अफजलखानाचें डोकें गरगर फिरूं लागून तो शोभूं लागला.

**ततो रुधिरधाराभिरार्द्रीकृतमहीतलः ।**
**प्रमत्त इव मोहेन घूर्णमानोऽतिविह्वलः ॥ ४३ ॥**
**यथैव शिवशस्त्रेण निःसृतान्युदराद्बहिः ।**
**तथैवान्त्राणि सर्वाणि बिभ्राणः स्वेन पाणिना ॥ ४४ ॥**
**अनेन निहतोऽस्मीह जह्येनमहितं जवात् ।**
**इति वक्ति स तं यावत् तावत् तत्पार्श्ववर्तिना ॥ ४५ ॥**
**तमेवाफजलस्यासिं समुद्यम्याभिमानिना ।**
**जिघांसयैव सहसा शिवराजोऽभ्यपद्यत ॥ ४६ ॥**

४३-४६ नंतर आपल्या रक्ताच्या धारांनीं भूमि भिजवून, झिंगलेल्या माणसाप्रमाणें मूर्च्छेनें झोकांड्या खात खात अतिविव्हल होत्साता तो खान शिवाजीच्या शस्त्राच्या योगानें पोटांतून बाहेर पडलेलीं आंतडीं जशींच्या तशींच सर्व आपल्या हातानें धरून "ह्यानें मला येथें ठार केलें, ह्या शत्रूस वेगानें ठार करा" असें जों आपल्या पार्श्ववर्ती सेवकास म्हणतो तोंच तो अभिमानी सेवक तीच अफजलखानाची तरवार उगारून ठार मारण्याच्या इच्छेनें एकदम शिवाजीवर चालून गेला.

नो हनिष्यत्यमुं राजा द्विजातिमिति जानता ।
स्वामिनाफजलेनासौ योद्धा युद्धे निवेशितः ॥ ४७ ॥

४७ "ब्राह्मणास शिवाजी ठार मारणार नाहीं" असें जाणून धनी अफजलखानानें त्या ब्राह्मण योद्धयास युद्धांत निविष्ट केलें होतें.

द्विजातिरिति तं श्रुत्वा जानानः शिवभूमिपः ।
अभ्येतमपि नो हन्तुमि[?मै]च्छन्निजनयस्थितः ॥ ४८ ॥

४८ तो ब्राह्मण आहे असें ऐकून जाणत्या व नीतीनें वागणाऱ्या शिवाजी राजानें त्यास ठार मारण्याची इच्छा केली नाहीं.

अप्राप्ता एव यावत्ते तत्राफजलसैनिकाः ।
तावत्स एव तं खड्गं शिवस्योपर्यपातयत् ॥ ४९ ॥

४९ अफजलखानाचे ते सैनिक तेथें पोंचले नाहींत तोंच त्यानें ती तरवार शिवाजीवर हाणली.

शिवस्तत्पातितं खड्गं खड्गेनादत्त वै तदा ।
शिरस्तदधिपस्यापि पट्टिशेन व्यधाद् द्विधा ॥ ५० ॥

५० त्यानें मारलेली ती तरवार त्या समयीं शिवाजीनें आपल्या तरवारीनें अडविली. आणि पट्टयानें त्याच्या धन्याच्या-खानाच्या डोक्याचेहि दोन तुकडे केले.

पट्टिशेन विनिर्भिन्नमुच्छ्रितस्य रिपोःशिरः ।
स्वरुणां विहतं सद्यो गिरेः शृंगमिवापतत् ॥ ५१ ॥

५१ धिप्पाड शत्रूचें पट्टयानें कापलेलें डोकें, वज्रानें फोडलेल्या पर्वतशिखराप्रमाणें लगेच खालीं पडलें.

असौ जिष्णुरभूत्तत्र स म्लेच्छोऽभून्महीधरः ।
शितकोटिः पट्टिशोऽपि शतकोटिरभूत्तदा ॥ ५२ ॥

५२ तेथें हा (शिवाजी) जणुं इंद्र झाला, तो म्लेच्छ पर्वत झाला आणि तीक्ष्णाग्राचा पट्टासुद्धां त्या समयीं वज्र झालें !

क्वचित्कबंधः प्रसृतः स्रस्तान्यान्त्राणि च क्वचित् ।
न्यपतच्च क्वचिन्मूर्धा शिरोवेष्टोऽपि च क्वचित् ॥ ५३ ॥
विप्रकीर्णं क्वचिच्छत्रं प्रकीर्णकमपि क्वचित् ।
तत्तन्मुक्तामणिमयो रत्नोत्तंसः स च क्वचित् ॥ ५४ ॥

क्वचिद्वस्त्रं क्वचिच्छत्रं समासाद्य दशामिमाम् ।
सोलुठन्मेदिनीपृष्ठे दुष्टः स्वेनैव कर्मणा ॥ ५५ ॥

५३-५५ एकीकडे धड पसरलें, एकीकडे आंतडीं गळालीं, एकीकडे मस्तक पडलें, एकीकडे पटका पडला, छत्री एकीकडे उडाली, चवरीहि एकीकडे गेली, सर्व प्रकारच्या मोत्यांचा व रत्नांचा तो शिरपेंचहि एकीकडे पडला, वस्त्र एकीकडे तर छत्र एकीकडे—अशी दशा प्राप्त होऊन तो दुष्ट आपल्याच कर्मामुळें भूमीवर लोळला.

निमिष्य नोन्मिषन्त्येव यावत्ते तस्य सैनिकाः ।
तावच्छिवनृपेणोच्चैर्यवनः स निपातितः ॥ ५६ ॥

५६ त्याच्या त्या सैनिकांच्या डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तोंच या शिवाजी राजानें त्या यवनास धाडकन् खालीं पाडलें.

ते हतं स्वामिनं वीक्ष्य यवनानीकनायकाः ।
कुप्यन्तोऽतीव दृप्यन्तो विनिर्धूतायतायुधाः ॥ ५७ ॥
सय्यदोऽबदुलो नाम बडाह्वोपि च सय्यदः ।
रहीमखानोऽफजलभ्रातृपुत्रश्च दुर्मदः ॥ ५८ ॥
पहीलवानखानोपि महामानी महान्वयः ।
पीलुजिच्छंकरश्चोभौ वीरौ महितवंशजौ ॥ ५९ ॥
चत्वारोन्येपि यवनाः पवनातिगविक्रमाः ।
बलिनोऽफजलस्यैते पार्ष्णिग्राहाः प्रमाथिनः ॥ ६० ॥
ध्वस्ते जंभासुरे सद्यः सुरेश्वरमिवासुराः ।
संभूयाभ्यपतन्सर्वे शिवराजजिघांसवः ॥ ६१ ॥

५७-६१ धन्यास ठार मारलेला पाहून, अबदुल सय्यद, बडा सय्यद, अफजलखानाचा पुतण्या उन्मत्त रहिमखान, अत्यंत मानी आणि थोर घराण्यांतील पहिलवानखान, पिलाजी व शंकराजी मोहिते हे दोघ वीर आणि वायूहून अधिक वेगवान, बलवान विध्वंसक व अफजलखानाचे पृष्ठरक्षक असे दुसरेहि चार यवन—असे ते यवनसेनेचे नायक अतिशय क्रुद्ध व बेफाम होऊन, शस्त्रें परजीत, जंभासुराचा नाश झाला असतां इंद्रावर जसे असुर लगेच चालून गेले त्याप्रमाणें, शिवाजी राजास ठार करण्याच्या इच्छेनें सर्व मिळून त्याच्यावर चालून गेले.

तदा हेतिद्वयं तद्वै परिभ्रामयतामुना ।
परितो विततकारः प्राकारः किमकारि न ॥ ६२ ॥

६२ त्या समयीं ती शस्त्राची जोडी (तीं दोन शस्त्रें) फिरवीत त्या शिवाजी राजानें आपल्याभोंवतीं जणुं दीर्घ तटच केला !

अभ्रमन्नपि युद्धेऽस्मिन् स भ्रमन्नभ्रमन्तरा ।
अभ्रामयदहोरात्रं मिषतां द्विषतां दृशः ॥ ६३ ॥

६३ त्यानें ह्या युद्धामध्यें न गोंधळतां आकाशांत गरगर फिरत राहून स्पर्धा करणाऱ्या (पाहणाऱ्या) शत्रूंचे डोळे अहोरात्र (एकसारखे) फिरविले.

कालेन करवालेन पटुना पट्टिशेन च ।
ककुभां वलयानीव मंडलानि व्यधत्त सः ॥ ६४ ॥

६४ काळ्या तरवारीनें व तीक्ष्ण पट्टयानें (अर्थात् ती फिरवून) त्यानें दिग्वलयांप्रमाणें (आपल्याभोंवतीं) वलयें (कडीं) केलीं.

मंडलानि वितन्वानं मन्वानं दर्पमात्मनि ।
पट्टिशं च कृपाणं च व्याधुन्वानं मुहुर्मुहुः ॥ ६५ ॥
तदा तमुग्रकर्माणं शिववर्माणमाहवे ।
न विलोकयितुं शेकुः परे स्वेपि च सैनिकाः ॥ ६६ ॥

६५–६६ तरवार आणि पट्टा वारंवार फिरवून वलयें (कडीं) बनविणारा व मनांत गर्व वाहणारा अशा त्या उग्रकर्म्या शिवाजीराजास शत्रूकडील, तसेच स्वकीयाहि सैनिक त्या समयीं युद्धांत पाहूं शकले नाहींत.

क्षणं विशन्वसुमतीं क्षणमाकाशमाविशत् ।
मध्य एव क्षणं तिष्ठन् जोषमासीन्न स क्षणम् ॥ ६७ ॥

६७ क्षणभर पृथ्वींत (भूमींत) घुसे, क्षणभर आकाशांत शिरे, क्षणभर मध्यें राही; याप्रमाणें तो क्षणभरहि स्तब्ध नव्हता.

तडित्पातानिव रयादुपेतानात्मनोऽन्तिके ।
पातितान्प्रतिवीरैस्तैः खङ्गपातननेकशः ॥ ६८ ॥
कदाचित्पट्टिशेनैव कदाचिद्गाढमुष्टिना ।
कदाचिद्युगपत्ताभ्यां द्वाभ्यामादत्त स प्रभुः ॥ ६९ ॥

६८–६९ विद्युत्पाताप्रमाणें वेगानें आपल्यावर येणाऱ्या अशा विरुद्ध वीरांनीं केलेले अनेक खड्गप्रहार त्या प्रभूनें केव्हां पट्टयानेंच, तर केव्हां तरवारीनें आणि केव्हां त्या दोहोंनीं एकदम अडविले.

तदा संभः कावुकीयः काट्कश्चेंगालसंभवः ।
कुंडाजिच्च यशोजिच्च द्वाविमौ कंकवंशजौ ॥ ७० ॥
गोकपाटान्वयः कृष्णः शूराजित् कांटकोपिऽच ।
तथैव माहिलो जीवो विश्वजिच्च मुरुंबकः ॥ ७१
संभः करवरस्तद्वदिभरामोऽपि बर्बरः ।
एते दश महावीराः शिवराजाभिरक्षिणः ॥ ७२ ॥
कृतक्ष्वेडारवाः कोषनिष्कासितमहासयः ।
प्रत्यगृह्णन्त तांस्तत्र पवनानिव पर्वताः ॥ ७३ ॥

७०-७३ तेव्हां संभाजी कावजी, काताजी ( काट्कः ) इंगळे, कोंडाजी व येसाजी हे दोघे कंक, कृष्णाजी गायकवाड, सूरजी कांटके, त्याचप्रमाणें जिवा माहाला, विसाजी मुरुंबक, संभाजी करवर, इब्राइम शिद्दी ( बर्बर ) अशा ह्या शिवराजरक्षक दहा महावीरांनीं गर्जना करून, म्यानांतून प्रचंड तरवारी उपसून, पर्वतांनीं जसें वायूस आडवावें तसा त्यांना (खानाकडील योद्ध्यांस) तेथें विरोध केला.

तेषां तेषां च नादेन पूरिते गगनोदरे ।
मन्दुरायां निरुद्धोऽपि विद्रुतोऽभूद्धरिर्हरेः ॥ ७४ ॥

७४ त्यांच्या—मुसलमानांच्या आणि त्यांच्या—मराठ्यांच्या गर्जनेनें गगन भरून गेलें असतां, अश्वशालेंत बांधलेला इंद्राचा घोडासुद्धां पळून गेला.

राजन्ददाम्यहं तुभ्यमसिमेतं सहस्व मे ।
वदन्मुहुर्मुहुरिदं बडाह्वः सय्यदस्तदा ॥ ७५ ॥
नदन्तं सिंहवद्भूरि भूयोऽप्यफजलान्तकम् ।
प्रत्यधावन्निषिद्धोऽपि माहिलेन तरस्विना ॥ ७६ ॥
अहमेव निहन्म्येनमायात्वेष ममान्तिके ।
इति क्षितिपतेर्वाक्यमनाकर्ण्येव माहिलः ॥ ७७ ॥
तमसिं सय्यदोत्क्षिप्तं समादत्त स्ववर्म्मणा ।
व्यधाच्च सय्यदं वीरः करवालेन वै द्विधा ॥ ७८ ॥

७५-७८ "हे राजा, तुझ्यावर हा तरवारीचा वार करतों. तो माझा वार संभाळ." असें वारंवार म्हणत त्या वेळीं बडा सय्यद सिंहाप्रमाणें प्रचंड गर्जना करणाऱ्या व अफजलखानास ठार मारणाऱ्या शिवाजीवर पुनः धावून गेला. वेगवान जिवा महालानें, नको म्हटलें असतांहि "ह्याला मीच ठा

करतों, हा माझ्याजवळ येऊं दे " असें महाराजांचें म्हणणें न ऐकलेसें करून, सय्यदानें उगारलेली ती तरवार आपल्या अंगावर घेतली आणि त्या वीरानें आपल्या तरवारीनें सय्यदाचे दोन तुकडे केले.

**काबुकीयेन कंकाभ्यामिंगालेनाभिमानिना ।**
**मुरुंबकेन वीरेण तथा करवरेण च ॥ ७९ ॥**
**क्रूरेण कांटकेनापि गोकपाटेन च द्रुतम् ।**
**बर्बरेण सावेशं युद्धन्तोन्येऽपि पातिताः ॥ ८० ॥**

७९–८० कावजी, दोघे कंक, अभिमानी इंगळे, शूर मुरुंबक, त्याचप्रमाणें करवर, क्रूर कांटके, गायकवाड आणि शिद्दी ( बर्बर ) ह्यांनीं आवेशानें लढणाऱ्या दुसऱ्याहि शत्रूंना पटापट पाडलें.

**निकृत्तस्कंधहस्तानि निकृत्तचरणानि च ।**
**निकृत्तमूर्धमध्यानि पतितानि समंततः ॥ ८१ ॥**
**लोहितेनानुलिप्तानि द्रुमामयसमश्रिया ।**
**तत्र तेषामहो तानि वपूंपि प्रचकाशिरे ॥ ८२ ॥**

८१–८२ खांदे व हात तोडलेलीं, पाय तोडलेलीं, डोकीं व मध्यभाग तोडलेलीं, लाखेसारख्या लाल रक्तानें माखलेलीं अशीं चोहोंकडे पडलेलीं त्यांचीं शरीरें तेथें चकाकूं लागलीं.

**एकाशीत्याधिकैः पंच दशभिः संमितैः शतैः ।**
**शालिवाहे शके संवत्सरे चैव विकारिणि ॥ ८३ ॥**
**मासि मार्गे सिते पक्षे सप्तम्यां गुरुवासरे ।**
**मध्याह्ने दैवतद्वेषी शिवेनाफजलो हतः ॥ ८४ ॥**

८३–८४ शके १५८१ विकारी नाम संवत्सरीं, मार्गशीर्षमासीं, शुक्लपक्षीं, सप्तमी तिथीस, गुरुवारीं, मध्याह्नीं देवद्वेष्टा अफजलखान शिवाजीनें ठार मारला.

**विध्वस्तेऽफजलेबलिन्यपि बलेनैतेन भूमीभृता**
**वाति स्मातिहिमः प्रभूतकुसुमामोदी मृदुमारुतः ।**
**नद्यश्चापि सुधावदातसलिलाः सद्यः स्थिरा सुस्थिरा**
**स्वं स्वं स्थानमवाप्य निर्वृतहृदः सर्वेऽप्यभूवन्सुराः ॥८५॥**

८५ बलवान अफजलखानासहि ह्या राजानें बलानें ठार केलें असतां, अत्यंत शीतल, असंख्य पुष्पांच्या सुगंधानें युक्त व मंद असा वायु वाहूं लागला;

नद्यासुद्धां निवळ शुद्ध पाण्यानें युक्त झाल्या, लगेच पृथ्वी अत्यंत स्थिर झाली, सर्व देवसुद्धां आपआपल्या स्थानीं जाऊन सुखी झाले.

इति निजरिपुमुच्चैः संगरे पातयित्वा
विलसति शिवभूमीवल्लभे शस्त्रपाणौ ।
सपदि विजयशंसी व्यश्नुवानास्त्रिलोकीम्
गिरिशिरासि गभीरो दुन्दुभिः प्रादुरासीत् ॥ ८६ ॥

८६ ह्याप्रमाणें आपल्या शत्रूस युद्धांत जोरानें लोळवून सशस्त्र शिवाजी राजा विलसूं लागला असतां लगेच तीनहि लोक व्यापून टाकणारा, विजय सूचक व गंभीर असा दुंदुभिध्वनि गडावर झाला.

इत्यनुपुराणे परमानंदकवींद्रप्रकाशितायां शत-
साहस्र्यां संहितायामफजलवधो नाम
एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥

---

# अध्याय २२ वा

कवीन्द्र उवाच

तेन दुंदुभिनादेन दूतेनेव प्रसर्पता ।
सैनिकाः शिवराजस्य सपदि प्रतिबोधिताः ॥ १ ॥

कविश्रेष्ठ म्हणाला

१ दूताप्रमाणें वेगानें जाणाऱ्या त्या दुंदुभिध्वनीनें शिवरायाच्या सैनिकांना लगेच सूचना दिली.

सौलक्षिकः कमलजिद्यशोजित् कंक एव च ।
तानाजिन्मल्लसूरश्च कुंडो वरखलस्तथा ॥ २ ॥
रामः पांगारिकश्चामी पंच पंचाग्नितेजसः
एकैकेन सहस्रेण पत्तीनां परिवारिताः ॥ ३ ॥
सहस्रैः पंचभिस्तद्वद्वृतो नारायणो द्विजः ।
क्षात्रेण कर्मणा ख्यातः सर्वेऽप्येते महायुधाः ॥ ४ ॥
बह्वायुधीयगहनां गहनांतरवर्तिनीम् ।
रयादवारयन्नेत्य परितः परवाहिनीम् ॥ ५ ॥

२–५ कमळोजी सोळंखे ( सौलक्षिकः ), येसाजी कंक, तानाजी मालुसरे, कोंडाजी वरखल आणि रामजी पांगारकर ( पांगारिकः ) हे पांच अग्नीप्रमाणें पांच तेजस्वी वीर एकेक हजार पायदळासह, तसाच पराक्रमानें प्रख्यात व पांच हजार पायदळासह असलेला नारायण ब्राह्मण अशा ह्या सर्वच महायोद्धयांनीं वेगानें येऊन अरण्याच्या मध्यभागीं असलेल्या, पुष्कळ योद्धयांची गर्दी असलेल्या शत्रुसेनेस चोहोंकडून घेरलें.

अत्रांतरे परेऽप्युच्चैः पटहेन प्रणादिना ।
हतोऽफजल इत्येव सहसा प्रतिबोधिताः ॥ ६ ॥
सज्जमानास्साभिमानान् संरब्धान् प्रतिरुंधतः ।
तान् पत्तीन् पर्वतोपांतादेतानैक्षंत सर्वतः ॥ ७ ॥

६–७ इतक्यांत शत्रूंनासुद्धां "अफजलखान मारला गेला" हीच गोष्ट कडाक्यानें वाजणाऱ्या दुंदुभीच्या योगे एकदम कळून ते सज्ज होत असतां

त्यांना पर्वताच्या बाजूवरून आलेलें अभिमानी, खवळलेलें व हल्ला करणारें तें पायदळ चोहोंकडे दिसलें.

निर्मदा इव मातंगा निर्विषा इव पन्नगाः ।
निरुष्णीषा इव नरा निःशृंगा इव भूधराः ॥ ८ ॥
निर्जीवना इव घनाः क्षितीशा इव निर्धनाः ।
विरेजिरे न यवनास्ते तदाफजलं विना ॥ ९ ॥

८–९ मदरहित हत्ती, विषरहित सर्प, पगडीरहित मनुष्य, शिखररहित पर्वत, जलरहित मेघ, आणि धनहीन राजे याप्रमाणे ते यवन अफजलखानाविणें त्या-समयीं शोभेनासे झाले.

तातस्याफजलस्यैतत् पतनं नभसो यथा ।
श्रुत्वा ध्वस्तधियस्तत्र मुमुहुस्तनयास्त्रयः ॥ १० ॥

१० आकाश कोसळून पडावें त्याप्रमाणें बाप अफजलखान पडलेला ऐकून त्याचे तिघे पुत्र नष्टबुद्धि होत्साते तेथें गोंधळून गेले.

नभस्वता प्रतीपेन भग्नपोता इवार्णवे ।
तदा ते जीवितस्याशामत्यजन् गहने वने ॥ ११ ॥

११ प्रतिकूल वाऱ्याच्या योगें समुद्रांत नौका फुटल्यामुळें तींतील लोक जसे जीविताची आशा सोडतात, तशी त्यांनीं त्या गहन अरण्यांत त्या समयीं जीविताची आशा सोडली !

अथ कृच्छ्रगतान् सर्वान् गतगर्वान् गतौजसः ।
सैन्यान्तर्वर्तिनस्सैन्यान् वीक्ष्य विद्रवतो निजान् ॥ १२ ॥
भक्तिमान् स्वामिनि मृधे शक्तिमानतिकोपनः ।
स्फुरदुद्घोणवदनः पृथुप्रसृतिलोचनः ॥ १३ ॥
क्रूरः करिकराकारकरः प्रतिभयस्वरः ।
स्थिरीकृत्य मुसेखानः पठानः स्वयमब्रवीत् ॥ १४ ॥

१२–१४ तेव्हां सैन्यामधील आपले सर्व सैनिक संकटांत सांपडल्या-मुळें हतगर्व व हतबल होत्साते पळूं लागलेले पाहून, स्वामीच्या ठायीं भक्तिमान व युद्धामध्यें शक्तिमान, अतिशय क्रुद्ध, नाक वर चढलेला व तोंड फुरफुरणारा, विस्तीर्ण पशाप्रमाणें डोळे असलेला, हत्तीच्या सोंडेप्रमाणें भुज व भयंकर स्वर असलेला असा मुसेखान पठाण त्यांस थांबवून स्वतः बोलूं लागला.

**मुसेखान उवाच**

**तृणीकृत्यात्मनः प्राणान् स्वामिकार्यचिकीर्षया ।**
**स गतोऽफजलस्तर्हि वयं सर्वेऽपि किं गताः ॥ १५ ॥**

मुसेखान म्हणाला—

१५ स्वामिकार्य करण्याच्या इच्छेनें आपला प्राण कस्पटासमान मानून अफजलखान जरी मेला, तरी आम्ही सर्वच मेलों कीं काय ?

**सर्वतः संवृतपथः पर्वतः क्व गमिष्यथ ।**
**आस्तिष्ठत प्रहरत प्रतीपान् परितः स्थितान् ॥ १६ ॥**

१६ चोहोंकडून पर्वतावरील मार्ग कोंडलेले आहेत; तेव्हां तुम्ही कोठें जाल? अरे ! उभे रहा आणि सभोंवतीं असलेल्या शत्रूंस मारा.

**स्वामिनं वा सखायं वा सहायं वा स्वमुज्झताम् ।**
**केषांचिदपि विद्रुत्य जीवतां मास्तु जीवितम् ॥ १७ ॥**

१७ आपल्या धन्यास, मित्रास, किंवा सोबत्यास सोडून पळून जाऊन जे कोणी आपला प्राण वांचवितील त्यांच्या जिण्याला धिक्कार असो !

**स्वामिकार्यमकुर्वाणः कुर्वाणस्त्राणमात्मनः ।**
**कथं दर्शयतु स्वीयं मुखमात्मजनांतिके ॥ १८ ॥**

१८ स्वामिकार्य न करितां आपलें रक्षण करणारा माणूस आपलें तोंड आपल्या लोकांस कसें दाखवूं शकेल ?

**विकरालं महाकालं करवालं करे वहन् ।**
**प्रसह्य विद्विषां सेनामिमां पातयितास्म्यहम् ॥ १९ ॥**

१९ अतिभयंकर, प्रलयकारक अशी तरवार हातीं धरून मी हें शत्रूचें सैन्य तडाख्यासरसें भुईस मिळविणार आहें.

**एवमुक्त्वा महाबाहुस्समारुह्य महाहयम् ।**
**संवृतः स्वेन सैन्येन शिबिरान्निर्ययौ रयात् ॥ २० ॥**

२० असें बोलून तो महाबाहु ( मुसेखान ) मोठ्या घोड्यावर चढून आपल्या सैन्यासह शिबिरांतून वेगानें बाहेर पडला.

**तमन्वियाय हसनः श्वसनप्रतिमो बली ।**
**अन्येपि सैन्यपतयः स्वस्वसैन्यसमन्विताः ॥ २१ ॥**

२१ वायूप्रमाणें वेगवान्, बलवान् हसन व दुसरेहि सेनानायक ( सरदार ) आपआपल्या सैन्यासह त्याच्या मागून गेले.

अन्तरादन्तुरानेकप्रसृतप्रस्तराविलम् ।
तुरंगमखुराघातोत्पतदग्निकणाकुलम् ॥ २२ ॥
स्यदत्स्खलत्पदपतज्जंघालजनसंकुलम् ।
अभूत् प्रचलने तेषां प्रचलं तन्महीतलम् ॥ २३ ॥

२२–२३ मधून मधून खडबडीत अशा अनेक विस्तीर्ण पाषाणांनीं व्याप्त, घोड्यांच्या खुरांच्या आघातांनीं उडणाऱ्या ठिणग्यांनीं पूर्ण, पाय घसरल्यामुळें किंवा अडखळल्यामुळें पडणाऱ्या चपल लोकांची गर्दी असलेली, अशी ती भूमि त्यांच्या हालचालीनें हादरून गेली.

अथ प्रतिभटान् वीक्ष्य संरब्धैरश्वसादिभिः ।
अप्यश्मवर्त्मसु रयात् पुरो नुनुदिरे हयाः ॥ २४ ॥

२४ तेव्हां शत्रुयोद्ध्यांस पाहून खवळलेल्या घोडेस्वारांनीं आपले घोडे खडकाळ रस्त्यांवरूनसुद्धां वेगानें पुढें घातले.

ततः पुरः प्रणुन्नाश्वो मुसेखानोऽत्यमर्षणः ।
तरस्वी प्रतिजग्राह पृषत्कैः परसैनिकान् ॥ २५ ॥

२५ नंतर अत्यंत क्रुद्ध व वेगवान मुसेखानानें आपला घोडा पुढें घालून शत्रुसैनिकांवर बाणांचा मारा केला.

हसनाद्यास्तथान्येऽपि क्रुद्धाः सर्वे धनुर्भृतः ।
शरैराकुलयांचक्रुः पुरस्थान परिपन्थिनः ॥ २६ ॥

२६ हसन इत्यादि दुसऱ्याहि सर्व क्रुद्ध धनुर्धरांनीं समोर असलेल्या शत्रूंस बाणांनीं जर्जर केलें.

तदा रोषारवैस्तेषां हयानां ह्रेषितैरपि ।
बृंहितैश्च महेभानां युद्धावेशोपबृंहितैः ॥ २७ ॥
चण्डदण्डाहतानां च पटहानां पटुस्वनैः ।
विविधानां च वाद्यानां निनादैर्भृशभीषणैः ॥ २८ ॥
तथाभितस्तरक्षूणां ऋक्षाणां वनपाक्षिणाम् ।
शार्दूलानां वृकाणां च खड्गिनां वनदंष्ट्रिणाम् ॥ २९ ॥

निर्गतानां दरीगर्भात् सद्यःक्षुभितचेतसाम् ।
कोलाहलैः सुबहुभिर्गगनोदरगामिभिः ॥ ३० ॥
प्रसभं पूरितात्युच्चैरटवी सातिसंकटा ।
प्रतिध्वानैः प्रतिभटानुद्भटान् बह्वतर्जयत् ॥ ३१ ॥

२७-३१ त्यावेळीं त्यांच्या क्रोधयुक्त शब्दांनीं, घोड्यांच्या खिंकाळण्यांनीं, मोठ्या हत्तींनीं युद्धावेशाने केलेल्या मोठ्या प्रचंड चीत्कारांनीं, दांड्यांनीं तडातड वाजविलेल्या नगाऱ्यांच्या तीव्र ध्वनींनीं, विविध वाद्याच्या अतिभयंकर आवाजांनीं, त्याचप्रमाणें सभोंवतालून एकदम खवळून दऱ्यांमधून बाहेर पडलेले, तरस, अस्वल, जंगली पक्षी, वाघ, लांडगे, गेंडे, रानडुक्कर याच्या गगनभेदी असंख्य कोलाहलांनीं अतिशय जोरानें भरून गेलेल्या त्या अति निबिड (दुर्गम) अरण्यानें प्रतिध्वनीच्या योगें मत्त शत्रुयोद्ध्यांना पुष्कळ धमकावलें.

शरैस्तीक्ष्णतरैर्विद्धा अप्यविद्धान पदातयः ।
तस्मिन् रणे मंडलाग्रैः क्षितिमंडलमानयत् ॥ ३२ ॥

३२ अत्यंत तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झालेल्या पायदळांनींहि त्या युद्धांत अविंधांना तरवारींनीं भुईस मिळविलें.

धावद्भिरसिधाराभिः शकलीकृतसैंधवाः ।
स्पर्धयेवाश्ववारास्तैः पत्तिभिः पत्तयः कृताः ॥ ३३ ॥

३३ धावणाऱ्या त्या पायदळांनीं घोडस्वारांच्या घोड्यांचे तुकडे करून त्यांना जणूं काय स्पर्धेनें पायदळच बनविलें.

कश्चित् परप्रहरणप्रहतो रुधिरारुणः ।
पतन्ननूरुस्सहसा सूर्यमंडलमासदत् ॥ ३४ ॥

३४ शत्रूंच्या शस्त्राचा प्रहार झाल्यामुळें रक्तानें लाल होत्साता खालीं पडून एकदम सूर्यलोकास गेला ( मृत्यु पावला ).

कश्चित् भीमेन वीरेण भिन्नोरुयुगमंडलः ।
सद्यस्सुयोधनदशामन्वभूद्वसुधां श्रितः ॥ ३५ ॥

३५ कोणाच्या मांड्या भयंकर वीरानें (वीर भीमानें) फोडल्यामुळें तो एकदम भूमीवर पडून दुर्योधनाची दशा अनुभविता झाला.

कश्चिन्नियुध्यतात्युच्चैर्द्विषता द्विदलीकृतः ।
वीरो विपर्यस्तवपुर्जरासंध इवापतत् ॥ ३६ ॥

३६ कोणा वीराचीं बाहुयुद्ध करणाऱ्या शत्रूनें दोन शकलें केल्यामुळें तो जरासंधाप्रमाणें उलटापालटा होऊन पडला.

गुळिकायत्रंनिर्मुक्तगुळिकाविद्धवक्षसः ।
केचिद्धृतधनुर्जीवा अपि निर्जीवतां दधुः ॥ ३७ ॥

३७ तोफांतून सुटलेल्या गोळ्यांनीं छाती विद्ध झालेले कांहीं वीर धनुष्याची दोरी (जीवा) हातात धरलेली असतांहि गतप्राण ( निर्जीव ) झाले.

तत्तल्लाघवमास्थाय प्रहरन् वै प्रभाविणम् ।
खड्गखेटकभृत् कश्चित् बभार बत गौरवम् ॥ ३८ ॥

३८ ढाल तरवार धारण करणारा कोणी वीर नाना प्रकारचें कौशल्य दाखवून पराक्रमी वीरावर प्रहार करीत असतां विलक्षण शोभूं लागला.

परितः पातितोदग्रतरवारितडिल्लताः ।
प्रावेपयंत यवनान् घनाः शिवपदातयः ॥ ३९ ॥

३९ शिवाजीच्या पायदळरूपी मेघांतून भयंकर तरवारीरूपी विजा चोहोंकडून पडल्यामुळें यवन थरथरां कांपूं लागले.

स्वमुखेन स्वयोधानां संमुखे यो व्यकत्थयत् ।
सोऽपि संख्ये मुसेखानः शूरैस्तैरभ्यभाव्यत ॥ ४० ॥

४० ज्यानें आपल्या योद्ध्यांच्या समोर स्वमुखाने बढाई मारली होती, त्या मुसेखानाचासुद्धां त्या शूरांनीं युद्धांत पराभव केला.

अथ ध्वस्तहये स्रस्तशस्त्रे वित्रस्तचेतसि ।
अपक्रामति संग्रामात् मुसेखानेऽभिमानिनि ॥ ४१ ॥
सद्यो यापितवैयात्ये याकुतेऽप्यपयायिनि ।
अत्याहितेन हसने व्यसनेषु निमज्जति ॥ ४२ ॥
भयशंकुवशे क्षिप्रमंकुशे विगतौजसि ।
मृदुभ्यामपकोषाभ्यां पदाभ्यामपसर्पति ॥ ४३ ॥
कातरौ भ्रातरौ हित्वा ज्यायानफजलात्मजः ।
विहाय सेनां चास्थाय रूपांतरमपासरत् ॥ ४४ ॥

४१–४४ मग घोडा नाश पावला, शस्त्रें गळालीं आणि मन घाबरलें अशी स्थिति होऊन त्या गर्विष्ठ मुसेखानानें युद्धांतून पाय काढला; याकुताचासुद्धां उद्धटपणा जिरविण्यांत आला तेव्हां त्यानेंहि पलायन केलें; मोठ्या

भीतिमुळें इसन संकटामध्यें मग्न झाला; भयभीत झाल्यामुळें कोमल पायांचा अंकुशखान हा नष्टसामर्थ्य होऊन अनवाणीच पसार झाला; घाबरलेल्या दोघां भावांस सोडून, सैन्य टाकून देऊन अफजलखानाचा वडील मुलगा वेषांतर करून पळून गेला.

ततस्तदेदिलानीकमपारमपनायकम् ।
पलायमानमभितः शिवसैन्यैर्न्यरुध्यत ॥ ४५ ॥

४५ नंतर आदिलशहाचें तें अफाट व नायकहीन सैन्य पळूं लागलें असत त्यास शिवाजीच्या सैनिकांनीं चोहोंकडून कोंडलें.

युध्यध्वं मां भृशबलं भ्रातरं शाहभूभुजः ।
मंबो वदन्निदं तत्र बत बंधादमुच्यत ॥ ४६ ॥

४६ " शहाजीराजाचा भाऊ जो मी भोसला त्या मजशीं युद्ध करा " असें मंबाजी म्हणत असतां तो तेथेंच जन्मबंधापासून मुक्त ( ठार ) केला गेला.

पौत्रः फरादखानस्य नाम्ना यो रणदूलहः ।
तेजसा तीव्रतीव्रेण सर्वेणापि सुदुःसहः ॥ ४७ ॥
साहसी शोणतनयः कोपी कोणपविक्रमः ।
युगदीर्घभुजो मानी घनसंहननो युवा ॥ ४८ ॥
स निजं प्रह्वयन्नेव शैलशृंगसमं शिरः ।
शिवसैन्यवशं यातो बत बंधमुपाददे ॥ ४९ ॥

४७-४९ अत्यंत तीव्र पराक्रमामुळें सर्वांनाच अति दुःसह, साहसी, शोणाचा पुत्र (शोणतनयः), रागीट, राक्षसाप्रमाणें पराक्रमी, जोखडाप्रमाणें दीर्घ भुज असलेला, मानी, दृढ शरीराचा, जवान असा जो फरादखानाचा नातू रणदुल्ला तो पर्वतशिखरासारखें आपलें शिर नमवितांच शिवराजाच्या सैन्याच्या ताब्यांत जाऊन कैद झाला.

सभयोऽबरखानस्य तनयोऽबरनामकः ।
तदा विवर्णवदनो बत जीवितकामुकः ॥ ५० ॥
विन्यस्तवर्मनिस्त्रिंशचर्मशक्तिशरासनः ।
शिवसैन्यवशं यातो बत बंधमुपाददे ॥ ५१ ॥

५०-५१ अंबरखानाचा पुत्र, भयभीत अंबर निस्तेज होत्साता जीव वांच-

विण्याच्या इच्छेनें कवच, खड्ग, ढाल, शक्ति आणि धनुष्य टाकून देऊन शिवाजीच्या सैन्याच्या ताब्यांत जाऊन कैद झाला.

**मतंगजवदुन्मत्तो राजजिन्नाम घांटिकः ।**

**शिवसैन्यवशं यातो बत बंधमुपाददे ॥ ५२ ॥**

५२ हत्तीप्रमाणें उन्मत्त असा राजाजी घाटगे हा शिवाजीच्या सैन्याच्या हातीं सांपडून कैद झाला.

**निजाग्रजपरित्यक्तौ यौ तावफजलात्मजौ ।**

**शिवसैन्यवशं यातौ बत बंधमुपेयतुः ॥ ५३ ॥**

५३ ज्यांना त्यांच्या वडील भावानें टाकलें ते अफजलखानाचे मुलगे शिवाजीच्या सैन्याच्या हातीं सांपडून कैद झाले.

**अन्येऽपि येदिलानीकनायकाश्छिन्नसायकाः ।**

**सहस्रिणो द्विसाहस्राः त्रिसाहस्राश्च भूरिशः ॥ ५४ ॥**

**पंचषट्सप्तसाहस्राः त्रिदशारिसमश्रियः ।**

**शिवसैन्यवशं याता बत बंधमुपाययुः ॥ ५५ ॥**

५४-५५ एकहजारी, दोनहजारी, तीनहजारी, पांचहजारी, सहाहजारी, सातहजारी असे दैत्यांसारखे आदिलशहाचे दुसरेहि पुष्कळ तेजस्वी सरदार ( सेनानायक ) बाण तोडले गेल्यामुळें शिवाजीच्या सैन्याच्या ताब्यांत जाऊन कैद झाले.

**पातितैश्च पतद्भिश्च पात्यमानैः पलायितैः ।**

**तद्वीराशंसनं वीरैरगमद्वर्णनीयताम् ॥ ५६ ॥**

५६ पाडलेल्या, पडणाऱ्या, पाडले जाणाऱ्या व पळालेल्या वीरांच्यायोगें अतिभयंकर अशी ती युद्धभूमि वर्णनीय झाली.

**पाशैः प्रासैश्चंद्रहासैः पट्टिशैश्च परश्वधैः ।**

**मुद्गरैः परिघैस्तद्वत् त्रिशूलैस्तोमरैरपि ॥ ५७ ॥**

**गदाभिश्शक्तिभिश्चापैर्निषंगैरिषुपूरितैः ।**

**खेटकैश्चापि चक्रैश्च छुरिकाभिः कटारकैः ॥ ५८ ॥**

**तनुत्रैश्च शिरस्त्रैश्च स्वर्णसारसनैस्तथा ।**

**तलत्रैरंगुलित्रैश्च यन्त्रैराग्नेयसंज्ञिकैः ॥ ५९ ॥**

आनकप्रमुखैर्वाद्यैः पताकाभिर्ध्वजैरपि ।
बिरुदैरातपत्रैश्च प्रकीर्णैश्च प्रकीर्णकैः ॥ ६० ॥
उल्लोचैः कांडपटकैरनेकैः पटमंडपैः ।
नैकवर्णैः सुविस्तीर्णैः महार्हक्षौमजन्मभिः ॥ ६१ ॥
त्रिपदैः करकैः स्थालैश्चषकैश्च पतद्ग्रहैः ।
चतुष्कैर्मंचकैश्चापि रूप्यकांचननिर्मितैः ॥ ६२ ॥
इतस्ततः परिस्रस्तैस्तैस्तैर्वस्त्रैश्च भूरिशः ।
अन्यैरपि महासैन्यसंभारैराभितः श्रिता ॥ ६३ ॥
विवृतास्यपरिस्पष्टदशनैः स्तब्धलोचनैः ।
शिरोभिर्विगतोष्णीषैरुग्रवेषवती क्वचित् ॥ ६४ ॥
आबाहुमूलात्पतितैर्धृतरत्नांगुलीयकैः ।
क्वचित्प्रसाधतांगीव कोमलांगुलिभिः करैः ॥ ६५ ॥
स्थूलस्थूणोपमैर्मूलाच्छिन्नैरुरुभिरूरुभिः ।
जानुजंघाग्रविभ्रष्टैरंघ्रिभिश्चोच्छ्रिता क्वचित् ॥ ६६ ॥
गृध्रैरुत्कृत्तमस्तिष्कग्रासग्रसनलंपटैः ।
पटुचंचूपुटैः पक्षप्रच्छायितपथा क्वचित् ॥ ६७ ॥
आपतन्निजयूथ्योग्रत्रस्यत्क्रोष्टुकुलाकुला ।
क्षतजोत्क्षेपणक्रीडड्डाकिनीमंडला क्वचित् ॥ ६८ ॥
दर्शितोदग्रदंताग्रनिकृत्तान्त्रवसामिषैः ।
स्नुतलोहितलिप्तांगैः पिशाचैश्चांचिता क्वचित् ॥ ६९ ॥
हरहारविधिप्रीतयोगिनी योगिनी क्वचित् ।
सा तदाधिगतार्थाभूज्जयवल्लीवनावनी ॥ ७० ॥

५७-७० पाश, भाले, तरवारी, पट्टे, फरस (परशु), मुद्गर, परिघ, त्रिशूळ, तोमर (रवीसारखें), गदा, शक्ति, धनुष्यें, बाणांचे भाते, ढाली, चक्रें, सुऱ्या, कट्यारी, कवचें, शिरस्त्राणें, सोन्याचे कमरपट्टे, चामड्याचे हात-मोजे, चामड्याचे पंजे, तोफा, दुंदुभ्यादि वाद्यें, पताका, ध्वज, बिरुदें, छत्र्या, इतस्ततः पडलेल्या चवऱ्या, छतें, कनाती, अनेक रंगी, अतिविस्तीर्ण अतिमूल्यवान असे अनेक रेशमी तंबू, तिवया, कळशा, हांडे, मद्याचे पेले,

पिकदाण्या, चौरंग, चांदीसोन्याचे पलंग, इतस्ततः पडलेलीं नानाप्रकारचीं पुष्कळ वस्त्रें आणि त्या मोठ्या सैन्याचें दुसरेंहि सामान यांनीं व्याप्त अशा त्या रणभूमीस -वासलेल्या तोंडांतून दांतांच्या कवळया स्पष्ट दिसणाऱ्या, निश्चल नेत्राच्या, बोडक्या ( पगडीरहित ) मुंडक्यांच्या योगें--कोठें भीषण स्वरूप प्राप्त झालें होतें; रत्नांच्या आंगठ्या असलेल्या, कोमल बोटांच्या, खांद्यापासून तुटून पडलेल्या हातांच्या योगें, कोठें जणूं काय शृंगारलेली होती; सांध्यापासून तोडलेल्या व मोठ्या खांबाप्रमाणें जाड मांड्या आणि गुडघे व घोटे यांच्या पासून निखळलेले पाय, यांच्या योगें कोठें उंच झाली होती; मेंदूचे तोडलेले लचके खाण्यांत गढलेल्या, तीक्ष्ण चोंचीच्या गिधाडांच्या पंखांच्या योगें तिच्यावरील वाटांवर कोठें सावली पडली होती; धावून येणाऱ्या आपल्या म्होरक्यांमुळें अतिशय भिणाऱ्या कोल्ह्यांच्या झुंडींनीं कोठें व्याप्त होती आणि कोठें रक्त उडवून खेळणाऱ्या डाकिनींचे घोळके होते; ज्यांनीं भयंकर दंताग्रांनीं आंतडीं, मेंदू व मांस तोडून बाहेर काढलीं आहेत व ज्यांचें अंग वाहणाऱ्या रक्तानें माखलेलें आहे अशा पिशाचांच्या योगें कोठें नटलेली होती; कोठें शंकराला हार घातल्यानें आनंदित झालेल्या योगिनींनीं युक्त होती; अशी ती जावळीची अरण्यभूमि त्या समयीं जयवल्ली या नांवास पात्र झाली.

इति जितपरानीकास्ते ते पदातिबलाधिपाः ।
प्रमुदितहृदस्सर्वे खर्वेतरस्मयसंगताः ॥
सरभसमथो बद्धानद्धा विरुद्धचमूपतीन् ।
पदि पदि पुरस्कुर्वन्तस्तांश्छिवं समलोकयन् ॥ ७१ ॥

७१ याप्रमाणें शत्रूचें सैन्य जिंकून ते पायदळाचे सर्व नायक हर्षभरित व अतिशय गर्वयुक्त झाले. मग वेगानें पक्के बद्ध केलेल्या त्या शत्रूसेनापतींना पदोपदीं पुढें ढकलीत त्यांनीं शिवाजीचें दर्शन घेतलें.

केचित् संयति पातिताः सकुतुकं केचिच्च विद्राविताः ।
संरब्धेन शिवेन ते प्रतिभटाः केचिच्च बंदीकृताः ॥
एतत्तत्र जगत्त्रयस्थितिपरे राजन्यलीलाधरे ।
दुष्टध्वंसकरे धराभयहरे चित्रं न विश्वंभरे ॥ ७२ ॥

७२ कांहीं युद्धांत लोळविण्यांत आले, तर कांहीं कौतुकानें पिटाळण्यांत आले आणि कांहीं शत्रुयोद्धे रागावलेल्या शिवाजीनें बंदींत टाकले. तीनहि लोकांचें

रक्षण करणाऱ्या, दुष्टांचा नाश करणाऱ्या, पृथ्वीचें भय नाहींसें करणाऱ्या व क्षात्र-लीला करणाऱ्या (क्षत्रियावतार धारण करणाऱ्या) विश्वंभराला हें आश्चर्य-कारक नाहीं.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां
शतसाहस्र्यां संहितायां अफजलसैन्यभंगो
नाम द्वाविंशोऽध्यायः ॥ २२ ॥

---

# अध्याय २३ वा



कवींद्र उवाच

अथ तत्तच्छिरोवेष्टश्लिष्टदोर्द्वयपृष्ठकान् ।
उष्णक्रान्तान्निरुष्णीषान्नमद्ग्रीवान् विचेतसः ॥ १ ॥
विकृष्टान् सैनिकैः स्वीयैः परसेनापतीन् पुरः ।
पुंजीभूतान् प्रतापाद्रौ शिवराजो व्यलोकत ॥ २ ॥

कवींद्र म्हणालाः—

१–२ नंतर ज्याच्या त्याच्या पटक्यानें दोन्ही हात पाठीमागें बांधलेले, उन्हानें म्लानवदन, बोडके, खालीं मान घातलेले, खिन्नमनस्क असे शत्रूकडील सरदार आपल्या सैनिकांनीं ओढून आणून, आपणासमोर गोळा केलेले शिवाजी राजानें पाहिले.

ततोऽरिसैन्यादानीतान् सौवर्णान् राजतान् पणान् ।
मञ्जूषान्तरनिक्षिप्तान् रत्नराशीननेकशः ॥ ३ ॥
तथा मुक्तामयान् हारान् हेमभारांश्च भूरिशः ।
स कुबेरगृहाकारे कोषागारे न्यथापयत् ॥ ४ ॥

३-४ मग शत्रूच्या सैन्यामधून आणलेलीं सोन्याचीं व चांदीचीं नाणीं, पेट्यांमध्यें ठेवलेल्या रत्नांच्या अनेक राशी, तसेच मोत्यांचे हार आणि सोन्याचे पुष्कळ ढीग त्यानें कुबेराच्या वाड्यासारख्या आपल्या कोषागारांत ठेवविले.

मनीषिण ऊचुः

अलीशाहस्य तां सेनां सहितः पत्तिसेनया ।
जयवल्लीवनांभोधौ न्यमज्जयदयं शिवः ॥ ५ ॥
तावत्सेनापतिस्तस्य सहितः सप्तिसेनया ।
क नु स्थितो किमकरोत् कवींद्र तदुदीरय ॥ ६ ॥

पंडित म्हणालेः—

५–६ पायदळासह असलेल्या ह्या शिवाजी राजानें अलीशहाचें तें सैन्य जावळीच्या

अरण्यसागरांत बुडविलें; तोंपर्यंत त्याचा सेनापति घोडदळासह कोठें वरें होता आणि त्यानें काय केलें तें, हे कवींद्रा, सांग.

कवींद्र उवाच

बलादफजलं नाम दनुजं हन्तुमुद्यतः ।
प्रस्थितोऽमित्रविजयी जयवल्लीं यदा शिवः ॥ ७ ॥
तदा तदाज्ञया तूर्णं प्रस्थितः पृतनापतिः ।
द्विषां बबंध राष्ट्राणि बभंज नगराणि च ॥ ८ ॥

कवींद्र म्हणाला:--

७-८ अफझलखान नामक दानवास ( यवनास ) बळानें मारण्यास सज्ज होऊन शत्रुजेता शिवाजी जेव्हां जावळीकडे निघाला, तेव्हां त्याच्या आज्ञेनें सेनापतीनें त्वरित निघून शत्रूचे प्रांत हस्तगत केले आणि नगरें उध्वस्त केलीं.

अस्मिन्नवसरे स्वामिकार्यैकनिहितात्मना ।
वैराटवार्तिना तेन यवनेनाभिमानिना ॥ ९ ॥
प्रहिताः स्वहिताः सैन्यपतयस्तीव्रविक्रमाः ।
उपचक्रमिरे शैवं राष्ट्रमाक्रमितुं क्रमात् ॥ १० ॥

९-१० इकडे ज्यानें स्वामिकार्यामध्येंच आपले प्राण वेंचिले त्या वाई येथील गर्विष्ठ यवनानें ( अफझलखानानें ) पाठविलेले आपलें हित करणारे व महापराक्रमी असे सरदार शिवाजीचा देश क्रमानें आक्रमूं लागले.

यादवः शूर्पविषयं पांडरश्च शिरोबलम् ।
खराटः साहसवटं हिलालः पुण्यनीवृतम् ॥ ११ ॥
हपसः सैफखानश्च परसैनिकसंकटम् ।
प्रविश्य निग्रहेणैव जग्राह तलकोंकणम् ॥ १२ ॥

११-१२ जाधवानें सुपें प्रांत, पांडऱ्यानें शिरवळ, खराट्यानें सासवड, हिलालानें पुणें प्रांत हबशी सैफखानानें मराठ्यांनीं व्यापलेलें तळकोंकण यांमध्यें शिरून निग्रहानें ते प्रांत घेतले.

ततः शिवस्य सेनानी श्रुत्वा तां देशदुःस्थताम् ।
कृतामायोधनपरैः परैरफजलाज्ञया ॥ १३ ॥
सहितः सप्तिभिः सप्तसाहस्रैः पत्तिभिस्तथा ।
संपरायपरः श्रीमान् स्वामिकार्याभियोगवान् ॥ १४ ॥

परावृत्य महाबाहुर्महाबाहुजिगीषया ।
प्रायात् पतगराड्रंहाः शिवराष्ट्रमनामयम् ॥ १५ ॥

१३–१५ तेव्हां अफजलखानाच्या आज्ञेनें युद्धपरायण शत्रूंनीं देशाची केलेली दुर्दशा ऐकून, युद्धोत्सुक, प्रख्यात (श्रीमान्), स्वामिकार्यनिष्ठ, पराक्रमी, गरुडाप्रमाणें वेगवान असा शिवाजीचा सेनापति सात हजार घोडदळ, तसेंच पायदळ यांसह परतला आणि त्या पराक्रमी सरदारांस जिंकण्याच्या इच्छेनें शिवाजीच्या सुखसंपन्न ( दुःखरहित ) देशांत गेला.

खराटं पांडरं चाथ यादवं च सुदुर्जयम् ।
हिलालं सैफखानं च विधास्ये शमनातिथिम् ॥ १६ ॥
सेनापतेरिमां संधां समाकर्ण्य शिवः स्वयम् ।
तस्मै निजेन दूतेन द्रुतमेतदवेदयत् ॥ १७ ॥

१६-१७ "खराटे, पांडरे, अजिंक्य जाधवराव, हिलाल आणि सैफखान यांस मी यमसदनास पाठवितों" अशी ( आपल्या ) सेनापतीची प्रतिज्ञा ऐकून शिवाजीनें स्वतः आपल्या दूतांकरवीं त्यास त्वरित असें कळविलें कीं,

यवनोऽफजलो नाम दानवो दुरतिक्रमः ।
जयवल्लीमिमामेति ससैन्यः संधिकाम्यया ॥ १८ ॥

१८ "अफजलखान–नामक दुर्जय यवन दानव सैन्यासह तह करण्याच्या इच्छेनें ह्या जावळीस येत आहे.

तस्मात्त्वया न योद्धव्यं तस्य तैः सैनिकैः समम् ।
संनद्धेनैव च स्थेयं यावत्संधिविनिर्णयः ॥ १९ ॥

१९ म्हणून त्या तहाचा निर्णय होईपर्यंत तूं त्याच्या सैनिकांशीं युद्ध करूं नकोस पण सज्ज मात्र राहा.

भवेदहन्यथो यस्मिन् मम तस्य च दर्शनम् ।
तस्मिन्नेवांतिके कुर्यास्त्वं वैराटमसंशयम् ॥ २० ॥

२० आणि ज्या दिवशीं त्याची व माझी भेट होईल, त्याच दिवशीं तूं वाईस निःसंशयपणें जावेंस."

इत्यादिष्टः स्पष्टमेव स परं शिवभूभृता ।
नायुध्यत परैः सार्धं मध्य एव व्यवास्थितः ॥ २१ ॥

२१ याप्रमाणें शिवाजी राजानें स्पष्ट आज्ञा केल्यामुळें पुढें शत्रूंशीं न लढतां तो मध्येंच राहिला.

अथ युद्धमभूद् यस्मिंश्छिवाफजलयोर्द्वयोः ।
वैराटमाययौ सैन्यपतिस्तस्योत्तरेऽहनि ॥ २२ ॥

२२ पुढें ज्या दिवशीं शिवाजी व अफजलखान या दोघांमध्यें युद्ध झालें, त्याच्या पुढच्या दिवशींच सेनापति ( नेताजी पालकर ) वाईस आला.

तेन ते न धृतास्तेन विद्रुताः सर्वतोदिशम् ।
मुसेखानप्रभृतयो दुर्धर्षास्त्रिदषाद्विषः ॥ २३ ॥

२३ त्यानें धरले नाहींत, म्हणून ते मुसेखानप्रभृति दुर्जय दानव ( यवन ) दाही दिशांस पळाले.

**मनीषिण ऊचुः**

स आरोहः सोऽवरोहः स पन्थाः सा महावनी ।
स विरोधी स परिधिः सा निशा स पराभवः ॥ २४ ॥
स वेषः स च संत्रासावेशः साप्यसहायता ।
जयवल्लीपरिसदादमी कथमपासरन् ॥ २५ ॥

पंडित म्हणाले:—

२४-२५ ती ( खडी ) चढण ! ती ( घसरगुंडी ) उतरण ! ती ( बिकट ) वाट ! तें महारण्य ! तो ( भयंकर ) शत्रु ! तो घेर ! ती भीषण रात्र ! तो पूर्ण पराभव ! ती कापाकापी ! ती घाबरगुंडी ! आणि ती असहाय स्थिति ! असें असतां ते (अफजलसैन्य) जावळीच्या समंतात् प्रदेशांतून कसे पळाले ?

**कवींद्र उवाच**

पातितेऽफजले तस्मिंश्छिवेन शिवपत्तयः ।
पलायमानानभितो यवनान् पर्यवारयन् ॥ २६ ॥

कवींद्र म्हणाला:—

२६ त्या अफजलखानास शिवाजीनें ठार केलें असतां पळणाऱ्या यवनांस शिवाजीच्या पदातींनीं चोहोंकडून घेरलें.

मुसेखानश्च हसनो याकुतश्चांकुशस्तथा ।
नासहन्त परं तत्र परैः कृतमतिक्रमम् ॥ २७ ॥

२७ मुसेखान, हसन, याकुत, आणि अंकुश यांस शत्रूंनीं केलेला मोठा अपमान सहन झाला नाहीं.

अपराह्णे महानासीत् तेषां तेषां च संगरः ।
प्रोत्पतन्निपतद्धातिमहोत्पातभयंकरः ॥ २८ ॥

२८ तिसऱ्या प्रहरीं त्यांच्या त्यांच्यामध्यें म्हणजे मुसलमान व मराठे यांच्यामध्यें वर उडणाऱ्या व खालीं पडणाऱ्या शस्त्रांच्या मोठ्या उत्पातामुळें भयंकर असा मोठा संग्राम झाला.

सा शैलभूमिः पत्तीनां हिता वै नाश्वसादिनाम् ।
यवनास्ते ततो भग्नाः संमग्नाः साध्वसार्णवे ॥ २९ ॥

२९ तो डोंगराळ प्रदेश पदातींस अनुकूल पण घोडेस्वारांस प्रतिकूल होता. म्हणून त्या यवनांचा मोड होऊन ते भीतिसागरांत मग्न झाले.

परस्परैकमनसः पालयन्तः परस्परम् ।
द्विषदभ्यागमधिया वीक्षमाणा दिशो दश ॥ ३० ॥
अतीव तुंगान् मातंगांस्तुरगान् सुमनोहरान् ।
अपारान् कोषसंभारान् परिवारान् प्रियानपि ॥ ३१ ॥
विहायापसृतास्तस्मात् समरादमरारयः ।
ताम्यन्तस्तामसाधियस्ते तरूनतरांतरा ॥ ३२ ॥
भ्रमन्तः कातरतराः परेषां दृगगोचराः ।
कंटकाविद्धसर्वांगाः क्षतजार्द्राः क्षतौजसः ॥ ३३ ॥
शिलाशीर्णोरुपर्वाणो मार्गान्वेषणतत्पराः ।
पुरः प्रतापवर्माणं चंद्रराजस्य बांधवम् ॥ ३४ ॥
वित्रस्तं वंचितदृशं द्वित्रैरेव जनैर्वृतम् ।
द्राग् विद्रवंतमद्राक्षुरक्षुद्राः क्षुद्रताजुषः ॥ ३५ ॥

३०–३५ एकमेकांशीं एकचित्त होऊन, एकमेकांचें रक्षण करीत, शत्रु अंगावर येईल या बुद्धीनें दाही दिशांस पाहात ते अति धिप्पाड दानव (यवन) हत्ती, अति सुंदर घोडे, अपार कोष ( खजिना ) आणि प्रिय परिवारसुद्धां टाकून त्या युद्धांतून पळाले. खिन्न झालेले, तामसबुद्धीचे, झाडांच्या मधून भटकणारे, अत्यंत घाबरलेले, शत्रूंची दृष्टि चुकविणारे कांट्यांनीं सर्वांग विद्ध झालेले, रक्तानें भिजलेले,नष्टबल झालेले, दगडांवर ढुंगण व गुडघे फुटलेले,मार्ग शोधण्यांत गढलेले, अक्षुद्र पण क्षुद्र बनलेले अशा त्या यवनांनीं, घाबरलेला, दृष्टि विफल झालेला, दोनतीनच माणसें बरोबर असलेला व त्वरेनें पळत सुटलेला असा चंद्ररावाचा भाऊ प्रतापराव समोर पाहिला.

अथायुधभृतः सर्वे सद्यःक्षुभितमानसाः ।
निहंतव्योऽयमित्युच्चैर्ब्रुवन्तस्ते तमब्रुवन् ॥ ३६ ॥

३६ तेव्हां सर्व सैनिक एकदम खवळून जाऊन "ह्यास मारलें पाहिजे" असें मोठ्यानें म्हणत ते त्यास बोलले:—

पुरा कर्णेजपीभूय पुनः पुनरुपेयुषा ।
मिथ्यानुलापिना नित्यं निजच्छद्मापलापिना ॥ ३७ ॥
त्वयैवानीयाफजलः स महानीकनायकः ।
सहसा सहितोऽस्माभिः कालानलमुखे हुतः ॥ ३८ ॥

३७-३८ पूर्वी चुगलखोर म्हणून वारंवार येऊन, नेहमीं खोटें बोलून व आपलें कपट छपवून त्या महासेनापति अफजलखानास आणून आमच्यासह त्याची प्रलयाग्नीच्या मुखांत एकदम आहुति दिलीस.

एवमुक्तवतस्तांस्तु हन्तुमुद्यमितायुधान् ।
स निबद्धांजलिः क्रुद्धान् प्रणनाम पुनः पुनः ॥ ३९ ॥

३९ याप्रमाणें बोलून मारण्यासाठीं शस्त्रें उगारलेल्या व क्रुद्ध अशा त्या सैनिकांस त्या प्रतापराव मोऱ्यानें हात जोडून पुनः पुनः प्रणाम केला.

मुसेखानस्ततस्तत्र दृष्ट्वा काकुरवाकुलम् ।
ऊचे करुणयैवेनं नीचीकृतनिजस्वरः ॥ ४० ॥

४० नंतर तेथें त्यास काकुळतीच्या स्वरानें बोलतांना पाहून मुसेखानानें आपला स्वर हलका करून त्यास अगदीं करुणापूर्वक म्हटलें:—

मुसेखान उवाच

तव दृष्टचरैवेयमटवी गाढसंकटा ।
अतोऽस्मानग्रतो भूत्वा नय केनचिदध्वना ॥ ४१ ॥

मुसेखान म्हणाला:—

४१ हें गहन व दुर्गम अरण्य तूं पूर्वी पाहिलेलेंच आहे. म्हणून पुढें होऊन (आमचा मार्गदर्शक होऊन) कोणत्या तरी मार्गानें आम्हांस बाहेर घेऊन चल.

वैराटं विषयं गत्वा वयं त्वामात्मदायिनम् ।
सौहृदादुपकर्तारः सखायमिव सुव्रतम् ॥ ४२ ॥

४२ वाई प्रांतास गेल्यावर आम्ही तुज प्राणदात्यावर एकनिष्ठ मित्राप्रमाणें प्रेमानें उपकार करूं.

स इमां गिरमाकर्ण्य मुसेखानमुखोद्गताम् ।
तथेति संप्रतिश्रुत्य भृशविश्रब्धमानसः ॥ ४३ ॥

केनाप्यज्ञायमानेन दृष्टपूर्वेण वर्त्मना ।
द्राक्तान् निष्क्रामयामास शिवस्य विषयाद्बहिः ।। ४४ ।।

४३–४४ मुसेखानाच्या तोंडून निघालेले हे शब्द ऐकून 'तसें करितों' असें वचन देऊन अत्यंत निश्चित होत्साता तो प्रतापराव कोणासहि माहीत नसणाऱ्या व पूर्वी पाहिलेल्या वाटेनें त्यांस शिवाजीच्या प्रांतांतून त्वरित बाहेर घेऊन गेला.

तथाविधानुजत्यागाल्लज्जितोऽफजलात्मजः ।
विन्यस्तपूर्वान् वैराटे तातेनाश्वांश्च कुंजरान् ।। ४५ ।।
संभारानवरोधांश्च कोषान् योधांश्च कांश्चन ।
आदाय दूयमानात्मा द्रुतमस्माद्विनिर्ययौ ।। ४६ ।।

४५–४६ तशा प्रकारें धाकट्या भावास टाकून आल्यानें लज्जित झालेला अफजलखानाचा पुत्र, बापानें पूर्वी वाईस ठेवलेले हत्ती, घोडे, सामग्री, जनाना, खजिना व कांहीं योद्धे घेऊन दुःखित अंतःकरणानें तेथून त्वरित निघून गेला.

अनुद्रुत्यापि नाद्राक्षीद्यदा तान् द्रुतविद्रुतान् ।
तदा सेनापतिर्नेता पुनर्वैराटमागमत् ।। ४७ ।।

४७ वेगानें पळून चाललेल्या त्यांचा पाठलाग करूनसुद्धां जेव्हां त्यांची गांठ पडली नाहीं, तेव्हां सेनापति नेताजी पालकर हा पुनः वाईस आला.

शिवोऽपि विहितद्वेषादल्लीशाहात्सुदुर्मतेः ।
बली बलेन विषयं क्षिप्रमादातुमुद्यतः ।। ४८ ।।
प्रस्थानभेरीझांकारझांकारितदिगंतरः ।
प्रभावी बहुभिः सैन्यैर्वैराटं स्थानमासदत् ।। ४९ ।।

४८–४९ बलाढ्य व प्रतापी शिवाजीहि आपला द्वेष करणाऱ्या व अत्यंत दुष्टबुद्धि अल्ली आदिलशाहापासून बलानें देश झटपट हस्तगत करण्यास उद्युक्त होऊन, प्रस्थानदुंदुभीच्या निनादानें दिशा दुमदुमवून, बरोबर पुष्कळ सैन्य घेऊन वाईस प्राप्त झाला.

अथ स्वेन प्रभावेण कृष्णातटमकंटकम् ।
कृतं व्यलोकत मुदा मोदितो मुदितैर्द्विजैः ।। ५० ।।

५० तेव्हां आपल्या प्रभावानें कृष्णाथडी निष्कंटक झालेली व ब्राह्मण आनंदित झालेले पाहून त्यास आनंद झाला.

ततोऽग्रयायिनं कृत्वा स तं सेनापतिं निजम् ।
अन्यमाक्रमितुं देशमुपाक्रमत विक्रमी ।। ५१ ।।

५१ मग आपल्या त्या सेनापतीस पुढें पाठवून त्या पराक्रमी शिवाजीनें दुसरा देश आक्रमण करण्यास आरंभ केला.

ततस्तु तस्य सैन्यानि परसैन्येन पालितौ ।
पर्यमंडलयंश्छैलावुभौ चंदनवंदनौ ॥ ५२ ॥

५२ पुढें शत्रुसैन्यानें रक्षिलेल्या चंदनवंदन ह्या दोन्ही किल्ल्यांस त्याच्या सैन्यांनीं वेढा दिला.

स नृपः श्रीपतिः साक्षादद्राक्षीदालयं श्रियः ।
श्र्यालयं नाम नगरं नामनिर्वासिताहितः ॥ ५३ ॥

५३ साक्षात् लक्ष्मीपति असा तो राजा केवळ नांवानेंच शत्रूंस पळवून लावून लक्ष्मीचें आगर असें जें श्र्यालय नांवाचें नगर तेथें प्राप्त झाला.

ततोऽफजलविध्वंसादवसन्नावनाश्रयौ ।
भृशं भृशबलानीकैः पुण्यदेशादपासितौ ॥ ५४ ॥
उभौ नायकनामानौ राजानौ यादवान्वितौ ।
खेलकर्णक्रीतपुत्रं हिलालं विश्रुतं क्षितौ ॥ ५५ ॥
पुरस्कृत्याभयं प्राप्य प्रपद्य च महाशयम् ।
न्यषेवेतां विशेषेण शिवतातिममुं शिवम् ॥ ५६ ॥

५४-५६ नंतर अफजलखानाच्या नाशामुळें धैर्य गळालेल्या, निराधार झालेल्या, नायक नांवाच्या दोघां राजांस जाधवरावासह भोंसल्यांच्या सैन्यानें पुणें प्रांतांतून पिटाळून लावल्यामुळें त्यांनीं, खेलकर्णाचा क्रीतपुत्र जो प्रसिद्ध हिलाल त्यास पुढें करून, ( त्याच्याद्वारें ) अभयदान मिळवून, थोर मनाच्या व अत्यत कल्याणकारक ( दयाळू ) शिवाजीस शरण येऊन त्याचा आश्रय केला.

उपायनान्युपानीय नमतस्तान् महाभुजान् ।
आत्मनीनतया श्रीमांश्छिवः श्रीभिः समार्धयत् ॥ ५७ ॥

५७ नजराणे अर्पण करून प्रणाम करणाऱ्या त्या बलवान् ( पराक्रमी ) सरदारांस श्रीमान् शिवाजीनें आपलेपणानें संपत्ति देऊन समृद्ध केलें.

अथ खट्वांगकं मायावनीं रामपुरं पुनः ।
कलधौतं बाल्वं च तथा हलजयंतिकाम् ॥ ५८ ॥

अष्टिं चाष्टं वटग्रामं वेलापुरमुदुंबरम् ।
मसूरं करहाटं च शूर्पं ताम्रं च पल्लिकाम् ॥ ५९ ॥
नेरलं कामनगरीं विश्रामपुरमप्युत ।
सवाहमूरणं कोलं करवीरपुरं तथा ॥ ६० ॥
बलैराक्रम्य स बली बलीनादाय भूरिशः ।
प्रयच्छन्नभयं वीरो न्यदधान्निजशासने ॥ ६१ ॥

५८–६१ नंतर खटाव ( खट्वांगक ), मायणी (मायावनी), रामापूर, कलेढोण ( कलधौत ), वाळवें ( वाल्लव ), हलजयंतिका, अष्टी ( अष्टि ), अष्टें ( अष्टं ), वडगांव ( वटग्राम ), वेलापूर, औदुंबर ( उदुंबरं ), मसूर, कऱ्हाड, सुपें ( शूर्पं ), तांबे ( ताम्रं ), पाली ( पल्लिका ), नेरलें, कामेरी ( कामनगरी ), विसापूर ( विश्रामपुरं ), सावे ( सवाहं ), उरण, कोळें ( कोलं ), आणि कोल्हापूर ( करवीरपुरं ) ह्या स्थळांवर बलवान वीरानें सैन्यांसह हल्ला करून त्यांजपासून पुष्कळ खंडणी घेतली आणि त्यांस अभय देऊन तीं स्थळें आपल्या सत्तेखालीं आणिलीं.

ततो न्यस्य यथान्यासं परितः स्वां पताकिनीम् ।
सहसा स महीपालः प्रणालं शैलमावृणोत् ॥ ६२ ॥

६२ मग आपलें सैन्य सभोंवतीं योग्य रीतीनें ठेवून त्या राजानें पन्हाळगडास अचानक वेढा दिला.

परिमंडलितं वीक्ष्य शैलं शैलाधिवासिनः ।
क्षिप्रं वप्रमुपाश्लिष्य जगर्जुर्जलदा इव ॥ ६३ ॥

६३ गडास वेढा पडलेला पाहून गडकरी ताबडतोब तटावर चढून मेघांप्रमाणें गर्जना करूं लागले.

ते शस्त्रवर्षैः सोत्कर्षैः पृथुवर्ष्मभिरश्मभिः ।
परानवाकिरन्नुग्रतरैरुल्काशरैरपि ॥ ६४ ॥

६४ त्यांनीं असंख्य शस्त्रांचा, प्रचंड दगडांचा व भयंकर उल्का बाणांचा ( दारूच्या ) शत्रूंवर पाऊस पाडला.

भूमानमागतैर्धूमैर्नालायन्नाननोद्गतैः ।
नभोंतकारितमभूद् भृशमंभोधरैरिव ॥ ६५ ॥

६५ तोफांच्या तोंडांतून निघून पसरणाऱ्या धुराच्या लोटांनीं मेघांप्रमाणें आकाश अगदीं आच्छादून टाकलें.

**आग्नेययंत्रोदरनिःसृतानां नवोदितार्कप्रभविग्रहाणाम् ।**
**कदंबकैरायसकंदुकानां कुतूहलान्यादित संगरश्रीः ॥६६॥**

६६ नुकत्याच उगवलेल्या सूर्यबिंबाप्रमाणें लाल अशा, तोफांमधून सुटणाऱ्या लोहगोलांच्या वर्षावानें युद्धास आश्चर्यकारक शोभा प्राप्त झाली.

**तडित्समानाः सुतरां रणन्तः प्रोत्क्षिप्यमाणाः शिवसैनिकौघैः ।**
**उल्काशरास्तत्र तथा निपेतुः परे यथा चेतसि नो चिचेतुः ॥६७**

६७ विजेप्रमाणें अतिशय कडाडणारे, शिवाजीच्या सैनिकांनीं वर फेंकलेले उल्काबाण तेथें इतके पडले कीं, शत्रूंना त्यांची कल्पनाहि करवेना !

**अथायुधीयाः शिवभूमिपीयाः तं शैलमध्यारुरुहुर्बलेन ।**
**निषिध्यमाना अपि तैः समस्तैः द्विषद्भिरुध्दूनितहेतिहस्तैः ॥६८**

६८ नंतर शस्त्रें फिरविणाऱ्या त्या समस्त शत्रूंकडून अडविले जात असतांहि शिवरायाचे योद्धे त्या गडावर जोरानें चढले.

**उत्पत्य तत्रापततां समन्तात् तार्क्ष्यक्रमाणां शिवसैनिकानाम् ।**
**क्रूरैः कृपाणैर्निशितैश्च बाणैः प्राणैर्व्ययुज्यन्त बत प्रतीपाः ॥ ६९ ॥**

६९ चोहोंकडून उड्या मारुन हल्ला करणारे व गरुडाप्रमाणें वेगवान अशा शिवसैनिकांच्या घातुक ( भयंकर ) तरवारींनीं व तीक्ष्ण बाणांनीं शत्रूंचे प्राण घेतले.

**शरैः शिवानीकचरप्रयुक्तैर्निपेतुषा शैलजुषा जनेन ।**
**मन्येऽधमर्णप्रतिमेन भर्त्रे प्रत्यर्पितोऽभूदशितो धनौघः ॥ ७० ॥**

७० शिवसैनिकांनीं सोडलेल्या बाणांच्या योगें मरणाऱ्या गडकऱ्यांनीं--जणूं काय ऋणकोप्रमाणें भोगलेलें धन धनकोस परत दिलें !

**सह्यस्य भर्ता द्विषतामसह्यस्तेभ्यो गृहीतं सपदि प्रसह्य ।**
**अध्यास्य विंध्याचलतुल्यकायं प्रभुः प्रणालाचलमैक्षतायम्॥७१॥**

७१ शत्रूंना असह्य अशा त्या सह्याद्रीच्या स्वामीशिवाजीनें त्यांच्यापासून बळानें तत्काळ घेतलेल्या त्या विंध्याचलतुल्य पन्हाळगडावर आरूढ होऊन तो पाहिला.

**दर्पादेत्य प्रणालाचलशिरसि शिवः सैनिकैरात्मनीनैः ।**
**न्यस्यंस्तस्मिन्ननीकं दिनमिव निखिलां यामिनीं तामतीत्य ॥**

प्राकारागारवापीविलसदुपवनापारकासारगुर्वीम् ।
दृष्टां दृष्टां मुहुस्तां श्रियमतुलतरां पार्वतीयामपश्यत् ॥ ७२ ॥

७२ आपल्या सैनिकांसह पन्हाळगडावर गर्वानें येऊन तेथें सैन्य ठेवून शिवाजीनें ती सबंध रात्र दिवसाप्रमाणें घालवून तट, वाडे, विहिरी, सुंदर बागा, अपार तलाव यांच्या योगें वृद्धिंगत अशी ती गडाची अप्रतिम शोभा वारंवार पाहिलेली असूनहि पुनः पाहिली.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरकवीन्द्रपरमानन्द-
प्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां प्रणालाद्रिग्रहो
नाम त्रयोविंशोऽध्यायः ॥ २३ ॥

---

# अध्याय २४ वा

:o:

मनीषिण ऊचुः

ते तदायोधनात् तस्मान्निधनाभावकांक्षया ।
सहसा विमुखीभूता मुसेखानपुरोगमाः ॥ १ ॥
हीनाः स्वीयेन सैन्येन ह्रीणाश्चाफजलं विना ।
किमकुर्वत किं मत्वा गत्वा विजयपत्तनम् ॥ २ ॥

पंडित म्हणाले:—

१–२ तेव्हां आपलें मरण चुकावें ह्या इच्छेनें त्या युद्धांतून एकदम परतून (पळ काढून) स्वसैन्यरहित व अफजलखान नसल्यानें लज्जित अशा त्या मुसेखानप्रभृति सरदारांनीं विजापुरास जाऊन काय विचार केला आणि काय केलें ?

निशम्याफजलस्यांतं प्रणालाद्रिग्रहं तथा ।
स्वयं पुनः किमकरोद्येदिलो भृशबालिशः ॥ ३ ॥

३ अफजलखानाचा अंत झाल्याचें व पन्हाळगड घेतल्याचें ऐकून अतिमूर्ख आदिलशहानें स्वतः पुनः काय केलें ?

तं च शैलं समादाय बलादफजलांतकः ।
स विश्वविजयी वीरश्चरितं किंविधं व्यधात् ॥ ४ ॥

४ आणि तो गड बळानें घेतल्यावर अफजलखानाच्या वधकर्त्या त्या विश्वजेत्या वीरानें काय केलें ?

कवींद्र उवाच

मुसेखानः फाजिलेन याकुतेनांकुशेन च ।
हसनेन च संभूय निजेनाभिजनेन च ॥ ५ ॥
विजयाह्वं पुरं गत्वा नत्वा स्वामिनमात्मनः ।
प्रह्वग्रीवः पुरोवर्ती बद्धांजलिपुटोऽभवत् ॥ ६ ॥

५–६ फाजल, याकुत, अंकुश, हसन आणि आपला परिवार यांसह मुसेखान विजापुरास जाऊन, आपल्या धन्यास प्रणाम करून, मान खालीं घालून पुढें हात जोडून उभा राहिला.

येदिलस्तमथोद्वीक्ष्य विषीदंतमधोमुखम् ।
जगाद गर्वगर्भाभिर्गीर्भिरुत्साहयन् भृशम् ॥ ७ ॥

७ तो खिन्न व अधोवदन आहे असें पाहून आदिलशहा गर्वयुक्त भाषणानें त्यास उत्तेजन देत म्हणाला.

येदिल उवाच

सहसा साहसात् स्वामिकार्यव्ययितजीवितः ।
स यातस्तां दशां तर्हि न यातः शोचनीयताम् ॥ ८ ॥

आदिलशहा म्हणालाः—

८ एकदम साहस केल्यामुळें स्वामिकार्यामध्यें प्राण वेंचिलेल्या त्या (अफजलखाना)ला जर ती दशा प्राप्त झाली, तर तो शोचनीय झाला असें नाहीं.

कृतहस्तः स्वयं तत्र कुसृतिप्रकृतिः परः ।
तमेकाकिनमाहूय हतवान् विजने वने ॥ ९ ॥

९ स्वतः तरबेज–निष्णात व कपटी स्वभावाच्या शत्रूनें त्यास तेथें एकटा बोलावून निर्जन अरण्यांत ठार मारलें.

यद्ययास्यत् तदा तत्र सेनामादाय भूयसीम् ।
असावजलस्तर्हि नायास्यत् तादृशीं दशाम् ॥ १० ॥

१० जर त्या वेळीं तो अफजलखान मोठें सैन्य घेऊन तेथें गेला असता, तर त्याला तशी दशा प्राप्त झाली नसती.

न हि साहसमात्रेण सिद्धिमायान्त्युपक्रमाः ।
अलं फलाय महते सनयाः किल विक्रमाः ॥ ११ ॥

११ केवळ साहसानेंच कामें सिद्धीस जात नाहींत; तर शहाणपणाचे पराक्रमच खरोखर मोठे फलप्रद होतात.

विपिनेऽफजलं तत्र यो हन्त हतवान् रुषा ।
आशीविष इवोच्छीर्षगतो नोपेक्ष्य एव सः ॥ १२ ॥

१२ अरेरे ! त्या वनांत अफजलखानास ज्यानें क्रोधानें मारलें, त्याची उशापाशीं असलेल्या सर्पाप्रमाणें मुळींच उपेक्षा करतां कामा नये.

अविषह्यतमं तस्मात् तमागस्करमात्मनः ।
शल्यतुल्यं सह्यशैलादुद्धरिष्यामि सर्वथा ॥ १३ ॥

१३ म्हणून माझा अपराध करणाऱ्या त्या अत्यंत दुःसह शिवाजीस सह्याद्रीपासून साफ उखडून काढतों.

बत प्रस्थाय वैराटमास्थितः सोऽपि संप्रति ।
सद्यः समुह्य सैन्यानि प्रणालाद्रिमुपैष्यति ॥ १४ ॥

१४ अहो ! सध्यां तोहि निघून वाईस आला आहे. लगेच सैन्य घेऊन तो पन्हाळगडावर येईल.

निगदंति प्रणिधयः किंवदंतीमिमामिह ।
तस्मात् सर्वेऽप्यभिक्रम्य कुरुध्वमतिविक्रमम् ॥ १५ ॥

१५ अशी वदंता हेर येथें सांगत आहेत. म्हणून तुम्ही सर्वच चालून जाऊन मोठा पराक्रम करा.

तत्तद्देशजुषस्तांस्तानानाय्यानीकनायकान् ।
परनिग्रहणायोच्चैर्जागरूकानिव ग्रहान् ॥ १६ ॥
साहाय्याय समुन्नद्धान् संदोह्यान्यांश्च सैनिकान् ।
अहर्दिवमविश्रांताः प्रयात पतगा इव ॥ १७ ॥

१६–१७ शत्रूंचा नाश करण्यास ग्रहांप्रमाणें अत्यंत जागरूक असे त्या त्या प्रांतांतील ते ते सेनानायक आणवून आणि दुसऱ्याहि अभिमानी सरदारांस साह्यार्थ पाठवून तुम्हीं पक्ष्यांप्रमाणें रात्रंदिवस अविश्रांतपणें चाल करा.

फरादसूनुसूनुर्हि नाम्ना यो रुस्तुमेजनः ।
स पृथुप्रधनश्लाघी पृतनापतिरस्तु नः ॥ १८ ॥

१८ फरादखानाचा नातू महायुद्धाभिमानी रुस्तुमजमान हा आमचा सेनाधिपति असूं दे.

इत्युक्तास्तेन सर्वेऽपि सत्कृताश्च यथोचितम् ।
तमात्मनः परिवृढं प्रणिपत्य प्रभाविणम् ॥ १९ ॥
ते सैन्यपतयस्तस्मात् पुरात् विजयसाह्वयात् ।
कृतक्ष्वेडारवोदग्राः समग्रा अपि निर्ययुः ॥ २० ॥

१९–२० याप्रमाणें त्या सर्वांसच बोलून त्यानें त्यांचा यथोचित सत्कार केला असतां ते सर्वच सरदार आपल्या सामर्थ्यवान स्वामीस प्रणाम करून भयंकर गर्जना करीत विजापुरांतून बाहेर पडले.

अथ संप्रेषितचरा चरास्ते येदिलांतिके ।
तमुदन्तं प्रणालाद्रेर्द्रुतमेत्य न्यवेदयन् ॥ २१ ॥

२१ नंतर पूर्वींच पाठविलेल्या हेरांनीं आदिलशहाजवळ त्वरित येऊन ती पन्हाळगडासंबंधाची बातमी सांगितली.

निशम्य येदिलस्तेन नरेंद्रेण करे कृतम् ।
अन्वशोचत् तमचलं फणी फणमिवोन्नतम् ॥ २२ ॥

२२ आपली उंच फणा गारुड्यानें पकडली असतां सापास जसें दुःख वाटतें, तसा तो उत्कृष्ट गड त्या राजानें (शिवाजीनें) हस्तगत केलेला ऐकून आदिलशहास दुःख झालें.

तमद्रिमद्रिपतिना शिवेन स्ववशीकृतम् ।
अलीशाहोऽन्वहं चित्ते चिंतया पर्यतप्यत ॥ २३ ॥

२३ गडांचा स्वामी जो शिवाजी त्यानें तो गड काबीज केलेला ऐकून अल्लीशहा दररोज चिंतेनें मनांत पोळूं लागला.

अथात्मानमपर्याप्तं मन्वानस्तद्विनिग्रहे ।
द्रुतमानाययामास दिल्लीपतिपताकिनीम् ॥ २४ ॥

२४ तेव्हां त्याचा निग्रह करण्यास आपण असमर्थ आहों असें समजून त्यानें दिल्लीच्या बादशहाची सेना लवकरच मदतीस आणविली.

शिवराजोऽपि तच्छ्रुत्वा घनसंनाहशालिनः ।
परसैन्यपतीन् भूयः संपरायाभिलाषिणः ॥ २५ ॥
नियुज्य पृतनामुग्रां प्रणालाचलपालने ।
स्वयमुत्साहवानुच्चैरुत्सुकस्तज्जिगीषया ॥ २६ ॥
स्फुरद्धेतिशतोदग्रदवाग्निसमविभ्रमैः ।
सैन्यैः समन्वितस्तैस्तैः पुरस्तात् तरसाभवत् ॥ २७ ॥

२५-२७ तेव्हां शिवाजीनेंहि शत्रूकडील दृढ युद्धवेषधारी सरदार पुनः युद्ध करूं इच्छीत आहेत असें ऐकून पन्हाळगडच्या रक्षणार्थ उग्र (कडवें) सैन्य ठेवून जातीचा उत्साहवान् व त्यांना जिंकण्याच्या इच्छेनें अत्युत्सुक असा तो लखलखणाऱ्या शेंकडों शस्त्रांच्यामुळें भयंकर वणव्याप्रमाणें शोभणाऱ्या त्या त्या सैन्यांसह वेगानें पुढें चालून गेला.

परेऽपि रुस्तुमं नाम पृतनाधिपतिं निजम् ।
सुदुर्धरं पुरस्कृत्य साभिमानाः पुरोऽभवन् ॥ २८ ॥

२८ शत्रूंनींसुद्धां रुस्तुम नांवाच्या आपल्या अत्यंत दुर्जय सेनाधिपतीच्या नेतृत्वाखालीं अभिमानानें पुढें चाल केली.

अथ वीक्ष्य सुदुर्धर्षां परवीरपताकिनीम् ।
रुस्तुमः फाजिलादीन् स्वान् यूथनाथानवोचत ॥ २९ ॥

२९ तेव्हां शत्रुवीरांची ( मराठ्यांची ) सेना अजिंक्य आहे असें पाहून रुस्तुम फाजलप्रभृति आपल्या सेनानायकांस म्हणालाः—

रुस्तुम उवाच

पश्यत प्रसभं व्यूढां प्रतिपक्षचमूमिमाम् ।
सन्नाहिनीं महोत्साहां धीरामुल्लासितध्वजाम् ॥ ३० ॥

रुस्तुम म्हणालाः—

३० शस्त्रास्त्रांनीं सज्ज, दुष्कर कृत्यें करणारी, अत्यंत उत्साही, धैर्यवान, झगझगीत तेजस्वी निशाणें असलेली, मजबूत व्यूह रचलेली ही शत्रुसेना पहा.

सन्त्यस्यां हि महावीराः सीरायुधसमश्रियः ।
प्रत्यात्मान इवानेके शिवस्यातुलतेजसः ॥ ३१ ॥

३१ हिच्यामध्यें बलरामासारखे महावीर अतुलपराक्रमी शिवाजीचीं जणूं काय अनेक प्रतिबिंबेंच आहेत.

स एष शिवसेनानीर्नेता नाम प्रतापवान् ।
योत्स्यते भृशमस्माभिरभिमानभृतां वरः ॥ ३२ ॥

३२ तो हा शिवाजीचा सेनापति प्रतापी, महामानी नेताजी आमच्याशीं निकरानें लढूं इच्छीत आहे.

तथा यादवराजोऽपि व्यूढकंकटको युवा ।
प्रभूतकटकः क्रुध्यन्नस्मानभिबुभूषति ॥ ३३ ॥

३३ त्याचप्रमाणें कवचधारी, पुष्कळ सैन्यानें युक्त, रागावलेला असा तरुण जाधवरावसुद्धां आमचा पराभव करूं इच्छीत आहे.

खराटः खर्वितारातिबलः प्रबलसाहसः ।
सूनुना हनुमन्नाम्ना सहितोऽस्मान् जिगीषति ॥ ३४ ॥

३४ शत्रुसेना छिन्नभिन्न करून टाकणारा, प्रचंड साहसी खराटे हा आपल्या हणमंत नांवाच्या पुत्रासह आम्हांस जिंकूं इच्छितो.

पांडवप्रतिमो युद्धे पांडरः पांडरध्वजः ।
बलस्य महतो भर्ता कर्ता समरमद्भुतम् ॥ ३५ ॥

३५ युद्धांमध्यें अर्जुनासारखा, पांढरें निशाण असलेला, मोठ्या सैन्याचा अधिपति पांढरे आमच्याशीं अद्भुत युद्ध करणार.

करवालकरः कालः कालज्वलनभीषणः ।
करिष्यति हिलालोऽपि भृशं भृशबलप्रियम् ॥ ३६ ॥

३५ खड्गधारी, प्रलयाग्निप्रमाणें भयंकर, प्रत्यक्ष काळच असा काळा हिलालसुद्धां भोसल्याचें अत्यंत हित करील.

महसां राशिरिंगालो हीरवर्मा महाभुजः ।
तथा व्याघ्रो भीमनामा प्रवारः सिद्धजित् तथा ॥ ३७ ॥
गोदो नाम महावीरो जगत्स्थापकवंशजः ।
तथा परशुरामोऽपि महाद्रिककुलोद्भवः ॥ ३८ ॥
अपरेऽपि महानीकनाथाः प्रधनपारगाः ।
शिवराजस्याभिसराः प्रसरन्ति पुरः पुरः ॥ ३९ ॥

३७–३९ तेजोराशि, महाबाहु हिराजी इंगळे, भिमाजी वाघ, सिधोजी पवार, महावीर गोदाजी जगताप, जणू काय दुसरा परशुरामच असा महाडिक, तसेच दुसरे युद्धनिपुण मोठमोठे सेनानायक शिवाजी राजाचे साह्यकर्ते पुढें चालून येत आहेत.

स्वयं भृशबलो राजा शिवोऽपि रिजराजहः ।
अमरप्रतिमः कामं समरं पारयिष्यति ॥ ४० ॥

४० शत्रुराजांचा हन्ता, देवतुल्य शिवाजी राजा भोसला हा स्वतः युद्ध खास जिंकणार.

तदद्धास्माकमप्येते यूथनाथाः समन्ततः ।
संव्युह्य वाहिनीं स्वां स्वां तिष्ठन्तु मृधमुर्धानि ॥ ४१ ॥

४१ म्हणून खरोखर ह्या आमच्या सेनानायकांनीदेखील सर्व बाजूंस आपआपल्या सैन्यांची चांगली रचना करून युद्धाच्या अघाडीस उभें राहावें.

पालयिष्याम्यहं मध्यभागमद्धा महायुधाः ।
सव्यं पार्श्वमनीकस्थः फाजिलोऽवतु विक्रमी ॥ ४२ ॥

४२ हे महायोद्धयांनो, मी खास मध्यभागाचें रक्षण करतों; पराक्रमी सरदार फाजल डाव्या बगलेचें रक्षण करूं दे.

मलीक इतबाराह्वः सादातेन समन्वितः ।
पालयत्वपरं पार्श्वे पृतनायाः पृथुस्मयः ॥ ४३ ॥

४३ आणि महागर्विष्ठ--मलिक इतबार सादातासह सेनेच्या उजव्या बगलेचें रक्षण करूं दे.

अजीजखानतनयः फतेखानो महायशाः ।
तथा मुल्लाहयाह्वोऽस्तु पार्ष्णिग्राहक्रियापरः ॥ ४४ ॥

४४ अजीजखानाचा पुत्र महाकीर्तिमान फत्तेखान आणि मुल्लाहय हे पिछाडीचें रक्षण करूं देत.

संताभिधो घोरफटः सर्जेराजश्च घांटिकः ।
सन्नद्धाः सैनिकाश्चान्ये पालयन्त्वभितश्चमूम् ॥ ४५ ॥

४५ संताजी घोरपडे, सर्जेराव घाटगे आणि दुसरे सज्ज योद्धे यांनीं चोहोंकडून सेनेचें रक्षण करावें.

इत्युक्तास्तेन ते सर्वे यथास्थानमवस्थिताः ।
पालयामासुरव्यग्राः समग्रामपि वाहिनीम् ॥ ४६ ॥

४६ ह्याप्रमाणें त्यानें त्यांस सांगितल्यावर ते सर्व आपआपल्या स्थानीं राहून समग्र सेनेचें अव्यग्रपणें रक्षण करूं लागले.

तदानीमेव भूपालः शिवोऽपि निजवाहिनीम् ।
व्यूहयन्नभितो योधानवोचदुचितं वचः ॥ ४७ ॥

४७ त्याच वेळीं शिवाजीराजानेंसुद्धां आपल्या सेनेची सभोंवती रचना करीत योद्ध्यांना उद्देशून समयोचित भाषण केलें.

नेता फाजिलमभ्येतु चतुरंगचमूपतिः ।
प्रयातु परवीरघ्नो व्याघ्रो मुल्लाहयाह्वयम् ॥ ४८ ॥

४८ चतुरंग सेनेचा अधिपति हा नेताजी फाजलावर हल्ला करूं दे. शत्रुवीरांना मारणारा वाघ मुल्लाहयावर चाल करूं दे.

मलीकमितबाराख्यमिंगालोऽप्यभिसर्पतु ।
महाद्रिको महामानी फतेखानेन युध्यतु ॥ ४९ ॥

४९ मलिक इतबारावर इंगळे चालून जाऊं दे. महामानी महाड्किकानें फत्तेखानाशीं लढावें. सिधोजी पवारानेंसुद्धां सादातास तोंड द्यावें. गोदाजी हा घाटगे व घोरपडे यांजवर चालून जाईल.

प्रवारवंश्यः सिद्धोऽपि सादाताभिमुखोऽचतु ॥
गोदस्तु घांटिकं घोरफटं च प्रतियास्यति ॥ ५० ॥

अहं तु रुस्तुमं नाम यवनानीकनायकम् ।
सादयिष्यामि समरे शूरं नासीरवर्तिनम् ॥ ५१ ॥

५१ आणि अघाडीस असलेल्या रुस्तुम नामक शूर यवन सेनाधिपतीस मी युद्धांमध्यें ठार करीन.

दक्षिणेन च सैन्यस्य खराटः पांडरोऽपि च ।
हिलालो यादवश्चोभावितरेणाभिगच्छताम् ॥ ५२ ॥

५२ खराटे व पांढरे ह्यांनीं सैन्याच्या उजव्या बाजूवर आणि हिलाल व जाधव ह्या दोघांनीं डाव्या बाजूवर चालून जावें.

इत्युक्तवति राजेंद्रे तद्योधास्ते महायुधाः ।
समं दुंदुभिनादेन सिंहनादान् वितेनिरे ॥ ५३ ॥

५३ याप्रमाणें राजेंद्र ( शिवाजी )नें भाषण केल्यावर त्याच्या त्या महापराक्रमी योद्ध्यांनीं दुंदुभिध्वनिबरोबरच सिंहगर्जना केली.

ततो भूरिप्रभेदानां दुंदुभीनामनेकशः ।
ऋचकानां काहळानां पणवानां च सर्वशः ॥ ५४ ॥
गोमुखानां च शृंगाणामनीकद्वयवर्तिनाम् ।
निध्वानः पुष्कराध्वानमावृणोद्दीर्णदिङ्मुखः ॥ ५५ ॥

५४-५५ नंतर पुष्कळ प्रकारचे दुंदुभि, ऋचक (रणवाद्यविशेष), कर्णे, ढोल, गोमुख ( मृदंगविशेष ), शिंगें, अशा दोन्ही सैन्यांतील रणवाद्यांच्या दिशा दणाणून सोडणाऱ्या ध्वनीनें आकाश व्यापून टाकलें.

अग्रतः प्रचलन्तीनां पताकानां समंततः ।
कान्तिभिः सकलं व्योम तदा किर्मीरतां दधौ ॥ ५६ ॥

५६ अग्रभागीं चालणाऱ्या पताकांच्या चोंहोंबाजूस फांकणाऱ्या तेजानें सर्व आकाश चित्रविचित्र दिसूं लागलें.

ते ततोऽत्यर्थमुद्वेले स्वनन्त्यौ भृशभीषणे ।
पूर्वापरार्णवनिभे पृतने समसज्जताम् ॥ ५७ ॥

५७ नंतर मर्यादांबाहेर अतिशय उसळणाऱ्या, गर्जना करणाऱ्या, अतिभयंकर अशा पूर्व व पश्चिम समुद्रांसारख्या त्या सेना परस्परांशीं भिडल्या.

आवेशादथ भुजदंभदत्तचित्तैः
अभ्यर्णागतपृतनाद्वयाग्रयोधैः ।

गर्जद्भिः सकुतुकसंप्रणोदिताश्वैः
धाराभिः समरधराभिषिच्यते स्म ॥ ५८ ॥

५८ मग एकमेकांच्या संनिध आलेल्या त्या दोन्ही सैन्यांच्या अघाडींतील बाहुबलगर्विष्ठ योद्ध्यांनीं आवेशानें गर्जना करीत व उत्सुकतेनें घोडे फेंकीत रुधिरधारांनीं रणभूमि भिजविली ( रणभूमीस स्नान घातलें ).

आधावत्तुरगखुरोत्थरेणुधारा-
संभाराकुलितमिहांतरेऽतरिक्षम् ।
संप्राप्ते घनसमये वहन्नवांभः-
संपृक्तं सर इव धूसरं बभूव ॥ ५९ ॥

५९ इतक्यांत धावणाऱ्या घोड्यांच्या खुरांनीं उडालेल्या धुळीच्या लोटांनीं व्यापलेलें अंतरिक्ष, पावसाळ्याच्या आरंभीं वाहणाऱ्या नव्या पाण्यानें भरलेल्या सरोवराप्रमाणें गढूळ झालें.

तं वृष्टेः समयमुदीक्ष्य दीर्घसारैः
आसारैर्नवजलदैरिव प्रकामम् ।
धावद्भिः सपदि धनुर्धरैरनेकैः
बाणौघैर्गगनतलं बताप्यधायि ॥ ६० ॥

६० तो वृष्टीचा समय ओळखून नवीन मेघांनीं जोराच्या सरींनीं आकाश जसें अगदीं आच्छादून टाकावें तसें धावणाऱ्या धनुर्धरांनीं अनेक शरवृष्टींनीं तें एकदम पूर्णपणें झांकून टाकलें.

यावत् स्वं रिपुमवलोक्य लब्धहर्षः
कोदण्डं किल युधि कश्चिदाचकर्ष ।
तावत् तत्करधृतभल्लभिन्नहस्तः-
तच्चित्रं यदजनि तत्र नो विहस्तः ॥ ६१ ॥

६१ आपला शत्रु पाहून हर्ष झालेल्या कोणा वीरानें, युद्धामध्यें धनुष्य ओढलें तोंच त्याच्या ( शत्रूच्या ) हातांतील भाल्यानें त्याचा हात भेदिला गेला असतांहि तो तेथें गोंधळला नाहीं हें आश्चर्य होय !

संग्रामांगणभुवि भूरिकीर्तिपुष्पा-
ण्यादातुं सपदि धनुर्लतां विकृष्य ।

ते शूराः करकलया शिलीमुखानां
संदोहं द्रुतमुदपातयन् परेषु ॥ ६२ ॥

६२ रणभूमीवरील विपुल कीर्तिरूप पुष्पें तोडण्यासाठीं धनुष्यरूपी लता तत्काळ ओढून त्या वीरांनीं हस्तकौशल्याने बाणरूपी भ्रमरांच्या झुंडी शत्रूंवर वेगानें उडविल्या.

अभ्येतप्रतिभटचंडचंद्रहास-
प्रौढिम्ना द्रुतमपमूर्धतां प्रपद्य ।
श्लिष्यद्भिः क्षितिमपि बद्धमुष्टिभावा-
न्नोन्मुक्ताः क्वचन पताकिभिः पताकाः ॥ ६३ ॥

६३ चालून आलेल्या शत्रुयोद्ध्यांच्या तीक्ष्ण तरवारींच्या प्रभावानें मुंडकीं वेगानें तुटून जाऊन भूमीवर पडणाऱ्या पताकावाल्यांनींसुद्धां, मुठी आवळलेल्या असल्यामुळें पताका मुळींच कोठेंहि सोडल्या नाहींत.

आगच्छन् गुरुतरगर्वमर्ववाहैः
संसृज्य द्रुतकृतसंगरावगाहैः ।
संरंभादभिजगृहेऽग्रगैरनेकैः
सैन्यौघैः स्वयमथ रुस्तुमः शिवेन ॥ ६४ ॥

६४ युद्धामध्यें त्वरेनें घुसलेल्या घोडेस्वारांसह मिळून मोठ्या गर्वानें चालून येणाऱ्या रुस्तुमखानावर अघाडीच्या अनेक पथकांसह शिवाजीनें स्वतः त्वेषानें हल्ला केला.

कर्षन्तः सपदि धनूंषि सप्रकर्षं
युध्यन्तः शिवसुभटाः शरैरमोघैः ।
क्रुद्धानामभिपततां महायुधानां
म्लेच्छानामदयमपातयंच्छिरांसि ॥ ६५ ॥

६५ तत्काळ धनुष्यें जोरानें ओढून अमोघ बाणांनीं लढणाऱ्या शिवाजीच्या उत्तम योद्ध्यांनीं खवळलेल्या व हल्ला करणाऱ्या महायुधधारी म्लेच्छांचीं मुंडकीं दया न दाखवितां पाडलीं.

सोल्लासं भृशबलसैन्यपातितानां
दंभोलिप्रकृतिभृतां बतायुधानाम् ।
संघातं कथमपि सेहिरे न तस्मिन्
संमर्दे सुमहति रुस्तुमायुधीयाः ॥ ६६ ॥

६६ भोंसल्यांच्या सैन्यानें उत्साहानें फेंकलेल्या वज्रासारख्या आयुधांचा समूह रुस्तुमाचे योद्धे त्या अति प्रचंड झुंजामध्यें मुळींच सहन करूं शकले नाहींत.

तिष्ठन्तं करटिकदंबदुर्गदेशे
गर्जन्तं घनमिव फाजिलं तदोच्चैः ।
आक्रामन् मरुदिव सर्वतो बलीयान्
उद्भ्रान्तं शिवपृतनापतिर्व्यधत्त ॥ ६७ ॥

६७ गजसमूहरूपी दुर्गामध्ये उभा असलेल्या व मेघाप्रमाणें प्रचंड गर्जना करणाऱ्या फाजलावर प्रचंड वाऱ्याप्रमाणें सर्व बाजूंनीं हल्ला चढवून शिवाजीच्या बलाढ्य सेनापतीनें त्यास गर्भगळीत केलें.

नेतारं भृशबलभूपवाहिनीनां
नेतारं कुपितमुदीक्ष्य फाजिलोऽद्धा ।
उच्चैरुच्चरितपदां पपाठ नांदीं
प्रारंभे द्रुतमपयानरूपकस्य ॥ ६८ ॥

६८ शिवाजीच्या सैन्यांचा नेता जो नेताजी तो खवळलेला पाहून फाजलानें खरोखर प्रारंभींच पलायनरूपी नाटकाची नांदी मोठ्यानें त्वरित म्हटली म्हणजे प्रथमारंभींच वेगानें पलायन केलें.

रत्नाढ्याभरणविभूषिता युवानः
संग्रामाङ्गणभुवि लोहितांगरागाः ।
अन्येभ्यो भयमपहाय केऽपि वीर-
श्रीयुक्ताः शरशयनेषु शेरते स्म ॥ ६९ ॥

६९ रत्नखचित अलंकारांनीं विभूषित व रक्ताची उटी लावलेले कांहीं तरुण वीर दुसऱ्यांचें भय टाकून वीरश्रीनें युक्त असे रणांगणामध्यें शरशय्यांवर पहुडले.

संग्रामे महति खराटकेन केचित्
योद्धारः सपदि च पांडरेण केचित् ।
विध्वस्ताः स्वयमथ यादवेन केचित्
व्याघ्रेण स्वयमभिपत्य चापि केचित् ॥ ७० ॥

७० त्या महासंग्रामामध्यें कांहीं योद्धे खराट्यानें, कांहीं पांढऱ्यानें, कांहीं स्वतः जाधवानें, कांहीं स्वतः वाघानें हल्ला करून तत्काळ ठार केले.

सोत्साहं प्रधनमपरो महोग्रकर्मा
विक्रम्यामृणदहितान् स हीरवर्मा ।
क्रोधाग्निप्रसृमरधूमधूम्रधामा
कांश्चित्तानथ हतवान् हिलालनामा ॥ ७१ ॥

७१ त्या अतिउग्रकर्म्या युद्धोत्सुक हिराजीनें ( हरिवर्म्यानें ) उत्साहानें हल्ला करून शत्रूंचा चुराडा केला. क्रोधाग्नीपासून पसरणाऱ्या धुराने ज्याची कांति धुरकटली आहे अशा हिलालानें कांहींना ठार केलें.

स्वं शस्त्रं विजहति रुस्तुमे वियाते
संग्रामात् सपदि च फाजिलेऽपयाते ।
सादातप्रमुखमनीकमव्यवस्थं
त्रातारं कमपि निजस्य नाध्यगच्छत् ॥ ७२ ॥

७२ उद्धट रुस्तुमानें आपलें शस्त्र टाकलें असतां व फाजलानें युद्धांतून एकदम पळ काढला असतां गोंधळ उडालेल्या सादातप्रमुख सैन्याला आपला त्राता कोणीहि मिळाला नाहीं.

अथ समरसदेशात् पंचषैरश्ववारैः
अपसरति विहस्ते रुस्तुमे भंगभाजि ।
भृशमशरणमलीशाहसैन्यं समस्तं
व्यधित दशदिगंतप्रेक्षणायासमाशु ॥ ७३ ॥

७३ तेव्हां पराभूत झालेला व गोंधळून गेलेला रुस्तुमखान पांचसहा घोडे-स्वारांसह युद्धामधून पळाला असतां अत्यंत असहाय असें अलीशहाचे समस्त सैन्य दाही दिशा शीघ्र पळत सुटलें.

तदनु शिवनृपस्तं प्राप्तभंगं पुरस्तात्
प्रसभमपसरन्तं रुस्तुमं त्रस्तमुच्चैः ।
निकटगमपि नैव न्यग्रहीन्निग्रहार्हं
न हि विदधति भीरौ शूरतां सूर्यवंश्याः ॥ ७४ ॥

७४ त्यानंतर, पराभव पावलेल्या, अत्यंत घाबरलेल्या, समोरून वेगानें पळून जाणाऱ्या त्या रुस्तुमास तो निकट असतांहि व पकडण्यास योग्य असतांहि शिवाजीनें पकडलें नाहींच. कारण सूर्यवंशी राजे भित्र्यावर शौर्य गाजवीत नाहींत.

येऽस्मानप्यपहाय हन्त समरे सद्योपयाताः स्वयं
भूयोऽप्याश्रयितुं त्रपाविरहितान् लज्जामहे तान् वयम्।
मन्वानाः सुतरामितीव हृदये ते येदिलानीकिनी-
मत्तेभाः सबलं शिवं भृशबलं भेजुः शरण्यं प्रभुम् ॥७५॥

७५ "जे आम्हांस युद्धांत सोडून स्वतः लगेच पळून गेले त्या निर्लज्जांचा पुनः आश्रय करण्याची आम्हांस लाज वाटते" असाच जणूं काय मनांत पक्का विचार करून त्या आदिलशहाच्या सेनेंतील मत्त हत्तींनीं शरणांगतांचें रक्षण करणाऱ्या बलाढ्य भोसले राजाचा आश्रय केला (ते शिवाजीच्या हातीं लागले).

सोत्साहोत्सवशिवसंहृतप्रतीप-
प्रस्रस्ताभरणगणप्रभानुभावैः।
कर्षन्ती सकुतुकलोकलोचनौघं
सौभाग्यं किमपि बभार सा मृधश्रीः ॥ ७६ ॥

७६ उत्साहानें व आनंदानें शिवाजीनें मारलेल्या शत्रूंच्या अंगांतून पडलेल्या अलंकारांच्या राशींच्या तेजःप्रभावानें, लोकांचे नेत्र कौतुकानें आकर्षिणाऱ्या त्या समरश्रीला कांहीं अवर्णनीय शोभा प्राप्त झाली.

प्रयत्नप्रोन्मज्जत्तुरगशतविज्ञातहृदयां
गभीरां गर्जन्तीं प्रतिभयतरामुद्धतरयाम्।
प्रवाहप्रौढिम्ना सपदि परिपूर्णोभयतटां
कबंधानां श्रेणी कथमथ ततारास्रसरितम् ॥ ७७ ॥

७७ प्रयत्नानें (प्रयासानें) बाहेर पडणाऱ्या शेंकडों घोड्यांस जिचें अंतरंग माहीत आहे अशी ती खोल, गर्जना करणारी, अति भयंकर, अद्भुत वेग असलेली, प्रवाहाच्या वाढीमुळें लगेच दुथडी भरून चाललेली रक्ताची नदी धडांच्या रांगेनें कशी बरें ओलांडिली?

इत्थं स रुस्तुममुखान् विमुखान् विधाय
देशं च तं नरपतिः स्वकरे निधाय।
ढक्कारवेण मधुरेण दिगंगनानां-
उल्लासयन्नुदलसद्वदनांबुजानि ॥ ७८ ॥

७८ याप्रमाणें रुस्तुमप्रभृति शत्रूंस पळवून लावून, तो प्रांत हस्तगत करून महादुंदुभीच्या मधुर ध्वनींनें दिशारूपी स्त्रियांचीं मुखकमलें उल्लसित करीत शिवाजी राजा झळकूं लागला.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरकवींद्रपरमानंद-
प्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां रुस्तुमादि
भंगो नामाध्यायः ॥ २४ ॥

# अध्याय २५ वा



कवींद्र उवाच

रुस्तुमादीन् विनिर्जित्य वितत्य च सितं यशः ।
शिवोऽल्लीशाहविषयं वशमानेतुमंजसा ॥ १ ॥
संप्रेष्य महतीं सेनां सेनापतिसमन्विताम् ।
स्वयं पुनः प्रणालाद्रिमवेक्षितुमुपागमत् ॥ २ ॥

कवीन्द्र म्हणाला:—

१–२ रुस्तुमखानप्रभृतींना पराभूत करून, आपली धवल कीर्ति पसरून अल्लीशहाचा मुलूख तावडतोब ताब्यांत आणण्याकरितां सेनापतीबरोबर मोठी सेना पाठवून शिवाजी स्वतः पुनः पन्हाळगडाची देखरेख करण्यास गेला.

सोऽपि सेनापतिर्नेता शिवराजानियोजितः ।
येदिलस्याशु तद्राष्ट्रं वशीचक्रे महायशाः ॥ ३ ॥

३ त्या महाविख्यात सेनापति नेताजीनेहि शिवराजाच्या आज्ञेवरून आदिलशहाचा तो मुलूख हां हां म्हणतां ताब्यांत आणला.

कपित्थं बदरग्रामं मल्लग्रामं च कुंडलम् ।
गोहग्रामं सतीकीरमेडं च मिरजं तथा ॥ ४ ॥
गोकाकं दुग्धवाटं च पुरं मुरवटं पुनः ।
धारावटं महादुर्गं क्षुद्रवंद्यपुरं तथा ॥ ५ ॥
श्यामग्रामं मायिलं च पारग्रामं च संगलम् ।
काणदं कर्दमवटं कागलं ह्रीबलं तथा ॥ ६ ॥
हनुवल्लीं हूणवटं रायबाकं हुकेरिकाम् ।
कांडग्रामं हरिद्रां च घुणिकां किणिकामपि ॥ ७ ॥
अरगं तिलसंगं च केरूरं चांबुपं पुनः ।
कामलापुरसंयुक्तामतनीं च त्रिकूटकम् ॥ ८ ॥
एतान्यन्यानि च महापत्तनानि पुराणि च ।
निगृह्य निग्रहाभिज्ञो निन्ये नेता स्वनिघ्नताम् ॥ ९ ॥

अध्याय २३ वा.

परमानन्दकृत शिवभारत.

शके १५८१ मधील

## अफजल प्रसंगा-नंतरची स्वारी.

स्केल

एक इंचांत २६ मैल.





अध्याय २९ वा.
परमानन्दकृत शिवभारत.
शके १५८२ मधील
उंबरखिंडीचें युद्ध.
स्केल
एक इंचांत १२ मैल प्रमाणें.
ठाणें जिल्हा
पुणें जिल्हा
उंबरखिंड
पेण
अलिबाग
सागरगड
रेवदंडा
चौल
कोर्लाई
नागोठणें
पालीकिल्ला
(पल्लीवन)
अवचितगड
सुरगड
बिरवाडीगड
घोसाळगड
मुरुड
राजपुरी
जंजिरा
दंडा
माणगड
कुंभाघाट
निझामपूर
लिंगाणा
रायगड
श्रीवर्धन
सोनगड
महाड
सावित्री नदी
पोलादपूर
प्रतापगड
पारघाट


अध्याय २५ वा.
परमानन्दकृत शिवभारत.
शके १५८२ मधील
शास्ताखानाची स्वारी.
स्केल
एक इंचांत २० मैल प्रमाणें.
हरिश्चंद्रगड
नाणेघाट
जिवधन
जुन्नर
मच्छिंद्रगड
शिवनेरी किल्ला
कोंढलीगड
कुसुरघाट
राजमाचीगड
बोरघाट
विसापूर किल्ला
लोहगड
कुलाबा जिल्हा
तिकोना किल्ला
संग्रामदुर्ग
चाकण
भीमा नदी
घोड नदी
पुणें
सिंहगड
सासवड
खेड शिवापूर
बेलसर
पुरंधर किल्ला
सुपें
भोर सं.
तोरणा
सोलापूर जिल्हा
शास्ताखानाचा मार्ग
DECCAN P. WORKS, POONA CITY.

अध्याय २५ वा.

परमानन्दकृत शिवभारत.

शके १५८२ मधील

# पन्हाळ्याचा वेढा.

स्केल.

एक इंचांत वीस मैल प्रमाणें.

विशाळगड
पारगांव
वारणा नदी
कृष्णा न.
कवठें
सांगली
मायिल
किणी
पन्हाळागड
अंबुप
पावनगड
मिरज
तिकोटें
तेलसंग
पंचगंगा नदी
अत्तीकीर
कोल्हापूर
इचलकरंजी
कुरुंदवाड
अथणी
हेबाळ
राजापूर
एड
सांगांव
रामपूर
कृष्णा नदी
दोदवाड
सत्ती
कागल
बोरगांव
बावडागड
जमखिंडी
वाळवें
वेदगंगा नदी
रायबाग
भोगावती नदी
दूधगंगा नदी
निपाणी
फोंडाघाट
मुरगूड
भूदरगड
हुकेरी
गोकाक
सामानगड
रांगणागड
प्रतितगड
मनोहरगड
मनसंतोषगड
कुडाळ
नारायणगड
घटप्रभा नदी
महादेवगड
गंधर्वगड
सावंतवाडी

DECCAN PRINTING WORKS, POONA CITY.

B.G.H.

४–९ कवठें, बोरगांव, मालगांव, कुंडल, घोगांव, सत्तीकीर, एड (आड), मिरज, गोकाक, दोदवाड, मुरवाड, धारवाडची मोठी गढी, क्षुद्रवंद्यपूर, श्याम-ग्राम (सांगांव), मायिल, पारगांव, सांगली, काणद, कुरुंदवाड, कागल, हेबाळ, हनुवल्ली, हूणवाड, रायबाग, हुकेरी, कांडगांव, हळदी, घुणिका, किणी, अरग, तेलसंग, केरूर, अंबुप, कमळापूर, अथणी, तिकोटें हीं व दुसरींहि मोठीं नगरें व पुरें जिंकून तीं त्या जयनिपुण नेताजीनें आपल्या ताब्यांत आणिलीं.

इति ध्वस्ते जनपदे स्रस्ते सैन्येऽपि भूयसि ।
पराधीनत्वमाप्तेषु प्रणालाद्रिषु चाद्रिषु ॥ १० ॥
चिरयत्सु च ताम्रेषु द्रुतमाकारितेष्वपि ।
विदूयमानोऽनुदिनं पतन्नत्याहितांबुधौ ॥ ११ ॥
अल्ली कर्णपुराधीशं जोहरं नाम बर्बरम् ।
आहूय प्राहिणोत्तूर्णं निग्रहीतुं शिवं नृपम् ॥ १२ ॥

१०–१२ ह्याप्रमाणें देश उध्वस्त झाला, पुष्कळ सैन्य गळालें (पांगलें), पन्हाळादि गड शत्रूच्या ताब्यांत गेले, त्वरित बोलाविलें असतांहि मोंगलांनीं उशीर केला, यामुळें दिवसेंदिवस खिन्न होऊन संकटसागरांत बुडत असतां अल्ली आदिलशहानें कर्णूलचा अधिपति शिद्दी जोहर यास बोलावून शिवाजी राजास पकडण्यास त्वरित पाठविलें.

स ततोऽनेकसाहस्रैरश्ववारैस्स्वजातिभिः ।
अपारैः पर्वताकारैः करिभिश्च समन्वितः ॥ १३ ॥
तथा कार्णाटकैः पत्तिबलैरतिबलैर्बली ।
पालितं शिवभूपेन प्रणालाचलमागतम् ॥ १४ ॥

१३–१४ तेव्हां तो बलाढ्य सरदार आपल्या जातीचे अनेक हजार घोडे-स्वार, पर्वतासारखे प्रचंड अगणित हत्ती, व अतिबलाढ्य कर्णाटकी पदाति यांसह शिवाजी राजाच्या ताब्यांतील पन्हाळगडास आला.

रुस्तुमः फाजिलश्चैव भग्नपूर्वावुभावपि ।
येदिलस्याज्ञया भूयः संभूय निजसेनया ॥ १५ ॥
समानगुणशीलेन सादातेन समन्वितौ ।
द्रुताग्रगामिना तेन जोहरेण समीयतुः ॥ १६ ॥

१५-१६ पूर्वी पराभूत झालेले रुस्तुम व फाजल हे दोघेहि आदिलशहाच्या आज्ञेवरून पुनः आपलें सैन्य घेऊन, समानगुणी व समानशील सादाताशीं मिळून, त्वरेनें पुढें जाणाऱ्या त्या जोहरास जाऊन मिळाले.

बाजराजो घोरफटः कार्णाटः पीडनायकः ।
वल्लीखानात्मजो भायीखानः समरदुर्जयः ॥ १७ ॥
मसूदो बर्बरोऽन्येऽपि येदिलस्य नियोगतः ।
प्रणालमद्रिमादातुं जोहरांतिकमाययुः ॥ १८ ॥

१७-१८ बाजराज घोरपडे, कर्णाटकी पीडनाईक, वल्लीखानाचा पुत्र अजिंक्य भाईखान, शिद्दी मसूद आणि दुसरेहि सरदार आदिलशहाच्या आज्ञेनें पन्हाळा घेण्यासाठीं शिद्दी जोहरापाशीं आले.

ततः स जोहरस्तद्वत् फाजिलश्चापि रुस्तुमः ।
अमी स्वैः स्वैरश्ववारैः सहिताः संगरोध्दुराः ॥ १९ ॥
बडेखानादिभिः पत्तिसेनाधिपतिभिर्वृताः ।
पूर्वदिग्भागमध्यास्य तं न्यरुन्धन् महीधरम् ॥ २० ॥

१९-२० नंतर तो जोहर, तसेंच फाजल व रुस्तुम ह्या रणधीर सरदारांनीं आपापल्या घोडेस्वारांसह व बडेखानादि पायदळाच्या सेनापतींसह पूर्वेकडून पन्हाळगडास वेढा दिला.

सादातश्च मसूदश्च बाजराजश्च बाहुजः ।
भायीखानादयोऽन्येऽपि स्वैः स्वैः सैन्यैः पुरस्कृताः ॥ २१ ॥
तथा कार्णाटयाष्टीकैः स्फुरत्फलकयाष्टिकैः ।
अन्यैश्च गुळिकायन्त्रधरैरुत्पनोद्धतैः ॥ २२ ॥
पदातिभिः परिवृतः प्रभावी पीडनायकः ।
प्रणालाचलमावव्रुः प्रतीचीं दिशमाश्रिताः ॥ २३ ॥

२१-२३ सादात, मसूद, क्षत्रिय बाजराज आणि भायीखानादि दुसरेहि सरदार यांनीं आपापल्या सैन्यांसह, तसेंच प्रतापी पीडनायकानें, प्रकाशमान ढाल, लाठी, कर्णाटकी लाठीवाले आणि हल्ला करण्यास उत्सुक असे दुसरे बंदुके पदाति यांसह पश्चिमेकडून पन्हाळगडास वेढा दिला.

अन्यान्यपि च सैन्यानि तस्याद्रेर्दक्षिणोत्तरौ ।
तस्थौ भागावुपाश्रित्य संश्लिष्टं जोहराज्ञया ॥ २४ ॥

२४ दुसऱ्याहि सैन्यांनीं जोहराच्या आज्ञेनें त्या गडाच्या दक्षिणेकडून व उत्तरेकडून कडेकोट वेढा दिला.

शैलवर्ती शिवोत्युच्चैरतिनीचैश्च जोहरः ।।।
आहवः स तदप्यासीद्भारताहवसोदरः ॥ २५ ॥

२५ गडावर शिवाजी अति उंच आणि जोहर अति खालीं तरीसुद्धां तें युद्ध भारतीय युद्धाच्या तोडीचें झालें !

बर्बरः स बहून् मासान् युयुधे तेन भूभृता ।
तथापि न यशो लेभे प्रतिवेलं पराहतः ॥ २६ ॥

२६ तो शिद्दी राजाशीं पुष्कळ महिनेपर्यंत लढला; तथापि प्रत्येक वेळीं हट-विला गेल्यामुळें त्यास यश मिळालें नाहीं.

एवं वदन्तमनघं कवींद्रं विप्रपुङ्गवम् ।
श्रीगोविंदपदांभोजप्रमोदभरमेदुरम् ॥ २७ ॥
शिवभूपयशःसोमसमुल्लासितचेतसम् ।
पर्यपृच्छन्निति मुदा बुधाः काशीनिवासिनः ॥ २८ ॥

२७–२८ ह्याप्रमाणें कथन करणारा, श्रीविष्णूच्या चरण कमलांच्या आनंद-भरानें भरलेला, शिवरायाच्या यशोरूपी सोमरसानें चित्त हर्षनिर्भर झालेला अशा निष्पाप ब्राह्मणश्रेष्ठ कवींद्रास काशीस्थ पंडितांनीं असें पुसलें:—

मनीषिण ऊचुः

अल्ली दिल्लीपतेः सेनां विधूतायोधनस्मयाम् ।
विसृज्य दूतमात्मीयं द्रुतमाह्वयति स्म याम् ॥ २९ ॥
सा पुनः कियती केन नायकेनाभिरक्षिता ।
केनाध्वना क्वचायाता किं कार्यं चान्वपद्यत ॥ ३० ॥
किं प्रतीकारमकरोच्छिवराजश्च तां प्रति ।
परमानंद सुमते तत्सर्वमभिधीयताम् ॥ ३१ ॥

पंडित म्हणाले:—

२९–३१ अल्ली आदिलशहानें आपला दूत पाठवून रणगर्व वाहणारी दिल्लीपतीची जी सेना बोलाविली ती किती होती, तिचा नायक कोण होता, ती कोणत्या मार्गानें व कोठें आली, तिनें कोणतें कार्य आरंभलें आणि शिव-रायानें तिचा कसा प्रतीकार केला तें सर्व, हे बुद्धिमान् परमानंदा, सांगावें.

कवींद्र उवाच

शिवस्योपचयं वीक्ष्य तथापचयमात्मनः ।
याचितां येदिलेनोच्चैः सहायमभिवांछता ॥ ३२ ॥
दिल्लीपतिः स्वपृतनां पृथुसारां प्रथीयसीम् ।
बलिना मातुलेनाढ्या शास्ताखानेन रक्षिताम् ॥ ३३ ॥
प्रपन्नपालनपरः शतशो जितसंगरः ।
प्रयातुमादिशत्तूर्णं धारागिरितलास्थिताम् ॥ ३४ ॥

कवींद्र म्हणालाः—

३२–३४ शिवाजीचा उत्कर्ष व आपला अपकर्ष झालेला पाहून उत्कृष्ट साह्यकर्ता मिळावा म्हणून आदिलशहानें (दिल्लीकडील) सैन्य मागितलें असतां; शरणागताचें रक्षण करण्यामध्यें तत्पर व शेंकडों लढाया ज्यानें मारल्या आहेत अशा दिल्लीपतीनें आपला मामा बलाढ्य शाएस्तेखान याच्या सेनापतित्वाखालीं दौलताबादेच्या ( देवगिरीच्या ) पायथ्याशीं असलेल्या आपल्या महासामर्थ्यवान् व अफाट सैन्यास त्वरित जाण्यास आज्ञा केली.

ततोऽनेकेऽनीकनाथाः स्वामिशासनवर्तिनः ।
प्रतस्थिरे सुसंनद्धाः शास्ताखानपुरोगमाः ॥ ३५ ॥

३५ नंतर धन्याच्या आज्ञेंत वागणारे अनेक सेनानायक चांगले सज्ज होऊन शाएस्तेखानाच्या नेतृत्वाखालीं निघाले.

मानी शमसखानाख्यः पटानः प्रथितक्रमः ।
सुतो जाफरखानस्य नामदारश्च दुर्जयः ॥ ३६ ॥
तथा गया[सु]दीखानो मुनीमो हसनोऽपि च ।
मिरजासुलतानश्च प्रतापी मनचेहरः ॥ ३७ ॥
तथा तुरुकताजश्च क्रूरात्मा च कुबाहतः ।
हौदखानोऽप्युजबखास्त्रयोऽमी समरोन्मुखाः ॥ ३८ ॥
इमामविरुदीखानो लोदीखानश्च दुर्धरः ।
पठानौ द्वाविमौ तद्वद् मौलदौ द्वौ दिलावरौ ॥ ३९ ॥
तथाबदुलबेगश्च भंगडः खोजडंबरः ।
जोहरश्च पुनः खोजसुलतानः पराक्रमी ॥ ४० ॥

शहाजहान बादशाह.



महमद आदिलशाह.



शाहिस्ताखान



जसवंतसिंह.



औरंगझेब.



फाजलखान.



राजा जयसिंह.



दिलेरखान.



सिद्दीफतेफतेजंगौ रणरंगविशारदौ ।
क्रोधनः कारतलबो गाजीखानादयोऽपि च ॥ ४१ ॥
तनयः शत्रुशल्यस्य भावसिंहः प्रभावभृत् ।
किशोरशामसिंहाह्वौ राजानौ चास्य बांधवौ ॥ ४२ ॥
राजा गिरिधरो नाम तथैव च मनोहरः ।
प्रद्युम्नश्चानिरुद्धश्च पंचमः पुरुषोत्तमः ॥ ४३ ॥
गोवर्धनेन सहिताः षडमी गौडवंशजाः ।
क्षत्रियाः क्षपितारातिकुलाः क्षितिभृतां वराः ॥ ४४ ॥
गौडविठ्ठलदासस्य नप्ता सप्ताश्वसन्निभः ।
सुतोऽर्जुनस्य विजयी राजसिंहश्च पार्थिवः ॥ ४५ ॥
वीरो बीरमदेवश्च रामसिंहश्च सुव्रतः ।
तथैव रायसिंहश्च त्रयोऽमीशीषेदान्वयाः ॥ ४६ ॥
श्रीमानमरसिंहाख्यो राजा चंद्रवतान्वयः ।
तथा चंद्रपुरेंद्रस्य सेनापतिररिंदमः ॥ ४७ ॥
द्वारकाजिच्च जीवाजित् पर्शुजिद्वलजित् पुनः ।
शरीफ--नृपसूनुश्च त्र्यंबकः समरोन्मुखः ॥ ४८ ॥
एते भृशबलाः प्रौढबलाः सर्वे प्रतापिनः ।
गोकपाटश्च सुराजिद्यशोजिच्च महाभुजः ॥ ४९ ॥
राजा दिनकरश्चापि ख्यातः कांकटकान्वयः ।
त्र्यंबकानन्तदत्ताख्यास्त्रयः खंडागेळान्वयाः ॥ ५० ॥
दत्तरुस्तुमवर्माणौ राजानौ यादवान्वयौ ।
सर्वजित्तनयो रंभः प्रवारः परवीरहा ॥ ५१ ॥
जायामुदयरामस्य जगज्जीवनमातरम् ।
राजन्याघ्रीति यां प्राहुर्युधि व्याघ्रीमिवोध्दुराम् ॥ ५२ ॥
सा प्रतापेन महता बताप्रतिहतायुधा ।
कृष्णराजप्रचंडाद्यैः साहिताऽऽत्मसनाभिभिः ॥ ५३ ॥
घांटिकः सर्जराजश्च गाढः कमल एव च ।
कोकाटो जसवंतश्च कमलेन समन्वितः ॥ ५४ ॥

दिल्लीपतेर्नियोगेन सर्वे एते महाभुजाः ।
स्वस्वसैन्यान्विताः शास्ताखानं सेनान्यमन्वयुः ॥ ५५ ॥

३६–५५ विख्यात पराक्रमी व मानी शमसखान पठाण, जाफरखानाचा पुत्र अजिंक्य नामदार, तसाच गयासुदीखान, हसन मुनीम, सुतान मिर्झा, प्रतापी मनचेहर, तुरुकताज, क्रूर कुबाहत व हौदखान हे तिघे युद्धोत्सुक उझबेग, इमाम विरुदीखान व दुर्जय लोदीखान हे दोघे पठाण, त्याचप्रमाणें दोघे दिलावर मौलद, तसाच अबदुल बेग, प्रख्यात खोजा भंगड, जोहर, पराक्रमी खोजा सुलतान, युद्धविशारद सिद्दी फते व फतेजंग, कोपी कारतलब, गाजीखानादि सरदार, शत्रुशल्याचा पुत्र पराक्रमी भावसिंह, त्याचे बंधु किशोरसिंह व शामसिंह हे दोघे राजे, राजा गिरिधर मनोहर, प्रद्युम्न, अनिरुद्ध, पांचवा पुरुषोत्तम व ( सहावा ) गोवर्धन असे सहा गौडवंशांतील शत्रुविध्वंसक श्रेष्ठ क्षत्रिय राजे, गौड विठ्ठलदासाचा सूर्याप्रमाणें तेजस्वी नातू, अर्जुनाचा पुत्र विजयी राजा राजसिंह, वीर बीरमदेव, सदाचारी रामसिंह, तसाच रायसिंह हे तिघे शिसोदे वंशांतील राजे, चंद्रवत वंशांतील राजा श्रीमान अमरसिंह, चंद्रपूरच्या राजाचा सेनापति अरिंदम, द्वारकाजी, जिवाजी, परसोजी, बाळाजी, शरीफ राजाचा पुत्र युद्धोत्सुक त्र्यंबकजी हे सर्व महाबलाढ्य प्रतापी भोसले, सुरजी गायकवाड, महाबाहु येसाजी, प्रख्यात राजा दिनकर कांकडे, त्र्यंबक, अनंत व दत्त हे तिघे खंडागळे, दत्त व रुस्तुम हे जाधव; सर्वाजीचा पुत्र शत्रुवीरघ्न रंभाजी पोवार, युद्धामध्यें वाघिणीप्रमाणें निर्भय अशी जी उदयरामाची बायको व जगजीवनाची आई ‘ रायबागीण ’ म्हणून ख्यात आहे ती, मोठ्या प्रतापामुळें अप्रतिहतगति स्त्री व तिचे कृष्णराज, प्रचंड इत्यादि भाऊ, सर्जेराव घाटगे, कमळाजी गाढे, जसवंतराव व कमळाजी कोकाटे हे सर्व बलाढ्य सरदार दिल्लीपतीच्या आज्ञेनें आपापल्या सैन्यासह सेनापति शाएस्तेखानामागोमाग गेले.

तैर्बलैः परितोऽप्यध्वसारितो विहितास्तथा ।
विना धनागमं नैताः पश्यन्त्यात्मपतिं यथा ॥ ५६ ॥

५६ त्या सैन्यांनीं सभोंवतालीं सुद्धां मार्गांतील नद्या अशा करून टाकल्या ( आटवून टाकल्या ) कीं, त्या आपला पति जो समुद्र त्यास पावसाळा सुरू होईपर्यंत भेटेनात.

निर्धार्यैः स ततः शास्ताखानः शास्ता चमूभृताम् ।
सहस्रैः सप्तसप्तत्या तुरगैः परिवारितः ॥ ५७ ॥

गंभीरवेदिभिर्भद्रकारिभिर्गिरिसंनिभैः ।
तथा बकसरैरग्रसरैः पत्तिवरैर्वृतः ॥ ५८ ॥
सन्नद्धः सहितस्तैस्तैर्विविधैर्युद्धसाधनैः ।
प्रपेदे सरितं भीमां सीमां विद्वेषिणीवृतः ॥ ५९ ॥

५७-५९ मग तो सेनापतींचा शास्ता निश्चयी शाएस्ताखान सत्याहत्तर हजार घोडेस्वार, पर्वतासारख्या भद्र जातीचे उद्दाम हत्ती, बक्सर जातीचे उत्तम अघाडीचे पदाति यांसह सर्व विविध युद्धसामग्री घेऊन सज्ज होत्साता शत्रूच्या प्रदेशाची सीमा जी भीमा नदी तिच्यासमीप आला.

प्रोच्छिन्नदेवायतनं छिन्नभिन्नमठीमठम् ।
भज्यमानाध्यक्षगृहं भग्नोद्यानमहीरुहम् ॥ ६० ॥
प्रभूतविजनीभूतप्रतनग्रामपत्तनम् ।
पर्यटन्म्लेच्छकटकस्पष्टभ्रष्टसरित्तटम् ॥ ६१ ॥
ग्रस्तं विधुंतुदेनेव निखिलं विधुमण्डलम् ।
दर्शनीयेतरमभूत् तदा तन्मेदिनीतलम् ॥ ६२ ॥

६०-६२ ज्यांतील देवळांचा विध्वंस केला, मठ मठ्या मोडल्या तोडल्या, अधिकाऱ्यांचीं घरें जमीनदोस्त केलीं, बागांतील झाडें मोडून टाकलीं, पुष्कळ जुनीं गांवें व नगरें उजाड केलीं, सर्वत्र संचार करणाऱ्या मुसलमान सैन्यांनीं नदीतीरें स्पष्ट भ्रष्ट केलीं असा तो भूप्रदेश खग्रास ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें भेसूर दिसूं लागला.

ततः क्षिप्रमुपेतेन क्षुभितांभोधिबंधुना ।
तेन चक्रेण चकितं चक्रे चक्रावतीतलम् ॥ ६३ ॥

६३ नंतर खवळलेल्या समुद्रासारख्या त्या सेनेनें त्वरित येऊन चाकणप्रांत भयचकित केला.

रुरुधुस्तां शोणमुखाः पुरीं चक्रावतीं रुषा ।
शिवराजे महाराजे प्रणालाचलवर्तिनि ॥ ६४ ॥

६४ शिवाजीमहाराज पन्हाळगडावर असतांना मोंगलांनीं त्या चाकणच्या किल्ल्यास क्रोधानें वेढा दिला.

तत्र संग्रामदुर्गान्तर्वर्तिभिः शिवपत्तिभिः ।
युयुधुर्युद्धकुशलास्ते दिनानि बहून्यपि ॥ ६५ ॥

६५ त्या संग्रामदुर्गांतील शिवाजीचे ते युद्धकुशल पदाति ( शिपाई ) पुष्कळच दिवस झुंजले.

यावद्युध्यति जोहरेण बलिना क्रुद्धः प्रणालाचले ।
राजा तावदमी वयं समुदिताश्चक्रावतीमण्डले ॥
योत्स्यामः प्रतियोधिभिः प्रतिपदं दुर्गस्थितानामिदम् ।
विज्ञायाभिमतं तथा न विदधे शास्तापि शस्तं मनः॥६६॥

६६ "जोंपर्यंत क्रुद्ध शिवाजी राजा पन्हाळगडावर बलाढ्य जोहराशीं लढत आहे, तोंपर्यंत हे आम्ही सगळे मिळून चाकण प्रांतांत शत्रूशीं पदोपदीं लढूं" अशी किल्ल्यांतील लोकांची इच्छा जाणून शाएस्तेखानास सुद्धां बरें वाटलें नाहीं.

अल्लीशाहोऽपि दिल्लीपरिवृढपृतनां तत्र संग्रामदुर्गे ।
युध्यन्तीमाकलय्य प्रथितपृथुबलां किंचिदाश्वस्तचित्तः ॥
रोद्धव्योऽयं विरुद्धः प्रसभमवहितीभूय शैले प्रणाले ।
संरंभादित्थमुच्चैर्विजयपुरगतो जोहरायालिलेख ॥ ६७ ॥

६७ दिल्लीच्या बादशहाचें मोठें व विख्यात सामर्थ्य असलेलें सैन्य त्या संग्रामदुर्गाशीं झुंजत आहे असें जाणून अल्लीशहाच्या चित्तास कांहींसा धीर आला व त्यानेंसुद्धां विजापुराहून जोहरास अत्यंत रागानें असें लिहिलें कीं, सावध राहून पन्हाळगडावर ह्या शत्रूस पक्कें कोंडून ठेवावें.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरकवीन्द्रपरमानन्द-
प्रकाशितायां शतसाहस्र्यां संहितायां शास्ताखानाभ्यागमो
नाम पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥

---

# अध्याय २६ वा

---:o:---

कवींद्र उवाच ।

अथ त्रस्ते जनपदे विस्रस्ते च महाजने ।
लुंटिते साहसवटे शूर्पे चाप्यवकुंठिते ॥ १ ॥
निगृहीते पुण्यपुरे गृहीते चेंदिरापुरे ।
परचक्रचयग्रस्तप्रायचक्रावतीचये ॥ २ ॥
आत्मजे शिवराजे च प्रणालाचलवर्तिनि ।
ऋद्धेऽपि जोहरेणोच्चैः क्रुद्धे तत्रैव युध्यति ॥ ३ ॥
सुता यादवराजस्य शाहपत्नी महाव्रता ।
अहो रणरसोत्साहादाहोपुरुषिकामधात् ॥ ४ ॥

कवींद्र म्हणाला:—

१–४ लोक घाबरून गेले, व्यापारी पळाले (गळाले), सासवड लुटलें गेलें, सुप्यास वेढा पडला, पुण्यावर हल्ला झाला, इंदापूर काबीज केलें गेलें, चाकण चौऱ्यांशींचा प्रदेश शत्रुसेनासमूहाच्या बहुतेक घशांत गेला, पुत्र शिवराय समृद्ध व अत्यंत क्रुद्ध होत्साता पन्हाळगडावर जोहराशीं तेथेंच लढत होता—अशा वेळीं जाधवरावाची मुलगी, शहाजीची धर्मनिष्ठ पत्नी (जिजाबाई) हिच्या ठिकाणीं वीररसाचा संचार होऊन ती युद्धाची भाषा बोलूं लागली.

जननी शिवराजस्य सा राजगिरिवर्तिनी ।
निजानां गिरिदुर्गाणामवनेऽवहिताभवत् ॥ ५ ॥

५ राजगडावर राहणारी ती शिवाजीची माता आपल्या गडांच्या रक्षणाच्या कामीं दक्ष झाली.

अथ सेनापतिर्नेता नैकानीकनिषेवितः ।
प्लुष्ट्वा शाहपुरं सर्वं दग्ध्वा पृष्ठं च विद्विषः ॥ ६ ॥
शिवसंदेशमासाद्य प्रसादमिव सुव्रतः ।
समन्वितो हिलालेन शिवपत्तनमाययौ ॥ ७ ॥

६–७ नंतर सदाचारी—सेनापति नेताजी, बरोबर पुष्कळ सैन्य घेऊन

सगळें शाहपूर जाळून, शत्रूस पळवून लावून शिवाजीचा निरोप प्रसादाप्रमाणें ऐकून हिलालासह शिवपट्टणा आला.

ततः स वत्सलां वत्सालोकने चिरमुत्सुकाम् ।
यातुं प्रणालमचलं स्वयमेव समुद्यताम् ॥ ८ ॥
रोषावेषवतीं स्वेन सैन्येन महतावृताम् ।
ददर्श शाहराजस्य राज्ञीं राजगिरिस्थिताम् ॥ ९ ॥

८-९ नंतर प्रेमळ, पुत्रदर्शनासाठीं दीर्घकाल उत्सुक, पन्हाळगडास स्वतःच जाण्यास सिद्ध झालेली, क्रोधाविष्ट झालेली, स्वतःच्या मोठ्या सैन्यानें युक्त अशी जी त्या शहाजीराजाची राणी तिला त्या (नेताजी)नें राजगडावर पाहिलें.

आगस्कर इवात्यर्थं भीतर्भीतः पदे पदे ।
स ननाम हिलालेन सहितस्तां महाव्रताम् ॥ १० ॥

१० जणूं काय अपराध्याप्रमाणें पदोपदीं अतिशय भीत भीत त्यानें हिलालासह त्या धर्मनिष्ठ राणीस प्रणाम केला.

प्रणमन्ताविमौ दृष्ट्वा बद्धांजलिपुटावुभौ ।
सा जगाद महाभागा मृदुगंभीरभाषिणी ॥ ११ ॥

११ त्या दोघांस हात जोडून प्रणाम करतांना पाहून ती महाभाग्यशाली मृदु व गंभीर वाणीनें बोलली:--

राजमातोवाच ।

बिभ्राणः समरोत्साहं मत्प्राणः स बहिश्चरः ।
रुद्धो विरुद्धैरभितः प्रणालाचलमूर्धनि ॥ १२ ॥

राजमाता म्हणाली:—

१२ युद्धोत्साह धारण करणारा तो माझा बाह्य प्राण (प्राणाप्रमाणें प्रिय पुत्र) पन्हाळगडावर शत्रूंनीं चोहोंकडून वेढला आहे.

तत्र तं स्वामिनं हित्वा त्रपां चातिमहीयसीम् ।
अहो युवां परभिया परावृत्तावुभावपि ॥ १३ ॥

१३ तेथें त्या धन्यास सोडून व सगळी लाज गुंडाळून ठेवून तुम्ही दोघेहि शत्रूच्या भीतीनें परतलांत हें आश्चर्य होय !

तमेकमात्मनो वत्सं विमोचयितुमात्मना ।
प्रयतिष्ये हरिष्येऽद्य जोहरस्य शिरो युधि ॥ १४ ॥

१४ त्या माझ्या एकुलत्या पुत्रास स्वतः सोडविण्याचा मी स्वतः प्रयत्न करीन आणि जोहराचें मुंडकें आज युद्धांतून घेऊन येईन.

**वन्यामिव दिशं शून्यामिमां पश्यामि यं विना ।**
**आनायिष्यामि तं सद्यः शिशुं सिंहमिवोद्धतम् ॥ १५ ॥**

१५ ज्याच्यावांचून ही दिशा ( हा देश ) मला मोठ्या अरण्याप्रमाणें शून्य दिसत आहे त्या सिंहाप्रमाणें पराक्रमी बाळास मी लागलीच आणीन.

**श्रीवत्सलांछनस्यांशं तमेकं वत्समात्मनः ।**
**क्षणं यदि न पश्यामि तर्हि त्यक्ष्यामि जीवितम् ॥ १६ ॥**

१६ विष्णूचा अवतार ( अंश ) असा तो माझा एलकुता पुत्र जर मला क्षणभर दिसणार नाहीं तर मी प्राण सोडीन.

**युध्यध्वामिह संभूय यूयमत्र परैः सह ।**
**स्वयं योत्स्यामि तेनाहं जोहरेण विरोधिना ॥ १७ ॥**

१७ तुम्ही इकडे एकत्र मिळून शत्रूंशीं झुंजा. मी स्वतः त्या शत्रु जोहराशीं लढत्यें ( समाचार घेत्यें ).

**एवमुक्तवतीं तत्र तां परित्रस्तचेतनः ।**
**क्षुभितां चारुचरितां चमूपतिरवोचत ॥ १८ ॥**

१८ ह्याप्रमाणें ती त्या समयीं बोलली असतां घाबरून जाऊन तो सेनापति क्षुब्ध झालेल्या व जिचें आचरण निर्मल आहे अशा त्या (राजमातेस) म्हणालाः—

**चमूपतिरुवाच ।**

**भगवत्याः प्रभावेण महाप्राणो महाभुजः ।**
**सोऽवेक्षते जगत् कृत्स्नं न सहायमपेक्षते ॥ १९ ॥**

१९ भवानीच्या प्रभावानें तो महासामर्थ्यवान् व पराक्रमी स्वामी अखिल जगताचें पालन करीत आहे. त्यास साह्यकर्त्यांची अपेक्षा नाहीं.

**अतस्तदाज्ञया गत्वा जित्वा विजयपत्तनम् ।**
**परावृत्तोऽस्मि भव्यं ते योध्दुं ताम्रमुखैः समम् ॥ २० ॥**

२० म्हणून त्याच्या आज्ञेनें जाऊन, विजापूर जिंकून,— तुमचें कल्याण असो —मी मोंगलांशीं युद्ध करण्यास परत आलों आहे.

**पातुमायातु मामत्र भवती भव्यनिश्चया ।**
**तत्र वर्वर्ति विजयी शिवः स भृशनिर्भयः ॥ २१ ॥**

२१ सत्यनिश्चयी आपण मला रक्षिण्यास यावें. तिकडे तो अत्यंत निर्भय व विजयी शिवाजी आहेच आहे.

तमात्मनः परिवृढं दुर्धराणां धुरंधरम् ।
कदा द्रक्ष्यामि च कदा परैः स्त्रक्ष्यामि संगरम् ॥ २२ ॥

२२ अजिंक्य पुरुषांचा धुरीण अशा त्या आपल्या धन्यास केव्हां पाहीन आणि शत्रूशीं केव्हां युद्ध करीन ( असें मला झालें आहे ).

योत्स्यन्ति ताम्रवदनैरनेके सैनिका इमे ।
अहं तु तत्र योत्स्यामि विरुद्धैर्जोहरादिभिः ॥ २३ ॥

२३ हे अनेक सैनिक मोंगलांशीं लढतील आणि मी स्वतः तिकडे जोहरादि शत्रूंशीं लढेन.

पालितान्यतियत्नेन शिवसैन्यैरिहाधुना ।
प्रभवत्यद्य दुर्गाणि गृहीतुं नारुणाननः ॥ २४ ॥

२४ इकडे शिवाजीच्या सैन्यांनीं सध्यां अति यत्नानें ( काळजीनें ) रक्षिलेले गड मोंगल आज घेऊं शकत नाहीं.

इति विज्ञापयामास तत्र तां पृतनापतिः ।
प्रतस्थे च प्रतापेन प्रणालमचलं प्रति ॥ २५ ॥

२५ याप्रमाणें सेनापतीनें त्या समयीं तिला विनति केली आणि तो धैर्यानें पन्हाळगडास निघाला.

तरसा तुरगारूढं करवालकरं दृढम् ।
षड्विधान्यपि सैन्यानि तं महान्वयमन्वयुः ॥ २६ ॥

२६ झटकन घोड्यावर बसून, हातांत तरवार घेऊन निघालेल्या त्या थोर कुलांतील खंबीर सेनापतीच्यामागून सहाहि प्रकारचीं सैन्यें निघालीं.

शुंडिशुंडासमुध्दूतधूलिधूसरितध्वजम् ।
स बाहुजो महाबाहुस्तदुवाह महद्बलम् ॥ २७ ॥

२७ हत्तींच्या सोंडांनीं उडालेल्या धुळीनें ध्वज मलिन झालेलें तें प्रचंड सैन्य तो सामर्थ्यवान क्षत्रिय घेऊन चालला.

निशम्य जोहरोऽप्येनां रिपुसेनामुपागताम् ।
तेन सेनाधिपतिना हिलालेन च पालिताम् ॥ २८ ॥

प्रतियोधयितुं योधानात्मनीनाननेकशः ।
तत्र संप्रेषयामास प्रासपट्टिशधारिणः ॥ २९ ॥

२८–२९ त्या सेनापतीच्या व हिलालाच्या हाताखालचें हें शत्रुसैन्य समीप आलेलें ऐकून त्यास विरोध करण्यास जोहरानेसुद्धां भालेकरी व पट्टेकरी असे पुष्कळ योद्धे तिकडे पाठविले.

ततस्ते बर्बराः सर्वे गर्वेण महतावृताः ।
प्रासपाशधनुर्बाणधारिणः प्रौढिकारिणः ॥ ३० ॥

तामिमां पर्वतपतेः पृतनां सुप्रथीयसीम् ।
ऋद्धां रुध्वाध्वनोर्मध्ये प्रत्ययुध्यन्नुदायुधाः ॥ ३१ ॥

३०–३१ तेव्हां मोठा गर्व वाहणारे, भाले पाश, धनुष्य बाण धारण करणारे, धिटाईचे असे ते सर्व शिद्दी शिवाजीच्या त्या अतिप्रचंड व समृद्ध सेनेस वाटेंत अडवून शस्त्रें उगारून तिच्याशीं लढूं लागले.

तत्र युद्धान्यजायन्त हिलालस्य परैः सह ।
शरोत्कृत्तशिरस्कानि कुन्तकृत्तकराणि च ॥ ३२ ॥

३२ तेथें शत्रूबरोबर हिलालाच्या चकमकी उडाल्या. त्यांत बाणांनीं डोकीं तोडण्यांत आलीं व भाल्यांनीं हात तोडण्यांत आले.

वाहवाहो महाबाहुर्हिलालस्यात्मजस्तदा ।
विवेश विद्विषां व्यूहं मन्युमानभिमानवान् ॥ ३३ ॥

३३ तेव्हां हिलालाचा रागीट व अभिमानी पुत्र सामर्थ्यवान वाहवाह (हा) शत्रूच्या व्यूहांत शिरला.

स युवा पृथुताम्राक्षो वैरिवक्षोविदारणः ।
अतीव दर्शनीयोऽभूत् दर्शयन्हस्तलाघवम् ॥ ३४ ॥

३४ मोठे भव्य व लाल डोळे असलेला, शत्रूंची छाती फाडणारा तो जवान (आपलें) हस्तचापल्य दाखवीत असतां अत्यंत प्रेक्षणीय दिसत होता.

स ततस्तैर्महायोधैर्विविधायुधयोधिभिः ।
हयान्निपातितो मानी मुमोह मृधमूर्धनि ॥ ३५ ॥

३५ नंतर विविध आयुधांनीं लढणाऱ्या त्या महायोद्ध्यांनीं त्या मानी वाहवाहास युद्धाच्या अग्रभागीं घोड्यावरून खालीं पाडलें व तो बेशुद्ध झाला.

तं भिन्नभल्लवपुषं भृशविह्वलचेतसम् ।
छिषन्तोऽतीवहृष्यन्तो निन्युः स्वशिबिरं प्रति ॥ ३६ ॥

३६ भाला मोडून व शरीर छिन्नभिन्न होऊन अति विव्हळ झालेल्या त्या वाहवाहास शत्रूंनीं (जो हरपक्षीयानीं) अतिशय हर्ष करीत आपल्या गोटाकड नेलें.

तमात्मानामिवात्मीयं नीयमानमरातिभिः ।
न शशाक हिलालोऽपि विमोचयितुमात्मजम् ॥ ३७ ॥

३७ जणूं काय आपला आत्माच अशा त्या पुत्रास शत्रु घेऊन जात असतां हिलालसुद्धां सोडवूं शकला नाहीं.

जोहरायुधिकास्तत्र क्रुधा युयुधिरे तथा ।
हिलालप्रमुखाः सर्वे विमुखाः सर्वतो यथा ॥ ३८ ॥

३८ जोहराचे योद्ध तेथें असे त्वेषानें लढले कीं हिलालप्रमुख सर्व वीर चोहोंकडे पळाले.

तमुदन्तमथाकर्ण्य पृष्ठगोपश्चभू [मू] पतिः ।
हिलालतनयं वीरमन्वशोचत चेतसि ॥ ३९ ॥

३९ ती वार्ता ऐकून पिछाडीचे रक्षण करणारा सेनापती, हिलालाच्या वीरपुत्राबद्दल मनांत शोक करूं लागला.

इति नेतृप्रभृतयो युध्यन्तोऽपि दिने दिने ।
पणालमचलं गंतुं अंतरं न प्रपेदिरे ॥ ४० ॥

४० याप्रमाणें नेताजीप्रभृति दररोज लढत असतांहि पन्हाळगडास जाण्यास त्यांस संधि मिळाली नाहीं.

निशम्य शिवभूपालश्चमूपालपराभवम् ।
चुक्रोध जोहरायैव जंभा एवाशु जंभजित् ॥ ४१ ॥

४१ (या प्रमाणें) सेनापतीचा पराभव झालेला ऐकताच शिवाजी राजास, इंद्रास जंभासुराचा जसा क्रोध आला त्याप्रमाणें, जोहराविषयीं क्रोध आला.

स एकदा नृपस्तत्र शयानः सुखसद्मनि ।
प्रयतः प्रैक्षत स्वप्ने तुलजां वरदायिनीम् ॥ ४२ ॥

४२ एकदां तो शुद्धाचरणी राजा तेथें सुखागारांत निजला, असतां, त्यास वरदात्री तुळजा भवानीचें स्वप्नांत दर्शन झालें.

**महासत्त्वं महासत्त्वा प्रणमन्तमथाग्रतः।**
**तमेनमवनीपालं जगाद जगदीश्वरी ॥ ४३ ॥**

४३ तेव्हां ती महासामर्थ्यवान् जगन्माता, तो महासामर्थ्यवान् राजा प्रणाम करीत असतां त्यास म्हणाली.

**तुलजोवाच**

**एत्य ताम्राननैस्तत्र पुरी चक्रावती जिता।**
**अतस्त्वयात्र न स्थेयं प्रस्थेयं पुत्र सर्वथा ॥ ४४ ॥**

तुळजादेवी म्हणाली:—

४४ मोंगलांनीं येऊन तिकडे चाकणचा किल्ला जिंकला. तेव्हां, बाळा, त्वां येथें राहूं नये; सर्वथा निघावें.

**सिद्धिवक्त्रेऽद्य ताम्राणां लग्ना चक्रावती तथा।**
**गरीयसेऽपकाराय तिमीनां बडिशं यथा ॥ ४५ ॥**

४५ तिमि माशांच्या जबड्यांत अडकलेल्या गळाप्रमाणें तसा मोंगलांच्या जयरूपी मुखांत सांपडलेला हा चाकणचा किल्ला मोठ्या अनर्थास कारण होईल.

**अरं राजगिरिं याहि पाहि राज्यं निजं नृप।**
**ताम्यति त्वां विना तत्र जरती जननी तव ॥ ४६ ॥**

४६ हे राजा, (तसेंच) सत्वर राजगडास जा आणि आपलें राज्य राख. तुझी वृद्ध माता तुजवाचून तेथें तळमळत आहे.

**सैन्यैः कतिपयैरेव प्रयातव्यमितस्त्वया।**
**जोहरं योधयिष्यंति त्वद्योधाः पर्वताश्रयाः ॥ ४७ ॥**

४७ थोडक्याशाच सैनिकांसह त्वां येथून निघून जावें. गडावरील तुझे योद्धे जोहराशीं लढतील.

**अहं तु निजयोगेन मोहयिष्यामि जोहरम्।**
**प्रथयिष्यामि भवने भवद्भुजयशोभरम् ॥ ४८ ॥**

४८ मी आपल्या मायेनें जोहरास मूढ करीन आणि जगामध्यें तुझ्या पराक्रमाची विपुल कीर्ति पसरवीन.

**गतायुरेष पापात्मा न चिरायुर्भविष्यति।**
**निमित्तांतरमाश्रित्य मृत्युरेनं जिघृक्षति ॥ ४९ ॥**

४९ ह्या पाप्याचे दिवस भरले आहेत; हा फार काळ वांचणार नाहीं: दुसऱ्या निमित्तानें मृत्यु ह्यास भक्षूं इच्छीत आहे.

एवमादिश्य तं देवी तत्रैवांतरधीयत ।
स तु प्रबुद्धस्तामेव पुनः पुनरनीनमत् ॥ ५० ॥

५० ह्याप्रमाणें त्यास आज्ञा करून देवी तेथेंच अंतर्धान पावली. पण जागा झाल्यावर त्यानें ( शिवाजीनें ) पुनः पुनः तिलाच वंदन केलें.

ततः प्रत्यर्थिसैन्येन परितः कृतमंडलात् ।
घनाघनघटालोकलीलाशालिशिखावलात् ॥ ५१ ॥
समंततस्तत श्यामतमकाननसंकुलात् ।
जननीलीमिलत्पंकपिच्छलोपत्यकातलात् ॥ ५२ ॥
गंभीरगद्गदनदन्निःसरन्नैकनिर्झरात् ।
प्रणालादचलादात्मबलान्निर्यातुमुद्यतः ॥ ५३ ॥
प्रौढां पताकिनीं तत्र निधित्सुः शिवभूमिपः ।
पर्याम्नातगुणं लोके नाम्ना त्र्यंबकभास्करम् ॥ ५४ ॥
निर्धार्यमग्रजन्मानमवधार्य धिया स्वया ।
गर्हिताहितसंदोहामर्हितां गिरमभ्यधात् ॥ ५५ ॥

५१–५५ मग शत्रुसैन्यानें चोहोंकडून वेढलेला, दाट मेघसमुदायाच्या दर्शनानें नाचणारा जणूं काय मोरच, सर्व बाजूंस पसरलेल्या काळ्या किर्र अरण्यांची दाटी असलेला, गद्गद, गंभीर व घो घो आवाज करीत अनेक ओहोळ ( झरे ) ज्यापासून वाहात आहेत अशा त्या पन्हाळगडाहून स्वसामर्थ्यानें बाहेर पडण्यास सिद्ध होऊन तेथें पोक्त सैन्य ठेवण्याच्या इच्छेनें त्र्यंबक भास्कर नांवाचा, लोकांमध्यें सन्मान्य, धैर्यवान् ब्राह्मणास स्वबुद्धीनें निश्चित करून शत्रुसमूहाची निंदा करणारें व योग्य असें भाषण शिवाजीनें केलें.

राजोवाच

पश्य युध्यद्भिरेवाहार्दिवमुद्यमितायुधैः ।
मासाश्चैत्रादयोऽस्माभिरिह नीताः प्रभाविभिः ॥ ५६ ॥

राजा म्हणालाः—

५६ पहा ! शस्त्रें उगारून रात्रंदिवस लढतां लढतां पराक्रम्यांनीं आम्ही येथें चैत्रादि चार महिने घालविले.

पंचमोऽयं तु संप्राप्तो नभाः श्यामनभाः शुभः ।
शोभां सुमहतीं तन्वन् इह काननसंकुले ॥ ५७ ॥

५७ ( मेघांच्या योगें ) आकाश काळेंकुट्ट असणारा असा हा पांचवा शुभ श्रावण मास प्राप्त झाला आहे.

हंताहार्यशिरस्यस्मिन् अहिताहार्यपौरुषैः ।
हतो न जोहरोऽस्माभिरहो शैलतलस्थितः ॥ ५८ ॥

५८ अहो, ज्यांचा पराक्रम शत्रूंस अनिवार आहे त्या आमच्या हातून ह्या अजिंक्य गडावरून पायथ्याशीं असलेल्या जोहरास ठार करणें झालें नाहीं हें आश्चर्य होय !

भग्नाः सेनाधिपतयो नेतृप्रभृतयः किल ।
नैनं परिधिमेतेषामीषत् क्षपयितुं क्षमाः ॥ ५९ ॥

५९ नेताजीप्रभृति सेनापतींचा मोड झाल्याची लोकवार्ता आहे; आणि ह्यांचा हा वेढा तर आम्हास थोडासुद्धां उठवितां येत नाहीं.

बलशाली बर्बरोऽयं सुबाहुर्बहुभिर्बलैः ।
अशक्यो जेतुमस्माभिरिदानीमिति मे मतिः ॥ ६० ॥

६० ह्या बलवान व पराक्रमी शिद्द्यास पुष्कळ सैन्याच्या साह्यानेंहि जिंकणें आम्हांस सध्यां अशक्य आहे असें मला वाटतें.

इहैव निग्रहायास्य चिरस्य मदवस्थितिः ।
न स्थाने पुण्यविषयस्थाने ताम्रावृते सति ॥ ६१ ॥

६१ पुणें प्रांत मोंगलांनीं आक्रमिला असतां त्याच्या ( शिद्द्याच्या ) नाशासाठीं ( पराभवासाठीं ) मी येथेंच फार वेळ राहणें योग्य नाहीं.

महती ताम्रवदनध्वजिनी साहसप्रिया ।
तत्र मन्ये मदन्येन न पराभूतिमेष्यति ॥ ६२ ॥

६२ तिकडे मोंगलांच्या साहसी महासेनेचा पराभव माझ्याखेरीज दुसऱ्या कोणाच्या हातून होणार नाहीं असें मला वाटतें.

अतोऽस्मि प्रस्थितस्तूर्णं ताम्राननजिघांसया ।
परैरधर्षणीयोऽस्तु पर्वतोऽयं त्वदाश्रयः ॥ ६३ ॥

६३ म्हणून मी मोंगलांचा संहार करण्याच्या इच्छेनें त्वरेनें निघालों आहें. ( तेव्हां ) शत्रूंस अजिंक्य असा हा गड तुझ्या हाताखालीं असूं दे.

त्वमत्र भव सेनानीः सेनानीर्भव विक्रमी ।
उज्जासनाय परितः परिवेषकृतां द्विषाम् ।। ६४ ।।

६४ तूं येथें सेनापति हो; चोहोंकडून वेढा देणाऱ्या शत्रूंच्या नाशासाठीं पराक्रमी कार्तिकस्वामी हो.

भित्वैनं विद्विषद्व्यूहं पार्थस्येव प्रयास्यतः ।
प्रतियोद्धा न मे कश्चित् पतितोऽद्धा भविष्यति ।। ६५ ।।

६५ हा शत्रूंचा व्यूह फोडून अर्जुनाप्रमाणें निघून जाणाऱ्या माझ्याशीं लढणारा कोणीहि नष्ट शत्रुयोद्धा मुळींच आढळणार नाहीं.

इत्युदीर्य स तं धीरं धरे तस्मिन् निधाय च ।
यामिन्याः प्रथमे यामे प्रस्थितः पृथिवीपतिः ।। ६६ ।।

६६ असें बोलून त्या धैर्यशाली त्र्यंबक भास्करास त्या गडावर ठेवून महाराज रात्रीच्या पहिल्या प्रहरीं निघाले.

याप्ययानसमासीनं तमेनं स्वामिनं भुवः ।
तदा बतानुयान्ति स्म पदगानां शतानि षट् ।। ६७ ।।

६७ आश्चर्याची गोष्ट ही कीं, ते महाराज असे पालखींत बसून जातांना त्यांच्यामागून सहाशें पदाति गेले !

प्रस्थानदुंदुभिस्तस्य दध्वान मधुरं तथा ।
ध्वनदंभोधरभ्रान्त्या परैर्न बुबुधे यथा ।। ६८ ।।

६८ त्यांच्या प्रस्थानदुंदुभीचा (कुचाच्या नगाऱ्याचा) असा कांहीं मधुर ध्वनि झाला कीं, शत्रूंस ती मेघगर्जनाच आहे असें वाटून त्यांस तो समजला नाहीं.

कदंबकेतकीकुंदकुटजामोदमेदुरः ।
परिस्फुरन्निर्झरांभःकणसंपर्कमंथरः ।। ६९ ।।
तस्यानुकूलतां तत्र दधानः पवनस्तदा ।
आत्मीयं दर्शयामास साहाय्यं स्वजनो यथा ।। ७० ।।

६९-७० कळंब, केवडा, कुंद, कुडा यांच्या सुगंधानें भरलेल्या, धडाधड उड्या मारीत वाहणाऱ्या झऱ्यांच्या तुषाराच्या संपर्कानें मंद अशा वायूनें त्यावेळीं तेथें अनुकूल होऊन स्वजनाप्रमाणें त्यास आपलें साहाय्य केलें.

व्रजते भूभृतेऽमुष्मै चरदृष्टचरे पथि ।
स्थलीं निम्नोन्नतां सद्यः सौदामिन्योऽप्यदर्शयन् ।। ७१ ।।

७१ महाराज प्रवास करीत असतांना त्यांस, हेरांनीं पूर्वी पाहून ठेवलेल्या मार्गावरील उंचसखल भूमि, विजांनींहि तत्क्षणीं दाखविली.

अपि यांतमदूरेण पथा तमवनीश्वरम् ।
नाज्ञासिषुर्विद्विषतो भगवत्या विमोहिताः ॥ ७२ ॥

७२ भवानीनें मूढ केलेल्या शत्रूंस महाराज जवळूनच जात असतांहि समजले नाहींत.

ततोंतरांतरास्रस्तप्रस्तरप्रोन्नतानतम् ।
प्रपातपातनिनदन्नदीनदसुदुर्गमम् ॥ ७३ ॥
नीलशैवलसंश्लिष्टसक्थिदघ्ननिषद्वरम् ।
नैकधातुद्रवमिलन्मृदुमृन्मसृणोदरम् ॥ ७४ ॥
पल्लवप्रोल्लसद्वीरुत्परिरब्धमहीरुहम् ।
वर्षाकुलितशार्दूलकुलसंकुलकंदरम् ॥ ७५ ॥
वामलूरांतरोद्गच्छद्दंदशूकजिघांसया ।
कृतकोलाहलं कोपात् प्रचलद्भिः कलापिभिः ॥ ७६ ॥
अदृष्टजनसंचारं चरदृष्टचरं तदा ।
राजा राजगिरेरीशस्तमध्वानमलंघत ॥ ७७ ॥

७३-७७ पुढें मधून मधून पडलेल्या शिळांच्या योगें उंचसखल असलेला, पर्वताच्या तुटलेल्या कड्यांवरून पडतांना गर्जना करणाऱ्या नद्यांच्या व नदांच्या योगें अति दुर्गम झालेला, निळ्या शेवाळ्याच्यायोगें घट्ट असा जांघडभर चिखल असलेला, पालवीच्यायोगें चकचकीत दिसणाऱ्या लतांनीं ज्याच्यावरील वृक्ष वेष्टिले आहेत असा, पर्जन्यामुळें घाबरलेल्या वाघांची गर्दी ज्याच्यावरील गुहांमध्यें झाली आहे असा, वारुळांतून बाहेर पडणाऱ्या सापांस मारण्याच्या इच्छेनें त्वेषानें धावून जाणाऱ्या मोरांच्या टाहोंनीं भरलेला, ज्याच्यावर मनुष्यांचा संचार दृष्टीस पडत नव्हता असा हेरांनीं आधींच पाहून ठेवलेला तो मार्ग रायगडचा स्वामी राजा शिवाजी आक्रमून गेला.

अथ धरणिमणिर्विशालशैलं ।
निजमधिरुह्य विलोकनीयशी[शा]लम् ॥
वसतिमभिमतां विलंघिताध्वा ।
स्वकटकविश्रमहेतुकामकार्षीत् ॥ ७८ ॥

७८ नंतर मार्ग आक्रमून आलेल्या राजा शिवाजीनें प्रेक्षणीय सभागृहें व पागा असलेल्या आपल्या विशाळगडावर चढून तेथें आपल्या सैन्यास विश्रांति मिळावी ह्या हेतूनें इष्ट अशी वस्ती केली.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां
शतसाहस्र्यां संहितायां स्वराष्ट्रावेक्षणं
नामाध्यायः ॥ २६ ॥

---

# अध्याय २७ वा



मनीषिण ऊचुः

प्रणालभूधरादात्मनिहितानीकदुर्ग्रहात् ।
समं पत्तिशतैः षड्भिस्तमज्ञातविनिर्गतम् ॥ १ ॥

जोहरः कथमज्ञासीत् मोहितो योगमायया ।
प्रतीकारं च कं चक्रे स्वेन चक्रेण संवृतः ॥ २ ॥

शिववीरयशःक्षीरनिधिप्लावितचेतसा ।
परमानंद भवता तत्सर्वमभिधीयताम् ॥ ३ ॥

पंडित म्हणाले:—

१-३ स्वतः ठेवलेल्या सैन्यामुळें अजिंक्य अशा पन्हाळगडाहून तो (शिवाजी) सहाशें पदातींसह न कळत निघून गेल्याचें योगमायेनें मूढ झालेल्या जोहरास कसें समजलें व आपल्या सेनेच्या बळावर त्यानें कोणता प्रतीकार केला तें सर्व, वीर शिवाजीच्या यशोरूपी क्षीरसागरांत पोहणाऱ्या परमानंदा, त्वां सांगावें.

कवींद्र उवाच

शिवः स्वयं प्रणालाद्रेर्यियासुरभवद्यदा ।
वीराय जोहरायेमं संदेशं व्यसृजत्तदा ॥ ४ ॥

कवींद्र म्हणाला:—

४ जेव्हां शिवाजीनें स्वतः पन्हाळगडाहून जाण्याची इच्छा केली, तेव्हां त्यानें वीर जोहरास असा निरोप पाठविला.

शिवराज उवाच

येदिलेन समाहूतैस्ताम्रैः स विषयो मम ।
उपक्रांतस्त्वाक्रमितुमतिक्रांतिविकारिभिः ॥ ५ ॥

शिवाजी म्हणाला:—

५ आदिलशहानें बोलावलेले व माझ्या अतिक्रमणामुळें रागावलेले मोगल माझा देश आक्रमूं लागले आहेत.

अतस्तैरधुना योद्धुमितः प्रस्थीयते मया ।
योद्धव्यं बत मे योधैर्युद्धविद्भिरिह त्वया ॥ ६ ॥

६ म्हणून त्यांच्याशीं युद्ध करण्यासाठीं आतां मी येथून निघत आहें. तेव्हां तूं माझ्या युद्धनिपुण योद्ध्यांशीं येथें लढावेंस.

यदि वास्ति मतिस्तेऽद्य द्वंद्वयुद्धे सकौतुका ।
तर्ह्यलंक्रियतामेत्य प्रणालाद्रेरुपत्यकाम् ॥ ७ ॥

७ किंवा जर माझ्याशीं मजेनें—कौतुकानें द्वंद्वयुद्ध करण्याची तुझी आज इच्छा असेल, तर पन्हाळगडाच्या पायथ्याशीं यावें.

स्वेन स्वेन ह्यनीकेन विदूरादवलोकितौ ।
योत्स्यावः सोत्सवं तत्र बत निस्त्रिंशधारिणौ ॥ ८ ॥

८ स्वतःचीं सैन्यें आम्हाला दुरून पाहात असतां आपण दोघेहि खड्ग घेऊन तेथें आनंदानें लढूं !

तमाकर्ण्यापि संदेशं कृती कर्णपुराधिपः ।
अनाकर्णितवच्चक्रे चकितेन स्वचेतसा ॥ ९ ॥

९ त्या कर्णूलच्या कुशल अधिपतीनें ( जोहरानें ) तो संदेश ऐकूनहि, मन भयचकित झाल्यामुळें, न ऐकल्यासारखें केलें.

तदाप्रभृति तेनोच्चैर्भायीखानादयो भटाः ।
संदिष्टाः सर्वतस्तस्य पर्वतस्य निरोधने ॥ १० ॥

१० तेव्हांपासून त्यानें भायीखानादि योध्द्यांना त्या गडास सर्व बाजूंनीं कडेकोट वेढा देण्यास आज्ञा केली.

अज्ञाता नैव निर्याति न चायाति पिपीलिका ।
तथोपविविशुस्तत्र ततो जोहरसैनिकाः ॥ ११ ॥

११ मग मुंगीसुद्धां न कळतां बाहेर जाणार नाहीं किंवा आंत येणार नाहीं अशा रीतीनें जोहराच्या सैनिकांनीं तेथें वेढा दिला.

अंधीकृत्येव तांस्तत्र निविष्टान् प्रतियोधिनः ।
शिवः स्वीयेन शौर्येण परिधिं तमलंघयत् ॥ १२ ॥

१२ तेथें ( वेढा देऊन ) बसलेल्या त्या शत्रुयोध्यांना जणूं काय आंधळे करून शिवाजी स्वशौर्यानें तो वेढा फोडून गेला.

स ततः सप्तभिर्यामैः पंचभिर्योजनैर्मितम् ।
अतीत्य किल पंथानं विशालं शैलमासदत् ॥ १३ ॥

१३ नंतर त्यानें खरोखर सात प्रहरांत पांच योजनें (४० मैल) मार्ग आक्रमून विशाळगड गांठला.

अथोदन्तविदश्चाराः शाहराजात्मजं नृपम् ।
विनिर्गतं प्रणालाद्रेर्जोहराय न्यवेदयन् ॥ १४ ॥

१४ मग ती बातमी जाणणाऱ्या हेरांनीं शिवाजी पन्हाळगडावरून निघून गेला असें जोहरास सांगितलें.

संवर्तसागरावर्तवर्तीव स ततः स्वयम् ।
तांतभावमधात्तत्र भ्रांतभ्रांतः सभांतरे ॥ १५ ॥

१५ तेव्हां जणूं काय प्रलयकाळच्या सागरांतील भोंवऱ्यांत सांपडलेला तो जोहार स्वतः अत्यंत व्यामूढ होऊन सभेमध्यें खिन्न झाला.

अहो रुद्धो विरुद्धोऽयमस्माभिरिह भूधरे ।
अस्मान् विस्मापयन्नस्मादकस्मादद्य निर्गतः ॥ १६ ॥

१६ अहो ह्या गडावर आम्ही कोंडलेला हा शत्रु आम्हास चकित करून आज येथून अकस्मात् निघून गेला यास काय म्हणावें !

अथ येदिलशाहाय दर्शयिष्ये कथं मुखम् ।
अतःप्रभृति मे जन्म परिहासाय केवलम् ॥ १७ ॥

१७ आतां मी आदिलशहास तोंड कसें दाखवूं ? यापुढें माझें जिणें केवळ उपहासास कारणीभूत होय.

यवनांतकरं ह्येनं मम हस्ताद्विनिःसृतम् ।
निशम्य किं वदिष्यंति शास्ताखानादयोऽपि माम् ॥ १८ ॥

१८ यवनांचा नाश करणारा हा माझ्या हातून निसटलेला ऐकून शाएस्ताखानादिसुद्धां मला काय म्हणतील !

अनुतप्येति स चिरं विचिंत्य च मुहुर्मुहुः ।
जगाद दुर्मदं वीरं मसूदं नाम बर्बरम् ॥ १९ ॥

१९ असा पुष्कळ वेळ पश्चात्ताप करून व वारंवार विचार करून तो अतिमत्त अशा वीर सिद्दी मसूदास म्हणाला.

जोहर उवाच

ग्रन्थिस्थेनेव रत्नेन सपत्नेनाधुनामुना ।
निरोधपरिमुक्तेन बत मे दूयते मनः ॥ २० ॥

जोहर म्हणालाः—

२० गांठींतील (थैलींतील) रत्नाप्रमाणें आतां हा शत्रु वेढ्यांतून निसटल्यामुळें माझ्या मनास किती तरी दुःख होत आहे !

पश्यतां नः समस्तानां हस्ताद्योऽद्य विनिःसृतः ।
द्रुतमेव महाबाहो मसूद तमनुद्रव ॥ २१ ॥

२१ आम्ही सगळे पाहात असतांना जो आज आमच्या हातांतून निसटला त्याचा, हे महाबाहु मसूदा, शीघ्र पाठलाग कर.

निजकार्यांतरव्यग्रो विशाले च शिलोच्चये ।
स चिरं बत न स्थाता त्वमतस्त्वरितो भव ॥ २२ ॥

२२ आपल्या दुसऱ्या कार्यामध्यें व्यग्र असलेला तो (शिवाजी) विशाळगडावर फार वेळ राहणार नाहींच, म्हणून तूं त्वरा कर.

स तेनेति विनिर्दिष्टो विशिष्टः शौर्यकर्मणि ।
महत्या सेनया सार्धं अनुदुद्राव तं द्विषम् ॥ २३ ॥

२३ याप्रमाणें त्यानें आज्ञा केल्यावर तो शौर्यकर्मामध्यें असामान्य ( मसूद ) मोठ्या सेनेसह त्या शत्रूचा पाठलाग करूं लागला.

आजानु तुरगास्तस्य ममज्जुः पथि पंकिले ।
निपेतुः पत्तयश्चापि सांद्रशैवालसंकुले ॥ २४ ॥

२४ चिखलाळ मार्गांत त्याचे घोडे गुडघ्यापर्यंत रुतले व पदातीसुद्धां दाट शेवाळ्यामध्यें पडले.

मसूदमागतं श्रुत्वा शिवराजः पराक्रमी ।
ससज्जे संगरायोच्चैर्वसंस्तत्र शिलोच्चये ॥ २५ ॥

२५ मसूद आलेला ऐकून त्या गडावर राहणारा पराक्रमी शिवाजी राजा लढण्यास चांगला सिद्ध झाला.

पल्लीवनपतिर्वीरो जसवंतो नराधिपः ।
प्रतापी सूर्यराजश्च शृंगारपुरपार्थिवः ॥ २६ ॥

अपरेऽपि च सामन्ताः शैलस्यास्य निरोधने ।
नियोजितचरास्तेन जोहरेण दुरात्मना ॥ २७ ॥
युध्यमाना अपि मुहुः शिवं शैलाधिरोहिणम् ।
निषेध्दुं न क्षमंते स्म पराभूताः पदे पदे ॥ २८ ॥

२६–२८ पल्लीवनाचा ( पालीचा ) राजा वीर जसवंतराव, शृंगापूरचा राजा प्रतापी सूर्याजीराव आणि दुसरेहि सामंत, त्या गडास वेढण्याच्या कामीं त्या दुरात्म्या दुष्ट जोहरानें पूर्वीच नेमले होते; ते वारंवर लढत असतांहि पदोपदीं पराभूत झाल्यामुळें गडावर चढणाऱ्या शिवाजीस अडवूं शकले नाहींत.

ते सर्वेऽपि मसूदेन ससैन्येनाभिमानिना ।
समेत्य भूधरममुं भूयो रुरुधुरुद्धताः ॥ २९ ॥

२९ त्या सगळ्याच गर्विष्ठ राजांनीं,त्या अभिमानी व ससैन्य मसूदास मिळून त्या गडास पुनः वेढा दिला.

अथ ते शिवराजस्य योधाः क्रोधारुणेक्षणाः ।
अवरुह्य गिरेस्तस्मात् निःस्वनंतो घना इव ॥ ३० ॥
धावमानाः सावधानान् रुंधानानभियायिनः ।
शिताभिरसिधाराभिः कृतोत्पातमघातयन् ॥ ३१ ॥

३०–३१ नंतर क्रोधानें डोळे लाल झालेले असे ते शिवाजीचे योद्धे त्या गडावरून खालीं उतरून मेघाप्रमाणें गर्जना करीत धावून जाऊन सावधपणें वेढा देणाऱ्यांवर हल्ला करून, उड्या वालून तीक्ष्ण तरवारींनीं कापून काढले.

बहवो बर्बरास्तत्र बालिभिः शिवपत्तिभिः ।
खंडिताः खड्गधाराभिर्ययुः संयमिनीं पुरीम् ॥ ३२ ॥

३२ तेथें पुष्कळ शिद्यांस शिवाजीच्या बलाढ्य पायदळांनीं तरवारीच्या धारांनीं कापून काढल्यामुळें त्यांनीं यमपुरीची वाट धरली.

जसवंतः सूर्यराजः सामन्ताश्चापि भूरिशः ।
रयं धारयितुं तेषां न तत्र प्रभवोऽभवन् ॥ ३३ ॥

३३ तेथें जसवंतराव, सूर्याजीराव व दुसरेहि पुष्कळ सामंत त्यांचा मारा सहन करूं शकले नाहींत.

मसूदस्त्वपयान्तीं तां परावर्त्यात्मवाहिनीम् ।
वेगवान् प्रतिजग्राह परान् ग्रह इव ग्रहान् ॥ ३४ ॥

३४ पळून जाणाऱ्या त्या आपल्या सैन्यास परतवून, वेगवान मसूदानें, ग्रह ग्रहांवर हल्ला करतो त्याप्रमाणें, शत्रूंवर हल्ला केला.

**अथोभयेषां सैन्यानां संनिपातो महानभूत् ।**
**असिभिः शक्तिभिश्चोच्चैर्निघ्नतामितरेतरम् ॥ ३५ ॥**

३५ तेव्हां तरवारींनीं व शक्तींनीं एकमेकांस जोरानें मारणाऱ्या त्या दोनहि सैन्यांमध्यें मोठें युद्ध झालें.

**ततो भुजमदावेशनिघ्नान् विघ्नानिवागतान् ।**
**बर्बरान् पातयामासुः परे प्रधनपारगाः ॥ ३६ ॥**

३६ तेव्हां बाहुबलाच्या गर्वानें उन्मत्त झालेल्या व विघ्नाप्रमाणें चालून आलेल्या शिद्यांना युद्धनिपुण शत्रूंनीं ( मराठ्यांनीं ) लोळविलें.

**तरूनिव तडित्वंतो गरुत्मन्त इवोरगान् ।**
**जगर्जुस्तान् विनिर्जित्य शैलाधिपतिपत्तयः ॥ ३७ ॥**

३७ विद्युद्युक्त मेघ वृक्षांना मोडून व गरुड सापांना पकडून गर्जना करतात, त्याप्रमाणें शिवाजीच्या पदातींनीं त्यांना जिंकून गर्जना केली.

**परितः शीर्णशीर्षण्यं शीर्णपाण्यंघ्रिमस्तकम् ।**
**शीर्णस्कंधोरुयुगलं तदाभूद् रणमंडलम् ॥ ३८ ॥**

३८ त्या वेळीं फुटलेलीं शिरस्त्राणें, तुटलेले हात, पाय, मस्तक, खांदे, मांड्या हीं त्या रणभूमीवर सर्वत्र पसरलेलीं होतीं.

**सा शादहरिताप्युच्चैर्विशालाद्रेरुपत्यका ।**
**लोहितैः प्रतिवीराणामभूत् सपदि लोहिता ॥ ३९ ॥**

३९ कोंवळ्या गवतानें अत्यंत हिरवीगार असलेली ती विशाळगडाच्या लगतची भूमि शत्रूकडील वीरांच्या रक्तानें एकदम लालभडक झाली.

**ऊरुभिर्जानुभिश्चापि तथा जंघाभिरंघ्रिभिः ।**
**शिरोभिश्च नराश्वानां दुष्प्रेक्ष्या वसुधाभवत् ॥ ४० ॥**

४० माणसें व घोडे यांच्या मांड्या, गुडघे, जंघा, पाय व डोकीं यांच्यायोगें भूमि हिडिस दिसूं लागली.

**इत्थं मसूदः स्वं सैन्यं शिवरोषमहार्णवे ।**
**समस्तमात्महस्तेन मज्जयित्वा विलज्जितः ॥ ४१ ॥**

परैः प्रधनपारीणैर्जीवन्मुक्तोऽनपेक्षितः ।
पराचीनोऽभवत्तेभ्यः परं निर्वेदमागतः ॥ ४२ ॥

४१-४२ याप्रमाणें आपलें सगळें सैन्य आपल्या हातानें शिवाजीच्या क्रोधसमुद्रांत बुडवून लज्जित झालेला मसूद युद्धपारंगत शत्रूंनीं अनपेक्षितपणें जिवंत सोडला व त्यास पराकाष्ठेचा खेद होऊन तो शत्रूंपासून पराङ्मुख झाला.

प्रपलाय्य रणात्तस्मात् पुरस्तादात्मनः स्थितम् ।
जोहरस्तमथामंस्त परलोकादिवागतम् ॥ ४३ ॥

४३ त्या युद्धांतून पळून येऊन आपणासमोर उभा राहिलेला तो ( मसूद ) जणूं काय परलोकाहून आला आहे असें जोहरास वाटलें !

अथ स्वविषयोपांतादानायितचरां चमूम् ।
समादाय विशालाद्रात् पर्वतात् प्रस्थितः स्वयम् ॥ ४४ ॥

४४ नंतर आपल्या प्रांताच्या सीमेहून पूर्वींच आणवून ठेवलेलें सैन्य घेऊन तो स्वतः विशाळगडाहून निघाला.

उषित्वा वसतीस्तास्ताः सोत्सवे पथि पंचषाः ।
सद्यो राजगिरिं गत्वा राजा राजगिरीश्वरः ॥ ४५ ॥
चंचन्मरीचिनिचयस्फुरद्रत्नासनस्थिताम् ।
कुलस्त्रीभिः परिवृतां कुलस्त्रीकुलदेवताम् ॥ ४६ ॥
तत्तद्व्रतवतीं नक्तंदिवमांचितदैवताम् ।
ददतीमाशिषस्तास्ताः सत्यगंभीरभाषिताम् ॥४७ ॥
प्रमोदबाष्पप्रचयस्तिमितायतलोचनाम् ।
समुच्चलितवात्सल्यरसां सदर्शनोत्सुकाम् ॥ ४८ ॥
संप्रस्नुतस्तनस्तन्यधाराभिरमृतात्मभिः ।
स्नपयन्तीं महाबाहुर्जननीं स्वामवन्दत ॥ ४९ ॥

४५-४९ आनंददायक मार्गांत निरनिराळ्या पांचसहा वस्ती करून राजगडच्या (शिव) राजानें लगेच राजगडास जाऊन, चमकणाऱ्या किरणसमूहाच्यायोगें लखलखणाऱ्या रत्नजडित आसनावर बसलेल्या, कुलीन स्त्रियांनीं परिवेष्टित असलेल्या, कुलीन स्त्रियांचें कुलदैवत झालेल्या, नाना प्रकारचीं व्रतें करणाऱ्या, रात्रंदिन दैवतांची पूजा करणाऱ्या, निरनिराळे आशीर्वाद देणाऱ्या, सत्य व गंभीर

भाषण करणाऱ्या, आनंदाश्रुपुरानें दीर्घ नेत्र स्तिमित झालेल्या, अंतःकरणांत पुत्रप्रेम उचंबळलेल्या, दर्शनोत्सुक झालेल्या, स्तनांतून वाहणाऱ्या अमृतमय दुग्धधारांनीं न्हाऊं घालणाऱ्या आपल्या जननीस वंदन केलें.

ततस्तदंतिके तत्तद् वृत्तमावेदयन्नयम् ।
अनयत्तद्दिनं सर्वं विजयी शाहनंदनः ॥ ५० ॥

५० नंतर निरनिराळ्या प्रकारचा सर्व वृत्तांत सांगण्यांत त्या विजयी शिवाजीनें तो सर्व दिवस तिच्यासंनिध घालविला.

आगतो विजयी राजा निजं राजगिरिं यदा ।
प्राणदन्मृदुगंभीरस्वनं दुंदुभयस्तदा ॥ ५१ ॥

५१ जेव्हां विजयी ( शिवाजी ) राजा आपल्या राजगडास आला, तेव्हां दुंदुभि मृदु व गंभीर ध्वनीनें वाजूं लागल्या.

तस्त्रथं परिभूय बर्बरबलं सद्यः स्वबाहोर्बलाद्
आयाते शिवपत्तनं शिवमहीपाले प्रणालाचलात् ।
सेनाभिः सकलाभिरेव सहितस्तत्तत्प्रयत्नाकुलः
स्वेऽभीष्टे किल संशयालुरभवद्दिल्लीपतेर्मातुलः ॥ ५२ ॥

५२ तेथील शिद्यांच्या सैन्याचा आपल्या बाहुबलानें तत्काळ पराभव करून शिवाजी राजा पन्हाळगडाहून आपल्या राजधानीस(राजगडास) आला.तेव्हां सगळें सैन्य बरोबर असून व निरनिराळ्या प्रयत्नांमध्यें तें व्यग्र असून सुद्धां दिल्लीपतीच्या मामास ( शाएस्ताखानास ) आपला इष्ट हेतु सिद्धीस जातो कीं नाहीं याविषयीं संशय उत्पन्न झाला.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां
शतसाहस्र्यां संहितायां स्वपुरप्रवेशो
नामाध्यायः ॥ २७ ॥

---

# अध्याय २८ वा

———:o:———

मनीषिण ऊचुः

तस्मिन् भृशबलोत्तंसे राज्ञि राजगिरिं गते ।

गतिः काऽभूत् प्रणालाद्रेः तदाचक्ष्व महामते ॥ १ ॥

पंडित म्हणाले:—

१ तो भोसलेकुलभूषण राजा शिवाजी राजगडास गेला असतां पन्हाळगडाची काय गति झाली तें, हे महाबुद्धिमाना ( परमानंदा ), सांग.

कवींद्र उवाच

शास्ताखानः स्वयं ह्यत्र विषये तत्र जोहरः ।

उभयत्रापि युद्धाय प्रभवामः कथं वयम् ॥ २ ॥

कवींद्र म्हणाला:—

२ स्वतः शाएस्तेखान ह्या प्रांतांत आहे; तिकडे शिद्दी जोहर आहे. तेव्हां आम्ही दोन्हीकडे कसे लढूं शकूं ?

तदद्य येदिलाधीनः प्रणालाद्रिर्विधीयताम् ।

प्रस्थीयतां च भवता कार्यांतरमिह स्थितम् ॥ ३ ॥

३ म्हणून आज पन्हाळगड आदिलशहाच्या स्वाधीन कर आणि तूं नीघ. इकडे दुसरें काम उपस्थित झालें आहे.

अलीशाहात् प्रतिनिधिं तस्य शैलस्य सर्वथा ।

आदास्यामः क्षणेनैव नास्मद्वचनमन्यथा ॥ ४ ॥

४ अलीशहापासून त्या गडाचा मोबदला आपण एका क्षणांत खातीनें घेऊं; आमचें भाषण खोटें होणार नाहीं.

निजदूतमुखेनेत्थं शिवेन प्रतिबोधितः ।

परिचिन्त्य निजे चित्ते स्वयं त्र्यंबकभास्करः ॥ ५ ॥

संगराभिनिविष्टोऽपि प्रभोराज्ञां प्रमाणयन् ।

अलीशाहाय तं शैलं विततार विनीतवत् ॥ ६ ॥

५-६ असें आपल्या दूताच्या तोंडून शिवाजीनें त्र्यंबक भास्करास कळविलें असतां त्यानें त्याचा आपल्या मनांत विचार करून स्वतः युद्धोत्सुक असूनसुद्धां

धन्याची आज्ञा प्रमाण मानून ( शिरसा वंद्य करून ) तो गड (पन्हाळा) नम्रपणें अलीशहास देऊन टाकला.

**ततः स जोहरं दृष्ट्वा तस्मै पृष्ट्वाप्यनामयम् ।**
**सुतरां सत्कृतस्तेन शिवसौहृदकांक्षया ॥ ७ ॥**

७ नंतर जोहरास भेटून त्यानें त्यास कुशल विचारलें. शिवाजीचा स्नेह जोडण्याच्या इच्छेनें त्यानेंहि त्याचा अत्यंत सत्कार केला.

**बहुना स्वसहायेन सैन्येन परितो वृतः ।**
**उपेत्य प्रणमन्मौलिः प्रभुं निजमुदैक्षत ॥ ८ ॥**

८ आपणास साह्य करणाऱ्या पुष्कळ सैन्यासह जवळ येऊन, मस्तक लववून त्यानें आपल्या धन्याकडे पाहिलें.

**मनीषिण ऊचुः**

**नायं त्वया निहंतव्यो मंतव्यो मंत्र एष मे ।**
**निमित्तमन्यदेवास्य जोहरस्य विनाशने ॥ ९ ॥**

पंडित म्हणाले:—

९ " याला तूं मारूं नकोस; ही माझी मसलत मान्य कर; ह्या जोहराचा नाश करण्याचें दुसरेंच निमित्त आहे. "

**भगवत्या समागत्य शिवराजाय धीमते ।**
**उक्तपूर्वमिदं ह्यासीत् प्रणालाचलवर्तिने ॥ १० ॥**

१० असें बुद्धिमान शिवाजी राजा पन्हाळगडास असतां त्याच्याजवळ येऊन त्यास देवी भवानीनें पूर्वींच सांगितलें होतें.

**तर्हि येन निमित्तेन यथा स निधनं गतः ।**
**तथा कथय नः सर्वं कवींद्र कुशलो ह्यसि ॥ ११ ॥**

११ तेव्हां तो कोणत्या निमित्तानें व कसा नाश ( मृत्यु ) पावला तें सर्व, हे कवींद्रा, आम्हास सांग; कारण तूं कुशल आहेस.

**वयं भागीरथीतीरे भवतो भारतीमिमाम् ।**
**पायं पायं न तृप्यामः सुधां सुमनसो यथा ॥ १२ ॥**

१२ देव जसे नित्य अमृतपान करीत असतांहि तृप्त होत नाहींत, तशी भागीरथीच्या तीरीं आपली वाणी सारखी उत्सुकतेनें ऐकूनहि आमची तृप्ति होत नाहीं.

कवींद्र उवाच

भगवत्या समादिष्टे शिवभूपे महाभुजे ।
ध्वजिनीं ताम्रवक्त्राणां पराभवितुमात्मना ॥ १३ ॥
बलिनं बर्बरव्यूहं सद्यो भित्वा विनिर्गते ।
शिलोच्चये प्रणाले च दैवाद्धस्तमुपागते ॥ १४ ॥
अलीशाहोऽतिमंदात्मा मन्यमानोऽन्यथात्मनि ।
चिराय जोहरायैव चुकोप किल कोपनः ॥ १५ ॥

कवींद्र म्हणालाः—

१३–१५ महाबाहु शिवाजी राजास, भवानी देवीनें आज्ञा केल्यावरून तो स्वतः मोंगलाच्या सेनेचा पराभव करण्यासाठीं शिद्याचा बलाढ्य सेनाव्यूह एकदम भेदून ( कोंडी फोडून ) निघून गेला असतां व पन्हाळगड सुदैवानें हातीं आला असतां, अति महामूर्ख व रागीट अलीशहाच्या मनांत भलतेंच येऊन तो पुष्कळ काळपर्यंत जोहरावरच रागावला.

ततो भूरि धनं लब्ध्वा बत लुब्धात्मना त्वया ।
कुमते ज्ञायमानोऽपि स प्रस्थास्यन्नुपेक्षितः ॥ १६ ॥

१६ "हे दुष्टबुद्धी, त्वां लोभ्यानें त्याच्यापासून पुष्कळ धन घेऊन तो निघून जाणार हें माहीत असतांहि त्याच्याकडे कानाडोळा केलास !

भवता प्रतिरुद्धस्य भवतोऽनुमतिं विना ।
दुर्गमो निर्गमस्तस्य नृपतेरिति मे मनः ॥ १७ ॥

१७ तूं त्यास कोंडलें असतां त्या राजानें निघून जाणें तुझ्या अनुमतीशिवाय दुष्कर होतें असें मला वाटतें.

तस्मादेहि धनं देहि यद्दत्तं तेन भूभृता ।
मद्धस्तेनैव भवतो भवेन्निधनमन्यथा ॥ १८ ॥

१८ म्हणून तूं ये आणि त्या राजानें दिलेलें धन दे; नाहीं तर माझ्या हातून तुझा मृत्यु ( नाश ) होईल."

वर्णदूतमिमं तस्मै प्रेषयामास येदिलः ।
तथापि न बिभायास्माद् बर्बरो बलिनां वरः ॥ १९ ॥

१९ असें आदिलशहानें त्यास पत्र पाठविलें; तथापि तो बलिश्रेष्ठ सिद्दी त्याला भ्याला नाहीं.

न यदा येदिलेनैष संपरायमपारयत् ।
तदा कर्णपुरं सद्यः शिश्रिये दुर्गदुर्गमम् ॥ २० ॥

२० जेव्हां हा आदिलशहाशीं लढूं शकला नाहीं, तेव्हां लगेच दुर्गाप्रमाणें दुर्गम अशा कर्णूलाचा त्यानें आश्रय केला.

**अथ केनापि यत्नेन जोहराय स येदिलः ।**
**हालया साकमज्ञातं हालाहलमदापयत् ॥ २१ ॥**

२१ नंतर त्या आदिलशहानें कळूं न देतां कांहींतरी युक्तीनें जोहरास मद्याबरोबर विष देवविलें !

**अहो येदिलशाहस्य महती मतिमंदता ।**
**उपकारपरे येन जोहरेऽपनयः कृतः ॥ २२ ॥**

२२ उपकार करणाऱ्या जोहरास ज्यानें अपकार केला, त्या आदिलशहाचा हा केवढा मोठा मूर्खपणा !

**अमानुषगतिर्देव्याः प्रसादेन सुदुर्धरः ।**
**मोहयित्वा परचमूं परिवेषपरां पराम् ॥ २३ ॥**
**प्रयातो भूधरात्तस्माद् भूभृद् भृशबलो यदि ।**
**मन्यामहे वयं तर्हि नापराधी स जोहरः ॥ २४ ॥**

२३-२४ देवीच्या प्रसादानें तो अमानुषगति व अजिंक्य राजा भोसला वेढा देऊन बसलेल्या मोठ्या शत्रुसेनेच्या हातावर तुरी देऊन जर त्या गडावरून निघून गेला, तर त्यांत त्या जोहराचा अपराध नाहीं असें आम्हांस वाटतें.

**अप्रस्तुतमिदं ह्यास्तां प्रथमप्रस्तुतं परम् ।**
**सुधांशुदर्शनोद्वेल्लत्सुधांभोधिसहोदरम् ॥ २५ ॥**
**चरित्रं शिवराजस्य कथ्यमानं सविस्तरम् ।**
**निशम्य विबुधैः सर्वैर्निजे हृदि निधीयताम् ॥ २६ ॥**

२५-२६ पण हें विषयांतर राहूं दे. प्रथम आरंभलेलें, श्रेष्ठ, चंद्रदर्शनानें उचंबळणाऱ्या अमृतसागरासारखें (गोड), सविस्तर वर्णिलें जाणारें शिवरायाचें चरित्र आपण सर्व पंडितांनीं ऐकून आपल्या हृदयांत सांठवावें.

**बर्बरान् परिधीभूतान् परिभूय स्वतेजसा ।**
**बली भृशबलो यावदायाति शिवपत्तनम् ॥ २७ ॥**
**तावत्ताम्राननबलैः सबलैः कृतविक्रमम् ।**
**संग्रामदुर्गमाक्रांतं कृत्वा संग्राममद्भुतम् ॥ २८ ॥**

२७-२८ वेढा देऊन बसलेल्या शिद्याच्या हातावर स्वपराक्रमानें तुरी

देऊन बलवान् (शिवाजी) भोसला जों राजगडावर येतो, तोंच मोंगलाच्या बलाढ्य सैन्यांनीं अद्भुत युद्ध करून पराक्रमानें लढणारा संग्रामदुर्ग काबीज केला.

तमुदंतं शिवनृपो निशम्य शिवपत्तने।
सर्वनीतिविदां वर्यः सचिवानिदमब्रवीत् ॥ २९ ॥

२९ ती बातमी राजगडावर ऐकून, सर्व राजनीतिवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा तो शिवाजी राजा सचिवांस असें बोलला:—

शिवराज उवाच

कार्यांतरप्रसक्तत्वात् मयि सांतरमास्थिते।
संग्रामदुर्गसहिता गता चक्रामती पुरी ॥ ३० ॥

शिवाजी म्हणाला:—

३० दुसऱ्या कार्यांत गुंतल्यामुळें मी दूर असतां चाकण नगरी संग्रामदुर्गासह हातची गेली.

इदानीमेव तां दुर्गसहितां दुर्ग्रहामपि।
स्वयमभ्येत्य ताम्रेभ्यो गृहीतुमहमुत्सहे ॥ ३१ ॥

३१ ती घेण्यास कठीण असली तरी तिच्यावर स्वतः चालून जाऊन ती किल्ल्यासह मीं आतांच घेऊं इच्छितों.

परं त्वापतितं यद्धि कार्यांतरमनंतरम्।
प्रयतिष्यामहे तस्मै वयं सर्वेऽप्यतपरम् ॥ ३२ ॥

३२ परंतु दुसरें जें निकडीचें कार्य उपस्थित झालें आहे त्याच्या प्रयत्नास आपण सर्वच यापुढें लागूं.

सहायपरिहीनेन नरेणेह न केनचित्।
परीभावयितुं शक्या प्रतीपानामनीकिनी ॥ ३३ ॥

३३ ज्यास साह्यकर्ता नाहीं अशा कोणत्याही मनुष्याच्या हातून या जगांत शत्रुसेनेचा पराभव होणें अशक्य आहे.

तस्माद्यत्नेन महता नरेंद्रेण विपश्चिता।
संग्राह्यानीकिनी शश्वत् परनिग्रहकारिणी ॥ ३४ ॥

३४ म्हणून शहाण्या राजानें शत्रूंचा नाश करणारें सैन्य मोठ्या यत्नानें सतत बाळगलें पाहिजे.

बहुनार्थेनरहितो महानपि महीपतिः।
न तद्विधानां सेनानां संग्रहं कर्तुमर्हति ॥ ३५ ॥

३५ ज्याच्याजवळ पुष्कळ द्रव्य नाहीं अशा मोठ्या राजासमुद्धां त्या प्रकारचीं सैन्यें बाळगतां येत नाहींत.

अर्थादर्थो भवत्युच्चैरर्थाद्धर्मोऽपि वर्धते ।
अर्थादेव तृतीयोऽर्थस्तस्मादर्थः प्रशस्यते ॥ ३६ ॥

३६ पैशापासून पैसा अतिशय होतो; पैशापासून धर्महि वाढतो; पैशानें कामहि प्राप्त होतो. म्हणून पैशाची प्रशंसा करतात.

कुलं शीलं वयो विद्या पौरुषं सत्यवादिता ।
गुणज्ञता च गांभीर्यमर्थादेव प्रजायते ॥ ३७ ॥

३७ कुल, शील, वय, विद्या, पराक्रम, सत्यवादित्व, गुणज्ञता, गांभीर्य हीं पैशापासूनच उत्पन्न होतात.

अर्थादसौ परश्चोच्चैर्लोको लोकस्य निश्चितः ।
पुमानर्थेनरहितो जीवन्नपि न जीवति ॥ ३८ ॥

३८ पैशानेंच लोकांना इहलोक व परलोक अगदीं निश्चितपणें प्राप्त होतात. द्रव्यहीन पुरुष जिवंत असूनही नसल्यासारखा असतो.

यस्यार्थास्तस्य सुहृदो यस्यार्थास्तस्य पौरुषम् ।
यस्यार्थास्तस्य सर्वेऽपि सहायाः संभवंति हि ॥ ३९ ॥

३९ ज्याच्याजवळ विपुल पैसा असतो, त्याला मित्र असतात; ज्याच्याजवळ पैसा असतो, तो पराक्रमी असतो; ज्याच्यापाशीं पैसा असतो, त्याला सर्वच साह्य करतात.

तद्दुग्ध्वा स्म प्रभावेण पृथुवत् पृथिवीमिमाम् ।
तमर्थमाहरिष्यामि यदधीनमिदं जगत् ॥ ४० ॥

४० म्हणून पृथुराजाप्रमाणें स्वसामर्थ्यानें ह्या पृथ्वीचें दूध काढून ( सर्व प्रांतांतून खंडणी वसूल करून ) ज्याच्यावर हें जग अवलंबून आहे तो पैसा घेऊन येईन.

तदनंतरमेवोच्चैस्तत्र दिल्लींद्रमातुले ।
करिष्यामि प्रतीकारमगस्त्य इव सागरे ॥ ४१ ॥

४१ त्यानंतरच, अगस्त्य ऋषींनीं समुद्राचा जसा सूड घेतला तसा तिकडे दिल्लीपतीच्या मामाचा चांगला सूड घेईन.

इति ब्रुवाणमुचितं सचिवाः सदसि स्थितम् ।
नयोपेतं विनयिनो व्याहरंति स्म भूपतिम् ॥ ४२ ॥

४२ ह्याप्रमाणें राजानें सभेंत बसून योग्य व राजनीतियुक्त भाषण केलें असतां त्यास विनयशाली सचिव म्हणाले:—

**सचिवा ऊचुः**

**अर्थः समर्थ इति यद्भवानाह तदर्थवत्।**
**तन्नोति कः प्रतिब्रूते तिष्ठन् वैतंडिकव्रते ॥ ४३ ॥**

सचिव म्हणाले:—

४३ "पैसा हा सामर्थ्यवान आहे" असें जें आपण म्हणतां तें "तसें नाहीं" असें कोणता शहाणा माणूस वितंडवादाचा अवलंब करून उलट म्हणेल?

**अर्थः समर्थसामर्थ्याद् व्रजेत्सामर्थ्यमात्मनि।**
**असमर्थाश्रितस्त्वर्थो नार्थोऽनर्थो हि केवलम् ॥ ४४ ॥**

४४ समर्थाच्या सामर्थ्यामुळें पैशाच्या ठिकाणीं सामर्थ्य येईल; पण असमर्थाजवळ असलेला पैसा हा लाभकारक नसतो, तर तो केवळ अनर्थकारकच होय.

**योऽर्थः सर्वेषु लोकेषु स तवैवेति विद्महे।**
**तद्याहि जैत्रयात्रायै शिवराज महाद्युते ॥ ४५ ॥**

४५ सर्व लोकांजवळ जो पैसा आहे तो तुझाच आहे हें आम्ही जाणतों. म्हणून हे महातेजस्वी शिवाजी राजा, आपण मुलुखगिरीवर जावें.

**किंच संप्रति सेनानीरिंद्रप्रस्थेंद्रमातुलः।**
**संग्रामदुर्गमव्यग्रो जित्वा भूत्वा महामनाः ॥ ४६ ॥**
**प्रस्थाय वै पुरः पुण्यपुरमास्थाय च स्थितः।**
**निशम्य त्वां महाबाहो शिवपत्तनवर्तिनम् ॥ ४७ ॥**
**भृशं विशंकमानोऽन्तः प्रायस्तेनैव वर्त्मना।**
**सह्यशैलावरोहाय सेनां संप्रेषयिष्यति ॥ ४८ ॥**

४६–४८ शिवाय सध्यां दिल्लीपतीचा मामा सेनापति शाएस्तेखान हा संग्रामदुर्ग जिंकून, निश्चिंत व गर्विष्ठ होत्साता पुढें चाल करून पुण्यास येऊन राहिला आहे. हे पराक्रमी राजा, तूं राजगडावर आहेस असें ऐकून मनांत अत्यंत भीति वाटून बहुधा त्याच वाटेनें तो आपली सेना सह्याद्रीवरून खालीं पाठवील.

**अभिद्रवंती सह्याद्रेर्यथा सा नावरोहति।**
**तावत्तथा विधातव्यमथान्यदपि सर्वथा ॥ ४९ ॥**

४९ चालून येणारी ती ( सेना ) सह्याद्रीवरून ज्या योगें खालीं उतरणार नाहीं अशी प्रथम तजवीज करावी. मग दुसऱ्याहि गोष्टी सर्व प्रकारें कराव्या.

**सचिवानामिति वचो निशम्य समयोचितम्।**
**स धन्यचरितः सम्यगमन्यत महामतिः॥ ५०॥**

५० सचिवांचें असें समयोचित भाषण ऐकून त्या महाबुद्धिमान व पुण्यशील राजास तें चांगलें वाटलें.

**मनीषिण ऊचुः**

**सहस्रैः सप्तिवाहानां त्रिसप्तत्या समन्वितः।**
**शास्ताखानः किमकरोत् बत पुण्यपुरस्थितः॥ ५१॥**

पंडित म्हणाले:—

५१ त्र्याहत्तर हजार घोडेस्वारांसह शाएस्तेखानानें पुण्यास आपलें ठाणें देऊन (पुढें) काय बरें केलें ?

**कवींद्र उवाच**

**स कारतलबं नाम यवनं कार्यकारिणम्।**
**पुरस्थितं समाहूय मिथः एतदभाषत॥ ५२॥**

कवींद्र म्हणाला:—

५२ समोर असलेल्या कारतलब नांवाच्या कार्यकर्त्या यवनास बोलावून त्यास तो एकांतांत असें म्हणाला.

**शास्ताखान उवाच**

**प्रतापी जसवंतस्ते जनकोऽजबडान्वयः।**
**भवानपि नयत्येतद्युद्धेनेव निजं वयः॥ ५३॥**

५३ तुझा बाप अजबड ( उजबेग ) वंशांतील जसवंत हा प्रतापवान आहे. आणि तूं सुद्धां आपलें हें वय युद्धांतच घालवीत आहेस.

**प्रबलं गालिबं जित्वा संप्रति स्वबलाश्रयात्।**
**प्रचंडपुर मादाय मह्यं दत्तमिह त्वया॥ ५४॥**

५४ बलाढ्य गालिबास जिंकून सध्यां स्वबळानें प्रचंडपूर घेऊन तूं मला येथें दिलेंस.

**सोऽधिपः सह्यशैलस्य दुर्धर्षः संगरे यथा।**
**करोत्यसुकरं कर्म तवापि विदितं तथा॥ ५५॥**

५५ अजिंक्य असा तो सह्याद्रीचा अधिपति शिवाजी युद्धामध्यें कसें दुष्कर कर्म करतो हें तुलाहि माहीत आहे.

**सह्यजयः सह्यपतिः सह्यस्याक्रमणं विना ।**
**नैवास्मद्वशतां गंता हंताहंकारसंयुतः ॥ ५६ ॥**

५६ सह्याद्रि पादाक्रांत केल्याशिवाय तो अजिंक्य व गर्विष्ठ सह्याद्रिपति ( शिवाजी ) आमच्या ताब्यांत मुळींच येणार नाहीं.

**सेनया सहितः सद्यस्तदद्य त्वं ममाज्ञया ।**
**बत प्रसह्य सह्याद्रेरवरोहे मतिं कुरु ॥ ५७ ॥**

५७ म्हणून माझ्या आज्ञेनें तू आज सेनेसह लगेच सह्याद्रि उतरण्याचा जोरानें विचार कर.

**अद्यप्रभृत्यहं वीर भविष्यामि भवद्वशः ।**
**अवरुह्य धरं सह्यं मह्यं देहि महद्यशः ॥ ५८ ॥**

५८ हे वीरा, आजपासून मी तुझ्या अधीन आहें. सह्यादि उतरुन मला मोठें यश ( मिळवून ) दे.

**चंपावत्यथ कल्याणपुरं भीमपुरी तथा ।**
**पणवल्ली पुनर्नागस्थानं कार्यं त्वयात्मसात् ॥ ५९ ॥**

५९ चौल, कल्याण, भिवंडी, पनवेल आणि नागोठणें हीं तूं हस्तगत कर.

**कच्छपाश्चाहुबाणाश्च महाप्राणा महायुधाः ।**
**तथैवामरसिंहोऽपि मित्रसेनः सबांधवः ॥ ६० ॥**
**गाढान्वयः सर्जराजो राजव्याघ्री च दुर्धरा ।**
**जसवंतश्च कोकाटो यादवश्च महाभुजः ॥ ६१ ॥**
**एतेऽति महिताः सैन्यसहिताः प्रहिता मया ।**
**सैन्यास्त्वामनुयातारो विरोचनमिवासुराः ॥ ६२ ॥**

६०-६२ महाबलवान व पराक्रमी ( मोठीं आयुधें असलेले ) कछप व चव्हाण, अमरसिंह, मित्रसेन व त्याचा भाऊ, सर्जेराव गाढे, अजिंक्य रायबागीण, जसवंत कोकाटे, महाबाहु जाधव हे अत्यंत माननीय असे मी सैन्यासह पाठविलेले सेनानायक विरोचनामागून जसे असुर गेले तसे-तुझ्यामागून येतील.

**अग्रगः समग्रसैन्यानां त्वमव्यग्रः पुरो भव ।**
**परिपालयिता पृष्ठं तवाहं प्रेष्ठकारिणः ॥ ६३ ॥**

६३ सर्व सैन्यांचा म्होरक्या असा तूं अव्यग्रपणानें पुढें हो. अत्यंत प्रिय करणारा जो तूं त्या तुझी मी पाठ राखीन.

इत्थं नियुक्तमात्रोऽयं पृतनापतिनामुना ।
वीरैः परिवृतो वीरः प्रतस्थे प्रथितक्रमः ॥ ६४ ॥

६४ ह्याप्रमाणें त्या सेनापतीची आज्ञा होतांक्षणींच हा प्रख्यात पराक्रमी वीर वीरांसह निघाला.

अथ पन्थानमाश्रित्य लोहाद्रेर्दक्षिणोत्तरम् ।
वीतभीः स बतारेभे सह्यशैलावरोहणम् ॥ ६५ ॥

६५ नंतर लोहगडच्या दक्षिणोत्तर मार्गानें तो निर्भयपणें सह्याद्रि उतरूं लागला.

एकपद्या तया यान्ती नालिकायंत्रतुल्यया ।
अभूदतीव स्थगिता वाहिनी सा पदे पदे ॥ ६६ ॥

६६ नलिकायंत्रासारख्या त्या पाऊल वाटेनें जात असतां ती सेना पदोपदीं अतिशय कुंठित झाली.

अस्मादवाङ्मुखीभूताः पताम इति निश्चिताः ।
नरास्ताम्राननचमूचराः सह्यमवातरन् ॥ ६७ ॥

६७ " ह्या वाटेवरून अधोमुख होऊन आपण पडूं " अशी खात्री झालेले मोंगलसैन्यांतील लोक सह्याद्रीवरून खालीं उतरले.

अहंकारपरः कारतलबः स्वबलान्वितः ।
हंतारं नैव हंतारं कांतारं तु व्यलोकत ॥ ६८ ॥

६८ आपल्या सैन्यासह येणाऱ्या त्या घमेंडखोर कारतलबास आपला शत्रु लवकर मुळींच दिसला नाहीं, तर अरण्यमात्र दिसलें.

शून्यामिव परैः पूर्णां तां वन्यां सोऽविशद्यदा ।
मित्रसेनादयस्तस्य पार्श्वे न विजहुस्तदा ॥ ६९ ॥

६९ शत्रूंनीं भरलेल्या पण जणूं काय शून्य दिसणाऱ्या अशा त्या झाडींत जेव्हां तो शिरला, तेव्हां मित्रसेनादि सरदारांनीं त्याची कड सोडली नाहीं.

न यत्र पवनस्तत्र यवनः स महावने ।
निवसन्नवने हेतुमात्मनो न व्यचिंतयत् ॥ ७० ॥

७० जेथें वारासुद्धां नव्हता अशा त्या महावनांत वस्ती करणाऱ्या कारतलबानें आपल्या रक्षणाचा ( सहजच ) उपाय चिंतिला नाहीं.

मनीषिण ऊचुः

तां वन्यामाविशन्तस्ते द्विषन्तः शिवभूपतेः ।
अनालोकमयं लोकं पश्यामः स्मेति मन्वते ॥ ७१ ॥

पंडीत म्हणाले:—

७१ त्या कीर्र रानांत शिरणाऱ्या त्या शिवाजीच्या शत्रूंस " आपण अंधकारमय लोक ( प्रदेश ) पाहिला " असें वाटलें.

सह्याद्रेरवरोहं तं प्रतिकूलमरुद्धतम् ।
तावदेव शिवः कस्मान्नविरुद्धमरुद्धतम् ॥ ७२ ॥

७२ प्रतिकूल ( उलट ) वाऱ्याच्या माऱ्याखालीं सह्याद्रीवरून उतरणाऱ्या त्या शत्रूंस शिवाजीनें तेव्हांच कां अडविलें नाहीं ?

विषयः शिवराजस्य स हि सह्यतलाश्रयः ।
परैर्न कथमाक्रांतस्तदा तद्ग्रहतत्परैः ॥ ७३ ॥

७३ सह्याद्रीच्या तळास असलेला शिवाजीचा तो प्रदेश घेण्यास उत्सुक असलेल्या शत्रूंनीं तो तेव्हां कसा पादाक्रांत केला नाहीं ?

कवींद्र उवाच

आदावेव हि रुद्धस्स्यात्स विरुद्धः शिवेन चेत् ।
नापतिष्यत्समं सैन्यैस्तर्हि तस्मिन् वनार्णवे ॥ ७४ ॥

कवींद्र म्हणाला:—

७४ आरंभींच जर त्या शत्रूस शिवाजीनें अडविलें असतें तर सैन्यांसह तो त्या अरण्यसागरांत येऊन पडला नसता.

इत्थमेव विनिश्चित्य स तं भुजमदोद्धतम् ।
न्यरुणत्किल नो तत्र समर्थोऽपि महीपतिः ॥ ७५ ॥

७५ असाच मनाचा निश्चय करून स्वतः समर्थ असतांहि त्या राजा ( शिवाजी )नें बाहुबलाचा गर्व वाहणाऱ्या त्या कारतबलास तेथें अडविलें नाहीं.

अधस्तादथ सह्याद्रेः समायातं पुरः पुरः ।
न्यरौत्सीदध्वनोमध्ये तं शिवो भ्येत्य विद्विषम् ॥ ७६ ॥

७६ मग सह्याद्रीच्या खालीं पुष्कळ पुढें आलेल्या त्या शत्रूवर शिवाजीनें चाल करून त्यास कोंडलें.

तेन राजन्यवीरेण पूर्वमेव नियोजितान् ।
तत्र तत्र स्थितानेत्य भागयोरुभयोरपि ॥ ७७ ॥

सन्नद्धान् पत्तिमूर्धन्यांस्तां वन्यामन्तरान्तरा ।
नाविदन्नुपकंठस्थानपि दिल्लींद्रसैनिकाः ॥ ७८ ॥

७७-७८ त्या क्षत्रिय वीरानें ( शिवाजीनें ) पूर्वींच नेमलेले पायदळाचे सज्ज नायक घेऊन त्या दाट अरण्यांत दोन्ही बाजूस ठिकठिकाणीं समीप राहिले असतांहि ते दिल्लीपतीच्या सैनिकांस समजले नाहींत.

अथोदुंबरखण्डाह्वगहनांतरवर्तिनीम् ।
वर्तनीं कारतलबः प्राविशत् पृतनान्वितः ॥ ७९ ॥

७९ नंतर 'उंबरखिंड' नांवाच्या अरण्यांतील पाऊल वाटेवर कारतलब आपल्या सेनेसह आला.

ततः सद्यः स्वनंतीनां भेरीणां निस्वनो महान् ।
उपागतः शिव इति प्रतियोधानबोधयत् ॥ ८० ॥

८० मग लगेच वाजूं लागलेल्या रणभेरींच्या निनादावरून "शिवाजी जवळ आला" असें समजलें.

तं श्रुत्वा कारतलबः शिवनिःसाननिस्वनम् ।
हंत वीररसावेशे निदधे निजमानसम् ॥ ८१ ॥

८१ तो शिवाजीच्या नगाऱ्यांचा आवाज ऐकून कारतबलानें शौर्य गाजविण्याचें आपल्या मनांत आणलें.

तदा तुंगारण्यपतिर्मित्रसेनो महाभुजः ।
अवतीर्य हयात्तूर्णमवलंब्योन्नतां भुवम् ॥ ८२ ॥
स्वीयैः परिवृतो वीरैर्वीरो वीरासने स्थितः ।
न्युब्जीकृतेषुधिस्तत्र शरसंधानतत्परः ॥ ८३ ॥
चापमारोपयांचक्रे परांतकरणोद्यतः ।
अन्येऽप्यमरसिंहाद्यास्तस्थुः स इव संयते ॥ ८४ ॥

८२-८४ तेव्हां "तुंगारण्याचा" अधिपति जो महाबाहु वीर मित्रसेन तो घोड्यावरून त्वरेनें उतरून, टेकाडावर उभा राहून, आपल्या वीरांना घेऊन, वीरासन धारण करून, धनुष्य वांकवून त्यावर बाण लावून शत्रूंचा नाश करण्याच्या तयारीनें तें सज्ज केलें. त्याच्याप्रमाणेंच अमरसिंहादि दुसरेहि योद्धे युद्धांत उभे राहिले.

अथ सपदि कृशानुयंत्रगोलैः
पदि पदि तत्र विनिघ्नतः प्रतीपान् ।
सरभसमवगम्य स प्रभावी
बत यवनः स्वचमूं समुह्य तस्थौ ॥ ८५ ॥

८५ नंतर शत्रु ताबडतोब तोफांच्या गोळ्यांनीं तेथें पदोपदीं मारा करीत आहेत असें त्वरित जाणून तो प्रभाववान् यवन आपलें सैन्य जमवून उभा राहिला.

अथ भृशमविहस्तस्तत्र कांतारगर्भेऽ
भिनवसुभटशोभाधाम धीरो धनुष्मान् ।
प्रतिनरपतिसैन्यं सादयन् सायकौघैः
समरममरसिंहो भूषयामास भूरि ॥ ८६ ॥

८६ तेव्हां त्या अरण्याच्या मध्यभागीं तरुण योध्यांच्या तेजाचें घरच अशा धैर्यवान् धनुर्धारी अमरसिंहानें न गोंधळतां त्या अरण्याच्या मध्यभागीं बाणांचा वर्षाव करून शत्रुराजाच्या सैन्याचा संहार करीत युद्धास पुष्कळ रंग आणला.

अनुवनमपयांतीं यावनीं वाहिनीं तां
बत कथमपि मा भैः स्थैर्यमेहीत्युदीर्य ।
निरुपमनिजचापारोपितैर्बाणवृंदैः
द्रुतमरुणदमित्रानीकिनीं मित्रसेनः ॥ ८७ ॥

८७ रानोरान पळणाऱ्या त्या यवनसेनेस "बाबांनो कसेंहि करून घाबरूं नका, स्थिर रहा" असें बोलून मित्रसेनानें आपल्या निरुपम धनुष्यावर लावलेल्या बाणांच्या वृष्टीनें शत्रुसेनेस त्वरित अडविलें.

प्रसभममरसिंहमित्रसेन-
प्रहितशराभिहताः परस्य योधाः ।
स्रवदसृगभिषिच्यमानगात्राः
कतिचन पेतुरुपेत्य मोहमुद्राम् ॥ ८८ ॥

८८ अमरसिंह व मित्रसेन यांनीं वेगानें सोडलेल्या बाणांनीं मारलेले कांहीं शत्रुयोद्धे अंगांतून वाहणाऱ्या रक्ताची आंघोळ होऊन, मूर्च्छा येऊन पडले.

प्रतिभयतमां वन्यामेतां सरोपषमेयुषाम्
त्यजति न भृशं युद्धावेशं बलं बहलं द्विषाम् ।

सपदि भवता सर्वोऽप्यध्वा तदस्य निरुध्यतां
इति शिवमहीपालः सेनापतिं स्वमवोचत ॥ ८९ ॥

८९ अत्यंत भयंकर अशा ह्या किर्र रानांत रोषानें आलेलें शत्रूचें महासैन्य आपला प्रबल युद्धावेश सोडीत नाहीं; म्हणून तावडतोब त्याचा सर्व मार्ग तुम्ही अडवा असें शिवाजी राजा आपल्या सेनापतीस बोलला.

तदनुतुरगारूढस्तूर्णं वधाय विरोधिनां
जगति जनितोत्कर्षं कर्षन् करेण शरासनम् ।
ज्वलितहुतभुग्-ज्वालाजालावलेहितखांडवात्
किमपि न पृथासूनोरूनो व्यलोकि सुरासुरैः ॥ ९० ॥

९० मग शत्रूंच्या वधासाठीं त्वरित घोड्यावर चढून जगांत उत्कर्ष उत्पन्न करणारें धनुष्य हातानें ओढणारा तो शिवाजी पेटलेल्या अग्नीच्या ज्वालांच्या लोळांनीं खांडव वन भस्मासात् करविणाऱ्या अर्जुनाहून किमपि कमी नाहीं असा सुरांना तसाच असुरांना दिसला.

शितविततकृपाणपातितानां
रुधिरभरेण विरोधिसैंधवानाम् ।
शिवसुभटवरैर्वनांतरालं
द्युतिमरुणादरुणामनीयतालम् ॥ ९१ ॥

९१ शिवाजीच्या वीरश्रेष्ठांनीं तीक्ष्ण व लांब तरवारींच्यायोगें पाडलेल्या शत्रूकडील घोड्यांच्या रक्ताच्या पुरानें अरण्याच्या मध्यभागास अरुणाहून फार अधिक लाली आणली.

प्रतिपदमविहस्तैर्मित्रसेनादिभिस्तैः
अवितमपि तदिंद्रप्रस्थसुत्रामसैन्यम् ।
प्रतिभटविशिखस्रक्पंजराभ्यंतरस्थं
परिचितदुरवस्थं निर्व्यवस्थं व्यरंसीत् ॥ ९२ ॥

९२ मित्रसेनादि वीरांनीं गोंधळून न जातां पदोपदीं राखिलें असतांहि शत्रुयोध्यांच्या बाणांच्या माळांच्या पिंजऱ्यांत सांपडल्यामुळें त्या सैन्याची दुर्दशा होऊन दाणादाण उडाल्यामुळें तें थांबलें.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निधिवासकरकवींद्रपरमानंदप्रकाशितायां
शतसाहस्र्यां संहितायां नामाध्यायः ॥ २८ ॥

# अध्याय २९ वा



कवींद्र उवाच

अथ द्युतिपतौ देवे दिवो मध्यमुपागते ।
समेत्य शिवतेजोभिः संतापयितुमुद्यते ॥ १ ॥
अवीक्षितवने तस्मिन् विपक्षाविहितावने ।
अलभ्यमानपवने दूयमानं महावने ॥ २ ॥
विलोक्यानीकमखिलं विषीदंतमनेकधा ।
जगाद कारतलबं राजव्याघ्री मदोध्दता ॥ ३ ॥

कवींद्र म्हणाला:—

१–३ नंतर सूर्य मध्याह्नीं येऊन शिवाजीच्या तेजाबरोबरच ताप देऊं लागला असतां, पूर्वी कधीं न पाहिलेल्या, शत्रूच्या (मराठ्यांच्या) रक्षणाखालीं असणाऱ्या, वारा मुळींच नसणाऱ्या, अशा महारण्यामध्यें सगळें सैन्य दुःखी होऊन धीर सोडतांना पाहून मदोन्मत्त रायबागीण कारतलबास म्हणाली.

राजव्याघ्री उवाच

अंकरोपितसैन्यस्त्वमकरोः कर्मगर्हितम् ।
प्राविशः सहसा येन शिवसिंहाश्रयं वनम् ॥ ४ ॥

रायबागीण म्हणाली:—

४ शिवाजीरूपी सिंहाच्या आश्रयाखालीं असणाऱ्या वनांत सैन्यासह प्रवेश केलास हें तूं वाईट काम केलेंस !

बत त्वया समानीय सैन्यं दिल्लीपतेरिह ।
अहो महोत्साहवता पंचाननमुखेऽर्पितम् ॥ ५ ॥

५ दिल्लीपतीचें सैन्य येथें घेऊन येऊन तें त्वां गर्विष्ठानें सिंहाच्या जबड्यांत आणून सोडलें ही दुःखाची गोष्ट होय !

अद्ययावद् यशो यावदिंद्रप्रस्थभृतार्जितम् ।
तत्तस्य भवतामुष्मिन् विपिने विनिमज्जितम् ॥ ६ ॥

६ आजपर्यंत दिल्लीपतीनें जेवढें यश मिळविलें तें त्याचें सारें यश तूं या अरण्यांत बुडविलेंस !

**पश्चात् पुरस्ताच्च पुनः सव्यदक्षिणपार्श्वयोः ।**
**स्थिता पश्य युयुत्संते सोत्सवाः परिपंथिनः ॥ ७ ॥**

७ पहा ! मागें व पुढें, उजवीकडे व डावीकडे उभे असलेले शत्रु आनंदानें लढूं इच्छीत आहेत.

**अमी सर्वे सुप्रयोगसायकास्तव सैनिकाः ।**
**तूष्णीमेवासते ह्यत्र बतालेख्यगता इव ॥ ८ ॥**

८ हे पटाईत तिरंदाज असलेले तुझे सर्व सैनिक येथें चित्रांतील मनुष्यां-प्रमाणें अगदीं स्तब्ध आहेत !

**अहो दिल्लींद्रसेनानीः शास्ताखानोऽल्पचेतनः ।**
**परिपंथिप्रतापाग्नौ ससैन्यं त्वामपातयत् ॥ ९ ॥**

९ खेदाची गोष्ट कीं, दिल्लीपतीच्या त्या मूर्ख सेनापति शाएस्तेखानानें शत्रूच्या प्रतापरूपी अग्नीमध्यें तुला सैन्यासह टाकलें !

**जीवग्राहं निगृह्याशु द्वेषणस्त्वां निनीषति ।**
**त्वं त्वंध इव कांतारे रुद्धो युद्धं चिकीर्षसि ॥ १० ॥**

१० शत्रु तुला ताबडतोब जिवंत पकडून नेऊं इच्छीत आहे. तूं मात्र अरण्यांत कोंडला गेला असून आंधळ्याप्रमाणें युद्ध करूं इच्छीत आहेस !

**सत्यां हि फलनिष्पत्तौ पुरुषस्येह पौरुषम् ।**
**परथा परिहासाय तदेव खलु साहसम् ॥ ११ ॥**

११ फलनिष्पत्ति होत असेल, तरच पुरुषाच्या उद्योगाचा ह्या जगांत उप-योग; नाहींतर तेंच साहसाचें कृत्य खरोखर उपहासास कारणीभूत होतें !

**तदद्य सद्य एव त्वं तं प्रपद्य महीभृतम् ।**
**अये ससैन्यमात्मानं मृत्युपाशाद् विमोचय ॥ १२ ॥**

१२ म्हणून तूं आज लगेच त्या राजास ( शिवाजीस ) शरण जाऊन आप-णास सैन्यासह मृत्युपाशांतून सोडीव.

**एवं स यवनस्तत्र राजन्याढ्या प्रबोधितः ।**
**विरराम महावीरः साहसी समरात्ततः ॥ १३ ॥**

१३ ह्याप्रमाणें रायबागिणीनें त्या महाशूर व साहसी यवनास तेथें जागें केल्यावर तो युद्धापासून परावृत्त झाला.

**अथैष संदेशहरं पराभिप्रायवेदिनम् ।**
**शिवाय प्रेषयामास प्रह्वभावमुपाश्रयन् ॥ १४ ॥**

१४ नंतर त्यानें नम्रभाव स्वीकारून दुसऱ्यांचें मन ओळखणारा दूत शिवाजीकडे पाठविला.

ततोऽतिसुंदरोदग्रग्रीवे व्यायतवक्षसि ।
शिक्षिते लक्षणोपेते महाकाये महौजसि ॥ १५ ॥
पार्श्वद्वितयसंसक्तनिषंगद्वयपक्षतौ ।
सरत्नाभरणे सप्तौ तार्क्ष्ये हरिमिव स्थितम् ॥ १६ ॥
आमुक्तवारबाणानां धन्वबाणासिधारिणाम् ।
बहूनां वाहवाराणां व्यूहाभ्यंतरवर्तिनम् ॥ १७ ॥
पिनद्धाभेद्यवर्माणं वर्ण्यशीर्षण्यशालिनम् ।
भव्यसव्येतरस्कंधविषक्तविशिखासनम् ॥ १८ ॥
वैकक्षिकीकृतोद्दामफलकोद्योतितांबरम् ।
स्वर्णसारसनालंबि-कौक्षेयककृतश्रियम् ॥ १९ ॥
दीव्यद्दक्षिणपाण्यग्रसंसक्तोन्नतशक्तिकम् ।
अतिसौम्यमपि स्वेन प्रभावेणातिभीषणम् ॥ २० ॥
पुरः प्रोत्सारणपरैर्हेमवेत्रधरैर्नरैः ।
यथास्थानीकृतानेकसैनिकैः साधुसेवितम ॥ २१ ॥
उग्रमुग्रादपि भृशं दुर्धरं दहनादपि ।
निर्घृणं नैर्ऋताच्चोच्चैर्बलिनं मारुतादपि ॥ २२ ॥
वित्तेशादपि वित्ताढ्यं प्रभुं वज्रधरादपि ।
दंडहस्तादपि क्रूरं नीतिज्ञं वरुणादपि ॥ २३ ॥
चंद्रादपि कृताह्लादं दुर्जयं मन्मथादपि ।
नरैर्वेत्रधरैस्तत्र नमन्मौलिर्निवेदितः ॥ २४ ॥
स तं राजानमाजानुभुजं दूरादलोकत ॥ २५ ॥

१५–२५ मग भालदारांनीं तेथें त्याची वर्दी दिल्यावर त्यानें मस्तक लववून आजानुबाहु शिवाजी राजाचें दुरून दर्शन घेतलें. तो अतिसुंदर व उंच मानेच्या, रुंद छातीच्या, शिकविलेल्या, सुलक्षणी, धिप्पाड शरीराच्या, महाबलवान्, दोन्ही बाजूंस बाणांचे दोन भाते पंखांप्रमाणें असलेल्या, रत्नखचित अलंकार घातलेल्या अशा घोड्यावर–गरुडावर विष्णु बसतो तसा–आरूढ होऊन अंगांत कवच घातलेल्या व हातांत धनुष्यबाण व तरवार असणाऱ्या घोडद-

ळाच्या समुदायामध्यें होता; त्याच्या अंगांत अभेद्य कवच होतें; त्याच्या मस्तकावर उत्कृष्ट शिरस्त्राण शोभत होतें; वैकक्ष हारासारखा व प्रचंड ढालीनें शोभणारा दुपेटा परिधान केला होता; सोनेरी कमरपट्ट्यापासून लटकणाऱ्या तरवारीच्यायोगें तो शोभत होता; त्याच्या तेजस्वी उजव्या हातांत उंच भाला होता;तो अत्यंत सौम्य असूनहि आपल्या तेजानें अत्यंत उग्र दिसत होता; पुढें जाऊन लोकांस दूर सारणाऱ्या भालदारांनीं योग्य स्थानीं उभे केलेले अनेक सैनिक त्याचा उत्तम सन्मान करीत होते; तो शंकराहूनहि उग्र, अग्नीपेक्षां अत्यंत असह्य नैर्ऋतापेक्षांहि अतिशय निर्दय, वायूहूनहि बलवान, कुबेराहूनहि धनाढ्य, इंद्राहूनहि समर्थ, यमाहूनहि क्रूर, वरुणापेक्षाहि नीतिज्ञ, चंद्रापेक्षांहि आल्हाददायक, आणि मदनापेक्षांहि अजिंक्य होता.

अमुं विनम्रमूर्धानं ताम्रदूतमुपागतम् ।
सरोरुहसदृग्भ्यां स दृग्भ्यां देवोऽप्युदैक्षत ॥ २६ ॥

२६ मस्तक नमवून आलेल्या त्या मोंगल दूताकडे ( वकिलाकडे ) राजानेंसुद्धां कमलासारख्या सुंदर नेत्रांनीं पाहिलें.

अथाज्ञप्तः शिवेनैष किंचिदुन्नमितभ्रुवा ।
यत्संदेशहरस्तस्य व्याजहार स्वयं वचः ॥ २७ ॥

२७ नंतर शिवाजीनें किंचित् भिवया चढवून त्यास आज्ञा केल्यावर, त्यानें ज्याचा ( कारतलबाचा ) संदेश आणला होता, त्याचें म्हणणें स्वतः सांगितलें.

दूत उवाच

यं कारतलबं नाम लंकापतिमिवापरम् ।
अजय्यं जानते लोकाः स त्वां विज्ञापयत्यदः ॥ २८ ॥

दूत म्हणालाः—

२८ ज्या कारतलब नांवाच्या सरदारास लोक जणूं काय दुसरा अजिंक्य रावणच समजतात, तो आपणास अशी विनंती करतोः—

शास्ताखाननियोगेन योगेन समयस्य च ।
बतावलोकितोऽस्माभिः स एष विषयस्तव ॥ २९ ॥

२९ शाएस्तेखानाच्या आज्ञेमुळें व वेळ आली म्हणून हा आपला देश पाहण्याची आम्हास पाळी आली !

नह्यन्यवशतां गंता गुप्तोऽयं विषयस्त्वया ।
मणिः फणाधरेणेव चिरं स्वयमुरीकृतः ॥ ३० ॥

३० नागानें दीर्घ काळ स्वतः धारण केलेल्या मण्याप्रमाणें हा आपल्या संरक्षणाखालीं असलेला देश दुसऱ्याच्या ताब्यांत जाणार नाहीं.

**हंत छित्राण्यहान्यत्र मया लब्धं न जीवनम् ।**
**तस्मादभयदानेन देहि मे मम जीवनम् ॥ ३१ ॥**

३१ काय सांगावें ! दोन तीन दिवस मला येथें पाणीसुद्धां प्यावयास मिळालें नाहीं; म्हणून अभयदान देऊन मला जीवदान दे.

**तलातलमिवासाद्य सह्याचलतलस्थलम् ।**
**विररामश्चिरं चित्ते विस्मरामश्च पौरुषम् ॥ ३२ ॥**

३२ सह्याद्रीच्या जणूं काय पाताळासारख्या खोल तळास येऊन आम्ही मनांत दीर्घ काळ स्तिमित झालों आहोंत व पराक्रमसुद्धां विसरलों आहों !

**तुंगारण्यादपि घनं सह्यारण्यमिदं तव ।**
**महार्णवसमेऽमुष्मिंस्त्वमस्मच्छरणं भव ॥ ३३ ॥**

३३ हें आपलें अरण्य तुंगारण्यापेक्षा निबिड आहे. महासागरासारख्या ह्या अरण्यांत आपण आमचें रक्षण करावें..

**जनकः शाहराजस्ते महाराजो महामतिः ।**
**यवनेऽप्यन्वहं स्नेहमपारमकरोन्मयि ॥ ३४ ॥**

३४ आपला पिता महामति, महाराज शहाजीराजा याचा मी यवन असतांहि मजवर अमर्याद लोभ होता.

**तत् सर्वमपि विस्मृत्य परप्रेष्यतया मया ।**
**अग्नेरिव तवावज्ञा विज्ञायापि विनिर्मिता ॥ ३५ ॥**

३५ तें सर्व विसरून जाऊन दुसऱ्याच्या सेवकत्वामुळें मी अग्नितुल्य असे जे आपण त्यांची जाणून बुजून अवज्ञा केली.

**तद् वितीर्य स्वसर्वस्वमात्मनमनवस्करम् ।**
**चिकीर्षामि महाबाहो जीवन् जिगमिषामि च ॥ ३६ ॥**

३६ म्हणून, हे महाबाहो, मी आपलें सर्वस्व आपणास अर्पण करून आपल्या अपराधाचें क्षालन करूं इच्छितों आणि जिवंतपणें जाऊं इच्छितों.

**अनुमन्यस्व मां तस्मात् त्वमस्मिन् विषये नृप ।**
**प्रपन्नपालनमरो भवानिव भवानिह ॥ ३७ ॥**

३७ म्हणून, हे राजा, ह्या प्रदेशांतून बाहेर पडण्याची आपण मला परवानगी द्यावी. ह्या जगांत शरणगताचें रक्षण करणारे आपणासारखे आपणच आहां.

यथायथं गदित्वेत्थं दूते विरतिमीयुषि ।
नृपः स्वसैनिकान् वीक्ष्य स तं प्रत्यब्रवीदिदम् ॥ ३८ ॥

३८ ह्याप्रमाणें यथोचित बोलून तो दूत ( वकील ) थांबला असतां शिवाजी महाराजांनीं आपल्या सैनिकांकडे पाहून त्यास असें उत्तर दिलें:—

शिवराज उवाच

यर्हि प्रपद्यसे तर्हि स्वीयया सेनया सह ।
निर्याहि विषयादस्मादास्तेऽस्मदभयं तव ॥ ३९ ॥

शिवाजी राजा म्हणाला:—

३९ "जर तूं शरण आला आहेस, तर ह्या प्रदेशांतून आपल्या सेनेसह निघून जा; आमचें तुला अभय आहे."

अदो मद्वचनं तस्मै मद्भीताय दयार्थिने ।
त्वमितस्त्वरितो गत्वा यवनाय निवेदय ॥ ४० ॥

४० हें माझें भाषण तूं येथून त्वरेनें जाऊन मला भिऊन दयेची याचना करणाऱ्या त्या यवनाला सांग.

इत्थं शिवनृपोदीर्णामाकर्ण्य रुचिरां गिरम् ।
दूतः प्रतीक्षमाणाय स्वाधिपाय न्यवेदयत् ॥ ४१ ॥

४१ ह्याप्रमाणें शिवाजीनें केलेलें गोड भाषण ऐकून दूतानें तें वाट पाहात बसलेल्या आपल्या धन्यास कळविलें.

तस्मादभयमानीतं तेन दूतेन वै यदा ।
शिवाय कारतलबः प्राजिघाय बलिं तदा ॥ ४२ ॥

४२ त्या दूतानें ( वकिलानें ) शिवाजीकडून जेव्हां अभयवचन आणलें, तेव्हां कारतलबानें त्याच्याकडे खंडणी पाठविली.

युध्यंतोऽप्यभयं प्राप्य मित्रसेनादयो नृपाः ।
शिवाय प्रेषयामासुः स्वं स्वं सद्यः स्वमंजसा ॥ ४३ ॥

४३ मित्रसेनादि राजे लढत असतांहि त्यांस अभय मिळाल्यावर त्यांनीं आपआपलीं खंडणी त्वरेनें लगेच शिवाजीकडे पाठविलीं.

अभयं यावदायाति तावद् यवनसैनिकाः ।
युध्यंतः शिवसैन्येन लुंठिताश्चावकुंठिताः ॥ ४४ ॥

४४ लढणाऱ्या त्या यवन सैनिकांस अभयदान येईपर्यंत शिवाजीच्या सैन्यानें लुटलें व चारी बाजूंनीं अडविलें ( कोंडलें ).

परस्मै फलकं दत्वा कश्चिन्मुक्तोऽभवत् तदा ।
अवरुह्य हयात् तूर्णं भयात् कश्चिदमुच्यत ॥ ४५ ॥

४५ कोणी त्या वेळीं आपली ढाल दुसऱ्यास देऊन टाकून आपण मुक्त झाला! कोणी घोड्यावरून त्वरेनें खालीं उतरून आपण भयमुक्त झाला!

बत तत्र दधानेन वासो लोहितलोहितम् ।
सद्यो विन्यस्तशस्त्रेण सन्यस्तमिव केनचित् ॥ ४६ ॥

४६ रक्तानें लाल झालेलें वस्त्र परिधान करणाऱ्या कोणा वीरानें लगेच शस्त्रें टाकून जणूं काय संन्यास घेतला !

कर्णाभरणलुब्धेन छिन्नकर्णश्च कश्चन ।
स्वकंठाभरणं सद्यो मुक्तामणिमयं जहौ ॥ ४७ ॥

४७ कोणी कर्णभूषणाच्या लोभानें एकाचे कान तोडले असतां त्यानें मोत्यें व रत्नें यांचा कंठा लगेच टाकून दिला.

वयं शिवनृपस्यैव भवाम इतिवादिनः ।
अमोचयन् निजात्मानं केचित् तुरगसादिनः ॥ ४८ ॥

४८ "आम्ही शिवाजी राजाकडीलच आहों" असें म्हणून कांहीं घोडेस्वारांनीं आपणास सोडवून घेतलें.

कृपाणछिन्नमूर्धापि त्वरमाणोऽभिघातिनम् ।
सद्यः सहचरं चक्रे चिरं चक्रेण कश्चन ॥ ४९ ॥

४९ कोणाचें मुंडकें तरवारीनें छाटलें गेलें असतां आपणास मारणाऱ्यावर वेगानें धावून जाऊन त्यानें त्याचें मुंडकें चक्रानें तत्काळ उडवून त्यास आपला सोबती केलें !

अत्रांतरे सह्यपतेराज्ञया वेत्रपाणयः ।
ऊर्ध्वीकृतकरास्तारस्वराः क्रोधपरा इव ॥ ५० ॥
तांस्तान् सैन्यपतीनेत्य विपिनाभ्यंतरास्थितान् ।
समंततः प्रतिभटप्रातियुद्धादवारयन् ॥ ५१ ॥

५०-५१ इतक्यांत हात वर करून जणूं काय रागावलेल्याप्रमाणें उंच स्वरानें ओरडणाऱ्या भालदारांनीं शिवाजीच्या आज्ञेनें अरण्यांतील निरनिराळ्या सेनापतींकडे येऊन शत्रूशीं युद्ध करण्याचें सर्वत्र बंद करा म्हणून त्यांस सांगितलें.

अथ लब्धाभयास्ताम्रसैनिकाः सभया इव ।
द्रुतं विनिर्ययुस्तस्मात् वनात् परकृतावनात् ॥ ५२ ॥

५२ मग अभय प्राप्त झालेले ते मोंगल सैनिक शत्रूच्या रक्षणाखालीं असलेल्या त्या वनांतून भ्यालेल्याप्रमाणें त्वरेनें निघून गेले.

अथाशु ताम्रवक्त्रेषु प्रयातेषु यथागतम् ।
गर्जत्सु निजसैन्येषु तूर्येषु निदत्सु च ॥ ५३ ॥
पुरःसरेष्वनेकेषु विनटद्वेत्रपाणिषु ।
जयघोषविशेषेण पूरयत्सु च पुष्करम् ॥ ५४ ॥
भव्यांबरेषु भव्येषु भव्याभरणधारिषु ।
उच्चैस्तरां यशोगाथाश्चारणेषु पठत्सु च ॥ ५५ ॥
अपारकोषगर्भासु मंजूषासु निजैर्नरैः ।
क्षिप्रमाह्रियमाणासु ताम्रक्षिप्तास्वितस्ततः ॥ ५६ ॥
विमुक्तेष्वटवीगर्भे रिपुभिः प्रपलायिभिः ।
सैन्यैरानीयमानेषु गजेषु तुरगेषु च ॥ ५७ ॥
भारभीत्यावमुक्तानामपयातैरारातिभिः ।
स्थालानां चषकाणां च भृंगाराणां च भूरिशः ॥ ५८ ॥
अन्येषां चाप्यमत्राणां सौवर्णानामनेकशः ।
स्वभृत्यैः क्रियमाणेषु पर्वतेषु च सर्वतः ॥ ५९ ॥
चंडेन भुजदंडेन दंडितारातिमंडलः ।
शिवः समीक्ष्य नेतारं सेनापतिमवोचत ॥ ६० ॥

५३-६० मग मोंगल आले तसेच शीघ्र गेले; आपले सैनिक गर्जना करूं लागले; तुताऱ्या वाजूं लागल्या अनेक भालदार नाचत पुढें चालले; प्रचंड जयघोषानें आकाश भरून टाकलें; सुंदर वस्त्रें व सुंदर अलंकार धारण करणारे श्रेष्ठ भाट मोठ्यानें यशःकथा गाऊं लागले; मोंगलांनीं इतस्ततः फेकलेल्या व आंत अपार कोष असलेल्या पेट्या आपले लोक भराभर आणूं लागले; पळून जाणाऱ्या शत्रूंनीं अरण्याच्या मध्यभागीं सोडून दिलेले हत्ती व घोडे सैनिक

घेऊन आले; पळालेल्या शत्रूंनीं भाराच्या भीतीनें टाकलेले पुष्कळ हंडे, पेले, रुप्याच्या व सोन्याचीं दुसरींहि पुष्कळ भांडीं यांचे पर्वत आपल्या सेवकांनीं सगळीकडे रचले अशा समयीं आपल्या प्रचंड भुजदंडानें शत्रुसमूहाचें दंडन करणारा शिवाजी सेनापति नेताजीस पाहून बोलूं लागलाः—

**शिवराज उवाच**

**यान्यहं येदिलायत्तराष्ट्राक्रमणकर्मणे ।**
**इहैव तु त्वया स्थेयं ताम्राननिबर्हणे ॥ ६१ ॥**

शिवाजी राजा म्हणालाः—

६१ आदिलशहाच्या ताब्यांतील देश पादाक्रांत करण्यास मला जाऊं दे; पण तूं मात्र मोंगलांचा नाश करण्यासाठीं येथेंच राहा.

**परावृत्ता एव परे न परावृत्तिकारिणः ।**
**इति त्वया न मंतव्यं ताम्रास्ते ह्यभिमानिनः ॥ ६२ ॥**

६२ युद्धांत कधींहि पाठ न दाखविणारे शत्रु परत गेलेच असें तूं समजूं नकोस; कारण ते मोंगल अभिमानी आहेत.

**प्रणालाद्रिप्रातिनिधिं द्रुतमादित्सतो मम ।**
**उद्यमः सद्य एवायं फलितो भविता न न ॥ ६३ ॥**

६३ पन्हाळगडचा मोबदला लवकर घेऊं इच्छिणारा जो मी त्याचा हा उद्योग तत्काळ सफल झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**इति संमंत्र्य सेनान्या समं तत्र स मंत्रवित् ।**
**अकारयज्जयी जैत्रप्रयाणपटहस्वनम् ॥ ६४ ॥**

६४ ह्याप्रमाणें तेथें त्या उपायज्ञ ( युक्तिवान ) व जयशाली शिवाजीनें सेनापतीशीं सल्लामसलत करून स्वारीचा दुंदुभि वाजविण्यास आज्ञा केली.

**अथ प्रगे प्रजानाथः स आस्थाय हयोत्तमम् ।**
**अभूषयत् तमध्वानं वाहिनीव्यूहभूषितम् ॥ ६५ ॥**

६५ मग पहाटेस उत्तम घोड्यावर आरूढ होऊन शिवाजी राजानें सेनासमुदायाच्या योगें शोभणाऱ्या त्या मार्गास ( अधिक ) शोभा आणली.

**क्रमेण क्रममाणोऽसौ पुरग्रामाचलाटवीः ।**
**पश्यन् रिपुभिरुत्सृष्टास्तुष्टिमाधत्त भूयसीम् ॥ ६६ ॥**

६६ क्रमाक्रमानें पुढें जात असतां नगरें, गांवें, गड व अरण्यें हीं शत्रूंनीं सोडून दिलेलीं पाहून त्यास फार संतोष वाटला.

ततो दाल्भ्यपुरं गत्वा नत्वा दाल्भ्येश्वरं नृपः ।
आदौ तमेव विषयं व्यधत्त तरसात्मसात् ॥ ६७ ॥

६७ नंतर दाभोळास ( दाल्भ्यपुरास ) जाऊन दाल्भ्येश्वरास वंदन करून प्रथम तोच देश शिवाजी राजानें वेगानें (पराक्रमानें) आपल्या ताब्यांत आणला.

स तदा विषयस्तेन शिवेन स्ववशीकृतः ।
साध्वसात् यवनस्पृष्टिसृष्टात् सद्यो व्यमुच्यत ॥ ६८ ॥

६८ तेव्हां शिवाजीनें हस्तगत केलेला तो देश यवनांच्या संपर्कामुळें उत्पन्न झालेल्या भीतीपासून मुक्त झाला.

तदा पल्लीवनपतिर्जसवंतो महाभुजः ।
स्मरन् कृतचरां स्वेन जोहरस्य सहायताम् ॥ ६९ ॥
दुर्विनीतांतकात् भीतः शिवादभ्यर्णवर्तिनः ।
प्रपेदे शरणं सद्यः शृंगारपुरनायकम् ॥ ७० ॥

६९-७० तेव्हां पालीचा (पल्लीवनचा) राजा महाबाहु जसवंत हा आपण पूर्वी सिद्दी जोहरास केलेलें साह्य आठवून दुष्टांचा काळ जो शिवाजी तो निकट आलेला पाहून, घाबरला व लगेच शृंगारपूरच्या राजाचा त्यानें आश्रय केला.

सोऽपि प्रभावलीपालः सूर्यराजः प्रतापवान् ।
तं जुगोप शिवात् भीतमात्मानमिव सागसम् ॥ ७१ ॥

७१ प्रभावलीच्या त्या प्रतापी राजा सूर्यराजानें त्या अपराधी अतएव भ्यालेल्या जसवंतराजाचें जणूं काय आपणाप्रमाणेंच शिवाजीपासून रक्षण केलें.

शिवस्तु सूर्यराजस्य जसवंतस्य चापि तत् ।
कर्म नामन्यतान्याय्यं परायत्तावुभाविति ॥ ७२ ॥

७२ पण सूर्यराजाचें व जसवंत राजाचें तें कृत्य शिवाजीस अयोग्य वाटलें नाहीं; कारण ते दोघेहि पराधीन (यवनाधीन) होते.

अथ दाल्भ्यपुरे राजा यथार्हमधिकारिणम् ।
निधाय सज्जं युद्धाय वीरं च द्विसहस्रिणम् ॥ ७३ ॥
व्रजन्नभयदानेन प्रीणयन्नभयार्थिनः ।
अपश्यच्चिपलुलिनं पुरं त्रिचतुरैर्दिनैः ॥ ७४ ॥

७३-७४ मग दाभोळामध्यें योग्य अधिकारी नेमून व युद्धास सज्ज असा दोनहजारी सरदार ठेवून पुढें चालला असतां अभय मागणाऱ्यांना अभयदानानें संतुष्ट करून शिवाजी राजा तीन चार दिवसांनीं चिपळुणास गेला.

स तत्र वरदं विश्वविश्रुतं चिरजीविनम् ।
रैणुकेयं वर्णनीयचरितं निरवर्णयत् ॥ ७५ ॥

७५ तेथें त्यानें वरदात्या, विश्वविख्यात, चिरंजीवी आणि वर्णनीय चरित्र असलेल्या परशुरामाचें डोळे भरून दर्शन घेतलें.

अथासौ कालकामाभ्यां भ्रातृभ्यां परिवारितम् ।
भक्तिमान् भृशमर्हाभिर्भार्गवं समभावयत् ॥ ७६ ॥

७६ नंतर ज्याच्या दोन्हीकडेस काल व काम हे भ्राते आहेत अशा परशुरामाची त्या अत्यंत भक्तिमान शिवाजीनें पूजा केली.

अद्धा परशुरामोऽपि ध्वस्ताविद्याधिपौजसे ।
पृथुं प्रसादमकरोदमुष्मै पृथिवीभृते ॥ ७७ ॥

७७ परशुरामानेंसुद्धां अविंध राजांची रग जिरवून टाकणाऱ्या त्या राजावर मोठी कृपा केली.

स तत्र भार्गवक्षेत्रे दानशौंडो दयान्वितः ।
क्षिप्रदत्तेन वित्तेन विप्रवृंदमनंदयत् ॥ ७८ ॥

७८ त्या दानशूर व दयाळू शिवाजीनें त्या परशुराम क्षेत्रांतील ब्रह्मवृंदांस तत्काळ धन देऊन संतुष्ट केलें.

ततोऽधिकारिभिर्म्लेच्छजनैस्तत्क्षणमुज्झितम् ।
संगमेश्वरयोगेन संगमेश्वरसंज्ञकम् ॥ ७९ ॥
नगरं स्ववशीभूतं प्रभूतद्विजदैवतम् ।
दृष्ट्वा मनुष्यदेवर्षिर्देवर्षिस्थानमीयिवान् ॥ ८० ॥

७९-८० नंतर मुसलमान अधिकाऱ्यांनीं तत्काळ सोडून दिलेलें, 'संगमेश्वरा'च्या सांनिध्यानें संगमेश्वर नांव पडलेलें व बहुत ब्राह्मण व देवता असलेलें असें नगर आपल्या ताब्यांत आलेलें पाहून तो राजर्षि देवरुखास (देवर्षिस्थानास) गेला.

तदा तदाज्ञया नीलकंठराजात्मजो द्विजः ।
मल्लसूरान्वयेनोच्चैःपदातिपृतनाभृता ॥ ८१ ॥

तत्तद्युद्धप्रसिद्धेन योध्द्रा तानजिता युतः ।
विपक्षाभ्यागमव्यग्रं संगमेश्वरमागमत् ॥ ८२ ॥

८१-८२ तेव्हां त्याच्या आज्ञेनें द्विज नीळकंठ राजाचा पुत्र, निरनिराळ्या युद्धांत प्रसिद्धीस आलेला, पायदळाचा अधिपति योद्धा तानाजी मालुसरे याच्याबरोबर शत्रूच्या हल्ल्यामुळें गोंधळून गेलेल्या संगमेश्वरास आला.

गुप्त्यर्थमस्य देशस्य तिष्ठंती संगमेश्वरे ।
अनीकिनी मामकीना शृंगारपुरवर्तिना ॥ ८३ ॥
कामं त्वयावेक्षणीया यावदागमनं मम ।
वैमत्यं परिहर्तव्यं कर्तव्यं मदुदीरितम् ॥ ८४ ॥
इत्थं संदेशमाप्तेन दूतेन स नृपस्तदा ।
प्रभावलीभृते भूमिपालाय समदेशयत् ॥ ८५ ॥

८३-८५ ह्या देशाच्या रक्षणार्थ संगमेश्वरामध्यें राहणाऱ्या माझ्या सेनेवर शृंगारपुरांत राहणाऱ्या त्वां मी येईपर्यंत चांगली देखरेख ठेवावी; वैर टाकावें व माझ्या सांगण्याप्रमाणें करावें असा निरोप विश्वासू दूताकरवीं प्रभावलीच्या राजास त्या राजानें ( शिवाजीनें ) त्या समयीं पाठविला.

अथ पुन्नागबकुलप्रसूनप्रायसौरभम् ।
नागवल्लीनाळिकेरक्रमुकप्रायभूरुहम् ॥ ८६ ॥
दैवतप्रायभूभागं द्विजन्मप्रायमानवम् ।
आरामप्रायभूमीध्रं तीर्थप्रायनदीनदम् ॥ ८७ ॥
तं देशं सपदि स्वीये निदेशे विनिवेशयन् ।
अयं राजवरो राजपुरं जित्वा व्यराजत ॥ ८८ ॥

८६-८८ नंतर उंडी व बकुळी यांच्या फुलांच्या बहरानें सुगंधित झालेला, नागवेली, नारळी व पोफळी या झाडांची दाटी असलेला, पुष्कळ देवता असलेला, लोकवस्तीमध्यें ब्राह्मणांचें बाहुल्य असलेला उपवनमय डोंगर असलेला, तीर्थमय नदीनद असलेला असा तो प्रदेश तत्काळ आपल्या सत्तेखालीं आणून व राजापूर जिंकून तो श्रेष्ठ राजा शोभूं लागला.

हत्वा म्लेच्छबलं स्वबाहुविभवैराक्रम्य तन्मंडलम् ।
शाक्रश्रीः शरणागताय सदयः सद्यः प्रदायाभयम् ॥

**धत्ते पोतवणिग्जनैर्धनदतां यस्यांतिके सागरः ।**
**तस्मिन् राजपुरे व्यराजततरां राजाधिराजः शिवः ॥८९॥**

८९ आपल्या बाहुबलानें यवनांचें सैन्य मारून, त्यांचा देश पादाक्रांत करून व शरणागतांस अभयदान देऊन तो इंद्रासारखा, दयाळू, राजाधिराज शिवाजी समुद्रावरील व्यापाऱ्यांच्यायोगें समुद्रानें ज्यास धनाढ्य बनविलें आहे अशा राजापुरांत विशेष विराजमान झाला.

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां**
**शतसाहस्र्यां संहितायां स्वपुरप्रवेशो**
**नामाध्यायः ॥ २९ ॥**

---

# अध्याय ३० वा

कवींद्र उवाच

अथाग्नियंत्रसंधानविशेषोदग्रविक्रमान् ।
प्राकारयुद्धकुशलान् ऋध्या जितधनेश्वरान् ॥ १ ॥
मयमायाधरान् अब्धिमध्यसंचारदुर्धरान् ।
उन्मार्गवर्तिनस्तांस्तान् फैरंगान् यवनावरान् ॥ २ ॥
तथा नौसाधनपरान् मल्लवारान् अनावरान् ।
सांयात्रिकाननेकांश्च कृतद्वीपांतराश्रयान् ॥ ३ ॥
असंमतांश्च सामंतान् मत्तानिव महाद्विपान् ।
बलैरानाय्य स बली तत्तद्दानाययद्धनम् ॥ ४ ॥

कवींद्र म्हणालाः—

१-४ नंतर तोफांच्या गोलंदाजींत (तोफांचा नेम धरण्यांत) असामान्य पराक्रमी, प्राकारयुद्धांत (तटावरून लढण्यांत) कुशल, संपत्तींत कुबेरावर ताण करणारे, मयासुराप्रमाणें शिल्पकलानिष्णात, समुद्रसंचाराच्यायोगें अजिंक्य, दुर्मार्गगामी, यवनांहून नीच अशा निरनिराळ्या फिरंग्यांस (पोर्तुगीज, डच, इंग्रज व फ्रेंच इत्यादि) तसेंच आरमारवाल्या उघड्या बोडक्या मलबाऱ्यांस अन्यद्वीपनिवासी समुद्रावरील अनेक व्यापाऱ्यांस, मत्त महागजांसारख्या वैरी मांडलिकांस त्या बलवान् शिवाजीनें सैन्याकरवीं आणवून त्यांच्याकडून निरनिराळी खंडणी द्यावयास लाविली.

स बद्धमुष्टिभिस्तैस्तैरविद्वैश्चिरपालिताम् ।
स्वहस्तमनयत् सद्यः श्रियं राजपुरस्थिताम् ॥ ५ ॥

५ त्या त्या लोभी अविद्वानांनीं दीर्घ काळ सांठविलेली राजापुरांतील संपत्ति त्यानें तत्काळ हस्तगत केली.

निक्षेपस्वर्णसंपूर्णकटाहजठरां धराम् ।
खलांतकः स खनकैरनेकैः समखानयत् ॥ ६ ॥

६ सोन्याच्या ठेवींनीं भरलेल्या कढया जीमध्यें पुरून ठेवलेल्या होत्या अशी ती भूमि त्या दुष्टांच्या कर्दनकाळानें अनेक खनकांकडून (भूमिगत धन ओळखणाऱ्यांकडून) खणविली.

न यद्यपि नरेंद्रस्य तत्र सिद्धांजनांचिते ।
तदप्यद्धा निधानानि पश्यतः स्म विलोचने ॥ ७ ॥

७ तेथें त्या राजाच्या नेत्रांत जरी सिद्धांजन घातलेलें नव्हतें, तरी त्यास ते पुरलेले सांठे प्रत्यक्ष दिसले !

न्ययोजयदयं राजा यत्र यत्र निजे दृशौ ।
तत्र तत्राभवन् मेरुसदृशाः स्वर्णराशयः ॥ ८ ॥

८ त्या राजानें जेथें जेथें आपली दृष्टि फेकली, तेथें तेथें मेरुपर्वताप्रमाणें सोन्याच्या राशि उत्पन्न झाल्या ( दिसल्या ) !

महाजनेनोपहृतैरनेकै रत्नराशिभिः ।
तत्र तस्मै विदूराद्रिरविदूर इवाभवत् ॥ ९ ॥

९ तेथें थोर लोकांनीं अर्पिलेल्या अनेक रत्नराशींच्यायोगें त्यास विदूराद्रि ( वैदूर्य रत्नांचा डोंगर ) हा जणूं काय अविदूर ( अगदीं जवळ ) झाला.

चिरस्थयवनस्पर्शवशादशुचितां गता ।
सनिक्षेपां स तत्र क्ष्मां खनकैः किमशोधयत् ॥ १० ॥

१० दीर्घ काळ राहिलेल्या यवनांच्या संपर्कानें अशुद्ध झालेली व पुरलेले सांठे असलेली भूमि त्यानें तेथें शुद्ध केली कीं काय !

जातरूपं तथा रूप्यमारकूटं च सीसकम् ।
ताम्रं लोहं च वंगं च काचं च स्वर्णमाक्षिकम् ॥ ११ ॥
मुक्तां मरकतं पद्मरागं वज्रं च विद्रुमम् ।
खड्गशृंगं चामरं च रदं स्तांबेरमं तथा ॥ १२ ॥
कस्तूरिकां च काश्मीरं पाटीरं हिमवालुकाम् ।
कालागुरुं च कर्चूरं कंकोलं रक्तचंदनम् ॥ १३ ॥
एलां च देवकुसुमं त्वक्पत्रं चीनदारु च ।
कतकं नक्रनखरं नलदं नागकेसरम् ॥ १४ ॥
जातीफलं मातुलानीमहिफेनं च पत्रकम् ।
राजादनं कंदरालं द्राक्षां खर्जूरकं तथा ॥ १५ ॥
खर्बूरं मरिचं पूगं देवदारु च नागरम् ।
ग्रंथिकं च पलां चव्यं कांचनीमथ सैंधवम् ॥१६॥

सौवर्चलं यवक्षारं सर्जिकां च हरीतकीम् ।
वृकधूपं सर्जरसं सिलाजतु च सिक्थकम् ॥ १७ ॥
तार्क्ष्यशैलं शिखिग्रीवं चक्षुष्यां यामुनं पुनः ।
अजमोदां च बाह्लीकं जीरकं लोध्रकं तथा ॥ १८ ॥
गुग्गुलं पावकशिखं मंजिष्ठां नागसंभवम् ।
पारदं हरितालं च गंधाश्मानं मनःशिलाम् ॥ १९ ॥
लाक्षां गंधरसं चापि गोरोचनमथाभ्रकम् ।
तांस्तान् विषविशेषांश्च तत्तन्निर्हरणानि च ॥ २० ॥
कौशेयान्यथ तार्णानि क्षौमाणि फलजानि च ।
रांकवाणि तथौर्णानि वासांस्यभिनवानि च ॥ २१ ॥
एतान्यन्यानि च तदा वस्तूनि बहुशो नृपः ।
महाभारसहैर्वाहैर्वामीभिर्वृषभैस्तथा ॥ २२ ॥
भारयष्टिधरैश्चापि पुरुषैर्विष्टिकारिभिः ।
वाहयित्वात्मदुर्गेषु तेषु तेषु न्यधापयत् ॥ २३ ॥

११–२३ सोनें, रुपें, पितळ, शिसें, तांबें, लोखंड, कथील, काच, सुवर्णमाक्षिक, मोतीं, पाच, माणिक, हिरा, पोवळें, गेंड्याचें शिंग, चामर, हस्तिदंत, कस्तुरी, केशर, चंदन, कापूर, कृष्णागरु, कापूरकाचरी, कंकोळ, रक्तचंदन, वेलदोडा, लवंग, दालचिनी, चीनदारु, निवळी, नखनख, वाळा, नागकेशर, जायफळ, भांग, अफू, तमालपत्र, चारोळी, अक्रोड, मनुका, खजूर, खर्बूर, मिरीं, सुपारी, देवदार, सुंठ, गांठी पिंपळमूळ, जटामांसी, चवक, हळद, सैंधव, पादेलोण, जवखार, सज्जीखार, हिरडा, दशांगधूप, राळ, शिलाजित, मेण रसांजन, मोरचूद, निळा सुरमा, काळा सुरमा, ओंवा, हिंग, जिरें, लोध्र, गुग्गुळ, पावकशिख, मंजिष्ठ, शेंदूर, पारा, हरताळ, गंधक, मनशीळ, लाख, रक्त्याबोळ, गोरोचन, अभ्रक, निरनिराळ्या प्रकारचीं विषें व तीं विषें उतरण्याचीं द्रव्यें, रेशमी, गवती, तागी, फळांचीं, 'रंकु' हरणाच्या लोकरीचीं, लोकरी अशीं नवीं वस्त्रें हे आणि दुसरे पुष्कळ पदार्थ त्या राजानें त्या वेळीं मोठीं ओझीं वाहणारे घोडे, घोड्या, बैल, कावडे, वेठ्ये यांच्याकडून वाहून नेववून आपल्या निरनिराळ्या गडांवर ठेवविले.

शठवल्ली समदलं हरचीरी च नैवरम् ।
नांधवाटं कुंतवाटं केळिवल्ली कशेळिका ॥ २४ ॥
प्रांशुर्धामनसं बिल्ववटं च क्षारपत्तनम् ।
अमून्यन्यान्यपि पुराण्यमुष्मै करमाहरन् ॥ २५ ॥

२४-२५ शेठवली, सौंदळ, हरचेरी, नेवरें, नाधवडें, कोतवडें, केळवली, कशेळी, पांवस, धामणसें, बेलवडें, खारेपाटण ह्या आणि दुसऱ्याहि गांवांनीं त्यास खंडणी आणून दिली.

इत्थं स नीवृतस्तांस्तान् वशीकृत्य प्रतापवान् ।
विविधं धनमाहृत्य स्वराष्ट्राभिमुखोऽभवत् ॥ २६ ॥

२६ ह्याप्रमाणें निरनिराळे प्रांत ताब्यांत आणून विविध खंडणी घेऊन तो प्रतापी राजा आपल्या देशाकडे वळला.

मनीषिण ऊचुः

विद्राव्याविद्धपृतनां द्रुतं दाल्भ्यपुरं जितम् ।
तथैव चित्रपुलिनं पुरं निजकरे कृतम् ॥ २७ ॥
गृहीतं चाप्रयासेन नगरं संगमेश्वरम् ।
अहो राजपुरं सर्वमापातालं च खानितम् ॥ २८ ॥
गृहीताः संचयाः सर्वे निगृहीताश्च नागराः ।
तथाक्रियत सामर्थ्यात् करदः सरितां वरः ॥ २९ ॥
शिवराजेन विद्वेषात् राष्ट्रमेवमुपप्लुतम् ।
अवेत्य येदिलस्तत्र कमुपायमचिंतयत् ॥ ३० ॥

पंडित म्हणाले:—

२७-३० मुसलमानांचें सैन्य पळवून लावून ( शिवाजीनें ) दाभोळ शीघ्र घेतलें ( जिंकलें ); तसेंच चिपळूण आपल्या हस्तगत केलें आणि संगमेश्वरहि अनायासेंच घेतलें. आणि अहो ! सर्व राजापूरहि पातळापर्यंत खणून काढलें; सर्व सांठे घेतले आणि नागरिक कैद केले; तसेंच स्वसामर्थ्यानें समुद्रास आपला मांडलिक केलें (त्याजवर आपली सत्ता स्थापिली.) अशा प्रकारें शिवाजीनें वैरानें देश व्यापला हें जाणून त्यावेळीं आदिलशहानें कोणता उपाय योजला ?

कवींद्र उवाच

स विरोधी किलास्माकं व्रजन् राजपुरं प्रति ।
न निरुद्धस्त्वया तस्मिन् वनमार्गे सुदुर्गमे ॥ ३१ ॥

कवींद्र म्हणाला:—

३१ "तो आमचा उघड शत्रु राजापुरावर चालून जात असतां त्यास त्या अत्यंत दुर्गम अरण्यमार्गांत तूं (सूर्यराजा) अडविलें नाहींस!

आस्तामिदमिदानीं तु त्वमस्मदपकारिणम् ।
समुद्वृत्तं परावृत्तं निरुंत्स्वाभ्यर्णमागतम् ॥ ३२ ॥

३२ बरें तें राहो. आतां तो आमचा उन्मत्त शत्रु परतून जवळ आला आहे; तेव्हां त्यास तूं कोंड."

इत्थमाज्ञां निजां तत्र येदिलो दूनमानसः ।
शृंगारपुरभूपाय प्राहिणोत् सूर्यवर्मणे ॥ ३३ ॥

३३ याप्रमाणें दुःखित आदिलशहानें शृंगापूरचा राजा सूर्याजीराव यास हुकूम पाठविला.

मनीषिण ऊचुः

स तदा येदिलस्तांस्तान् परिहृत्य चमूपतीन् ।
कस्मात्तमेव नृपतिं कार्येऽमुष्मिन् न्ययोजयत् ॥ ३४ ॥

पंडित म्हणाले:—

३४ त्यावेळीं त्या आदिलशहानें सर्व सेनापति सोडून त्याच राजाची योजना त्या कामावर कां केली?

कवींद्र उवाच

भग्नपूर्वाः शिवेनैव रुस्तुमाद्याश्चमूभृतः ।
प्रभविष्यन्ति नो योध्दुमिति चिंतयता स्वयम् ॥ ३५ ॥
येदिलेनाटवीमध्यवर्ती पत्तिबलान्वितः ।
स एव दुष्करेऽप्यस्मिन् कार्ये किल नियोजितः ॥ ३६ ॥

कवींद्र म्हणाला:—

३५-३६ शिवाजीनेंच पूर्वी पराभूत केलेले रुस्तुमादि सरदार (त्याच्याशीं) लढण्यास समर्थ होणार नाहींत असा मनांत विचार करून, अरण्याच्या मध्यभागीं राहणाऱ्या व पायदळ बाळगणाऱ्या त्याच राजाची योजना असें म्हणतात तें काम कठीण असतांहि त्यावर केली.

अथाभिमानैकधनः प्रभावी
स भूपतिर्येदिलशासनेन ।
दधौ धियं वैरमयीं मदेन
करीव सिंहेन समं शिवेन ॥ ३७ ॥

३७ तेव्हां त्या अत्यंत अभिमानी व पराक्रमी राजानें आदिलशहाच्या आज्ञे-वरून—हत्ती मदानें सिंहाशीं जसें वैर करतो तसें—मदानें शिवाजीशीं वैर धारण केलें.

दुरध्वसंचालनसंचिकीर्षया
शिवेन विन्यासविदा निवेशिताम् ।
अनीकिनीं तामधिसंगमेश्वरम्
स्थितां ससैन्यः स रुरोध सत्वरम् ॥ ३८ ॥

३८ शिवाजीनें दुर्गम मार्ग साफसूफ करण्याच्या इच्छेनें संगमेश्वरीं ठेवलेलें तें सैन्य त्यानें आपलें सैन्य घेऊन सत्वर वेढलें.

स पत्तिसंपत्तियुतो निशीथे
निरुध्य सेनां महतीं शिवस्य ।
दुर्दैवयोगेन युयुत्सुरुच्चैः
जगर्ज मेघप्रातिमश्चिरस्य ॥ ३९ ॥

३९ पुष्कळ पायदळाच्या साह्यानें शिवाजीचें मोठें सैन्य मध्यरात्रीं वेढून दुर्दैवानें लढूं इच्छिणारा तो सूर्याजीराव पुष्कळ वेळ मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला.

उच्चकैः श्रवणगोचरीकृतं
पन्नगारय इवाहिफूत्कृतम् ।
तत्तदायुधभृतो न सेहिरे
तानजित्प्रभृतयोऽस्य गर्जितम् ॥ ४० ॥

४० गरुड जसा नागांचा फूत्कार सहन करीत नाहीं, तशी प्रचंडपणें कानीं पडलेली ती त्याची गर्जना त्या समयीं तानाजीप्रभृति योध्यांनीं सहन केली नाहीं.

तदातिभीतः किल नीलकंठ-
राजात्मजो दैवहतः पिलाजी ।

प्रभावलीशाय यशांसि दातुं
अमंस्त युद्धादपयानमेव ॥ ४१ ॥

४१ तेव्हां अतिशय भ्यालेला नीळकंठ राजाचा पुत्र जो हतभागी पिलाजी त्यानें प्रभावलीच्या राजास जणूं काय यश देण्यासाठींच लढण्यापेक्षां पळणेंच अधिक पसंत केलें !

संजातवेपथुममुं भृशमुच्छ्वसंतं
विन्यस्तपाणिगकृपाणमपद्रवंतम् ।
सद्यः स्वयं कतिपयानि पदानि गत्वा
धृत्वा करे न्यगकरोत् किल मल्लसूरः ॥ ४२ ॥

४२ कांपरें भरलेल्या, अतिशय धापा टाकणाऱ्या, हातांतील तरवार खालीं टाकून पळत सुटलेल्या अशा त्या पिलाजीस तावडतोब कित्येक पावलें जाऊन मालुसऱ्यानें स्वतः हातांत धरलें व त्याचा उघड धिक्कार केला.

मल्लसूर उवाच

तवाहमस्मिन् समरे सहायः ।
पलायसे हा स्वजनं विहाय ॥
आसन् पुरा यानि विकत्थितानि ।
तानि क्व तेऽनीकपते गतानि ॥ ४३ ॥

मालुसरे म्हणालाः—

४३ ह्या युद्धांत मी तुझा साह्यकर्ता आहें. तूं आपल्या लोकांस टाकून पळत सुटला आहेस ही खेदाची गोष्ट होय! पूर्वी तूं ज्या बढाया मारीत होतास, त्या तुझ्या बढाया, हे सेनापते ! कोठें गेल्या ?

प्रदाय माहात्म्यमभीष्टदेन
यः पालितोऽभूः शिवभूमिपेन ।
सेनापतिः सोऽद्य विमुक्तसेनः
पलायसे हन्त विलज्जसे न ॥ ४४ ॥

४४ अभीष्टदात्या शिवाजीनें ज्या तुला मोठेपणा देऊन पाळिलें तो तूं सेनापति आज सैन्य टाकून पळून जात आहेस आणि अरे ! त्याची तुला खंतहि वाटत नाहीं !

इत्युक्त्वा दृषदि निबध्य रज्जुखंडैः
तं त्रस्तं निजसविधे स्थिरं विधाय ।
आत्मीयां सपदि स तत्र शौर्यशक्तिं
शूरेभ्यः पदि पदि दर्शयन् ननर्त ॥ ४५ ॥

४५ असें बोलून त्या घाबरलेल्या पिलाजीस आपल्या संनिध दोरखंडानीं दगडास पक्का बांधून ठेवून तेथें लगेच आपलें शौर्य शूरांस पदोपदीं दाखवीत नाचूं लागला.

प्रतिहतरिपुशूरप्रस्रवद्रक्तपूरः
प्रचुरसमरशोभासुभ्रुवः कर्णपूरः
स मृधमधिविरेजे तानजिन्मल्लसूरः
समजनि निशि तस्यां तेजसा यस्य सूरः ॥ ४६ ॥

४६ ठार केलेल्या शत्रूकडील वीरांच्या रक्ताचे पूर वाहावयास लावणारा व प्रचुरयुद्धशोभारूपी सुंदरीच्या कानांतील अलंकार असा तो तानाजी मालुसरे युद्धामध्यें चमकूं लागला व त्याच्या तेजानें त्या रात्रीं सूर्य उत्पन्न झाला.

अथ कृतजयघोषग्रस्तमेघस्वनानां
विलसदसिलतानां हन्तुमेवोद्यतानाम् ।
प्रतिपदमविहस्ताः सन्निपाते रिपूणां
सुमहति कृतहस्ताः सैनिकास्तं ररक्षुः ॥ ४७ ॥

४७ तेव्हां आपण केलेल्या जयघोषानें ज्यांनीं मेघांचा ध्वनि लोपवून टाकला आहे, ज्यांच्या हातांत तरवारी चमकत आहेत व जे पदोपदीं मारण्यास उद्युक्त झाले आहेत अशा शत्रूंच्या प्रचंड गर्दीमध्यें न गोंधळणाऱ्या व उत्तम तिरंदाज सैनिकांनीं त्याचें रक्षण केलें.

आतिष्ठ प्रहर प्रयच्छ विरम व्यापारय प्रापय
त्रायस्व त्यज मुंच विद्रव नय व्यावर्तयालोकय ।
भिन्द्धि च्छिन्द्धि गृहाण पातय जहीत्युच्चैस्ततो गर्जतां
योधानामभिधावतामुभयतः कोलाहलः कोऽप्यभूत् ॥४८॥

४८ सज्ज हो, हाण, दे, थांब, फेक, पोंचव, वांचव, टाक, सोड, पळ, ने, परतव, पहा, फोड, तोड, घे, पाड, मार असें तेथें मोठ्यानें ओरडणाऱ्या व एकमेकांवर धावून जाणाऱ्या दोहींकडील योध्यांचा अवर्णनीय ओरडा झाला.

स्फूर्जद्रत्नांगुलीयद्युतिशबलनखद्योतिभिः पंचशाखैः
स्रस्तोष्णीषैः शिरोभिर्निबिडनिपतितैरंघ्रिभिर्बाहुभिश्च ।
अंगैरन्यैश्च हंत क्षणरुचिविलसत्खड्गवल्लीनिकृत्तैः
उत्कृष्टासृक्प्रवाहप्रचयिभिरथ सा दुर्गमाभूद्धरित्री ॥४९॥

४९ चकाकणाऱ्या रत्नजडित आंगठ्यांच्या चकाकीनें ज्यांच्या नखांची कांति चित्रविचित्र झाली आहे असे हात, पगड्या पडलेलीं मुंडकीं, दाट पडलेले हात पाय आणि विजेप्रमाणें चमकणाऱ्या तरवारींनीं तुटलेले व ज्यांच्यावर पुष्कळ रक्तप्रवाहाचे संचय झालेले आहेत असे दुसरेहि अवयव यांच्यायोगें ती भूमि दुर्गम झाली !

अथ प्रभवति विभावरीविरामे
तिमिरमिवार्यमरश्मिभिः समग्रम् ।
शिवनृपसुभटैः प्रसह्य भग्नं
सपदि जगाम विराममन्यसैन्यम् ॥ ५० ॥

५० मग रात्र संपू लागली असतां, सूर्याचे किरण जसे अंधकार नाहींसा करतात तसें, शिवराजाच्या योध्यांनीं पूर्ण पराभूत केलेलें शत्रुसैन्य तत्काळ नाहींसें झालें (पळालें).

अथ विहितपलायनेषु तेषु
प्रतिनृपसैनिकपुंगवेषु सद्यः ।
स्वनदभिनवमेघसाम्यभाजा
सह पटहेन जगर्ज मल्लसूरः ॥ ५१ ॥

५१ मग ते शत्रुराजाकडील श्रेष्ठ सैनिक लगेच पळून गेले असतां नवीन मेघाप्रमाणें गर्जणाऱ्या दुंदुभीबरोबर मालुसरे गर्जना करूं लागला.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवींद्रपरमानंदप्रकाशितायां
शतसाहस्त्र्यां संहितायामध्यायः ॥ ३० ॥

---

# अध्याय ३१ वा



**कवींद्र उवाच**

**अथ राजपुरात् तूर्णं परावृत्तं शिवं प्रभुम् ।**
**प्रत्युद्गम्य समं सैन्यैर्मल्लसूरो व्यलोकत ॥ १ ॥**

कवींद्र म्हणालाः—

१ मग राजापुराहून त्वरित परत आलेल्या शिवाजी राजास मालुसरे सैन्या-सह सामोरा जाऊन भेटला.

**तं भूरिणा प्रभावेण परिभूतारिसैनिकम् ।**
**वंदमानं नृपः पश्यन् अभिमानधनं तदा ।**
**उपकंठे नीलकंठराजात्मजनिवेदितम् ॥ २ ॥**
**प्रथीयसा प्रसादेन सानीकं समभावयत् ॥ ३ ॥**

२-३ ज्यानें मोठ्या पराक्रमानें शत्रूचें सैन्य पराभूत केलें असा तो तानाजी आल्याचें नीळकंठराजाच्या पुत्रानें जवळ जाऊन कळविलें असतां वंदन कर-णाऱ्या त्या मानधन तानाजीस पाहून राजानें त्याचा सैन्यासह मोठ्या कृपेनें सन्मान केला.

**ततः श्रुत्वा तदौद्धत्यं सूर्यराजकृतं शिवः ।**
**तरस्वी तत्क्षणेऽत्यर्थं क्रुद्धोऽपि क्रोधमावृणोत् ॥ ४ ॥**

४ नंतर सूर्यराजानें केलेला तो उद्धटपणा ऐकून पराक्रमी (बलाढ्य) शिवाजी राजा अतिशय रागावला असतांहि त्यानें आपला राग आवरला.

**अथ वैवधिकस्तूर्णं विसृष्टः शिवभूभृता ।**
**प्रोचे प्रभावलीपालमुपेत्य महितं वचः ॥ ५ ॥**

५ आणि शिवाजीनें त्वरित पाठविलेल्या दूतानें प्रभावळीच्या राजाकडे येऊन आदरणीय भाषण केलें.

**वैवधिक उवाच**

**यदा यदा येदिलस्य साहाय्यं समुपेयुषा ।**
**भवता शिवभूपस्य बहवो मंतवः कृताः ॥ ६ ॥**

यच्च सैन्ये शिवस्योच्चैः संगमेश्वरवर्तिनि ।
न्यपतः सैन्यसहितो वीतभीर्निशि संप्रति ॥ ७ ॥
प्रभावलीपते विश्वजयिना शाहसूनुना ।
कथं कथय सोढव्यः स तवापनयो महान् ॥ ८ ॥

दूत म्हणालाः—

६–८ ज्या अर्थी आदिलशहाच्या मदतीस जाऊन तूं शिवाजी राजाचे पुष्कळ अपराध केलेस आणि संगमेश्वरीं असलेल्या शिवाजीच्या सैन्यावर रात्रीं तूं सैन्यासह निर्भयपणें छापा घातलास, त्या अर्थी तो तुझा मोठा अपराध, हे प्रभावलीच्या राजा, विश्वजेत्या शिवाजीनें कसा सहन करावा हें तूंच सांग.

अतः स कुपितोऽप्युच्चैर्दैवादात्तदयस्त्वयि ।
बतादिशद्यथाद्य त्वां तथा वक्ष्ये निशाम्यताम् ॥ ९ ॥

९ म्हणून तो अतिशय रागावला असतांहि सुदैवानें तुझ्यावर दयाळू होऊन त्यानें आज तुला जी आज्ञा केली आहे ती सांगतों ऐक.

**शिवराज उवाच**

वनद्विप इवोन्मत्तो मत्तो भीतः पलायितः ।
यः प्राप्तस्त्वां महाबाहो महाबाहुर्नराधिपः ॥ १० ॥
तस्य पल्लीवनपतेर्विमतेर्विहितागसः ।
उपवर्तनमाहर्तुमुद्यतोऽस्म्यहमंजसा ॥ ११ ॥

शिवाजी राजा म्हणालाः—

१०–११ हे महाबाहो, रानांतील हत्तीप्रमाणें उन्मत्त असा जो बलवान् (महाबाहु) राजा मला भिऊन पळून तुझ्याकडे आला, त्या प्रतिकूल, अपराधी पालीच्या राजाचा देश ताबडतोब घेण्यास मी सज्ज झालों आहें.

अथास्मत्तो न भेतव्यमेतव्यमपि च त्वया ।
तत्र पल्लीवने यत्र दातव्यमभयं मया ॥ १२ ॥

१२ तेव्हां आम्हास भिऊं नकोस आणि तिकडे पालीस बिनचूक ये म्हणजे तेथें तुला मी अभयदान देईन.

आगंतासि न चेद्दर्पात् तर्हि गंतासि तद्दशाम् ।
न विद्यतेऽद्य मत्कोपात् कोऽपि गोपायिता तव ॥ १३ ॥

१३ जर घमेंडीमुळें तूं तेथें आला नाहींस, तर त्याची अवस्था तुला प्राप्त होईल. माझ्या कोपापासून तुझें रक्षण करण्यास आज कोणीहि नाहीं.

ततो वार्तावहादित्थं निशम्य शिवभाषितम् ।
शृंगारपुरभूपालो याहि यामीत्युवाच तम् ॥ १४ ॥

१४ तेव्हां याप्रमाणें दूताकडून शिवाजीचें म्हणणें ऐकून "तूं जा, मी जातों ( येतों )" असें शृंगापूरचा राजा त्यास म्हणाला.

अथ पल्लीवनाभ्यर्णमुपेत्य शिवभूभृते ।
विविक्ते सूर्यराजोक्तं वचनं व्याजहार सः ॥ १५ ॥

१५ मग पालीजवळ जाऊन त्यानें ( दूतानें ) शिवाजी राजास सूर्यराजाचें बोलणें एकांतांत सांगितलें.

ततस्तं देशमाक्रम्य शिवः पल्लीवनाह्वयम् ।
अन्वग्रहीदनुग्राह्यान् निगृह्यान् न्यग्रहीदपि ॥ १६ ॥

१६ नंतर शिवाजीनें पाली नांवाचा तो प्रांत पादाक्रांत करून अनुग्रह करण्यास योग्य असलेल्यांवर अनुग्रह व निग्रह करण्यास योग्य असलेल्यांचा निग्रहहि केला.

विप्राश्च बाहुजास्तद्वदूरव्याश्च जघन्यजाः ।
कांस्यकाराः कलादाश्च व्योकाराः शौल्विकस्तथा ॥१७॥
तक्षाणः पलगंडाश्च नापिताः प्रतिहारिकाः ।
मालाकाराः कुंभकाराः कारूकाश्च कुशीलवाः ॥ १८ ॥
तंतुवायास्तुन्नवाया रंगाजीवाश्च भूरिशः ।
तांबूलिकाश्चाक्रिकाश्च रजकाः शौंडिका अपि ॥ १९ ॥
अजापालाश्च गोपाला देवलाश्च कृषीवलाः ।
गांधिकाश्च तथा कांदविकाः कांबविकाः पुनः ॥ २० ॥
मार्दंगिकाश्च वेणुध्माः पाणिवादाश्च वैणिकाः ।
वाद्यविद्याविदग्धाश्च लुब्धकाश्चासिधावकाः ॥ २१ ॥
कुसीदवृत्तयः कांडकारिणश्चाहितुंडिकाः ।
पादूकृतः पुलिंदाश्च जालिकाश्च जनंगमाः ॥ २२ ॥
उपलब्धभयाः सद्यस्तमेत्य विषयं पुनः ।
दिने दिने वर्धमानश्रियो नंदन्ननेकधा ॥ २३ ॥

१७-२३ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, कांसार, सोनार, लोहार, तांबट, सुतार, गवंडी, न्हावी, तमासगीर, माळी, कुंभार, कारागीर, भाट, कोष्टी,

शिंपी, रंगारी, तांबोळी, तेली, परीट, कलाल, घनगर, गवळी, गुरव, कुणबी ( शेतकरी ), गंधी, हलवाई, कोमटी, पखवाजी (मृदंग्ये,) पांवेकरी, टाळकरी, वीणेकरी, बजवय्ये,पारधी, शिकलगार, सावकार, बाण करणारे, गारुडी, चांभार, भिल्ल, कोळी, मांग ( चांडाळ ) असे घाबरून गेलेले लोक पुनः लगेच त्याच प्रांतीं येऊन दिवसेंदिवस भरभराट पावून अनेक प्रकारें आनंद पावले.

**अथो जनपदस्यास्य रक्षणाय भृशाक्षमम् ।**
**चिरदुर्गमितिख्यातमवलोक्य शिलोच्चयम् ॥ २४ ॥**

**समंततः शिरस्युच्चैः प्राकारेण पटीयसा ।**
**परिवारितमुत्साही स कारुभिरकारयत् ॥ २५ ॥**

२४--२५ तेव्हां, त्या देशाच्या रक्षणार्थ अतिशय समर्थ असा 'चिरदुर्ग' या नांवानें प्रख्यात गड पाहून त्या उत्साही शिवाजीनें त्याच्या माथ्यावर कारागिरांकडून सभोवतीं उंच तट बांधविला.

**अथ मंडनमस्यैष मंडलस्येति सूचयन् ।**
**शैलमेनं महीपालो व्यदधान्मंडनाह्वयम् ॥ २६ ॥**

२६ आणि 'हा त्या प्रांताचें मंडनच ( भूषणच ) आहे' असें सुचविण्यासाठीं या गडास 'मंडनगड' असें नांव दिलें.

**अथ दुर्गपतिस्तस्मिन् गिरिदुर्गे सुदुर्गमे ।**
**निधायाधृष्यमध्यक्षं दक्षं रक्षणकर्मणि ॥ २७ ॥**

**सेनां च कांचिदव्यग्रः समग्रगुणशालिनीम् ।**
**प्रभुः प्रास्थित शृंगारपुरभूपजिगीषया ॥ २८ ॥**

२७–२८ त्या गडांच्या स्वामीनें त्या अत्यंत दुर्गम गडावर रक्षणाच्या कामीं दक्ष असा अजिंक्य गडकरी नेमून व सर्वगुणसंपन्न असें कांहीं सैन्य ठेवून तो दक्ष राजा शृंगारपूरच्या राजास जिंकण्याच्या इच्छेनें निघाला.

**मनीषिण ऊचुः**

**क्षणात् प्रभावलीपालं परिभावयितुं प्रभुः ।**
**पुरैव न कथं यातः शिवः शृंगारपत्तनम् ॥ २९ ॥**

**कथं च साभिमानाय दधानाय प्रतीपताम् ।**
**अभयं ते ददामीति दूतं तस्मै विसृष्टवान् ॥ ३० ॥**

# शिवभारत अध्याय ३१ वा

पंडित म्हणाले:—

२९–३० प्रभावळीच्या राजाचा एका क्षणांत पराभव करण्यास समर्थ असा शिवाजी पूर्वींच शृंगारपुरास कसा गेला नाहीं ? आणि वैर धरणाऱ्या त्या गर्विष्ठ राजास 'तुला अभय देतों' असें म्हणून त्याच्याकडे दूत कसा पाठविला ?

**कवींद्र उवाच**

**जयवल्लीजयाद्येन कर्मणा प्रथितं शिवम् ।**
**सूर्यराजः पुरा मत्वा पुरारिसमविक्रमम् ॥ ३१ ॥**
**प्राज्यं प्रभावलीराज्यं पिपालयिषुरात्मना ।**
**तव क्रीतसुतोऽस्मीति वाचिकेन व्यजिज्ञपत् ॥ ३२ ॥**

कवींद्र म्हणाला:—

३१–३२ जावळीच्या जयापासून केलेल्या पराक्रमानें प्रख्यातीस आलेल्या, इंद्राप्रमाणें पराक्रमी अशा शिवाजीस पूर्वी मानलें नसतांहि सूर्यराजाने प्रभावलीचें समृद्ध राज्य स्वतः राखण्याच्या इच्छेनें 'तुझा मी क्रीतपुत्र (विकत घेतलेला पुत्र) आहें' असा निरोप पाठवून विनंती केली.

**तदाप्रभृति तं भूपं शरण्यः शरणोन्मुखम् ।**
**शिवतातिः शिवनृपश्चिरकालमपालयत् ॥ ३३ ॥**

३३ त्या वेळेपासून त्या शरणेच्छु राजाचें रक्षण शरणागतांचें रक्षण करणाऱ्या शिवाजी राजानें पुष्कळ काळपर्यंत केलें.

**अयुध्यदरिभिः सार्धं शिवराजो यदा यदा ।**
**अकरोदस्य साहाय्यं सूर्यराजस्तदा तदा ॥ ३४ ॥**

३४ जेव्हां जेव्हा शिवाजी राजानें शत्रूशीं युद्ध केलें, तेव्हां तेव्हां सूर्यराजानें त्यास साह्य केलें.

**अथ दैवध्वस्तधिया परित्यक्तभियामुना ।**
**अहंयुना घनारण्यवर्तिना जिह्मवृत्तिना ॥ ३५ ॥**
**शिवराजविरुद्धानामविद्धानामनेकधा ।**
**व्यक्तमव्यक्तमप्युच्चैर्व्यधीयत सहायता ॥ ३६ ॥**

३५–३६ नंतर दुर्दैवानें बुद्धि नष्ट झालेल्या, भीति टाकलेल्या, निबिड अरण्यांत राहणाऱ्या, गर्विष्ठ, कपटी सूर्यराजानें शिवराजाचे वैरी जे अविंध त्यांस गुप्तपणें व उघडपणेंहि अनेक प्रकारें मोठें साह्य केलें.

दृढव्रतः शिवोऽमुष्मै भूयो भूयः कृतागसे ।
अपि निग्रहणीयाय निग्रहं न व्यचिंतयत् ॥ ३७ ॥

३७ त्यानें पुनः पुनः अपराध केले असतांहि व तो निग्रह करण्यास योग्य असतांहि दृढव्रत शिवाजीनें त्याचा निग्रह करण्याचें मनांत कसें आणलें नाहीं ?

आहूतोऽपि समर्यादे नाययौ स यदा मदात् ।
अकुप्यत् सूर्यराजाय भूभृत् भृशबलस्तदा ॥ ३८ ॥

३८ जवळ बोलाविला असतांहि जेव्हां तो गर्वानें जवळ आला नाहीं, तेव्हां शिवाजी राजा भोसला सूर्यराजावर रागावला.

अथासौ पृथिवीनाथः पदातीनां तरस्विनाम् ।
युतो युतेन सार्धेन प्रयाणाभिमुखोऽभवत् ॥ ३९ ॥

३९ नंतर तो राजा पंधरा हजार वेगवान पदाति बरोबर घेऊन स्वारीवर निघण्यास सिद्ध झाला.

नृवाह्यं यानमारुह्य व्रजन्नथ स सत्वरः ।
समपश्यन्महासारः पुरं सारवरं पुरः ॥ ४० ॥

४० तो महाबली शिवाजी पालखींत बसून त्वरेनें जात असतां त्यास समोर सारवर दिसलें.

अथ श्रुत्वा रुषा स्पृष्टं शिवमभ्यर्णमागतम् ।
प्रभावलींद्रो विमनाः स्वजनान् समवोचत ॥ ४१ ॥

४१ तेव्हां क्रोधाविष्ट झालेला शिवाजी समीप आलेला ऐकून प्रभावलीचा राजा खिन्न होऊन आपल्या लोकांस म्हणाला.

सूर्यराज उवाच

कृतकर्मा महाबाहुः सुरासुरनरैर्नुतः ।
सुतः शाहनरेंद्रस्य नैक-सैनिकसंयुतः ॥ ४२ ॥
शृंगारपुरमादातुमस्मत्तोऽद्य बतोद्यतः ।
अज्ञात एव निकटे कूटयोधी किलागतः ॥ ४३ ॥

सूर्यराज म्हणालाः—

४२-४३ सुरासुरांनी स्तविलेला, कपट युद्ध करणारा, कर्तृत्ववान व बलवान् शिवाजी पुष्कळ सैनिक बरोबर घेऊन आमच्यापासून शृंगारपूर घेण्यास उद्युक्त होऊन अगदीं गुप्तपणें जवळ आला आहे अशी लोकवार्ता आहे.

समर्थेन समं तेन संपरायममुं वयम् ।
अकूपारमिवापारं पारयिष्यामहे कथम् ॥ ४४ ॥

४४ त्या समर्थाशीं होणाऱ्या ह्या युद्धांतून अपार समुद्राप्रमाणें आम्ही कसे पार पडूं ?

इत्युक्तवान् स तैस्तत्र स्वजनैरनुमोदितः ।
रिरक्षयिषुरात्मानमपयाने मतिं दधे ॥ ४५ ॥

४५ असें बोलून व तेथें आपल्या लोकांचें अनुमोदन घेऊन त्यानें आत्मरक्षण करण्याच्या इच्छेनें पळून जाण्याचा विचार केला.

**मनीषिण ऊचुः**

आसीदवस्थितिर्यस्य वनदुर्गे सुदुर्गमे ।
अहन्यहनि च प्रायो मतिरायोधनोद्यमे ॥ ४६ ॥
सुदुर्धर्षस्य सह्याद्रिर्मनुते यस्य शासनम् ।
येनान्यदुर्लभं लब्धं बत पूर्वनृपासनम् ॥ ४७ ॥
स्वराष्ट्ररक्षणाकांक्षी येन दुर्दांतचेतसा ।
कृतागसापि संधाय दौस्थ्यं तत्याज येदिलः ॥ ४८ ॥
कुर्वता स्ववशानेव हबसानवशानपि ।
अकारि विनयग्राही येन वै मकरालयः ॥ ४९ ॥
अनंददधिकं येन पारंपर्यागता चमूः ।
यः परेणानुभावेन परिभूतो न केनचित् ॥ ५० ॥
सोऽपि प्रभावलीपालः क्षत्रधर्मविदां वरः ।
नायुध्यत कथं तेन शिवेनापचिकीर्षता ॥ ५१ ॥

पंडित म्हणाले:—

४६–५१ जो अत्यंत दुर्गम अरण्यांत वास करीत असे, ज्याची प्रायः प्रतिदिवशीं लढण्याची इच्छा असे, ज्या अजिंक्य राजाची सत्ता सह्याद्रि मान्य करीत होता, ज्यानें इतरांस दुर्लभ असें पूर्वीच्या राजांचें सिंहासन प्राप्त केलें होतें, ज्या गर्विष्ठ राजाशीं, तो अपराधी असतांहि, आपल्या राज्याचें रक्षण करूं इच्छिणाऱ्या आदिलशहानें ज्याच्याशीं तह करून आपली दुर्दशा टाळली, ज्यानें हबशांच्या ताब्यांतील लोकांना आपल्या ताब्यांत आणलें, ज्यानें समुद्रहि आपला आशांकित केला, ज्याच्यायोगें परंपरागत सेना अधिक आनंदित झाली, ज्यास

श्रेष्ठ पराक्रमानें कोणीहि मागें टाकलें नाहीं, अशा त्या प्रभावलीच्या राजानेंहि आपणास अपकार करूं इच्छिणाऱ्या शिवाजीशीं कसें युद्ध केलें नाहीं ?

**कवींद्र उवाच**

**पुरा पुराग्निप्रतिमप्रतापं संगमेश्वरात् ।**
**प्रयातं शिवमाकर्ण्य पल्लीवनपुरं प्रति ॥ ५२ ॥**
**असपत्नमिवात्मानं मन्यमानोऽल्पचेतनः ।**
**लक्षयन् प्रधनाभावं हर्यक्षसमविक्रमान् ॥ ५३ ॥**
**पुंजीकृतान् स्वपृतनापतीन् भुवनपूजितान् ।**
**तांस्तान् स्वस्वनिकेताय सूर्यराजोऽनुजज्ञिवान् ॥ ५४ ॥**

कवींद्र म्हणाला:—

५२–५४ पूर्वी प्रळयाग्नीप्रमाणें प्रतापी शिवाजी संगमेश्वराहून पालीकडे निघून गेल्याचें ऐकून त्या मूर्ख सूर्यराजानें आपणास कोणी शत्रु उरला नाहीं असें समजून व युद्धाचा प्रसंग नाहीं असें पाहून सिंहाप्रमाणें पराक्रमी, जगद्वंद्य अशा गोळा झालेल्या निरनिराळ्या सेनानायकांस आपआपल्या घरीं जाण्यास अनुज्ञा दिली.

**अथ पल्लीवनात्तूर्णं परावृत्तः शिवो यदा ।**
**सूर्यराजः समाहर्तुं सेनां नाभूत् प्रभुस्तदा ॥ ५५ ॥**

५५ मग पालीहून जेव्हां शिवाजी त्वरित परतला, तेव्हा सूर्यराजास आपलें सैन्य जमवितां आलें नाहीं.

**अमुना हेतुना नूनं दुर्मनाः स द्विजोत्तमाः ।**
**प्रभावलीपरिवृढो न मृधे निदधे मनः ॥ ५६**

५६ या कारणामुळें खरोखर खिन्न होऊन, हे पंडितानो, त्या प्रभावलीच्या राजानें युद्ध करण्याची इच्छा केली नाहीं.

**विष्वक्सेनावतारेण नैकसैनिकवर्तिना ।**
**दृप्यद्देदिलदोःस्तंभदार्ढ्यं दंभापहारिणा ॥ ५७ ॥**
**दीर्णदिल्लींद्रसैन्येन वज्रप्रतिममूर्तिना ।**
**अतीवाव्यक्तमंत्रेण स्वतंत्रेणानुभाविना ॥ ५८ ॥**
**दुर्ग्राह्यविद्विषद्दुर्गग्राहिणा हठवाहिना ।**
**चंद्रराजभुजच्छेदकारिणाफजलारिणा ॥ ५९ ॥**

विरच्य विपुलं वैरं पलायनपरं मनः ।
चकार सूर्यराजो यत्तन्न चित्रकरं मम ॥ ६० ॥

५७–६० विष्णूचा अवतार, अनेक सैनिकांचा अधिपति, गर्विष्ठ आदिल शहाचा स्वबाहुबलाविषयींचा गर्व हरण करणारा, दिल्लीपतीच्या सैन्याचा चुराडा करणारा, वज्रासारखा देह असलेला, अत्यंत गुप्त मसलत कराणारा, स्वतंत्र, सामर्थ्यवान, शत्रूंचे अजिक्य दुर्ग जिंकणारा, हट्टी, चंद्रराव मोऱ्याचा भुजच्छेद करणारा, अफजलखानास ठार मारणारा अशा शिवाजीशीं मोठें वैर मांडून सूर्यराजानें पळून जाण्याचा विचार केला यांत मला कांहीं आश्चर्यकारक वाटत नाहीं.

अथोन्नतानतशिलाशतसंकुलितांतराम् ।
तरुकोटरसंविष्टघूकघूत्कारगर्भिताम् ॥ ६१ ॥
महोरगविनिर्मुक्तानेकनिर्मोकभास्वराम् ।
अपारविटपिव्रातविटपव्याप्तपुष्कराम् ॥ ६२ ॥
उपकंठनटन्नैकनीलकंठमनोहराम् ।
नीडांतरोत्पतत्कीरां किकीदिविकृतस्वराम् ॥ ६३ ॥
परिश्लिष्टाचलतटामंभोधरघटाकृतिम् ।
प्रतिक्षणोच्चलच्छाखामृगांदोलितपल्लवाम् ॥ ६४ ॥
स्तब्धरोमसमारब्धघर्घरस्वरघोषणाम् ।
मृगादनवतीं माद्यदिभसंनिभसैरिभाम् ॥ ६५ ॥
घनकर्मारकुंजांतर्निद्राणव्याघ्रपुंगवाम् ।
अभीकानेकभल्लूककृतवल्मीकदारणाम् ॥ ६६ ॥
विसंकटामपि कुटैरुत्कटैः कृतसंकटाम् ।
विशन् सुभटशृंगारः स शृंगारपुराटवीम् ॥ ६७ ॥
विविधास्कंदनाकांक्षी सूर्यराजमपद्रुतम् ।
निशम्यानीकसहितो विमनस्क इवाभवत् ॥ ६८ ॥

६१–६८ जींत शेंकडों उंचसखल धोंडींची गर्दी होती, जिच्यांतील झाडांच्या ढोलींमध्यें बसलेलीं घुबडें घूत्कार करीत होतीं, जी मोठमोठ्या नागांच्या अनेक कातींनीं चकाकत होती, जींतील असंख्य वृक्षांच्या खांद्यांनीं आकाश व्यापून टाकलें होतें, जी कडेस नाचणाऱ्या अनेक मोरांच्यायोगें मनोहर दिसत होती,

जिच्यामधील घरट्यांतून पोपट उडत होते, जींत तास ( पक्षी ) ओरडत होते, जिनें गडाच्या तटास वेष्टिलें होतें, जी मेघसमूहाप्रमाणें दिसत होती, जिच्यांतील वृक्षांचे पल्लव क्षणोक्षणीं उड्या मारणाऱ्या वानरांच्यायोगें हलत होते, जींत रानडुकर घरघर घोष करीत होते, जीमध्यें लांडगे व मत्त हत्तीसारखे गवे होते, जीमधील दाट वेळूच्या बेटांमध्यें मोठमोठे वाघ निजले होते, जीमध्यें अनेक निर्भय कोल्हे वारुळें उकरीत होते, जी भयंकर असूनहि उंच उंच झोपड्यांनीं ( घरांनीं ) गजबजलेली होती अशा त्या शृंगारपूरच्या झाडींत शिरणारा, निरनिराळया प्रकारें हल्ले करूं इच्छिणारा, उत्तम योध्यांस ललामभूत असा तो शिवाजी सूर्यराज पळून गेला हें ऐकून सैन्यासह खिन्नसा झाला.

अथ प्रस [प]न्नाभयदायकेन
दुर्दान्तदर्पापहसायकेन।
उपेत्य शृंगारपुरं शिवेन
भुजस्मयावेशभृता व्यलोकि ॥ ६९ ॥

६९ शरणागतांना अभय देणारा, गर्विष्ठांचा गर्व नाहींसा करणारा बाणच, बाहुबलाचा अभिमान बाळगणारा असा शिवाजी शृंगारपुराजवळ येऊन तें त्यानें पाहिलें.

नृवाह्ययानस्थित एव तूर्णं
स्वसैनिकैस्तत्क्षणमेव पूर्णम्।
प्रविश्य शृंगारपुरं प्रपश्यन्
स्वमन्यमंस्तैष परैरधृष्यम् ॥ ७० ॥

७० आपल्या सैनिकांनीं तत्काळ व्यापलेल्या त्या शृंगारपुरांत पालखींत बसूनच त्वरेनें प्रवेश करून तें पाहात असतांना आपणहि शत्रूंस अजिंक्य आहों असें त्यास वाटलें.

अजय्यमन्यैरिति विश्रुतं यत्
स भूपतिर्वैरिनृपासनं तत्।
स्पृशन् भृशं स्वेन पदा तदानीं
अमानि लोकेन महाभिमानी ॥ ७१ ॥

७१ शत्रूंस अजिंक्य अशी ज्याची ख्याति होती, त्या शत्रुराजांच्या सिंहासनास त्यानें आपल्या पायानें लाथ मारली त्यावेळीं तो लोकांस महागर्विष्ठ वाटला.

आदाय तस्मादभयं द्रढीयः
समीयुषा पौरजनेन भूयः ।
प्रविश्य शृंगारपुरं प्रभूय
प्रभूतशृंगारपदं व्यधायि ॥ ७२ ॥

७२ त्याच्यापासून पक्के अभयदान घेऊन जमलेल्या पौरजनांनीं शृंगारपुरांत पुनः प्रवेश करून, समर्थ (समृद्ध) होऊन त्यास पुष्कळ शृंगाराचें स्थान केलें.

अथ कतिपयसैनिकानुयातं
प्रतिनृपमाशु दिगंतमेत्र यातम् ।
त्रिभुवनजनजित्वरप्रतापः
स बत निहंतुमपत्रपामवापत् ॥ ७३ ॥

७३ नंतर कांहीं थोड्या सैनिकांसह शीघ्र दिगंतास पळून गेलेल्या शत्रुराजांस मारण्याची, ज्याचा प्रताप त्रिभुवनांतील लोकांस जिंकणारा आहे अशा शिवाजीस, लाज वाटली.

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां
शतसाहस्र्यां संहितायां स्वपुरप्रवेशो
नामाध्यायः ॥ ३१ ॥

---

# अध्याय ३२ वाँ

कवींद्र उवाच

अथ शाहसुतः प्रभावलीविषयं सर्वमपि स्वतेजसा ।
अकरोन्निजपाणिवर्तिनं नयवर्त्म प्रतनं प्रवर्तयन् ॥ १ ॥

कवींद्र म्हणालाः—

१ नंतर शिवाजीनें जुना राजनीतिमार्ग चालू करून सर्वच प्रभावली प्रांत स्वपराक्रमानें आपल्या हस्तगत केला.

पटुसंगरकर्मकर्मठं प्रथितं त्र्यंबकभास्करं शिवः ।
सुमतिं सपदि प्रभावलीविषयाध्यक्षपदे न्ययोजयत् ॥ २ ॥

२ जोराच्या—वेगाच्या युद्धांत निष्णात, प्रख्यात, शहाण्या अशा त्र्यंबक भास्करास शिवाजीनें लगेच प्रभावली प्रांताचा अधिकारी नेमलें.

हृतराजपुरश्रियं रुषा जितशृंगारपुरं तथौजसा ।
परसैनिकपुंगवाः शतं शतमेतं शरणैषिणोऽनमन् ॥ ३ ॥

३ क्रोधानें राजापूरची संपत्ति हरण करणाऱ्या व बलानें शृंगारपूर जिंकणाऱ्या त्या शिवाजीस शत्रूकडील शेंकडों शरणेच्छु श्रेष्ठ सैनिक प्रणाम करूं लागले.

अथ तस्य पुरस्य रक्षणे क्षणमालक्ष्य सदेशवर्तिनम् ।
स गिरिं प्रथितं प्रतीत इत्यभिधानेन समन्वितं व्यधात् ॥ ४ ॥

४ मग त्या नगराच्या ( शृंगापूरच्या ) रक्षणासाठीं जवळच असलेला प्रख्यात गड क्षणभर पाहून त्यानें त्याचें ' प्रतीतगड ' असें नांव ठेवलें.

अथ चंद्रमृणालचंद्रिकामिहिकाचंदनचंपकादिभिः ।
उपनीय मुदं तपर्तुना स भृशामोदभृता न्यषेव्यत ॥ ५ ॥

५ चंद्र, कमळतंतु, चांदणें, दंव, चंदन, चांपा इत्यादींच्यायोगें आनंद देऊन अत्यंत सुखावह अशा ग्रीष्म ऋतूनें त्याची सेवा केली.

श्रितकेसरकांडपाटलीसुमनोदंभनिषंगवाहिना ।
अपि विष्टपजित्वरेषुणा तनुनाहारि शिवस्य नो मनः ॥ ६ ॥

६ आश्रयास असलेल्या बकुळी व पाडळी यांच्या फुलांच्या बाणांचा भाता धारण करणाऱ्या व ज्याचे बाण जगास जिंकणारे आहेत अशा कोमल मदनानेंसुद्धां शिवाजीचें मन हरण केलें नाहीं (तो मदनवश झाला नाहीं).

**तपतातितरां तपागमे तपनेनाशु कदुष्णतां गताः ।**

**सरितस्ततसत्त्वसंश्रयं दधुरंतः सलिलं सुशीतलं ॥ ७ ॥**

७ ग्रीष्म ऋतु आला असतां अतिशय तापणाऱ्या सूर्याच्या योगें कोमट झालेल्या पाण्याच्या खालीं नद्यांत चांगले शीतळ पाणी होतें (व) जनावरें त्या आश्रयावर तेथें होतीं.

**प्रतिवासरकल्पितांभसः सरसीः पंकनिषण्णसारसाः ।**

**विरमज्झषकच्छपावलीर्विदधे तीव्रतरातपस्तपः ॥ ८ ॥**

८ अतिशय कडक ऊन्ह असणाऱ्या ग्रीष्म ऋतूने प्रत्येक दिवशीं तलावांतील पाणी आटवून टाकल्यामुळें (कमी कमी केल्यामुळें) सारसपक्षी चिखलांत बसू लागले आणि मासे व कांसवें यांचे थवेच्या थवे मरू लागले.

**प्रतिफुल्लशिरीषपाटलीपटसौरभ्यभृता नभस्वता ।**

**स्मरतापमबीभरन्मनः सुधियां निर्विषयात्मनामपि ॥ ९ ॥**

९ फुललेल्या शिरीष व पाडळी यांच्या छताच्या सुगंधानें सुगंधित झालेल्या वायूच्यायोगें विरक्त व विद्वान लोकांच्या मनासमुद्धां कामज्वराची बाधा झाली!

\+ \+ \+ \+ \+

---

# श्रीशिवभारत-सूची.

( शं. ना. जोशी, वांईकर. )

[ सूची शक्य तितकी उपयुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. नांवापुढील पहिला म्हणजे उभ्या रेघेपूर्वीचा आंकडा अध्यायाचा असून रेघेपुढील आंकडा श्लोकाचा आहे. सूचींतील व्यक्तींचे निर्देश ती व्यक्ती कोणाकडील आणि कोणच्या प्रसंगांतील, हें कळण्याकरतां पुढील संक्षेप योजिले आहेत. ]

अ. = अफजलखान प्रसंग ( श. १५८१ )
जो. = शिद्दीजोहार पन्हाळा युध्द ( श. १५८२ )
नि. = निजामशाही सरदार
पे. = पेमगिरीची बादशाही ( श. १५५५-५८ )
भा. = भातवडीचें युद्ध ( श. १५४६ )
मु. = मुस्तफाखानाकडून शहाजीराजे यांच्यावर अटकेचा प्रसंग
मो. = मोगलाकडील सरदार.
रु. = रुस्तुमजमानशी शिवाजीचें युद्ध. ( श. १५८१ )
वि. = विजापुरकरांकडील सरदार
श. = शहाजीकडील सरदार
शा. = शाइस्तेखानाकडील सरदार
शि. = शिवाजीमहाराजांकडील सरदार
सं. = संभाजी ( शिवाजीचा भाऊ ) कडील सरदार.

## ल



## व

**शिवाजी व स्थलविशेष**